काव्यसंग्रह. १३.

अनेककविकृत पदें, कटाव, लावण्या वगैरे

# पदसंग्रह.

## भाग पहिला.

कवीं कवित्वाचा प्रबंध । कवीं नाना धाटी मुद्राछंद ।
कवीं गद्यपद्य भेदाभेद । पदप्रकार केले ॥

रामदास.

हा

**वामन दाजी ओक,**

हेडमास्तर, हायस्कूल, रायपूर,

यांनीं अर्थनिर्णायक, व अवांतर माहितीच्या टीपा देऊन,
अनेक जुनाट हस्तलिखित प्रतींच्या आधारें शुद्ध
करून व शेवटीं तीन परिशिष्टें जोडून
तयार केला.

तो

मुंबईंत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक
तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१८९४.

किंमत १॥ रुपये.

महाराष्ट्र भाषेचें आणि कवितेचें

आस्थापूर्वक अध्ययन

करूं पाहणाऱ्या सज्जनांस

हा ग्रंथ

सप्रेम अर्पण करतों.

'काव्यसंग्रह'कार.

KÂVYASANGRAHA. 13.



# A COLLECTION OF MARÂṬHÎ PADAS.

BY

## VARIOUS MARÂṬHÎ POETS.



"*It should be the earnest endeavour of every educated person to maintain inviolate the purity of his native language---to be familiar with the history of its rise and progress.*"

*FREDERICK SCHLEGEL.*



## PART I.



*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

BY

VÂMANA DÂJÎ OKA.

HEAD MASTER, HIGH SCHOOL, RAIPORE.



PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂMA JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGARA" PRESS.

Bombay.

1894.

*Price* $1\frac{3}{4}$ *Rupees.*

# अनुक्रमणिका.


| अनुक्रमांक. | कविनाम. | पदसंख्या. | पृष्ठांक. |
|---|---|---|---|
| १ | मुकुंदराजकृत पदें (१–२) .... .... | २ | १–२ |
| २ | ज्ञानदेवकृत पदें (३–२४) .... .... | १२ | २–१३ |
| ३ | मुक्ताबाईकृत पदें (२५–२९) .... .... | ५ | १३–१५ |
| ४ | नामदेवकृत पदें (३०–३९) .... .... | १० | १५–२३ |
| ५ | जनाबाईकृत पदें (४०–४३) .... .... | ४ | २३–२६ |
| ६ | एकनाथकृत पदें (४४–१२०) .... .... | ७७ | २६–६२ |
| ७ | त्र्यंबककृत पदें (१२१–१३५).... .... | १५ | ६२–६९ |
| ८ | तुकारामकृत पदें(१३६–२१६).... .... | ८१ | ६९–१०० |
| ९ | कान्होबाकृत पदें(२१७–२१८).... .... | २ | १००–१०० |
| १० | रामदासकृत पदें(२१९–३३२).... .... | ११४ | १०१–१४३ |
| ११ | केशवस्वामीकृत पद (३३३–८००) .... | ४६८ | १४३–२९० |

एकंदर ग्रंथसंख्या—८००


# परिशिष्टें.


| अनुक्रमांक. | परिशिष्टनाम. | पृष्ठांक. |
|---|---|---|
| १ | पदांची सूची .... .... .... .... .... | १–१३ |
| २ | पाठभेद..... .... .... .... .... .... | १४–१९ |
| ३ | अधिक कडवीं .... .... .... .... .... | २०–२३ |

## सूचना.

हा भाग तयार करतेवेळीं अनेक 'काव्यसंग्रह'हितैषी मित्रांनीं साहाय्य केलें. रा॰ रा॰ भगवंत बाळकृष्ण पै रायकर (होडावडें), व्यंकटेश यशवंत शिंगबाळ (गोवें), गोविंद विष्णु श्रीखंडे (खांडवा), नारायणराव मास्तर (खांडवा), पांडुरंग आबा जोशी मोघे (वसई), चिंतो गोविंद वैशंपायन (पालशेत), गणपतराव रामचंद्र गनोदवाले (रायपुर), सदाशिवराव मास्तर (रायपुर), व्यंकट श्रीकर (रायपुर), मोरेश्वर वासुदेव कर्वे (भिंवडी), दाजी मनोहर पांड्ये (रायपुर) व मथुराबाई श्रीखंडे (सागर) यांनीं आम्हांस अनेक हस्तलिखित प्रती मिळवून दिल्या याबद्दल आम्ही सकल सन्मित्रांचे फार फार आभार मानतों.

'काव्यसंग्रह'कार.

# अनेककविकृत पदें, कटाव, लावण्या, वगैरे.

## भाग पहिला.

### मुकुंदराजकृत पदें.[1]

#### पद १ लें.

उबगल्यें[2] सासऱ्या आतां मज माहेरासि न्या हो ! ।
तोडा येवढा जाच, पडतें तुमच्या पायां हो ! ॥ ध्रुवपद. ॥

त्रिविध[3] ताप सासरा प्रभु मज उगाचि गांजतो ।
भेद भयंकर भाऊ हा तर उगाचि जाळितो ॥
क्रोध माझा दिर तो मजला भलतेंच बोलतो ।
काम माझा दादला सखे गे! भलतिकडे जातो. ॥ उब० ॥ १ ॥
सासू ही कल्पना मजला करिति जाच नाना ।
अविद्या ही नणंद बाइ ! तर उगीच राहीना ॥
आशा ममता जावा यांनीं मांडियली दैना[4] ।
कुठवर सोसूं जाच? आतां कदापि राहीना. ॥ उब० ॥ २ ॥
अहेव[5] मायेचा तंतू[6] हा तर बळेंच तोडीन ।
प्रपंचाचें लुगडें हें तर उभेंच फाडीन ॥
जो मज माहेर दाविल त्याची मी सेवा करीन ।
**मुकुंदराज** म्हणे लाज बाइ ! गेली उडोन. ॥ उब० ॥ ३ ॥

---

१. **मुकुंदराज** या नांवाचा एक साधु कवि सुमारें सातशें वर्षांपूर्वी झाला. हा जातीचा देशस्थ ब्राह्मण असून **'जोगाईचें आंबें'** या गांवचा राहणारा होता. 'जोगाईचें आंबें' म्हणजे जाधवकुळांतील जयंतपाळाचें प्रधाननगर (राजधानी). हें निझामशाहींत असून त्याला हल्लीं **'मोमीनाबाद'** म्हणतात. मुकुंदराजानें जयंतपाळास आत्मज्ञानाचा उपदेश करण्यासाठीं **'विवेकसिंधु'** नामक ग्रंथ रचिला. याचा **'परमामृत'** म्हणून दुसरा ग्रंथ आहे. या ग्रंथांतील प्रतिपादन शांकरदर्शनानुसारी आहे. याची वाणी शुद्ध, प्रौढ आणि सरळ आहे. याची समाधि 'जोगाईच्या आंब्या'स डोंगराच्या कड्यावर आहे. २. त्रासल्यें, कंटाळल्यें. ३. आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक असे तीन प्रकारचे ताप. ४. दैन्य, गरीबी, गांजणूक. ५. सुवासिनी स्त्री. ६. सौभाग्यतंतु.

### पद २ रें.

हे खुण अनुभवाची पिंडीं परतोनी पाहे ।
आपेआप प्रकाशलें तेणें आनंदें राहे ॥ ध्रुवपद. ॥
पश्चिमदिशेसि जातां उजवा टाकिला मेरु ।
अनुहात गगन गर्जे थोर उठला गजरु ॥ हे खुण० ॥ १ ॥
त्रिकुटीं स्थिरावला मनपवन वारु ।
जिंकिले पंचबाण केला विषयासी मारु ॥ हे खुण० ॥ २ ॥
आधारी नाभ मुळी तीही एकचि तंतु ।
सहस्रदळावरती तेथें राहे निवांतु ॥ हे खुण० ॥ ३ ॥
विघडले संद बंद षट्चक्राची माळ ।
चंद्रावीण चांदणें दिसे मुक्ति कल्होळ ॥ हे खुण० ॥ ४ ॥
आशा मनषा दया क्षमा असति जया अंतरीं ।
मुकुंदराज योगी सदा सुखिया होय आधारी ॥ हे खुण० ॥ ५ ॥

---

## ज्ञानदेवकृत पदें.[१]

### पद ३ रें.

ऐसा गे! माय! कैसा हा योगी? ।
जे ठायीं जन्मला तो ठाय [२]भोगी. ॥ ध्रुवपद. ॥
माय कुमारी बाप ब्रह्मचारी ।
एकविस पुत्र झाले उदरीं ॥ ऐसा गे० ॥ १ ॥

---

१. ज्ञानदेव ह्याचा जन्म शके ११९७ श्रावण वद्य ८ स आळंदी येथें झाला, आणि तेथेंच हा शके १२१८ कार्तिक वद्य ८ स समाधिस्थ झाला. यास ज्ञानेश्वर, ज्ञानोबा असेंही म्हणतात. याचे ज्ञानेश्वरी (भावार्थदीपिका), अमृतानुभव, आणि चांगदेवपांसष्टी असे मुख्य ग्रंथ आहेत. याची कविता प्रासादिक आणि गहन असून तिचा विषय भक्ति, वैराग्य आणि आत्मबोध हा आहे. ह्याची वाणी रसाळ, उपमारूपकादिकालंकारपूर्ण आहे. याची वर्णन करण्याची शैली इतकी चटकदार आहे कीं वर्ण्य विषयाची प्रतिमा प्रत्यक्ष डोळ्यांपुढें उभी केलेली असते. इतकें आहे तथापि याचे ग्रंथ गहनविचारांनीं भरलेले असल्यामुळें ते सहज समजण्यासारखे नाहींत. याचीं पदें, अभंग इत्यादि कविता ही गहन आहे व तिच्यावर त्याच्या ग्रंथांतील प्रमुख विचारांची छाया पडली आहे. **'ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र'** या नांवाचा ग्रंथ रा० बळवंत खंडोजी पारख यांनीं लिहिला आहे तो जिज्ञासु जनांनीं पाहिला असतां या कवीची ओळख चांगली होण्यासारखी आहे. २. हें कूटपदांपैकीं आहे.

आचार सांडोनी झालासे भ्रष्ट ।
मावशीसीं जेणें लाविला पाट. ॥ ऐसा गे० ॥ २ ॥
आणिक याचें नवल सांगू मी कायी? ।
बहिण भोगिली एकेचि ठायीं. ॥ ऐसा गे० ॥ ३ ॥
पितयाचा अंश घेऊनी आला ।
मातेसि जेणें उपभोग केला ॥ ऐसा गे० ॥ ४ ॥
ज्ञानदेव म्हणे अनुभवी जाणें ।
अनुभवावांचूनि कांहींच नेणें. ॥ ऐसा गे० ॥ ५ ॥

### पद ४ थें.

सावध होउनि बाई! आत्मरूप पाहीं डोळां गे! ।
प्रत्यक्ष गुरुची साक्षी चक्षू[1] लक्षीं घनसांवळा[2] गे! ॥ ध्रुवपद. ॥
त्रिकुटगिरीचे शिखरीं क्रीडा करितो नानापरी गे! ।
रसनेविण[3] चाखे तो अलक्ष्य नांदे सर्वांतरीं गे! ॥
जागृति स्वप्न सुषुप्ती[4] तुर्या[5] भोगिति उन्मनि[6] नारी गे! ।
चाळक चिन्मय[7] आत्मा नांदे इंद्रियव्यापारीं गे! ॥ सावध० ॥ १ ॥
कुंकुममय मंदिरीं शुभ्र स्फटिक शीळेवरी गे ।
श्याम सुनीळ रूप मनोहर इंद्रनिळा[8]चेपरी गे ॥
झळझळ झळके स्वरूप माझ्या अंतरिंचें अंतरीं गे! ।
संतां शरण जाई ते तुज दाविति आपुले करीं गे! ॥ सावध० ॥ २ ॥
होऊनी अनुभवी विश्वीं विश्व विश्वाकारीं गे! ।
अनुवाद[9] न साहे आहे गगनाचीयापरी गे! ॥
प्रत्यक्ष अनुभव असतां जैसा अंमलक[10] हस्तावरी गे! ।
गुरुविण प्राणी जंव हा निर्गुरा[11] पडला दुरिचे दुरी गे! ॥ सावध०॥३॥
गुरुविण जंव हा प्राणी शब्द संताचे गोफाटीं[12] गे! ।
दिसे तितुकें नासे ऐशा भ्रमिष्ट सांगे गोष्टी गे! ॥

---

१. डोळा. २ घनश्याम. ३. जिव्हेविना. ४. या देहाच्या अवस्था आहेत. ५. समाधिरूप चौथी स्थिति. ६. मनाचा लय होतो अशी पांचवी स्थिति. ७. ज्ञानमय. ८. एकरत्न. ९. उक्त भाषणांचा सर्वांस चांगला बोध व्हावा म्हणून केलेला पुनरुच्चार. १०. आंवळा. ११. गुरुहीन, ज्याला गुरु नाहीं तो, ज्यानें गुरु केला नाहीं तो. १२. गोफाटा=क्लेश, त्रास, पीडा. [गोफाट्यांत पडणें, मांपडणें, घालणें—असा प्रयोग होतो.]

आत्माच कळला नाहीं, जपतप साधन तीर्थे खोटीं गे ! ।
ज्ञानदेव म्हणे न सुटती संसाराच्या गोष्टी गे ! ॥ सावध० ॥ ४ ॥

## पद ५ वें.

[1]विठोबा ! मी कसा विसरूं कसा विसरूं ? । तूं माय मी लेंकरूं. ॥ ध्रुवपद. ॥
नऊ महिने गर्भी असतां । कुठवरी मी धिर धरूं ? ॥ विठोबा० ॥ १ ॥
पांच पंचविस पाठि लागती । आतां कसा मागें सरूं ? ॥ विठोबा० ॥ २ ॥
कागद कोरा काळी शाई । लेखणिस आणिला बेरू[2] ॥ विठोबा० ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे सख्या विठोबा ! । निवृत्ति आमचा गुरू. ॥ विठोबा० ॥ ४ ॥

## पद ६ वें.

कांट्याच्या [3]अणिवर वसति तिन गांव । दोन ओसाड, एक वसेचि ना. ॥
वसेचि ना तेथें आले तीन [4]कुंभार । दोन [5]थोटे, एक घडीच ना. ॥
घडीच ना त्यानें घडलीं तीन मडकीं । दोन कच्चीं, एक भाजेचि ना. ॥
भाजेचि ना त्यांत रांधले तीन मुगे । दोन हिरवे, एक शिजेचि ना. ॥
शिजेचि ना तेथें आले तीन पाहुणे । दोन रुसले, एक जेवीच ना. ॥
जेवीच ना त्याला दिल्ह्या तीन म्हसी । दोन वांजा, एक फळेचि ना. ॥
फळेचि ना तिला झाले तीन टोणगे । दोन मेले, एक वांचेचि ना. ॥
वांचेचि ना त्याचे आले तीन रुपये । दोन खोटे, एक चालेचि ना. ॥
चालेचि ना तेथें आले तीन पारखी । दोन आंधळे, एका दिसेचि ना. ॥
दिसेचि ना त्याला मारल्या तीन बुक्या । दोन [6]हुकल्या, एक लागेचि ना. ॥
ज्ञानदेव म्हणे याचा तो अनुभव । सद्गुरुवांचुनि कळेचि ना[7]. ॥

## पद ७ वें.

उन्मनी लागो नीज, ।
निजीं निज बाळा ! सहज चैतन्याची पालखी रे ! ॥

---

१. विठोबा, विठ्ठल, विठाई हीं सर्व एकाच देवाचीं नांवें होत. विठोबा हा कृष्ण होय. एकदां राधा कृष्णाच्या मांडीवर बसली असतां तेथें रुक्मिणी आली, तेव्हां राधेनें तिला अभ्युत्थान दिलें नाहीं म्हणून ती आपला अपमान झाला असें समजून रागानें दिंडीरवनांत येऊन तपश्चर्या करूं लागली. जेथें हल्लीं श्रीपंढरपुर क्षेत्र आहे तेथें पूर्वी दिंडीरनामक दैत्याचें वन होतें. या वनांत रुक्मिणी असतां कृष्णानें तेथें येऊन तिची मनधरणी करून समजूत केली. नंतर त्या दोघांनीं तेथें 'विठोबा रुक्माई' हीं नांवें धारण करून अखंडवास केला—असें वर्णन ग्रंथांतरीं आहे. २. बोरू. ३. टोंकावर, अग्रावर. ४. कुंभकार या शब्दाचा कुंभार हा अपभ्रंश आहे. ५. हस्तहीन. ६. फुकट गेल्या. ७. हें कूट पद आहे.

शुद्ध सुमनाची[1] शेजे[2] ।
तेथें तूं निद्रा करी चहूं वाऱ्यांशि गूज र । ॥ ध्रुवपद. ॥
आधार बा! मूळबंध वाम चरण निरुद्ध रे! ।
स्वाधिष्ठानीं लिंगस्थान तेथें धरीं प्रसिद्ध रे! ॥ शुद्ध० ॥ १ ॥
दक्षिणेचा चरण माथां ठेवुनियां निर्बंध रे! ।
तयासि तूं रक्ष आधीं, सिद्धासन तें शुद्ध रे! ॥ शुद्ध० ॥ २ ॥
अनुहत बा! हृदयस्थान जेथें वायूचें संधान रे! ।
साधना लावि त्याशीं नित्य करुनि संधान रे! ॥ शुद्ध० ॥ ३ ॥
घंटांचे नाद होती तेथें राहुनि लीन रे! ।
विशुद्धी कंठस्थान वेगें जाये जिंकोनि रे! ॥ शुद्ध० ॥ ४ ॥
अग्नी चक्र भ्रू मध्यांगे भोगी सुषुम्नेच्या[3] अंगें रे! ।
प्राणापान समरशीं प्रणवाचा संयोग रे! ॥ शुद्ध० ॥ ५ ॥
सत्रावीचें क्षीर घेई लंबीकेच्या नी मार्गें रे! ।
अलक्षाशीं लक्ष लावीं बैसोनियां राजयोग रे! ॥ शुद्ध० ॥ ६ ॥
पाहें पां सहस्रदळ शुद्ध स्वरूप केवळ रे! ।
त्रिज्ञानें हे दृष्टि लाहे ज्ञान राहे समूळ रे! ॥ शुद्ध० ॥ ७ ॥
निजतत्वांशि निज रे बाळा! जेथें ब्रह्म निष्कळंक रे! ।
'अहं ब्रह्म' जाणशील तुझा तूंचि केवळ रे! ॥ शुद्ध० ॥ ८ ॥
यालागीं बा! सद्गुरुचे चरण सेवीं निरंतर रे! ।
पावशील ब्रह्मपदा तेथें धरुनि निर्धार रे! ॥ शुद्ध० ॥ ९ ॥
स्वानंदाचें सुख ················ थोर रे! ।
निवृत्तिज्ञानदेवीं·······अपार रे! ॥ शुद्ध० ॥ १० ॥

## पद ८ वें.

चाल माझ्या विठो! । तुम्ही आम्ही भेटों ॥ ध्रुवपद. ॥
अणकाईवर ठणकाई तीवर बसला खुबा ।
मिसकिन माझी फुसकन पादली जांवई हा गे! उभा ॥ चाल० ॥ १ ॥
काजळ कुंकू करूनि गेले केकतीच्या वना ।
सोळाजण दादले केले कोणीच नये मना ॥ चाल० ॥ २ ॥

---

१. पुष्पांची. २. शय्या. ३. सुषुम्ना=इडा आणि पिंगळा यांच्या मध्यसंधींतील नाडी.

आंत पोकळ बाहेर पोकळ कोल्हाट्याचा वेळू ।
म्हातारपणीं दादला केला त्याचें डेंगणें पेळू ॥ चाल० ॥ ३ ॥
कर्म नेणों धर्म नेणों नेणों आम्ही कांहीं ।
ज्ञानदेव म्हणे आम्हां येणें जाणें नाहीं ॥ चाल० ॥ ४ ॥

**पद ९ वें.**

काय थांगुं तूतें बाई ! । काय थांगुं तूतें ? ॥ ध्रुवपद. ॥
जात होतें पानीया तेथें भेतला सावळा ।
दोयबल तोपि मयुलपिछाची खांद्यावली कांबला ॥ काय थांगुं०॥ १ ॥
घुलगें माझें फुतलें मग मी ललत बैसलें ।
कुनिकुन आला सालंगपानी[1] मला पोतासी धलीलें॥ काय थांगुं० ॥ २ ॥
मला पोतासी धलीलें सुख मोतें वाटलें ।
निवेलतीचे[2] कलपेकलुनी ज्ञानदेवा लाधले ॥ काय थांगुं० ॥ ३ ॥

**पद १० वें.**

फुगडी फु गे ! बाई ! निजब्रह्म तूं गे ! बाई ! ।
मनचित्त धु गे ! बाई ! विषयावरी थु गे ! बाई ! ॥ ध्रुवपद. ॥
एक नाम मांडी बाई ! दुजा भाव सांडी बाई ! ।
हरी आले रंगा बाई ! सज्जनाचे संगें बाई ! ॥ फुगडी० ॥ १ ॥
सकळ पाही हरी बाई ! त्याचे चित्तीं धरीं बाई ! ।
वामन दक्षाच्या भुजा बाई ! आलिंगीन गे बाई ! ।
ज्ञानदेव गोडी बाई ! संसारफुगडी बाई ॥ फुगडी० ॥ २ ॥

**पद ११ वें.**

सौरी झालें जनीं । राम केला धनी ॥ ध्रुवपद. ॥
अनुताप वैराग्याचा नेसलें मी शेला ।
मागील कर्म ठावें नाहीं पुसूं नको मला. ॥ सौरी० ॥ १ ॥
शांतीगुंति घेउनि हातीं भक्ती चोळी ल्याली ।
मीतूंपण ठावें नाहीं वीसरून गेली. ॥ सौरी० ॥ २ ॥
भावाची मी साडी मायेची घरघुसी ।
कृष्ण पुरुष वरीयेला मग कैंची रंडी. ॥ सौरी० ॥ ३ ॥

---

१. शार्ङ्गपाणि. (कृष्ण.) २. निवृत्तीचे.

कर्म नेणें धर्म नेणें नेणों आम्ही कांहीं ।
ज्ञानदेव म्हणे आम्हां येणें जाणें नाहीं. ॥ सौरी० ॥ ४ ॥

### पद १२ वें.

कसें रे! बोटानें दाखवूं तुला । पहा अनुभव गुरुच्या मुला! ।
नको सोडूं देटिंचा मुळा । सोड अंजुळी आपुल्या कुळा ॥ ध्रुवपद. ॥
किति पाहाशिल पहा भोंवतें । येतां जातां सर्वें आसतें ।
तुझ्या पाठीं पायांगतें । तुझ्या लोचनीं चमकतें. ॥ कसें० ॥ १ ॥
ही खुण त्वां वळखुन घ्यावी । गुरुपुत्रा जाउनि पुसावी ।
तो नेउन तुज दाखवी ज्ञानदेवें सांगीतली । तेणें मुक्तीही जोडली ॥ २ ॥

### पद १३ वें.

सोही कच्चा बे कच्चा बे । नहीं गुरूका बच्चा ॥ ध्रुवपद. ॥
दुनियां त्यज कर खाक लगाई जाकर बैठा [१]बनमों ।
खेचरिमुद्रा बज्रासनमों ध्यान धरत है मनमों. ॥ सोही० ॥ १ ॥
तीरथ करके उंमर [२]खोई जोग जुगुतमों सारी ।
धन कामिन कुंजर लागे जोग कमाया भारी. ॥ सोही० ॥ २ ॥
गुप्त होकर परगट होवे गोकुल मथुरा काशी ।
सिद्धजी हुवे प्राण निकाले सत्यलोकके बासी. ॥ सोही० ॥ ३ ॥
शास्त्रमें तो कुच नहिं रह्या पुरान गायन माया ।
भेदविदीका मारग चलता तनका लगका लीया. ॥ सोही० ॥ ४ ॥
कुंडलनीकू खूब चढावे [३]ब्रह्मरंध्रकू जावे ।
चलता है पानीके उपर बोलत सोई होवे ॥ सोही० ॥ ५ ॥
हुकुम निवृत्तिका ज्ञानेश्वरकू तीन उपर मेना ।
सद्गुरूकी कृपा भई जद आपी आप पिछाना. ॥ सोही० ॥ ६ ॥

### पद १४ वें.

धर्म [४]जागो देवाजीचा, जो कां परोपकारी, ।
आंधळ्यास दृष्टी देतो, त्याचें नाम मी उच्चारीं. ॥ ध्रुवपद. ॥

---

१. वनांत. २. घालविली. ३. मस्तकांतील पोकळी. ४. जागृत असो.

पूर्वजन्मीं पाप केलें तें म्यां बहुत निस्तारिलें, ।
[1]चौऱ्यायशीं लक्ष योनी फिरतां दुःख भोगिलें, ॥
........................................... ।
ज्ञानदृष्टी हारपली, दोनी नेत्र अंध झाले. ॥ धर्म जागो० ॥ १ ॥
संसार दुःख मूळ चहूंकडे [2]इंगळ ।
विश्रांति नाहीं कोठें, रात्रदिवस तळमळ ॥
कामक्रोध लोभ [3]सूणें पाठि लागलें वोढाळ, ।
कोणासि मी शरण जाऊं? दृष्टी देईल निर्मळ. ॥ धर्म जागो० ॥ २
मातापिता बंधुबहिणी कोणी न येती [5]निर्वाणीं, ।
इष्टमित्र स्वजन सखे हे [6]तंव सुखाची मांडणी; ॥
एकला मी दुःख भोगीं [7]कुंभपाकीं जाचणी, ।
तेथें कोणी सोडविना एका सद्गुरुवांचूनी. ॥ धर्म जागो० ॥ ३ ॥
साधूसंत मायबाप तिहिं मज केलें कृपादान, ।
पंढरीस नेवोनियां घडलें [8]चंद्रभागेस्नान; ॥

---

१. या चौऱ्यायशीं लक्ष योनींची संख्या अशीः—२१ लक्ष अंडज खाणींत [९ लक्ष यो सर्प मुंगी इत्यादि, ४ लक्ष योनि जळचरांत, ८ लक्ष योनि पक्षिकुळांत,—मिळून २१ ल २१ लक्ष जारज खाणींत [९ लक्ष द्विपद योनि, ४ लक्ष चतुष्पद योनि, ८ लक्ष श्वा योनि,—मिळून २१ लक्ष]; २१ लक्ष उद्भिज्ज खाणींत [९ लक्ष अन्नधान्यादिक, ४ सुगंधादिक पदार्थ, ८ लक्ष वृक्ष तृण इत्यादि,—मिळून २१]; २१ लक्ष स्वेदज खाणींत [९ तारागणादिक, ४ लक्ष मेघमाला, ८ लक्ष हिरे रत्न माणिकादि, मिळून २१ लक्ष]; याप्र प्रत्येक खाणींत २१ मिळोन चार खाणींत ८४ योनि होतात. दुसऱ्या मताप्रमाणें २१ लक्ष वृक्षयो ११ लक्ष कीटकयोनि, ३० लक्ष पशुयोनि, ९ लक्ष जळचर योनि, १० लक्ष पक्षियोनि, आणि ४ मनुष्ययोनि, मिळून ८४ लक्ष योनि होतात. २. अग्नि, निखारा. ३. भटकणारें गुरुं. ४. भटक० ५. अखेरच्या प्रसंगीं, संकटीं. ६. जोंपर्यंत सुखाची व्यवस्था आहे तोंपर्यंत. ७. एक नरक ज येथें पातकी जनांस कुंभांत (मडक्यांत) घालून शिजवितात असा समज आहे. ८. पंढरपुराजवळ भीमानदीला चंद्रभागा असें म्हणतात. हिची कथा अशी आहेः—इंद्रानें अहल्येशीं कप धारण करून जारकर्म केलें. त्या कामीं चंद्रानें इंद्रास साहाय्य केलें म्हणून गौतमानें क्रोधानें ' कुष्ट होईल' असा चंद्राला शाप दिला. तेव्हां चंद्र गौतमाला शरण आला. नंतर मुनीनें 'भी रथींत (भीमानदींत) स्नान कर म्हणजे तुझें कोड जाईल' असा उःशाप दिला. चंद्रानें त्याप्र केलें तेव्हां तो पूर्वीसारखा झाला. चंद्राच्या भागाप्रमाणें (कोरीप्रमाणें) जेथें भीमरथीचा प्रवाह झालेला आहे तेथें तिला चंद्रभागा असें अन्वर्थक नांव पडलें—अशी कथा पुराणांतरीं आहे.

[1]पुंडलिक वैद्यराज पूर्वी साधिलें साधन, ।
वैकुंठींचें मुळस्थाना दृष्टी केलें अंजन. ॥ धर्म जागो० ॥ ४ ॥
कृष्णांजन एकवेळ डोळां घातलें अढळ ।
[3]तिमिर दुःख गेलें, तुटलें भ्रांतीचें पेंडळ. ॥
सद्गुरु निवृत्ति दाता मार्ग दाविला निर्मळ ।
[6]बाप रुक्मादेवीवर विठोबा दयेचा कृपाळ. ॥ धर्म जागो० ॥ ५ ॥

---

१. पुंडलिक बळरामाचा अवतार होय असें समजतात. पुंडलीक हा एक देशस्थ ब्राह्मण होता. याच्या बापाचें नांव जानुदेव आणि मातेचें नांव सत्यवती. हा आपल्या पत्नीसह सुख भोगून मातापितरांस अनेक प्रकारांनीं छळीत असे. तीं काशीयात्रेस जावयास निघालीं तेव्हां हाही स्वपत्नीसह त्यांच्या बरोबर निघाला. मार्गीनें यानें आपल्या वृद्ध मातापितरांस पुष्कळ त्रास दिला. काशीस आल्यावर हीं सर्व मनुष्यें कुक्कुटस्वामी नामक महातापसाच्या आश्रमासमीप उतरलीं होतीं. तेथें रात्रौ पुंडलिकास गंगा, यमुना, सरस्वती या तीर्थदेवतांचा साक्षात्कार झाला. कुक्कुटस्वामी हे साक्षात् मातृपितृसेवारत श्रावणाचे अवतार होत. यांची गोष्ट त्या देवतांनीं पुंडलिकास सांगून त्याचे डोळे उघडिले व त्याला शुद्धीवर आणिलें. तेव्हां त्याला आईबापांस दुःख दिलें म्हणून परम पश्चात्ताप झाला. त्याला लागलीच उपरति झाली आणि तो मातापितरांच्या आज्ञेंत राहून त्यांच्या एकनिष्ठ सेवेंत सुख मानून राहूं लागला. नंतर तो त्यांच्यासह काशीहून परत आला आणि भीमातटीं गरसळें नामक गांवीं कायावाचामनेंकरून त्यांची सेवा करीत राहिला. पुढें याला नारदाचें दर्शन झालें. 'भगवान् श्रीकृष्ण येतील तोंपर्यंत तूं असाच राहून त्या देवाचें नांव 'श्रीविठ्ठल' असें सुप्रसिद्ध कर' असें त्याला सांगून नारद इष्टस्थलास गेले. पुढें रुक्मिणी रुसून आली होती तिची समजूत करण्यासाठीं देव श्रीकृष्ण तेथें आले. तिची समजूत घालून तिच्यासह दिंडीरवनांत पुंडलिकाची झोंपडी होती तेथें देव येऊन उभे राहिले. त्यानें केलेली मातापितरांची सेवा पाहून देवांनीं प्रसन्न होऊन त्याला जन्ममरणबंधमुक्त केलें. 'जे कोणी चंद्रभागेंत स्नान करून श्रीविठ्ठलनामाचा जप करुन देवदर्शन घेतील ते संसारपाशमुक्त होतील' असा वरही दिला. प्रत्येक दिवसीं पुंडलिकास भेटण्यासाठीं सर्व तीर्थें येतात अशी भक्तजनांची समजूत आहे. पुंडलीकाचें सविस्तर चरित्र 'भक्तिकथामृत' नामक ग्रंथांत दिलेलें आहे. २. काळें अंजन. ३. अंधकार. ४. पडदा, वस्त्र. ५. निवृत्तिनाथ हा सुप्रसिद्ध ज्ञानदेवाचा ज्येष्ठ बंधु आणि गुरु. याचा जन्म शके ११९५ माघ शुद्ध १ या दिवशीं झाला, आणि हा त्र्यंबकेश्वरीं शके १२१६ ज्येष्ठ वद्य १३ स समाधिस्थ झाला. याचीं पदें वैराग्यपर आणि भक्तिपर अशीं असून प्रेमळ आहेत. याचा 'वृत्तिबोध' नामक एक ग्रंथ आहे असें म्हणतात पण तो कोठें उपलब्ध असल्याचें प्रसिद्ध नाहीं. ६. ज्ञानेश्वरानें आपल्या पदांच्या आणि अभंगांच्या शेवटीं 'बाप रखुमादेवीवरू विठोबा' असें भगवन्नामदर्शक अथवा जनकजननीनामवाचक पद योजिलें आहे. कोठें कोठें निवृत्तिनाथाचेंही नांव घातलें आहे.

### पद १५ वें.

विठाई कीठाई माझे कृष्णाई कानाई । रंगा येई हो ! येई ॥ध्रुवपद.॥
कटिकरविराजित तैसी येई गा! धांवत सत्वर ।
विश्वरूप विश्वंभरे कमलनयन कमळाकर ।
मुगुटरत्न हा जडित कांसे कसीला पीतांबर ।
तुझें ध्यान लागो बरें बाप रखुमादेवीवर ॥ ॥ विठाई० ॥ १ ॥

### पद १६ वें.

गोड तुझें नाम विठोबा! आवडतें मज ।
दुजें विचारितां मना वाटतसे लाज ॥ ध्रुवपद. ॥
कर्म आणि धर्म आचरती जयालागीं ।
साधक शीणले साधन साधितां अभागी ॥ गोड० ॥ १ ॥
भक्ति आणि मुक्ति नामापासीं ह्या प्रत्यक्ष ।
चारी वेद साहा शास्त्रें देताती साक्ष ॥ गोड० ॥ २ ॥
रखुमादेवीवरा बापा विठ्ठलाची आण ।
कायावाचाचित्तें चरणीं ठेविलीस गहाण ॥ गोड० ॥ ३ ॥

### पद १७ वें.

मज न गमे आणीक कांहीं । श्रीविठ्ठलावांचुनी ॥ ध्रुवपद. ॥
ज्ञान धन संपत्ति । ब्रह्मपदप्राप्ति ।
जरी होय लक्षपति । आणीक चाड नाहीं ॥ मज० ॥ १ ॥
धर्मशास्त्रश्रवण । क्रिया कर्म दानाचरण ।
मती तर्क व्याकरण । आणीक चाड नाहीं ॥ मज० ॥ २ ॥
म्हणे योगी ज्ञानेश्वर । हाचि माझा निर्धार ।
बाप रखुमादेवीवर । आणिक चाड नाहीं ॥ मज० ॥ ३ ॥

### पद १८ वें.

मोगरा फुलला मोगरा फुलला ।
फुलें वेंची तात बा ! रूकळी यासी आला ॥ ध्रुवपद. ॥
कैवल्यस्वरूप लावीयेलें द्वारीं ।
त्याचा वेल गेला गेगनावरी ॥ मोगरा० ॥ १ ॥

---

१. बांधिला. २. आकाशावर.

मनाचीये मणीं गुंफियेला झेला ।
बाप रखुमादेवीवरू विठ्ठला अर्पिला ॥ मोगरा० ॥ २ ॥

पद १९ वें.

हमामा पोरा हमामा । घुमरी वाजे घुमामा ॥ ध्रुवपद. ॥
हमामा घालीं बाळा ! । सांडीं खोटे चाळा ॥
पोरा ! तुझा फोडीन बाळा । वांकुल्या दावी काळे ॥ हमामा० ॥ १ ॥
हमामा घालीं बा रे ! । आंगीं भरलें वारें ॥
कांखेस पिकलीं बोरें । आम्हीं जाऊं वयल्या द्वारें ॥ हमामा० ॥ २ ॥
हमामा घालीं नेटें । सांडी बोलणें खोटें ॥
आतां पोरा ! जाशी कोठें । कान्होबाचें बळ मोठें ॥ हमामा० ॥ ३ ॥
हमामा घाली सोई । संभाळीं सावध होई ॥
एक नेम रे ! तूं राहीं । मग आत्मसुख पाहीं ॥ हमामा० ॥ ४ ॥
हमाम्याचा नाद वाजे । अनुहात कोंपर गाजे ॥
रत्नजडित मुकुट साजे । बाप रुक्मादेवीवर विठ्ठल राजे ॥ हमामा० ॥५॥

पद २० वें.

मन हें धालें मन हें धालें । अंतर बाहेर गुंगुन गेलें ॥ ध्रुवपद. ॥
विठ्ठल म्हणतां सरलें पाप । पदरीं पडलें पुण्यमाप ॥
जहाला दिनाचा मायबाप । विठ्ठलची ॥ मन० ॥ १ ॥
विठ्ठल जळीं स्थळीं भरला । रिता ठाव नाहीं उरला ॥
तो म्यां दृष्टीनें पाहिला । विठ्ठलची ॥ मन० ॥ २ ॥
विठ्ठल आसनीं शयनीं । विठ्ठल आणिला निदानीं ॥
अखंड वदो माझी वाणी । विठ्ठलची ॥ मन० ॥ ३ ॥
तो हा चंद्रभागे तीरा । पुंडलीकाला दिधला थारा ॥
बाप रुक्मादेवीवरा । जडलें पाईं ॥ मन० ॥ ४ ॥

पद २१ वें.

कृष्ण आळवा वय आळवा परतुनी मातें दावा ॥ ध्रुवपद. ॥
रांगत रंगणीं चोरित लोणी धांवुनि धरिती गौळणी ॥
बांधिती चरणीं देति गाऱ्हाणीं यशोदे साजणी ॥
दधि दुध भक्षुनी तैमाळनीळें नवल केलें साजणी ॥

१. हा एक खेळ आहे. २. वाद्यविशेष. ३. तृप्त झालें. ४. कृष्णें.

कृष्ण कान्हा मधुसूदना कामिनीमनमोहना ॥
गोपीध्याना हरिस्मरणा योगीध्याना मानसकान्हा बोलती यमुना ॥
तोड ॥ कृष्णानें नीवसी बानेनीवसी आकाळतो नाकळीसीं ॥ कृष्ण० ॥ १ ॥
इंद्रनीळा श्रुतिजन किरळासुरजन घनसांवळा ॥
कंठीं माळा, कौस्तुभ गळां, प्रीती तुळशीदळा ॥
कासे कशिला सोनसळा[१], उभा बळिभद्र जवळा ॥
तोड ॥ कृष्ण सांवळा बाप डोळसू सहज परमहसूं ॥ कृष्ण० ॥ २ ॥
सदानंदा बाळमुकुंदा श्रीहरि प्रेमानंदा ॥
आनंदकंदा भयनिर्दाळा पावकनंदा घेनुलुब्धा गोविंदा गोपाळा ॥
तोड ॥ कृष्ण आमुचा बय आमुचा खेळण गौळीयांचा ॥ कृष्ण० ॥ ३ ॥
कर्पुरगौरा मानसस्थीरा पुराणपुरुषा गंभीरा ॥
विराधवीरा महावीरा पांडवदळसाकारा ॥
मथुरानगरीं कंसासुरा शिक्षा लावी चातुरा ॥
अतिसुंदरा तूं पेंदारा बाप रखुमादेवीवरा ॥
तोड ॥ कृष्णा जाणितलें बा! जाणितलें माझें मज दिधलें ॥ कृष्ण० ॥ ४ ॥

## पद २२ वें.

देखिला हो! हरि हा देखिला हो! । विश्वव्यापक मुरारी ॥ ध्रुवपद. ॥
आजि सोनियाचा दीन । वर्षे अमृताचा घन[२] ॥ देखिला० ॥ १ ॥
बरवा संतसमागम । प्रगटला आत्माराम ॥ देखिला० ॥ २ ॥
बाप रुक्मादेवीवर । कृपासिंधु करुणाकर ॥ देखिला० ॥ ३ ॥

## पद २३ वें.

दडदडदडदड दुडदुडदुडदुड पळ सुटला कळिकाळा बापुड्या ॥ ध्रुवपद. ॥
मनासि बा! आधीं । कावड घेतली खांदीं ॥
मिळाली संतमांदी[३] । त्याचें चरणरजरेणु वंदी ॥ रे कापड्या! ॥ १ ॥
गुरु लिंग हो जंगम । त्याणें लाविला आँगम[४] ॥
अनुभव करी श्रम । तेणें पावसी विश्राम ॥ रे! कापड्या! ॥ २ ॥
जवळी असतां जगजीवन । कां रे! धुंडाळीसी वन ॥
एकाग्र करीं मन । तेणें होसी समाधान ॥ रे! कापड्या! ॥ ३ ॥

---

१. पीतांबर. २. मेघ, ढग. ३. साधुसमुदाय. ४. वाममार्ग.

सांडी देह अभिमान । संतां घरीं शुद्ध ज्ञान ॥
इतुकें देईं कृपादान । तेणें घडेल अमृतपान ॥ रे! कापड्या! ॥ ४ ॥
क्षुधा तृषा हरे । निज[1] भाव येणें सरे ॥
हें जीवन सांगितलें । बाप रुक्मादेवीवर ॥ रे! कापड्या! ॥ ५ ॥

## पद २४ वें.

गोविंदु गे! माय गोपाळू गे! ।
सबाह्य अभ्यंतरीं अवघा परमानंदु गे! ॥ ध्रुवपद. ॥
सांवळें सगुण सकळ गुणांचें निधान ।
परमानंदमूर्ति पाहतां हर्षलें मन. ॥ गोविंदु० ॥ १ ॥
त्रिभंगगड देहुडे ठाण मांडुनियां माय ।
कल्पद्रुमातळीं वेणु वाजवितो आहे. ॥ गोविंदु० ॥ २ ॥
शून्य स्थावर जंगम व्यापुनि राहिला अचळ ।
बाप रुक्मादेवीवरु विठ्ठल सकळ ॥ गोविंदु० ॥ ३ ॥

---

# मुक्ताबाई[2]कृत पदें.

## पद २५ वें.

उलट उलट माघारा प्राण्या! फिर गोते खासी[3] ।
भरला पुर मायेचा लोंढा वाहुनियां जासी ॥ ध्रुवपद. ॥
भवनदीचें[4] पाणी सखया! मोठें ओढीतें ।
भल्या भल्या पोहणारां उचलुन खालीं पाडीतें ॥ उलट० ॥ १ ॥
या अविद्येचा पूर वेगीं बसरेना[5] ।
कल्पना सुसरी इची मीठी सुटेना ॥ उलट० ॥ २ ॥
क्षणभंगुर संसार याचा भरंवसा नाहीं ।
दुर्लभ नरतनु[6] गेल्या मग तूं पडशिल पस्ताई. ॥ उलट० ॥ ३ ॥

---

१. अहंभाव, अहंपणा. २. ही ज्ञानदेवाची धाकटी बहीण. ही बालपणापासून विरक्त, विठ्ठ-भक्त आणि ज्ञानी असून आमरण अविवाहित होती. हिचा जन्म शके १२०१ आश्विन शुक्ल प्रतिपदेस झाला आणि शके १२२० वैशाख वद्य ११ स भुसावळ तालुक्यांत तापीनदीच्या कांठीं [e]दलाबाद येथें समाधिस्थ झाली. येथें दर एकादशीस वारकरी लोकांची यात्रा भरते. हिची कविता वैराग्यपर, प्रेमळ आणि भक्तिरसपरिप्लुत आहे. ३. जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडसी. ४. संसाररूप नदीचें. ५. निघून जाईना, सरेना. ६. मानवदेह.

म्हणे **मुक्ताबाई** **चांग्या**[1] अंतरिंची खूण ।
धरिं सद्गुरूचे पाय तुजला नेतिल उतरून. ॥ उलट० ॥ ४ ॥

### पद २६ वें.

निष्काम[2] **राम** जपा रे ! ॥ ध्रुवपद. ॥
स्वर्गींचे जे ज्ञानी **रामा** इच्छिती मेदिनी ।
अमृत प्राशुनी आम्हां नाहीं नफा रे ! ॥ निष्काम० ॥ १ ॥
**निवृत्ति**[3]कृपेनें बोले **मुक्ताबाई** ।
नाहीं आम्हां भवभयधोका रे ! ॥ निष्काम० ॥ २ ॥

### पद २७ वें.

व्यर्थ भूललासी काय राया ! । देह जाइल वायां. ॥ ध्रुवपद. ॥
म्हणसी संपदा माझी किती । अंबाऱ्या हत्ती ॥
हत्ती घोड्यांचि होइल माती । **यम** तुजला नेती. ॥ व्यर्थ० ॥ १ ॥
म्हणसी पालखी माझा घोडा । कां भुललासी मूढा ! ॥
अंतीं **काळाचा** पडेल खोडा । म्हणुनी **राम** जोडा. ॥ व्यर्थ० ॥ २ ॥
म्हणसी गाइ ह्या माझ्या म्हैसी । आणि बटकी दासी ॥
अंतीं **काळाचे** पडसिल फांसीं । मग काय करिसी ? ॥ व्यर्थ० ॥ ३ ॥
झां झां झांगड नोबत गाजे । वाजंत्रें वाजे ॥
लोडा तीवाशा बसले राजे । हें येथेंचि साजे. ॥ व्यर्थ० ॥ ४ ॥

---

१. चांगदेवाला. **चांगदेव**—हा इंद्रशापदग्ध मरुद्गणाचा अवतार होय. हा सुस्वरूप असल्यामुळें यास चांगदेव म्हणत. हा सकलविद्याकलापारंगत झाल्यावर योगाभ्यास करून अलौकिक योगी झाला. यानें स्वविद्याबळानें मोठमोठ्या विद्वानांस पराजित केलें. यास संजवनीविद्याही प्राप्त झाली होती. याप्रमाणें याची चढती कळा होती. पण ज्ञानदेवाचे अद्भुत पराक्रम ऐकून हा चकित झाला आणि तो ज्ञानदेवाच्या भेटीसाठीं स्वशिष्यशाखेसह वाघावर बसून हातांत सापाचा चाबूक घेऊन आळंदीस आला. तेथें ज्ञानेश्वर आपल्या भावंडासह भिंतीवर बसून त्यास सामोरा गेला. निर्जीव भिंतीवर बसून ज्ञानदेव येतो आहे असें पाहतांच चांगदेवाचा सर्व गर्व परिहार झाला व तो ज्ञानदेवाच्या पायां पडला. नंतर त्यास उपदेश ज्ञानदेवांनीं केला आणि परत पाठविलें. मुक्ताबाईनेंही चांगदेवाचें अज्ञान पाहून त्यास उपदेश केला तेव्हां त्यानें तिचे पाय धरिले. यांचें चरित्र 'भक्तलीलामृतां'त (अध्याय २-१०) आहे तें पहावें. हा साधुकवि मुकुंदराजाच्याही आधींचा होता असें म्हणतात. एकनाथानें भागवतावर टीका लिहितांना हा आद्यकवि समजून यास प्रणाम केला आहे. तुकारामाचे शिष्य निळोबा ब्राम्हण यांनीं 'चांगदेवचरित्र' म्हणून एक ओवीबद्ध ग्रंथ लिहिला आहे असें समजतें. २. इच्छा मनांत न धरितां. ३. निवृत्तिनाथ हा आपल्या धाकट्या दोन भावांचा (ज्ञानदेवाचा व सोपानदेवाचा) आणि बहिणीचा (मुक्ताबाईचा) गुरु होता.

भजनीं क्रमावें राया ! पाहीं । पर उपकारी होई ॥
मुक्ताबाईनें केली सोई । हरिभजनीं राहीं. ॥ व्यर्थ० ॥ ९ ॥

### पद २८ वें.

भाव एक । मी सद्गुरूची लेंक ॥ ध्रुवपद. ॥
बाई मी उदास धांगडी । पाडी प्रपंचाची बेडी ॥
नाकीं नाहीं वेसण काडी । माझें नांव ठेवा आवडी जगभुली देख॥ १ ॥
सद्गुरु माझा चंद्रमौळी । काखे देऊनियां झोळी ॥
मज हिंडवी आळोआळी । जगही म्हणती सुकाळीं मोठें सूख ॥ २ ॥
मज पाजोनियां भांग । मग घडला संतसंग ॥
गुरु गुह्य मजला सांगे । मारुनि हाक ॥ ३ ॥
ऐसी म्हणे मुक्ताबाई । जा शरण गुरूचे पायीं ॥
पुन्हा जन्ममरण नाहीं । ऐसी भाक ॥ ४ ॥

### पद २९ वें.

कां रे ! अनाथबंधू ! येवढें कां केलें निर्वाण ? ।
किति अंत पहासिल माझा कंठीं राहिला प्राण. ॥ ध्रुवपद. ॥
ब्रह्मादि वंदित पाय तूं त्रैलोक्या धनी ।
तुझा मी म्हणवितों मला चिंतेची काचणी ॥ कां रे !० ॥ १ ॥
सुवर्णाची लंका घेउन दीधली शेरणागता ।
जगदीशा ! जगन्नायका ! तुझी कळिकाळावरी सत्ता ॥ कां रे !० ॥२॥
कामधेनु कल्पतरु क्षीरसागर तुजपाशीं ।
वितभर पोटासाठीं कवणा तोंड वासूं ? ॥ कां रे !० ॥ ३ ॥
मुक्तीच्या माहेरासी रिद्धीसिद्धी तुझ्या दासी ॥
क्षीरार्णवा ! रंक मी तों मरतों उपवासी ॥ कां रे !० ॥ ४ ॥

---

## नामदेवकृत पदें.

### पद ३० वें.

ऽव्हतंच कैसं झालं रे ! खेळिया ! नाहीं तेंच दिसूं लागलं रे ! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. शंकर, शशिशेखर. २. शरण आलेल्या बिभीषणाला. ३. नामदेव—हा उद्धवाचा अवतार समजतात. परंपरादृष्टीनें पाहिलें असतां सनत्कुमार, प्रऱ्हाद, अंगद आणि उद्धव या रूपानें नामदेव भिन्नभिन्न अवतारीं उदित झाला असें समजतात. हा कवि पंढरपुराजवळ गोकुळगांवीं इ० स० १२७८ ह्या वर्षीं जन्मला, व इ० स० १३२८ या वर्षीं निवर्तला. ह्याचे बापाचें नांव दामाशेटी शिंपी व आईचें नांव गोणाई. ह्यांची ईश्वरभक्त म्हणून बरीच कीर्ति

[1]अरूप होतं तें रूपासि आलं, जीवशिव नांव पावलं रे! ।
आपुली आवडी धरूनि पोटीं, आपआपणातें व्यालं रे!॥
[2]झोंपन्याकारणं बायको केली, [3]तिनं हें पोट वाढवीलं रे! ।
एकअंगीं [4]त्रिविधी होउनि सर्वहि, भूतीं भौतिक दाखवीलं रे! ॥ नव्हतंच०॥१
ब्राह्मणाचं पोर एक भ्यालं! रे खेळिया, बारा वर्षें लपालं रे! ।
कांपत कांपत बाहेर आलं, नागवंच पळून गेलं रे! ॥
[5]सातोंड्या **सं**ब्याच बाळक, त्यानं बाळकपण [6]आथिलं रे! ।
खेळतां खेळतां चकीत चकलं, कपाट फोडुनि गेलं रे! ॥ नव्हतंच० ॥ २ ॥
खेळियामाजी [7]**ह**नुम्या बळकट, न पडेचि कामव्यसना रे! ।
काम नाहीं तेथें क्रोधचि कैंचा, तेथें कैंचे भांडणार रे! ॥
[8]**दा**हातोंड्याचें पोर मारिलें, **रा**म्या गड्याचा गडिपणा रे! ।
**अ**हिरावण **म**हिरावण मारुनि तेणें, समूळ बुडवि **रा**वणा रे! ॥ नव्हतंच०॥३॥
**ब्र**ह्याच पोर एक [9]**ना**ऱ्या रे! खेळिया, हिंडतो [10]त्रिभुवना रे! ।
कुटाळकि करुनी जग भांडवी, साधू म्हणवि आपणा रे! ॥
**गं**गा **गि**रिजा भांडण लावुनि, **सं**ब्यासि धाडिलें वना रे! ।
खेळ खेळे परि डावीं न सांपडे, ऐसा तो खेळिया शाहणा रे! ॥ नव्हतंच०॥४
**या**दवाचं पोर एक **गो**पाळ्या भला त्यानं, अनंत खेळ खेळला रे! ।
लहान थोर त्यानं अवघेच मारुन, डावच मोडुन गेला रे! ॥

---

झाली व त्यावरून त्याला पुष्कळ भक्तमंडळ मिळालें. एकदां ह्या मंडळीसह एका उत्सवाला जात असतांना बेदर येथें त्याला कोणी लोकांनीं धरून नेलें व तेथें त्यानें मेलेल्या गाईला जीवंत केल्यावर व असेच दुसरे दैवी चमत्कार केल्यावर झाला व ह्याचे बरोबरचे भक्तांना सोडून दिलें. नामदेवास शतकोटि अभंग करण्याविषयीं दृष्टांत झाल्यावरून त्यानें व त्याचे कुटुंबांतील माणसांनीं मिळून ९९ कोटी ९६ लक्ष अभंग केले व बाकी राहिलेले ४ लक्ष अभंग करण्याकरितां तुकारामाचा अवतार झाला व त्यांनीं शतकोटि अभंग पुरे केले. नामदेवांनीं आपल्या अभंगांचे शेवटीं **'नामा'** असें पद घातलें आहे व त्यांचे अभंगांवरून त्यांचा ओढा परमेश्वरभक्तीकडे फार होता असें स्पष्ट दिसून येतें. यांची **जनी** म्हणून एक दासी होती तिनेंही पुष्कळ अभंग केले आहेत. शिंपीजातीमध्यें नामदेव हे मोठे ईश्वरभक्त झाल्यामुळें हल्लीं शिंपी आपणाला 'नामदेव' म्हणवितात. या एकनिष्ठ भगवद्भक्ताची कविता सरळ, गोड, सुबोध आणि प्रेमळ आहे. 'श्रीनामदेव-चरित्र'नामक पुस्तकांत या साधूची इत्थंभूत हकीकत दिलेली आहे.

१. रूपहीन. २. जोंपण्याकरितां, जोंपासना करण्याकरितां. ३. मायेनें. ४. त्रिगुणात्मक, सत्वरजस्तमोगुणात्मक. ५. षडानन, कार्तिकस्वामी. ६. पावलें. ७. हनुमान्, मारुति. ८. रावणाचा पुत्र (इंद्रजित्). ९. नारदमुनि. १०. नारदमुनि त्रिभुवनांत (आकाश, पृथ्वी, पाताळांत) फिरतात ह्या गोष्टीला अनुरोधून हें म्हटलें आहे.

पांडवाचं पोर एक धर्म्या गडि त्यानं, श्यामकर्ण वारु सोडिला रे! ।
संतसाधु ऋषिमुनि अवघेहि थकले, भक्तिमार्ग त्यानं दाविला रे! ॥ नव्हतंच० ॥
मछिंद्राच पोर एक खेळिया शहाणा त्यानं, निरंजनिं खेळ खेळला रे! ।
आपआपणाचा शोध करुनियां, आपण निराळा राहिला रे! ॥
त्रिकूट भेदुनि श्रीहाट रोधुनि, गोल्हाट गड घेतला रे! ।
विष्णुदास नामा म्हणे पाहा संत हो! विचारून देहाला रे! ॥ नव्हतंच० ॥ ६ ॥

### पद ३१ वें.

विठाई! सांवळे डोळसे! रंगा येई हो! ॥ ध्रुवपद. ॥
कानीं कुंडलांची प्रभा । जैसे चंद्र सूर्य नभा हो! ॥ विठा० ॥ १ ॥
गळां वैजयंतीमाळा । कांसे पीतांबर पींवळा हो! ॥ विठा० ॥ २ ॥
नामा म्हणे कृपावंता! । झडकरि यावें पंढरीनाथा हो! ॥ विठा० ॥ ३ ॥

### पद ३२ वें.

विठोबा! चला मंदिरांत । गस्त हिंडती बाजारांत. ॥ ध्रुवपद. ॥
रांगोळी घातली गुलालाची । शेज म्यां केली पुष्पांची. ॥ विठोबा! ॥ १ ॥
समया जळती अर्धरात्रीं । गळ्यामधीं माळ मोत्यांची. ॥ विठोबा! ॥ २ ॥
नामदेवाला सांपडलें माणीक । घेतलें जनीनें हातांत. ॥ विठोबा! ॥ ३ ॥
घेऊन गेली राउळांत । गस्त हिंडती हाकीमाची बाजारांत. ॥ विठोबा! ॥

### पद ३३ वें.

कृष्णा! राहें बा! उगला । नाहीं तरी सांगेन त्या बागुला ॥
घुसळणाशीं उशीर झाला । रवी सोडीं गोविंदा! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. घोडा. २. मत्स्येंद्रनाथाचें. शिवपार्वती यांचा आत्मज्ञानविषयक संवाद चालला असतां, त्स्यरूपानें विष्णु हुंकार देत होता, त्या मत्स्यरूपधारी विष्णूपासून 'आदेश' असें म्हणत ालेला कुमार हा मत्स्येंद्रनाथ होय. हा आदिनाथ संप्रदायाचा प्रवर्तक होय. मत्स्येंद्राचा पोर म्हणजे त्स्येंद्रनाथाचा शिष्य–गोरखनाथ–असावा. ३. "श्रीहाट म्हणजे शक्तीचा बाजार. ह्याचें स्थान ाळवेवर बोट फिरविल्यानें शरीरस्थ वायूवर फेरफार होऊन टाळवेचा मुख्य बिंदु ठरतो त्या बेंदूच्या जागीं सर्व शरीराची ज्ञानशक्ति राहते, म्हणून त्यास **श्रीहाट** (शक्तीचा बाजार) अशी ंज्ञा आहे." (ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र–पृष्ठ ९४.) ४. "गोल्हाट म्हणजे छातीच्या आंतील, ोंकळींत जो उलटा प्राण आहे, त्या प्राणांतील ज्ञानवृत्तीला इंद्रियांवांचून स्वतांच्या स्वरूपाचा यथार्थ ोध होत नाहीं; अशा त्या प्राणवायु राहण्याच्या ठिकाणास **गोल्हाट** म्हणतात." (बळवंत खंडोजी ारखकृत ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र–पृष्ठ ९३.) ५. देवळांत. ६. या पदांत दशावताराचें वर्णन ाहे. मुख्य अवतार १ मत्स्य, २ कूर्म, ३ वराह, ४ नृसिंह, ५ वामन, ६ परशुराम, ७ राम, कृष्ण, ९ बुद्ध आणि १० कल्की–असे दहा आहेत. याशिवाय आणखी चौदा अवतार भागवत-

पहिला बागुल तो ऐसा । तया नाम म्हणती मासा ॥
शंखासुर वधिला कैसा । चारी वेद आणिले. ॥ कृष्णा !० ॥ १ ॥
दुसरा बागुल बोलती । त्यासीं कूर्मरूप[1] म्हणती ॥
त्यानें पृष्टीस धरिली क्षिती । पाय पोटासीं धरीयेले. ॥ कृष्णा !० ॥ २ ॥
तिसरा बागुल बोलती । त्यासीं वराहरूप म्हणती ॥
त्यानें दाढेस धरीली क्षिती । थोर दैत्य वधोनीयां. ॥ कृष्णा !० ॥ ३ ॥
चौथा बागुल नरहरी[2] । तो तंव खांबामध्यें गुरगुरी ॥
दैत्य[3] वधूनी दानव वरी । भक्त प्रल्हाद रक्षीला. ॥ कृष्णा !० ॥ ४ ॥
पांचवा बागुल ब्रह्मचारी[4] । तो तंव उभा बळीच्या द्वारीं ॥
भिक्षा मागुनियां निर्धारीं । बळीचें द्वार रक्षीतसे. ॥ कृष्णा !० ॥ ५ ॥
सहावा बागुल बोलती । त्यासीं परशुराम म्हणती ॥
त्यानें वधिलें मातेप्रती[5] । पित्याचें वचन ऐकुनीयां. ॥ कृष्णा !० ॥ ६ ॥
सातवा बागुल तो साचा । राम म्हणती दशरथाचा ॥
रावण वधिला दशमुखांचा । मग ती जानकी सोडविली. ॥ कृष्णा !० ॥७॥
[6]आठवा बागुल बोलती । तो तर गोकुळीं आहे म्हणती ॥
त्यानें वधिलें कंसाप्रती । असुर मारिले भारी. ॥ कृष्णा !० ॥ ८ ॥
नववा बागुल बोलती । त्यासीं बौद्धरूप म्हणती ॥
त्याची कुणासीं कळेना गती । बौद्धरूप प्रकटुनियां. ॥ कृष्णा !० ॥९॥
दहावा बागुल बोलती । नाम कलंकी[7] म्हणती ॥
थोर थोर करील ख्याती । अश्वारूढ होईल. ॥ कृष्णा !० ॥ १० ॥
होतां कलंकीचा अंत । वेगीं येईल धांवत ॥
नामा म्हणे पंढरीनाथ । ऐसा बागुल जाणावा. ॥ कृष्णा !० ॥११॥

**पद ३४ वें.**

गौळणी[8] ठकविल्या । एक एक संगतीनें ॥
मराठी कानडीया । एक मुसलमानी ॥
कोंकणी गुर्जरणी । अशा पांचिव जणी. ॥ ध्रुवपद. ॥

---

कारांनीं वर्णिले आहेत:—१ सनक, २ यज्ञ, ३ नारद, ४ दत्त, ५ कपिल, ६ नरनारायण, ७ हरि, ८ पृथु, ९ ऋषभदेव, १० हयग्रीव, ११ हंस, १२ धन्वंतरी, १३ मोहिनी आणि १४ व्यास. या सर्व अवतारांचें वर्णन मोरोपंतांनीं 'अवतारमाला'नामक काव्यांत केलें आहे.
७. बाऊ, बागुलबुवा. ८. ताक करण्याची काठी.

१. कांसव. २. नारसिंह. ३. हिरण्यकशिपु. ४. वामन. ५. रेणुका. ६. कृष्णावतार. ७. कल्की. ८, या पदांत पांच प्रकारची भाषा योजिली आहे.

गौळणी सुंदरी । गेल्या यमुनेतीरीं ॥
वस्त्रें फेडुनियां । स्नान करिती नारी ॥
गोविंदानें वस्त्रें । नेलीं कळंबावरी ॥
स्नान करोनियां । त्या आल्या बाहेरी. ॥ गौळणी० ॥ १ ॥
लेंडोवा[1] गोविंदा । नीरवाणीं आज ॥
आडच्याल्लो पडच्याल्लो । शीरफोड्यानफोडो ॥
मारीं कन्हैया । पामी खेळ्या न खेळो. ॥ गौळणी० ॥ २ ॥
देखरे कन्हैया । मै इज्जतकी[2] बडी ॥
कदम[3] पैकडूंगी[4] । मैयाकुटो जडी ॥
मेरी छुनरी[5] दे । मेरी दे दुल्लडी. ॥ गौळणी० ॥ ३ ॥
देवकीनंदना । तूं ऐक श्रीपती ॥
उघडी हिंवाची । तुजविण बुकीती ॥
पायां पडतों बा ! । मी येतों काकुळती ॥
माडी साडी दे । घे नाकाचें मोती. ॥ गौळणी० ॥ ४ ॥
पाव गा ! दाताला । तूं नंदाचो झीलो ॥
माकां फडको दी । मी हींवीन[6] मेलों ॥
घे माजो कोयतो । देवा पायां पडलों. ॥ गौळणी० ॥ ५ ॥
ज्योरे माधवजी ! । में शरण थईं ॥
तनका काकैपी । बाप दयाळ तूंही ॥
मारी साडी आपो[7] । हातनी ले कंगणी[8]. ॥ गौळणी० ॥ ६ ॥
इतुकें ऐकुनी । देव बोले हासोनी ॥
सूर्या दंडवत करा । दोन्ही कर जोडुनी ॥
नामा विनवीतो । म्हणे सारंगपाणी[9] ॥
गौळ्या ! ऐक तूं । धन्य तुझी करणी. ॥ गौळणी० ॥ ७ ॥

**पद ३५ वें.**

कुंडी[10] म्हणे आत्म्याला, । 'नका टाकून जाऊं स्वामी ! मजला ॥ ध्रुवपद. ॥
तुझी माझी बाळपणाची बहु प्रीत । बसून दोघें पिंजऱ्यांत ॥

---

१. लबाड. २. अब्रूची मोठी. ३. पाय. ४. धरीन. ५. चुनडी, साडी. ६. थंडीनें. ७. दे. ८. हातांतली बांगडी. ९. शार्ङ्गपाणि. (शार्ङ्ग नामक धनुष्य हातांत ज्याच्या तो.) १०. या पदांत आत्मा व देह यांचा संवाद आहे.

आतां कसें केलें चंचलचित्त । ओढवलें संचीत[1] ॥
आत्म्या! तुझा कळेना मज अंत । जातोस वैकुंठांत ॥
कधीं पडशील रे, पडशील माझ्या डोळां.' ॥ कुडी० ॥ १ ॥
आत्मा म्हणे, 'वचन ऐक कुडी! । तुझी न माझी जोडी ॥
अंतर पडला नाहीं अर्ध घडी । पुढें गेले गडी ॥
आम्हां जाणें आहे तांतडी । तुटली मायेची बेडी ॥
आग लागो रे, लागो या संचिताला.' ॥ कुडी० ॥ २ ॥
कुडी म्हणे, 'तूं माझा मनमोहन । जातोस पिंजऱ्यांतून ॥
मी बैसलें परदेशी होऊन । आतां मला नाहीं कोण ॥
वेस्ता[2] भाव भोगिले हौसेन । सोन्याचें कंकण ॥
मजवर तुटून पडलें गगन । कडाडलें अस्मान[3] ॥
आतां भेटूं रे, भेटूं गळ्याशीं लावूं गळा.' ॥ कुडी० ॥ ३ ॥
कुडीला कोठें दिला हो! जानवसा । मसणपूर गांव खासा ॥
तेथें भाव महार आहे खासा । त्रैलोक्यामध्यें ठसा ॥
आत्मा पहातो कुडीचा तमाशा । हिंडतो दाही दिशा ॥
जैसा गळ वोढून घेतो मासा । होतो कासावीसा ॥
जेथून आला रे, आला तेथें गेला. ॥ कुडी० ॥ ४ ॥
मैना! कां रुसलीस तूं मजवर? । मी परदेशी नर ॥
हात जोडूनी तुझ्या समोर । नको होऊं दिलगीर ॥
तुजला भाऊ बंध अवघे सार । साहाय्य करतील फार ॥
तूं मृत्युलोकाची राहणार । मला जाणें आहे दूर ॥
एकवीस स्वर्गांवरती माझें घर । अवघ्याला महशुर ॥
विष्णुदास नामा पामर । संतांचा किंकर ॥
सोडूं नकारे, नका गुरूच्या चरणाला ॥ कुडी० ॥ ५ ॥

**पद ३६ वें.**

मुक्ताफळी नथ नाकीं । चरणीं ल्याली वाळे वांकी ॥
पीतांबरें आंग झांकी । कृष्णा मामाजी ॥ ध्रुवपद. ॥

---

१. नशीब. २. दागिने. ३. आकाश.

खांदा वरी धाबळी । पायघोळ लांब वरी ॥
पांघरली धाबळी । **कृ**ष्णा मामाजी ॥ १ ॥
गाई पाठी लागली । पळतां नाहीं भागली ॥
मायबहिण चांगली । **कृ**ष्णा मामाजी ॥ २ ॥
देहुडा पावली । उभी माझी माऊली ॥
विश्रांतीची साउली । **कृ**ष्णा मामाजी ॥ ३ ॥
उभा नीट विटेवरी[1] । उभा **भी**मरथीचे तीरीं ॥
**नाम**याचा कैवारी । **कृ**ष्णा मामाजी ॥ ४ ॥

**पद ३७ वें.**

परब्रह्म[2] निःकाम तो हा गवळीया घरीं ।
पायीं वाक्या अँदु[3] **कृ**ष्ण नवनीत चोरी ॥ ध्रुवपद. ॥
म्हणती गवळणी **ह**रीचीं पाऊलें धरा ।
रांगत रांगत येतो **ह**री हा राजमंदिरा ॥ परब्रह्म० ॥ १ ॥
लपत छपत येतो **ह**री हा राजभुवनीं ॥
**नं**दासी टाकुनी आपण बैसे सिंहासनीं ॥ परब्रह्म० ॥ २ ॥
बहुता पुण्या बहुता भाग्या जोडीला देव ।
अनंत पवाडे तुमची नकळे माव[4] ॥ परब्रह्म० ॥ ३ ॥
सांपडला देव रायासी बांधा दाव्यानीं ।
शंख चक्र गदा पद्म सारंगपाणी[5] ॥ परब्रह्म० ॥ ४ ॥
**ना**मा म्हणे, 'अहो **के**शवराज! दातारा ।
जन्मोजन्मीं द्यावी तुमची चरणसेवा.' ॥ परब्रह्म० ॥ ५ ॥

---

१. ही **इं**द्रवीट म्हणून प्रसिद्ध आहे. तिची कथा अशी:—**इं**द्राला **गौ**तमानें **अ**हल्येशीं जारकर्म केल्याबद्दल 'तुला सहस्र भगें पडतील' असा शाप दिला, परंतु **इं**द्र शरण आला म्हणून मुनि प्रसन्न झाला आणि 'तुझें शरण चतुष्कोण विटेप्रमाणें पाषाणरूप होऊन **दिं**डीरवनांत पडेल व तेथें श्री**कृ**ष्णचरणाचा स्पर्श होऊन तूं पूर्ववत् होशील आणि स्वपद पावशील' असा उःशाप दिला. पुढें श्री**कृ**ष्ण **वि**ठ्ठलरूपानें **पुं**डलिकाच्या दर्शनास आले. तोंपर्यंत ही **इं**द्रवीट **पुं**डलिकानें **ना**रदाच्या सांगीवरुन आपणापाशीं ठेविली होती. श्री**कृ**ष्ण आल्यावर **पुं**डलिकानें ती वीट पुढें केली; तिजवर श्री**कृ**ष्ण उभे राहिले तेव्हां **इं**द्र शापमुक्त झाला व वीट तशीच कायम राहिली.
२. परमात्मा. (श्रीकृष्ण.) ३. सांखळया. ४. माया. ५. शार्ङ्गपाणिं. (कृष्ण.)

## पद ३८ वें.

रांईएवढें[1] पांखरूं । दादा! त्रिभुवनीं त्याचा थारू[2] ॥ ध्रुवपद. ॥
नर आणि नारी त्या बा! । पांखराचा चारा ॥
पिंडीं आणि ब्रह्मांडीं । त्याचा अनुभव तुम्ही करा ॥
त्याचा अनुभव घेतां । चुकेल चौऱ्यांशींचा फेरा ॥ राई० ॥ १ ॥
एकवीस स्वर्गांवरती[3] । त्या बा! पांखराची उंची ॥
डोळ्यांतील बावल्या बा! । त्या पांखराची नीची ॥
सप्त हे सागरा । पांखरूं घेउन गेलें चुंची ॥ राई० ॥ २ ॥
पिंड आणि ब्रह्मांड । मच्छेंद्रनाथानें दाविलें ॥
त्याच्या अनुग्रहें । गोरक्षनाथें ओळखिलें ॥
तयाच्या प्रसादें । नाम्या शिष्यानें गाइलें. ॥ राई० ॥ ३ ॥

## पद ३९ वें.

सावध सावध रे, भजले रे! राजा ॥
उत्तम नरतनु पायो रे भाई! । गाफल क्यौं हुवा दीवानो[4] ॥ ध्रुवपद. ॥
जिने जन्ममें डारा है तुजकूं । बिसर[5] गया उनकु ध्यान ॥
फिर पस्तायेगा[6] दगा पायेगा । निकल जायेगा अवसान ॥ सावध० ॥ १ ॥
क्या करना सो आजि करले[7] । फीर नये ऐसी जोडी ॥
हौस जायेगा, पिंजरा[8] पडेगा । तुज कैसी भुल पडी ॥ सावध० ॥ २ ॥
सुन्नेका मंदीर मेहेल बनाया । धन संपत नहीं तेरी[9] ॥
माँ[10] भैन[11] आवर जोरू[12] है लडके । सुखके खातर सारे ॥
एकेले आना एकेले जाना । सब झुटी माया पसरी थु ॥ सावध० ॥ ३ ॥
लक्ष चौऱ्यांसीका[13] फेरा आवेगा । तब चुपी मिलाये बंदकु ॥

---

१. मोहरीयेवढें. २. थारा, वास्तव्य. ३. एकवीस स्वर्गांचीं नांवें:—ज्योति, शीत, विमळ, अभियागता, प्रकाशविख्यात, सदोदीतरम्य, सहज, सिद्ध, आनंद, दिव्य, एकांत, अमळ, तृप्ति, निर्मळ, प्रेम, निज, लय, अंत, नित्य, अति, शिव. (शिवनिबंध.) ज्योति, शीत, नीळ, रम्य, सोहो, जळ, शिव, निज, भुह, प्रळय, सहा, महा, जन, तप, तपनी, योग, आनंद, नित्य, भुव, नित्य, अति. (कथाकल्पतरु.) ४. वेड्यानो! ५. विसरलास. ६. पश्चात्ताप होईल. ७. जें कांहीं करणें असेल तें आजच करून घे. ८. या ठिकाणीं पिंजरा म्हणजे कुडी, देह असें समजावें. ९. तुझी. १०. माता. ११. बहीण. १२. स्त्री. १३. मागें १४ व्या पदावरील टीप पहा.

फिरता फिरता ज्यु रमता है बाबा । कोन रखे तेरे तनकुं ॥
जिस माय उदरीं जन्म लीयेगा । तेरे संगत दुःख उनकु ॥ सावध० ॥ ४ ॥
गरभीकी यातना सुन मोरे भाई! । नवमास बंधन डारे ॥
नहीं जगा हलने चलनेकु बाबा! । छोडनेकु कोई नहीं आवे ॥
आग लगी है देखत अंधे । कायके खातर खोया ॥ सावध० ॥ ५ ॥
ऐसी बात सुनके **ना**मा सावध हुवा । गुरुके पाव मिठी डारी ॥
मैं अनाथ दुबले शरण भये तुमकु । आप **गो**रखके चरण लागे॥सा०॥६॥

## जनाबाईकृत पदें.

### पद ४० वें.

बाई गे! मी लेणें ल्यालें सद्गुरुरायापाशीं ॥ ध्रुवपद. ॥

---

१. देहाला. २. ऐक. ३. गोरक्षनाथ हा मच्छेंद्रनाथाचा शिष्य. याची हकीकत अशी आहे:—अयोध्येजवळ **जयश्री** नांवाचें एक नगर होतें. त्या नगरांत **सद्बोध** नामें कोणीएक सावकार ब्राह्मण आपल्या सुशील स्त्रीसहवर्तमान सुखानें प्रपंच करीत असे. त्यांना कांहीं कमी नव्हतें, मात्र संतति नव्हती. एके वेळीं **म**त्स्येंद्रनाथ फिरतां फिरतां **ज**यश्री नगरास गेले व भिक्षा मागण्याकरितां **स**द्बोध ब्राह्मणाकडे गेले. त्यावेळीं ब्राह्मण घरीं नव्हता. त्याच्या स्त्रीनें **म**त्स्येंद्रनाथांस पाहतांच झटकन बाहेर येऊन भिक्षा घातली व त्यांस नमस्कार केला. त्यांनीं तिची म्लान मुद्रा पाहून तसें असण्याचें कारण विचारलें. तें समजल्यावर त्यांनीं तिला भस्म मंत्रित करून प्रसाद म्हणून दिलें व तें खाण्यास सांगितलें. परंतु तिच्या शेजारणीनीं तिला सांगितलें कीं, 'तूं तें खाऊं नको. असले ढोंगी कानफाटे स्वामी असें कांहीं तरी फसविण्याकरितां करीत असतात.' यायोगें तिचें मन फिरलें व तिनें तें भस्म भक्षण न करतां शेणाच्या टोणखळींत टाकून दिलें. ही गोष्ट तिनें नवऱ्यास बिलकूल समजूं दिली नव्हती. पुन: बारा वर्षांनंतर **म**त्स्येंद्रनाथ त्या बाईकडे भिक्षेस्तव आले, व 'अलख' असा पुकार केला. नंतर तिला विचारलें कीं, 'पुत्र क्षेम आहेना?' तिनें भीतभीत सांगितलें, 'मी आपला प्रसाद भक्षण न करतां टाकून दिला.' नंतर स्वामीनीं भस्म टाकलेल्या जागीं जाउन 'अलख' अशी हाक मारतांच बारा वर्षांच्या उमरीचा पुत्र 'गुरुजी! आदेश' असें म्हणत शेणखळींतून बाहेर पडला. त्यास स्वामीनीं आपल्याबरोबर तीर्थाटनास नेलें. हाच **गोरक्षनाथ** होय. पुढें **म**त्स्येंद्र यांच्या प्रसादेंकरून सिद्धपुरुष झाला. यास योगसिद्धि पूर्ण प्राप्त झाली होती. हा मोठा कवि होता. यानें **गो**रक्षगीता, **गो**रक्षकल्प, **गो**रक्षशतक, **गो**रक्षसहस्रनाम इत्यादि ग्रंथ संस्कृतांत लिहिले असून **वि**वेकमार्तंड नांवाचा दोन सहस्र श्लोकांचा ग्रंथ याचाच आहे असें समजतें. **म**त्स्येंद्रनाथाचा शिष्य **गो**रक्षनाथ, त्याचा **शां**भव, त्याचा **अ**द्वयानंद, त्याचा **गै**नीनाथ, त्याचा **नि**वृत्ति, त्याचा **ज्ञा**नदेव, त्याचा **वि**सोबा **खे**चर, त्याचा **ना**मदेव, त्याची शिष्या **ज**नी अशी ही शिष्यपरंपरा आहे. ४. ही नामदेवाची भगवद्भक्तिपरायण दासी होय. ही **गो**दातीरवर्ती **गं**गा-

ब्रह्मीं झाला जो उल्लेख । तोचि नादाकार देख ।
पुढें ओंकाराची रेख । तुर्या[1] म्हणताती तीसी ॥ बाई गे० ॥ १ ॥
माया महत्वाचें सुभर । तीनें पांचांचा प्रकार ।
पुढें पंचविसांचा[2] भार । गणती केली छत्तीसी ॥ बाई गे० ॥ २ ॥
बारा सोळा एकविस हजार । आणिक साशांचा उभार ।
माप चाले सोहंकार । वळखिन बावन[3] मात्रेंसी ॥ बाई गे० ॥ ३ ॥
चार खोल्या चार घरीं । चौघे पुरुष चारी नारी ।
पाहुनि चौघांचे विचारीं । बैसल्यें पांचव्यापाशीं ॥ बाई गे० ॥ ४ ॥
पांच शाहाणे पांच मूर्ख । पांच चाळक असती देख ।
पांच बखेडखोर आणिक । ओळखिले दोघांसी ॥ बाई गे० ॥ ५ ॥
बीजापासून अंकुर । होय वृक्षाचा उभार ।
शाखापत्रें फळ फुलभार । बीजापोटीं सामात्रे ॥ बाई गे० ॥ ६ ॥
तंतुच्या धारें कांती काढून । वरी क्रीडा करिती जाण ।
शेखीं[4] तंतूसीं गीळून । एकली राहिन आपेशी ॥ बाई गे० ॥ ७ ॥
वेदशास्त्र आणि पुराणा । याचा अर्थ आणिला मना ।
कनकीं नगांच्या भूषणा । अनुभव आला जीवासी ॥ बाई गे० ॥ ८ ॥

---

खड नामक गांवांतील **दमा** नांवाच्या महाभगवद्भक्त शूद्राची कन्या. हिच्या आईचें नांव **करुंड.** ही स्त्रीपुरुषें **पंढरी**चीं वारकरी होतीं आणि श्री**पांडु**रंगाच्या प्रसादानेंच ही कन्या त्यांस प्राप्त झाली. **जनी** ही त्रेतायुगांतील **मंथरा** आणि द्वापारयुगांतील **कुब्जा** होय. ही **नाम**देवाच्या समागमानें महाभगवद्भक्त झाली. हिच्या मस्तकावर **नार**दानें हस्त ठेवून मंत्र दिला. ही 'वेडी पिशी **जनी नाम**याची' म्हणून प्रसिद्ध आहे. देव **जनी**बरोबर भोजन करी, तिचें उष्टें अन्न सेवी, तिच्या झोपडींत निजे, तिच्या बरोबर दळूं लागे, तिला लुगडें नेसवी, तिचे केंस विंचरी, तिला न्हाऊं माखूं घाली, आणि अशींच तिचीं इतर कामें करून तिला संतुष्ट करी. तिनें देवाचें पदक आणि महावस्त्र (शालजोडी) हीं चोरलीं म्हणून तिला शूळावर चढविण्याचें ठरलें असतां, तिनें देवाचा धांवा केला. त्यामुळें त्या शूळाचें पाणी झालें. असे अनेक चमत्कार तिच्याविषयीं लिहिलेले आहेत. जसा **ज्ञा**नेश्वराच्या काव्यरत्नांचा लेखक **स**च्चिदानंद, **नि**वृत्तीच्या **सो**पानदेव, **मुक्ता**बाईच्या **ज्ञा**नदेव, **जो**गापरमानंदाच्या **वि**सोबा **खे**चर, **चो**खामेळ्याच्या **अ**नंतभट, **सा**वतामाळ्याच्या **का**शिबा गुरव, तसा **नाम**देव आणि **ज**नी यांच्या काव्यरत्नांचा लेखक साक्षात् भगवान् **रुक्मिणीरमण** होय असें वर्णन आहे.

१. चवथी अवस्था. (समाधि.) जागृति, स्वप्न, सुषुप्ति आणि तुर्या ह्या चार अवस्था देहाच्या आहेत. (पंचीकरण.) २. हीं सर्व तत्वांचीं आणि त्यांच्या भेदांचीं नांवें आहेत. ३. या बावन्न मातृकांचा तपशील:—४ आधारचक्रीं, ६ स्वाधिष्ठानचक्रीं, १० मणिपुरचक्रीं, १२ अनुहातचक्रीं, १६ विशुद्धचक्रीं, २ द्विदलचक्रीं, आणि २ सहस्रदळचक्रीं. ४. शेवटीं.

नामदेवाच्या प्रतापांत । शिरीं विठोबाचा हात ।
जनी म्हणे केली मात । पुसा ज्ञानेश्वरासी. ॥ बाई गे० ॥ ९ ॥

पद ४१ वें.

सुंदर माझें जातें ग! फिरे बहुत। ओंव्या गाऊं कौतूकें तूं ये रे! बा! ॥ १ ॥
जीवशिव दोनी खुंटे हो! प्रपंचाचे नेटे हो!। लावुनी पांची बोटें तूं ये रे! बा! ॥२॥
सासू सासरा दीर तीसरा । ओंव्या गाऊं भ्रतारा तूं ये रे! बा! ॥ ३ ॥
बारा सोळा गडणी आवघ्या कामिनी । ओंव्या गाऊं बसुनी तूं ये रे! बा! ॥४॥
प्रपंच दळण दळिलें पीठ भरीलें । सासुपुढें ठेविलें तूं ये रे! बा! ॥ ५ ॥
सत्वाचें आधण ठेविलें पुण्य वैरीलें । पाप तें वोतुन गेलें तूं ये रे! बा! ॥ ६ ॥
जनीनें जातें गाईलें कीर्ति राहीली । थोडासा लाभ होईल तूं ये रे! बा! ॥७॥

पद ४२ वें.

मज तारिं दयासागरा! । किती तरि विनवूं रमावरा! ॥ ध्रुवपद. ॥
झोंबतो खळ लांडगा विपिनीं[२] हरिणीसि जसा ।
न करी म्हणे सुता अहो! हा सासरा ॥ किति तरि० ॥ १ ॥
गरुडा पळऊं नको मन तें करिं पांगुळ ।
मज तव पायांचा न दुजा[३] आसरा ॥ किति तरि० ॥ २ ॥
द्रुपदबाळा न म्हणे न म्हणे पंडूची सून ।
दासीजनी पाळावें गाई हे वासरा ॥ किति तरि० ॥ ३ ॥

पद ४३ वें.

झडतो नामाचा चौघडा ॥ ध्रुवपद. ।
धरा सैतरांचा हो मेळा । कारखाना झाला गोळा ।
वाजविती आपुल्या कळा । प्रेमबळा आनंदें. ॥ झडतो० ॥ १ ॥
झडतो नामाचा चौघडा । ब्रह्मीं ब्रह्मरूपीचा हुंडा ।
संत ऐकताती कोडा । प्रेमबळा आनंदें. ॥ झडतो० ॥ २ ॥
जनाबाई घड्याळमोगरी । घटका भरतां टोला मारी ।
काळ व्यर्थची गेला तरी । गजर करी आनंदें. ॥ झडतो० ॥ ३ ॥

---

१. ऊत येऊन. २. अरण्यांत. ३. अन्य. ४. सतरा तत्वांचा; पांच प्राण, दहा इंद्रियें, एक मन आणि एक बुद्धि मिळून सतरा. ५. बुरूज. ६. कौतुकानें.

**नामा**[1] **दामा**[1] दोनी काळू । **नारा विठा** दमामे फैळ ।
चौघी[2] सुना[2] चारी हेळ । कडकडां बोल उमटती. ॥ झडतो० ॥ ४ ॥
**गोंदा म्हादा** करणी करी । नादें दुमदुमली **पंढरी**, ।
आवुबाई[3] तूतारी । मंजुळ स्वर उमटती. ॥ झडतो० ॥ ५ ॥
**गो**[4]नाबाई नोबत पल्ला । नाद अंबरीं कोंदला ।
**रा**[5]जाई झांज मंजुळ बोला । मंजुळ स्वर उमटती. ॥ झडतो० ॥ ६ ॥

---

## एकनाथकृत[6] पदें.

### पद ४४ वें.

क्षुधित वनीं **गो**विंद । बाइ गे! ॥ ध्रुवपद. ॥
रवि[7]तनयातटीं शिशु[8]सह हा व्रज । चारित गोधनवृंद. ॥ बाइ गे० ॥ १ ॥
ऋषिपत्न्या तुम्ही प्रेमळ सात्विक । तोषवा सगुण **मुकुंद**. ॥ बाइ गे० ॥२॥
**एका जनार्दनीं** अन्न समर्पितां । येकी स्वागतनंद. ॥ बाइ गे० ॥ ३ ॥

---

१. नामदेव हा दामाजीचा पुत्र. २. नामदेवाला नारायण, महादेव, गोविंद आणि विठ्ठल, असे चार पुत्र होते. यांचीं लग्नें लाडाबाई, गोडाबाई, येसूबाई आणि साखराबाई, यांच्याशीं झालीं. ३. ही नामदेवाची बहीण. ४. नामदेवाची जननी. ५. नामदेवाची स्त्री. या सर्वांचा समावेश पुढील अभंगांत आहे:—'**गो**णाई **रा**जाई दोघी सासुसूना । **दा**मा **ना**मा जाणा बापलेका ॥१॥ **ना**रा **म**हादा **गों**दा **वि**ठा चौघे पुत्र । जन्मले पवित्र त्याचे वंशीं ॥ २ ॥ **ला**डाई **गो**डाई **ये**सा **सा**खराई । चौघी सुना पाहीं **ना**मयाच्या ॥ ३ ॥ **लिं**बाई ते लेकी **आ**उबाई बहिणी । वेडी पिशी **जनी ना**मयाची ॥ ४ ॥.' ६. एकनाथ—हा साधु ब्राह्मण कवि ज्ञानदेवाचा अवतार असें समजतात. याचा जन्म शके १४७० या वर्षी झाला असें दिसतें. याचा मरणशक १५२१ फाल्गुन वद्य ६ असें आढळतें. याची कविता (१) एकनाथी भागवत, (२) भावार्थरामायण, (३) रुक्मिणीस्वयंवर, (४) स्वात्मसुख, (५) हस्तामलक, (६) आनंदलहरी, (७) चतुःश्लोकी भागवत टीका, (८) अभंग, (९) पदें–इतकीं प्रकरणें मराठी असून कांहीं कविता हिंदुस्थानी भाषेंतही आहे. याच्या गुरुचें नांव जनार्दनपंत होतें म्हणून त्यानें आपल्या कवितेंत आपलें नांव **'एका जनार्दन'** असें लिहिलेलें आढळतें. याची वाणी रसाळ आणि सरळ असून वर्णन करण्याची शैली मनोहर आहे. एकनाथानें मराठी भाषेवर केवढे उपकार केले या विषयाचें प्रतिपादन **'एकनाथाचें चरित्र'** नामक पुस्तकांत आणि 'आमची देशी भाषा विद्यापीठीं शोभण्यासारखी आहे कीं नाहीं?' या व्याख्यानांत प्रो० **रा**जाराम **रा**मकृष्ण **भा**गवत यांनीं केलें आहे तें पाहण्यासारखें आहे. महिपतीच्या 'भक्तलीलामृतां'त (अध्याय १३-२४) एकनाथाचें सविस्तर चरित्र आहे. याशिवाय रा० धोंडो बाळकृष्ण सहस्रबुद्धेकृत 'श्रीएकनाथ महाराज यांचें चरित्र' हें पुस्तकही पाहण्यालायक आहे. ७. यमुनातीरीं. ८. गोपालांसह.

### पद ४५ वें.

मजला[1] वरिल[2] सुभद्रा काय । कोणि तरि सांगा हो ! ॥ ध्रुवपद. ॥
आहे लग्नाची मनिं आस[3] । कैसा घ्यावा हो ! संन्यास ।
दिसतिल दाही दिशा उदास । होइल त्रास शरिराला. ॥ मजला० ॥ १ ॥
मजला अंतरतिल हे[4] पाय । पाहुनि धर्महि म्हणेल काय ।
द्रौपदि म्हणेल 'हायहाय !' । मुकेल माय[5] प्राणासी. ॥ मजला० ॥ २ ॥
जन म्हणतिल संन्यासी पार्थ । नाहीं प्रपंच ना परमार्थ ।
यांत कैंचा घडेल स्वार्थ । हें यथार्थ बोला हो ! ॥ मजला० ॥ ३ ॥
ऐकुनि बोले मे[6]घश्याम, । 'कार्या विघ्न करिल बळिराम ।
एका जनार्दनासी काम । करिं विश्राम यति[7]धर्मीं'. ॥ मजला० ॥ ४ ॥

### पद ४६ वें.

येडका मदन । तो केवळ पं[8]चानन. ॥ ध्रुवपद. ॥
थडक मारिली नारदा । केला रावणाचा चेंदा ।
दुर्योधना मारिली गदा । घेतला प्राण. ॥ तो केवळ० ॥ १ ॥
थडक मारिली शंकरा । केला ब्र[9]ह्याचा मातेरा ।
इंद्रा चंद्रासी भेंद[10]रा । लाविला ज्याणं. ॥ तो केवळ० ॥ २ ॥
[11]भस्मासुर मुकला प्राणासी । तीच गति झाली वा[12]ळीसी ।
विश्वामित्रासारिख्या ऋषी । नाडिला जाण. ॥ तो केवळ० ॥ ३ ॥
शुकदेवानें ध्या धरोनी । ये[13]डका आणिला आकळोनी ।
एका जनार्दनाचे चरणीं । लाविला जेणं. ॥ तो केवळ० ॥ ४ ॥

### पद ४७ वें.

सगुण चरित्रें परम पवित्रें हरिचीं वर्णावीं ।
स[14]ज्जनवृंदें मनोभावानें आधीं वंदावीं. ॥ ध्रुवपद. ॥
संतसंगें अंतररंगें नाम बोलावें, ।
कीर्तनरंगीं देवासंनिध सुखेंचि डोलावें. ॥ सगुण० ॥ १ ॥

---

१. हें सुभद्राप्रेप्सु मदनशरहत अर्जुनाचें कृष्णापाशीं भाषण आहे. २. वरणें=माळ घालणें, विवाह करणें. ३. इच्छा. ४. हे (तुझे—कृष्णाचे) पाय (चरण). ५. कुंती. ६. कृष्ण. ७. संन्यासीधर्मीं. ८. सिंह. ९. सरस्वतीस (स्वकन्येस) भुलून गेल्यामुळें. १०. भ्यायला. ११. मोहिनीरूप विष्णूच्या लावण्याला भुलून भस्मासुर मरण पावला. १२. रुमा (सुग्रीवपत्नी) पळवून आणल्यामुळें वालीला रामाच्या हस्तें मरण आलें. १३. येडकारूप मदन. १४. साधुसमुदायानें.

भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या, ।
प्रेमभरें वैराग्याच्या युक्ती विवराव्या. ॥ सगुण० ॥ २ ॥
जेणें करुनी मूर्ति ठसावी अंतरिं श्रीहरिची, ।
ऐशी कीर्तनमर्यादा ही देवाचे घरची. ॥ सगुण० ॥ ३ ॥
अद्वयभजनें अखंडस्मरणें वाजवि करताळी ।
एका जनार्दनीं मुक्ती होये तत्काळीं. ॥ सगुण० ॥ ४ ॥

**पद ४८ वें.**

मन रामीं रंगलें । अवघें मनचि राम झालें. ।
सबाह्यअभ्यंतरीं अवघें रामरूप कोंदलें हो! ॥ ध्रुवपद. ॥
आत्मया रामाचें ध्यान लागलें मज कैसें हो? ।
क्रियाकर्मधर्म अवघें तेणेंचि प्रकाशे हो! ।
सत्य मिथ्या प्रकृती पुरुष रामचि अवघा भासे हो! ॥ मन० ॥ १ ॥
चित्तचि हारपलें अवघें चैतन्य जाहलें हो! ।
देखतां देखतां अवघें विश्व मावळलें हो! ।
पाहातां पाहाणेंपणा हरिला, सर्वस्वें ठकवीलें हो! ॥ मन० ॥ २ ॥
भक्ति ज्ञान वैराग्य लाभे आत्मस्थिती हो! ।
निर्धारितां नकळे रामरूपीं जडली प्रीति हो! ।
एका जनार्दनीं अवघा रामचि आदिअंतीं हो! ॥ मन० ॥ ३ ॥

**पद ४९ वें.**

झालि संध्या, संदेह माझा गेला । आत्माराम हृदयीं सेजे आला. ॥ ध्रुवपद. ॥
गुरुकृपा निर्मळ भागीरथी । शांति क्षमा यमुना सरस्वती ।
असिपदीं एकत्र जेथें होती । स्वानुभवें स्नान हेचि गुप्त स्थिती. ॥झालि०॥१॥
सद्बुद्धीचें घातलें शुद्धासन । वरी दया सद्गुरुची कृपा पूर्ण ।
शमदम आंगीं विभुती चर्चिलें जाण । मुखीं उच्चारी केशव नारायण॥झालि०॥२॥
बोध पुत्र निर्माण झाला जेव्हां । ममता म्हातारी मरोन गेलि तेव्हां ।
भक्ति बहिण धांवोनी आली गांवा । आतां संध्या करूं मी कैंची केव्हां॥झालि०॥३॥
सहज कर्में तीं जालीं कृष्णार्पण । ऐसें ऐकतां नीवती साधुजन ।
जन नव्हे अवघाचि जनार्दन । एका जनार्दनीं लाधली हेचि खूण॥झालि०॥४॥

---

१.चिंताव्या.२.लागलींच.३.बाहेर आणि आंत.४.सांख्यमतांतील दोन मुख्य वस्तु, प्रकृति+पुरुष यांच्या संयोगानें सर्व जगत् उत्पन्न झालें आहे. ५. नष्ट झालें, लयास गेलें. ६. भस्म. ७. देवार्पण.

## पद ५० वें.

उठा जी! मायबाप । कशि लागलि झोंप? ।
हुजूर जाउनियां । येवढी चुकवा खेप. ॥ ध्रुवपद. ॥
रातच घोकीतो, तुम्ही सावध असा ।
तुमच्या नगरीचा, आम्हां नाहीं भरंवसा ।
उजेड पडताना कीं, गळां पडल फांसा. ॥ उठा० ॥ १ ॥
तुमची [1]नांदणूक, आम्हां दिसेना बरी ।
तुमच्या शेजारीं, दोन लोभी का नारी ।
त्याचा तुल वाद, पाहा गांवांत भारी. ॥ उठा० ॥ २ ॥
कोनतं हित केलं, बाप येथूनि मागं ।
आली या वाटांचे, न मोडावे माग ।
महाराच्या बोलन्याचा तुम्हां येतसे राग. ॥ उठा० ॥ ३ ॥
जुन्या ठेवन्याचा, कांहीं पुरजा काढा ।
एका जनार्दनीं धरा बळकट मेढा ।
त्याच्या आसऱ्यानं, आम्ही बोलूं घडघडा. ॥ उठा० ॥ ४ ॥

## पद ५१ वें.

रे कानोबा! सांग पां त्याचें नांव । त्याचा [2]वैसता कोण ठाव. ॥ ध्रुवपद. ॥
कृष्णा! एक पांखरूं आहे । तें मुखेंविण चारा खाये ।
त्याला डोळे नाहीं परि तें पाहे । तें वाचेविण बोलताहे. ॥ रे कानोबा० ॥१॥
तया पांख नाहीं परि तें उडे । त्यासि हिंडतां त्रिभुवन थोडें ।
त्याचे नखीं आकाश बुडे । तें सर्वेंचि पाहे चहूंकडे. ॥ रे कानोबा० ॥ २ ॥
त्यासि मायबाप दोनी नाहीं । त्याचा उपज कोणे ठायीं ।
तें एका एकपणें पाहीं । असे जनार्दनाचे पायीं. ॥ रे कानोबा० ॥ ३ ॥

## पद ५२ वें.

निंदक कामाचा कामाचा । गडी आत्मारामाचा. ॥ ध्रुवपद. ॥
निंदक आमुची काशी । आमुचीं पातकें [3]अवघीं नाशी. ॥ निंदक० ॥१॥
निंदक आमुचा सखा । आमुचीं वस्त्रें धूतो [4]फुंका. ॥ निंदक० ॥ २ ॥

---

१. वर्तन. २. राहण्याचा ठाव (स्थान). ३. सगळीं, सर्व. ४. फुकट, कांहीं न घेतां.

निंदक आमुची **गंगा** । आमचीं पातकें नेते भंगा[1] ॥ निंदक० ॥ ३ ॥
निंदक आमुचा गुरु । **एका जनार्दन** थोरु ॥ निंदक० ॥ ४ ॥

### पद ५३ वें.

जन कां निंदीना निंदीना । तसेंच निंदूं द्याना. ॥ ध्रुवपद. ॥
निंदक करिती निंदा । निंदिति हरळी शिंपी कुंदा. ॥ जन० ॥ १ ॥
काय कारण जनांशी । जडला सद्गुरुचरणांशीं. ॥ जन० ॥ २ ॥
[2]संतसमागमें झालों धीट । गुरुपद पावलों **वैकुंठ.** ॥ जन० ॥ ३ ॥
**एका जनार्दनीं** भावें[3] । आम्ही कोण कोणा भांडावें. ॥ जन० ॥ ४ ॥

### पद ५४ वें.

सांगा बा**! मारुती!** । किं मजला कधिं भेटेल **रघुपती.** ॥ ध्रुवपद. ॥
मी अपराधी, वचनीं निरंतर । छळिला ऊर्मिलापती[4]. ॥ किं मजला० ॥१॥
साधुसि छळिलें, मज फळ आलें, । वनिं राक्षस गर्जती ॥ किं मजला० ॥२॥
**एका जनार्दनीं** आसरा तुमचा । दे साधुसंगती. ॥ किं मजला० ॥ ३ ॥

### पद ५५ वें.

**संतांचा** महिमा काय कोण ऐसा वांणी[5]. ॥ ध्रुवपद. ॥
केवळ ईश्वरी अवतार । ज्यांचा चाले साक्षात्कार ।
करिती जड जीव उद्धार । मस्तकीं पाणी[6] ठेऊनी. ॥ संतांचा० ॥ १ ॥
**ज्ञानो**बाचा महाबोध । प्रत्यक्ष रेडा[7] बोलवी वेद ।
**तु**कारामाचे पैं कागद । बुडूं न शके पाणीं[8]. ॥ संतांचा० ॥ २ ॥
पाषाणांची मूर्ति भली । **ना**मदेवें जेवविली ।
[9]शरीराचीं पुष्पें झालीं । तो हा **क**बीर पहा. ॥ संतांचा० ॥ ३ ॥
**मुकुं**दराज **के**शवस्वामी । **रा**मदास निश्चय **रा**मीं ।
**एका जनार्दना**चे नामीं । कीर्ति आहे **पैठ**णीं. ॥ संतांचा० ॥ ४ ॥

### पद ५६ वें.

**दत्तगुरु दत्तगुरु दत्तात्रय** गुरु हो**!** ॥ ध्रुवपद. ॥
आदिनाथ दिनानाथ ब्रह्मरूप ॥ **दत्तगुरु**० ॥ १ ॥

---

१. लया. २. साधूंच्या संगतीनें. ३. भक्तीनें. ४. लक्ष्मण. ५. वर्णन करी. ६. हात. ७. ज्ञानेश्वरानें रेड्याकडून वेद बोलविला या सुप्रसिद्ध आख्यायिकेकडे कटाक्ष आहे. ८. पाण्यांत. ९. कबीराच्या अर्ध्या देहाच्या तुळशी व अर्ध्या देहाचा सबजा झाला—अशी आख्यायिका आहे.

शंखचक्रगदाधरा ब्रह्मरूप ॥ दत्तगुरु० ॥ २ ॥
उमापते! रमापते! ब्रह्मरूप ॥ दत्तगुरु० ॥ ३ ॥
पूर्णब्रह्म सनातन ब्रह्मरूप ॥ दत्तगुरु० ॥ ४ ॥
[1]अनसूयावरदपुत्र ब्रह्मरूप ॥ दत्तगुरु० ॥ ५ ॥
भक्तकाजकल्पद्रुम[2] ब्रह्मरूप ॥ दत्तगुरु० ॥ ६ ॥
सच्चित अतिसुखसागर ब्रह्मरूप ॥ दत्तगुरु० ॥ ७ ॥
निरंजन निराधार ब्रह्मरूप ॥ दत्तगुरु० ॥ ८ ॥
निर्विकल्प चित्प्रकाश ब्रह्मरूप ॥ दत्तगुरु० ॥ ९ ॥
सर्वांठायीं सदोदित ब्रह्मरूप ॥ दत्तगुरु० ॥ १० ॥
एका जनार्दनीं दत्त ब्रह्मरूप ॥ दत्तगुरु० ॥ ११ ॥

## पद ५७ वें.

कशी मी जाऊं वृंदावना । मुरली[3] वाजवितो कान्हा. ॥ ध्रुवपद. ॥
पहिले तीरीं हरी वाजवी मुरली[3] । नदी भरली यमुना. ॥ कशी० ॥ १ ॥
कासे पीतांबर केशरी टिळक । कुंडल शोभे कांना[4]. ॥ कशी० ॥ २ ॥
काय करूं कोणा सांगूं । नामाची सांगड आणा. ॥ कशी० ॥ ३ ॥
नंदाच्या हरीनें कौतुक केलें । जाणें अंतरींच्या खुणा. ॥ कशी० ॥ ४ ॥
एका जनार्दनीं मनीं म्हणा । देवमाहात्म्य न कळे कोणा. ॥ कशी० ॥ ५ ॥

## पद ५८ वें.

गौळणी[5] म्हणती यशोदेला । कोठें ग! सांवळा ।
कां रथ शृंगारिला । सांगा हो! मजला ।
अक्रुर उभा असे बाई! ग! साजणी! ॥ ध्रुवपद. ॥
ह्या नंदाच्या अंगणीं मिळाल्या गौळणी । बोले नंदाची राणी ।
सद्गदीत होउनि, मथुरेसी चक्रपाणी[6] । जातो ग! साजणी! ।
दुःखित झालें मन वँच[7] हें ऐकुनी ॥ गौळणी० ॥ १ ॥
अक्रुरा रे! चांडाळा! । तुज कोणी धाडिला ।
कां घात करूं आला । वधिसी सकळा ।
अक्रुरा! तुझी नाम तैसी करणी ॥ गौळणी० ॥ २ ॥

---

१. अनसूयेचा (वरद=वर देणारा असा) मुलगा=आत्रेय. २. कल्पवृक्ष. ३. पांवा. ४. कानाला. ५. हें प्रासंगिक पद आहे. अक्रूर कृष्णाला घेऊन कंसाकडे गेला त्या प्रसंगास उद्देशून यांत गोपींचे करुणविरहोद्गार आहेत. ६. ज्याच्या हातीं चक्र आहे तो. (कृष्ण.) ७. वचन, शब्द.

रथीं चढला [1]वनमाळी । आकांत गोकुळीं ।
[2]भूमीं पडल्या [3]व्रजबाळी । कोण त्यां सांभाळी ।
नयनींच्या उदकानें भीजली [4]धरणी ॥ गौळणी० ॥ ३ ॥
[5]देवें बोले अक्रुरासी । वेगें हांकी रथासी ।
ह्या गोपींच्या शोकासी । न पाहवे मजशीं ।
एका जनार्दनीं म्हणे रथ गेला निघूनी. ॥ गौळणी० ॥ ४ ॥

**पद ५९ वें.**

[6]जाऊं दे रे! जाऊं दे [7]कमलनयना रे! ॥ ध्रुवपद. ॥
अरे! कृष्णा! तुझी मुरली देखिली मी आज ।
यमुनेच्या वाटे दृष्टि पडली सहज ।
कुंजवनामधें झोंबी खेळूं पाहसी मज ।
जातें शुद्धपंथा कृष्णा रे! आडविशी कान्हा! ॥ जाऊं० ॥ १ ॥
घरीं द्वैत सासऱ्याचा जाच न साहे ।
गृहीं मोठी सासू क्रूर दृष्टीनें पाहे ।
पति माझा येतो क्रोधें जीव माझा जाये ।
दावी शुद्धपंथा कृष्णा रे! आतां मज कान्हा! ॥ जाऊं० ॥ २ ॥
घरीं जाच दारीं जाच तुझा पुरवला ।
दोहींपरिस आणिक तिसरा मुरलीचा झाला ।
देहभान गेलें म्हणुनी देहभान गेला ।
म्हणुनी जीव वारण्याला जाऊं दे कान्हा! ॥ जाऊं० ॥ ३ ॥
आतां मी कसा करूं उपाय याला ।
घडोघडी माझी [8]अबरू घेऊं लागला ।

---

१. वनमाला धारण करणारा. (कृष्ण.) वनमालेचें वर्णन संस्कृतांत आहे तें असें:—'आपादपद्मं या माला वनमालेति सा मता' इति कालिंगः; अथवा—'आजानुलंबिनी माला सर्वर्तुकुसमोज्ज्वला । मध्ये स्थूलकदंबाढ्या वनमालेति कीर्तिता ॥'; तात्पर्यार्थ—कंठांत घातली असतां पायांपर्यंत पोंचणाऱ्या मालेला 'वनमाला' असें नांव आहे. पूर्वोक्त प्रकारची माला श्रीकृष्णाची असे म्हणून त्यास 'वनमाली' म्हणतात. २. जमिनीवर. ३. गोकुळांतील गौळणी. ४. जमीन. ५. कृष्ण. ६. कृष्णाला उद्देशून प्रेमासक्त अशा कोण्या गोपांगनाचे हृदयोद्गार या पदांत व्यक्त केले आहेत. ७. कमलाप्रमाणें ज्याचे नेत्र आहेत तो. (कृष्ण.) ८. हा शब्द फारशी आहे. आब=पाणी, रू=मुख=मुखावरील पाणी=कीर्ति. मूळ शब्द आबरू व त्याचा अपभ्रंश अब्रू. अब्रू घेणें—अपकीर्ति करणें.

जातो यमुनेच्या वाटे अडवितो मला ।
माझें पातिव्रत्य सारें ठेविलें तुझ्या पायीं कान्हा! ॥ जाऊं० ॥ ४ ॥
तुजवीण संसार मज झाला पाठमोरा ।
तुझ्या मुरलीनें माझा बुडविला थारा ।
तिच्या नादें ऐसें वाटे व्यर्थ हा पसारा ।
एका जनार्दनीं साऱ्या झाल्या वेरझारा कान्हा! ॥ जाऊं० ॥ ५ ॥

## पद ६० वें.

पैरेस[1] सद्गुरु राया रे! । खेळया! पैरेस सद्गुरु राया रे! ॥ ध्रुवपद. ॥
देव पुजूं गेला देउळ उडालें पैरेस सद्गुरु राया रे! ।
चिंचेच्या पानावर देउळ रचलें आधिं कळस मग पाया रे! ॥ १ ॥
दोहीं तोंडीं हरिणी पाण्यावर आली मुखाविण पाणी प्याली रे! ।
आंधळ्यानें देखिली, बहिऱ्यानें ऐकिली, पांगळ्यानें लागुपाठ केली रे!॥२॥
पावसा नाहीं सांगड मृगजळ डोहीं वांझेचा पुत्र पोंहला रे! ।
एका[2] जनार्दनीं एकपणें विनवी अखंड रामनाम बोला[3] रे! ॥ ३ ॥[4]

## पद ६१ वें.

तें मन निष्ठुर कां केलें । जें पूर्ण दयेनें भरलें. ॥ ध्रुवपद. ॥
गजेंद्राचे[5] हाके सरसें । धांउनियां आलें. ॥ तें० ॥ १ ॥

---

१. खेपा. २. ऐक. ३. जोतें. ४. हें कूट पदांपैकीं एक पद आहे. ५. गजेंद्र—ही कथा श्रीमद्भागवत—स्कंध ८ अध्याय २-४ यांत आहे. क्षीरसागरांत त्रिकूट नामक एक पर्वत होता. त्याच्या खालच्या तटावर वरुणाचें ऋतुमत् नामक उद्यान होतें, आणि त्यांत एक अत्यंत रमणीय सरोवर होतें. तेथें उन्हानें संतप्त आणि तृषार्त असा एक गजेंद्र आपल्या कळपासह पाणी पिण्यासाठीं आला. तो सरोवरांत प्रवेश करून तेथील पाणी यथेच्छ पिऊन बाहेर येऊं लागला, तों त्याला एका सुसरानें पकडिलें. तेव्हां त्यानें नक्राच्या हातून सुटण्याचा पुष्कळ यत्न केला, परंतु सुटेना. त्याची सुटका करण्यासाठीं इतर गज, गजस्त्रिया, आणि कलभ (गजशावक) यांनींही पुष्कळ प्रयत्न केला. पण त्यांचेंही कांहीं चालेना. या उद्योगांत हजार वर्षें गेलीं; सर्व उपाय हरले. अखेरीस निरुपाय होऊन गजेंद्रानें हें प्राणसंकट टाळण्यासाठीं परमेश्वराचा धांवा केला (अध्याय २ श्लोक २-२९). 'मी ग्राहापासून मुक्त होण्याची इच्छा करीत नाहीं, तर अज्ञानमोक्षाची इच्छा करतों' इत्यादि गजेंद्रानें केलेलें स्तोत्र ऐकून प्रसन्न होऊन श्रीभगवान् हरि प्रकट झाला. त्याला पाहतांच 'हे नारायणा! अखिलगुरो! भगवन्नमस्ते' असे म्हणून गजेंद्रानें सोंडेनें एक कमळ उपटून भक्तिभावानें त्याच्या प्रीत्यर्थ वर आकाशांत फेंकून दिलें. तेव्हां त्या पीडिताला पाहून विष्णूला दया आली. त्यानें एकदम गरुडावरून उतरून सग्राह गजेंद्राला सरोवराच्या बाहेर काढून चक्रानें नक्राचें तोंड कापून त्यास सोडविलें. (अध्याय ३ श्लोक ३३.)

[1]प्रल्हादाच्या भावार्थासि । [2]स्तंभीं गुरगुरलें. ॥ तें० ॥ २ ॥
[3]पांचाळीच्या करुणावचनें । कळवळुनि आलें. ॥ तें० ॥ ३ ॥
एका जनार्दन पूर्ण कृपेनें । [4]निशिदिनीं पदिं रमलें. ॥ तें० ॥ ४ ॥

पद ६२ वें.

बा ! रे ! जन्मोनी केलेंस काय ? ॥ ध्रुवपद. ॥
घडि घडि पल पल वय हें जातें । व्यर्थ श्रमविली [5]माय. ॥ बा० ॥ १ ॥
कोण कैसा तूं आलास कोठून । हेंचि मनिं शोधुनी पाहे. ॥ बा० ॥ २ ॥
एका जनार्दनीं शरण तूं जाईं । धरि सदां गुरुचे पाय. ॥ बा० ॥ ३ ॥

पद ६३ वें.

श्रीपाद औदुंबरवासा । कृष्णातीरनिवासा रे ! ॥ ध्रुवपद. ॥
[6]काषायांबर दंड कमंडलु । [7]ध्यानातीत सुंदर रे ! ।
त्रिशूळ चक्र करीं विराजित । भस्म रुद्राक्षधारण रे ! ॥ श्रीपाद० ॥ १ ॥
गंगातीरीं स्नान सारी । पंढरपुरिं श्रीखंडा रे ! ।
निद्रासन माहुरीं करी । भिक्षा मागत पंढरपुरीं रे ! ॥ श्रीपाद० ॥ २ ॥
चौदा विद्या चौसष्ट [8]कला । रिद्धीसिद्धी ओळंगत रे ! ।
एका जनार्दनीं स्मरण करितां । दुःखें सर्वेही हरती रे ! ॥ श्रीपाद० ॥ ३ ॥

---

१. प्रल्हाद—हिरण्यकशिपूस कयाधूपासून झालेला ज्येष्ठपुत्र. हा भगवन्निष्ठ आणि विष्णूचा उपासक म्हणून पित्यानें ह्याचा पुष्कळ छळ केला. शेवटीं या परमभागवताच्या सेवेनें प्रसन्न होऊन नृसिंहानें याच्या पित्याचा वध केला आणि याचें संरक्षण केलें. (भागवत—स्कंध ७ अध्याय १-१०.) २. खांबांत. ३. पांचाळी=द्रौपदी. द्रुपदराजाची कन्या. हिला पित्याच्या नांवावरून 'पांचाली,' 'याज्ञसेनी' अशीं नांवें पडलीं. द्रुपदराजानें, हिचें कौतुकानें 'कृष्णा' असें नांव ठेविलें होतें. ४. रात्रंदिवस. ५. आई. ६. रंगित वसन. ७. ज्याचें ध्यान करतां येत नाहीं असा. ८. कलांसहित, चौसष्ट कलांसहित. या कलांचीं नांवें:—१ अभिधानकोश, २ अक्षरमुष्टिकाकथन, ३ आकारज्ञान, ४ आकर्षकक्रीडा, ५ आलेख्य, ६ उत्साहन, ७ उदकघात, ८ उदकवाद्य, ९ ऐंद्रजाल, १० काव्यसमस्यापूरण, ११ कर्णपत्रभंग, १२ केशमार्जनकौशल, १३ क्रियाविकल्प, १४ क्रौंचमारणयोग, १५ गंधयुक्ति, १६ गीत, १७ चित्रयोग, १८ चित्रशाकापूभक्तविकारक्रियां, १९ छंदोज्ञान, २० छलितयोग, २१ तंदुलकुसुमबलिप्रकार, २२ तर्ककर्म, २३ तक्षण, २४ दशनवसनांगराग, २५ दुर्वचकयोग, २६ देशभाषाज्ञान, २७ द्यूतविशेष, २८ धातुवाद, २९ नाटकाख्यायिकादर्शन, ३० नाट्य, ३१ नृत्य, ३२ नेपथ्ययोग, ३३ पट्टिकावेत्रबाणविकल्प, ३४ पानकरसरागासवयोजना, ३५ पुष्पवाटिकानिमित्तज्ञान, ३६ पुष्पास्तरण, ३७ पुस्तकवाचन, ३८ प्रतिमाला, ३९ प्रहेलिकाकूटवाणीज्ञान, ४०, बालक्रीडन, ४१, भूषणयोग, ४२ मणिभूमिकाकर्म, ४३ मणिरागज्ञान, ४४ मानसी काव्यक्रिया, ४५ माल्यग्रथनविकल्प, ४६ मेषकुक्कुटलावकयुद्धविधि, ४७ म्लेंच्छितकविकल्प, ४८ यंत्रमातृकाधारणामातृकासंवाय, ४९ रौप्यरत्नपरीक्षा, ५० वस्त्रगोपन, ५१ वाद्य, ५२ वास्तु, ५३ विशेषकच्छेद्य, ५४ वीणाडमरुवाद्य, ५५ वृक्षायुर्वेदयोग; ५६ वैनयिकविद्याज्ञान, ५७ वैतालिक-

### पद ६४ वें.

नित्य नवा कीर्तनीं जैसा ओढवला रंग ।
श्रोता आणि वक्ता स्वयें झाला श्रीरंग. ॥ ध्रुवपद. ॥
अल्ला देव वैष्णव करिती नामाचा घोष ।
हरिनाम गर्जती गगनीं नै समाये हर्ष. ॥ नित्य० ॥ १ ॥
पदोपदीं कीर्तनीं निवेदिती आहे जनवान ।
आवडी भुकेली तिणें गिळिलें गगन. ॥ नित्य० ॥ २ ॥
एका जनार्दनीं नित्य हरीचें कीर्तन ।
निमालें इंद्रिय विषया विसरलें काम. ॥ नित्य० ॥ ३ ॥

### पद ६५ वें.

आईचा जोगवा मागेन मागेन ॥ ध्रुवपद. ॥
अनादि निर्गुण प्रगटली भवानी । मोहम्हैसासूरमर्दनालागुनी ।
त्रिविध ताप करावया झाडणी । भक्तालागीं तूं पावसी निर्वाणी ॥ आई० ॥ १ ॥
द्वैत सारून माळ मी घालीन । हातीं बोधाचा झेंडा मी धरीन ।
........................... । भेदरहित वारीसी जाईन. ॥ आई० ॥ २ ॥
पूर्ण बोधाची भरीन मी परडी । आशा मनीषाची पाडीन पैरवडी ।
मनोविकार करीन कुरवंडी । अद्भुत रसाच्या भरीन दुरडी ॥ आई० ॥ ३ ॥
नवविध भक्तीच्या करोनि नवरात्रा । करोनि पोटीं मागेन ज्ञानपुत्रा ।
सांडुनि अंतरीं सद्भावींच्या मित्रा। दंभ सासरा सांडीन कुपुत्रा ॥आई० ॥ ४ ॥
आतां साजणी ! झालें मी निःसंग । विकल्पसोयऱ्याचा सोडियला संग ।
कामक्रोध हे झोडियले मांग । लोभ कळा मारग सुरंग ॥ आई० ॥ ५ ॥
आईचा जोगवा मागुनी ठेविला । जाउनि महाद्वारीं नवस म्यां फेडिला ।
एक एकपण जनार्दन वळखिला । जन्म मरणाचा फेरा चुकविला ॥ आई० ॥ ६ ॥

---

विद्यादान. ५८ वैनायिकविद्यादान, ५९ शयनरचना, ६० शुकसारिकाप्रलापन, ६१ शेखरापीडयोजना, ६२ सूचीवानकर्म, ६३ सूत्रक्रीडा, आणि ६४ हस्तलाघव. हीं कलांचीं नांवें श्रीमद्भागवत–दशमस्कंध–अध्याय ४५ श्लोक ३६ याच्या टीकेंत दिलीं आहेत. तसेंच श्रीवात्स्यायनप्रणीत **'कामसूत्र'** नामक ग्रंथाच्या प्रथम अधिकरणाच्या 'विद्यासमुद्देश' नामक तृतीय अध्यायांत सविस्तर दिलीं आहेत.

१. ऐकणारा. २. बोलणारा. ३. न राहे. ४. अंबाबाईचा, देवीचा. ५. जोगवा मागणें=देवीच्या नावानें नवरात्रांत भिक्षा मागणें. ६. भवपत्नी, देवी काली. ७. महिषासुर. ८. आध्यात्मिक, आधिभौतिक आधिदैविक असा त्रिविध ताप. ९. समृद्धि, विपुलता. १०. कुरवंडी करणें=बळी देणें. ११. टोपल्या. १२. नऊ प्रकारच्या भक्तीच्या. [श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, आत्मनिवेदन–अशीं नवविधाभक्तींचीं नांवें आहेत.]

### पद ६६ वें.

येई पुंडलीकवरदायिनी, विश्वजननी रंगा येई हो! ॥ ध्रुवपद. ॥
माझे कुळचे कुळस्वामिनी, विठाई जगत्रयजननी ! ।
येई पंढरपुरवासिनी, ठेविले दोनी, कर जंघनीं, उभी सुखसदनीं. ॥ १ ॥
मध्यें सिंहासन घांतलें, चार चउक साधिले ।
ज्ञानकळस वरि ठेविले, पूर्ण बोधिले, धूप दीपिले, स्वासें करुनी. ॥ २ ॥
चार पुरुषार्थ गोंधळी, जीव शीव घेउनी संबळी ।
हर्षें गाती नामावळी, मातले बळी, प्रेमकल्लोळी, आनंदें करुनी. ॥ ३ ॥
दिव्य मंडप अतिशोभला, भक्ती चांदवा दीधला ।
उदोउदो शब्द गर्जला, रंग मातला, वेद बोलिला, सुखाचे सदनीं. ॥ ४ ॥
ऐसा गोंधळ घातला, भक्तिपरमार्थ लुटिला ।
एका जनार्दनीं भला, ऐक्य पावला, ठाव आणिला, लाभ त्रिभुवनीं.॥ ५ ॥

### पद ६७ वें.

ऐक ऐक तुं सखये ! बाई ! नवल मी सांगूं काई? ।
त्रैलोक्याचा धनी तो हा यश्वदेसी म्हणतो 'आई' ॥ ध्रुवपद. ॥
देवकीनें वाहीला गे ! । यश्वदेनें पाळीला गे ! ।
पांडवांचा बंधुजन होऊनीयां राहीला गे ! ॥ १ ॥
ब्रह्मांडची साठवण । योगीयांचें नीज ध्यान ।
चोरी केली म्हणुनीयां उखळासी बंधन. ॥ २ ॥
सकळ तीर्थें ज्याचे चरणीं । सुलभ हा सुलभ पाणी ।
राधीकेसी म्हणतो, 'तुजी करीतों मीं वेणीफणी' ॥ ३ ॥
शरण एका जनार्दनीं । कैवल्याचा मोक्षदानी ।
गाई गोप गोपबाळा मिळविली आपुलेपणी. ॥ ४ ॥

### पद ६८ वें.

अरे कृष्णा ! अरे कान्हा ! मनरंजनमोहना ॥ ध्रुवपद. ॥
संत आले घरीं तरी काय बोलुन शिणवावे? ।
उंस गोड झाला म्हणून काय मुळासहीत खावा? ।
प्रीतीचा पाहुणा झाला म्हणून काय फार दिवस राहवा? ।
गांवचा पाटेल झाला म्हणुन काय गांवच बुडवावा? ॥ अरे कृ० ॥ १ ॥

---

१. मांड्यांवर. २. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष. ३. उदय उदय होवो–असा शब्द. ४. साधुजन.

देवं[1] आंगीं आला म्हणुन काय भलतेंच बोलावें ? ।
चंदन शीतळ झाला म्हणुन काय उगाळुन प्यावा ? ।
वडील रागें भरला म्हणुन काय जिवेंच मारावा ? ।
भगवीं वस्त्रें[2] केलीं म्हणून काय जगच नाडावें ? ॥ अरे कृ० ॥ २ ॥
आगया विंचु झाला म्हणुन काय कंठींच कवळावा ? ।
फुकाचा हत्ती झाला म्हणुन काय भलत्यांनीं न्यावा ? ।
फुकट हीरा झाला म्हणून काय कथिलीं जोडावा ? ।
नित्य व्याज खातो म्हणून काय मुद्दल बुडवावें ? ॥ अरे कृ० ॥ ३ ॥
परस्त्री सुंदर झाली म्हणून काय बळेंच भोगावी ? ।
सखा मित्र झाला म्हणून काय बाईल मागावी ? ।
सोन्याची सुरी झाली म्हणून काय उरींच मारावी ? ।
मखमली पैजनें[3] झालीं म्हणुन काय शिरींच वंदावीं ? ॥ अरे कृ० ॥४॥
सद्गुरु सोयरा झाला म्हणुन काय आचार बुडवावा ? ।
नित्य देव भेटे तरी काय जगाशीं दावावा ? ॥
घरचा दिवा झाला तरी काय आडनीं बांधावा ? ।
एका जनार्दन म्हणे हरी हा गुप्तची वोळखावा ? ॥ अरे कृ० ॥ ५ ॥

## पद ६९ वें.

धांव रे ! धांव आतां । दीनवत्सला रामा ! ॥
संसारसंगें दोषी । नित्य गुंतलों कामा. ॥ ध्रुवपद. ॥
तारुण्य अभिमान । देहा भरला ताठा ॥
वैभवसंपत्तीचा । आंगीं फुटला फांटा. ॥ धांव रे० ॥ १ ॥
विषय सेवितां हे । वय खोंचलें माझें ॥
स्वहित आठवेना । ध्यान चुकलों मी तुझें. ॥ धांव रे० ॥ २ ॥
विषय मोकळोनी । शरण तुज मी आलों ॥
एका जनार्दनीं । दास तुझा मी झालों. ॥ धांव रे० ॥ ३ ॥

## पद ७० वें.

आहा रे ! दैवा काय हें करवीसी ? । मातेच्या हस्तें बाळ मारवीसी. ॥ ध्रुवपद. ॥
[क]याधूमाता[4] करोनियां पाक । आठवी आपुल्या कर्माचा वीपाक[5] ॥
[घ]ोरीयेमाजी मेळविलें ताक । माझीये मनीं होता बहु धाक ॥ आहा रे० ॥१॥

१. देव आंगीं येणें=देवाचा संचार आंगांत होणें. २. भगवीं वस्त्रें करणें=संन्यासी होणें. [३.] पांयतणें. ४. प्रऱ्हादाची आई. ५. परिणाम.

काय म्यां केला साधूचा अपमान । किंवा म्यां हरिलें ब्राह्मणाचें धन ॥
गांजियलें काय अनाथालागून । ढकलिलें कूपीं अंधातें नेऊन ॥ आहा रे० ॥२॥
स्त्रीपुरुषांमाजी अंतर पाडिलें । बाळक मातेपासूनी विघडीलें ॥
हरिणीचें काय बाळक तोडिलें । मत्स्यासीं जळाबाहेर काढिलें॥ आहा रे० ॥३॥
पतीची आज्ञा मजला मोडवेना । पतिव्रताधर्म मजला सोडवेना ॥
स्नेहाचा पाश मजला तोडवेना । द्यावया विष हात ओढवेना ॥ आहा रे० ॥४॥
नवमास तुज म्यां उदरीं वाहिलें । डोळेभरि नाहीं तूज म्यां पाहीलें ॥
मंगळकार्य होणें तें राहीलें । द्यावया वीष तान्हुलें बाहीलें[1] ॥ आहा रे० ॥५॥
ये रे बा! सगुणा प्रल्हादा! राजसा । तुजला मी जेवूं घालितें पाडसा ॥
तुजवीणें मजला ओस दाही दिशा । निष्ठुर कैसा जाहलासी जगदीशा! ॥आहा०
हृदयीं धरूनी दीधलें चुंबन । कुरवाळी हस्तें बाळाचें वदन ॥
स्नेहाचिये भरें मांडीलें रुदन । सद्गदित एकनाथ जनार्दन ॥ आहा रे० ॥ ७ ॥

**पद ७१ वें.**

वेधू लाविला गोविंदें, परमानंदें, आनंदकदें, वेधू लाविला. ॥ध्रुवपद.॥
यशोदेशीं गौळणी सांगती गार्‍हाणीं ।
नटनाटक कपटी सांभाळी आपुली तान्ही ।
किती खोडी याच्या सांगूं साजणी! ।
सेहस्त्रमुख[2] भागला, निवांत ठेला, वेद परतला, [3]नेतीनेती शब्दु ॥ वेधू० ॥
एके दिवशीं मी गेलें यमुनातिरीं जीवैना[4] ।
सवें गोप संगती घेऊनी आला कान्हा ।
करीं धरी पदरा न सोडी जाणा ।
एकां घाली मिटी, न सुटे गांठी, पाहिली दृष्टी, नित्य आनंदु ॥ वेधू० ॥२॥
एके दिवशीं घराशीं आले सारंगपाणी[5] ।
दहीं दुध भक्षिलें रिती केली दुधाणी ।
अज्ञान मडकें टाकिलें निपटोनी ।
पाहिला हरी, घराभीतरी, पळाला दुरी, बाई यशोदेचा ॥ वेधू० ॥ ३ ॥

---

१. बोलाविलें. २. शेष नाग. ३. 'न इति न इति' इत्यादि उपनिषद्वचन. ४. उदकाला. ५. शार्ङ्गपाणि. (शार्ङ्ग धनुष्य ज्याच्या हातीं आहे तो.)

किती खोडी याच्या सांगूं साजणी ! ।
गुण लिहितां न पुरे मेदिनी ।
रूप सुंदर पाहतां न पुरे नयनीं, ।
एका जनार्दनी, वेधल्या नारी, गवळण तान्ही, सारंगपाणी.॥ वेधू०॥४॥

**पद ७२ वें.**

आल्या पांच गौळणी । पांच रंगांचे शृंगार करूनी ॥ ध्रुवपद. ॥
पहिली गौळण रंग सेफेत[1] । जशी चंद्राची जोत ॥
गगनीं चांदणी लखलखित । ऐका तिची मात. ॥
मंथन करीत होती दारांत । धरुन कृष्णाचा हात ॥
ऐशा नटून आल्या पांच गौळणी ॥ १ ॥
दुसरी गौळण भाळीं भोळी । रंग हळदीहून पीवळी ॥
पिवळा पीतांबर नेसुन आली । आंगीं बुटेदार चोळी ॥
एक लहान तनू[2] उमर कंवळी[3] । जशी चांफ्याची कळी ॥
ऐशा नटून आल्या पांच गौळणी ॥ २ ॥
तिसरी गौळण रंग काळा । नेसुन चंद्रकळा ॥
काळें काजळ लेऊन डोळां । रंग तिचा सांवळा ॥
काळी गरसोळी लेऊन गळां । आली राजस बाळा ॥
ऐशा नटून आल्या पांच गौळणी ॥ ३ ॥
चवथी गौळण रंग लाल । लाल लालडी लाल ॥
कपाळीं कुंकुचिरी लाल । भांगीं भरून गुलाल ॥
मुखीं विडा रंग लाल । जसें डाळिंबीचें फूल ॥
ऐशा नटून आल्या पांच गौळणी ॥ ४ ॥
पांचवी गौळण हिरवा रंग । अवघ्या झाल्या दंग ॥
हिरव्या कंकणाचा पहा रंग । आरशींत जडलें भिंग ॥
फुगडी खेळती कृष्णासंग । एकनाथ अभंग ॥
ऐशा नटून आल्या पांच गौळणी. ॥ ५ ॥

---

१. शुभ्र. २. शरीर. ३. कोमल.

**पद ७३ वें.**

**गो**विंदु घ्या कोणी **दा**मोदर घ्या गे ! । तव हासती **मथु**रेच्या नारी गे ! ॥ ध्रु.॥
दुडिवरि दुडी गौळणी साते निघाली । गौळणगोरस म्हणो विसरली ॥ १ ॥
दडिया माझारी **का**न्होबा झाला भारी । उचंबळे गोरस सांडे बाहेरी ॥ २ ॥
**ए**का **ज**नार्दनीं सबळस गौळणी । ब्रह्मानंद न समाये मनीं ॥ ३ ॥

**पद ७४ वें.**

वाऱ्यानें [१]कुंडल हाले । डोळे मोडित **रा**धा चाले ॥ ध्रुवपद. ॥
**रा**धेला पाहुनी भुलले **ह**री । बैल दोही तो आपुले घरीं ॥ १ ॥
फणस गंभीरी कर्दळी दाटे । हातीं घेऊनी नारंगी फाटे ॥ २ ॥
**ह**रिला पाहूनी भुलली चित्ता । मंदिरिं घुसळी खडबडी डेरा रिता ॥ ३ ॥
मन मिळालेंसे मना । **ए**का भुललों **ज**नार्दना ॥ ४ ॥

**पद ७५ वें.**

कां रे! आमुची त्वां धरियेली वाट, ।
गवळण गोपी बाळा त्यजविला [३]हाट ॥ ध्रुवपद.॥
न म्हणसी लेकी सुना कर्म करिसी अचाट ।
**ए**का **ज**नार्दनीं तारी गुण नाम देव गर्जती जैसे भाट ॥ कां रे० ॥ १ ॥

**पद ७६ वें.**

**रा**धे ! **रा**धे ! **रा**धे ! **रा**धे ! घेई श्यामसुंदरा ॥ ध्रुवपद. ॥
नानापरि समजावितें परि न राहे **ह**री ।
दहिंभात कालउनी दिलासे झडकरी ।
कडेवर घेउनीयां फिरविलें मी **दा**मोदरा ॥ **रा**धे० ॥
क्षणभरि घरीं असतां खोडी करी [४]**सा**रंगपाणी ।
बाहेरी येतां जातां आळ घेती गवळणी ।
थापटुनि निजविते उठोनि येतो द्वारा ॥ **रा**धे० ॥ २ ॥
**रा**धा घेउनियां **ह**रिला गेली निज मंदिरीं ।
हृदयमंचकावरी निजविला **ह**री ।
**ए**का **ज**नार्दनीं **रा**धा भोगीतसे सुंदरा ॥ **रा**धे ० ॥ ३ ॥

**पद ७७ वें.**

पाण्या जातां तुम्ही घरीं मी येकली ।
**का**न्हा येतो घाई घाई, शिव्या कां हो ! देतां सासुबाई ! ॥ ध्रुवपद.॥

---

१. कृष्ण. २. कर्णभूषण. ३. बाजार. ४. शार्ङ्गपाणि. (कृष्ण.)

पतीचा घेतो वेष कुसरी विशेष ।
करीं धरोनी साई खाई । शिव्या कां हो! देतां सासुबाई ! ॥ १ ॥
एका जनार्दनीं तुमची आण ।
माझा अपराध नाहीं । शिव्या कां हो ! देतां सासुबाई ! ॥ २ ॥

### पद ७८ वें.

उठुनी प्रातःकाळीं गौळणी घुसळण घुसळिती ।
गाती कृष्णाचे पवाडे हृदयीं पदोपदीं ध्याती. ॥ ध्रुवपद. ॥
प्रथम मत्स्य अवतार तुमचें अगाध चरित्र ।
न कळेच ब्रह्मादिकां वैष्णव गाती पवित्र. ॥ गाती० ॥ १ ॥
द्वितीय अवतारीं आपण कूर्मरूप झालां ।
सृष्टी धरुनी पृष्ठीं शेवटीं सांभाळ केला. ॥ गाती० ॥ २ ॥
तृतीय अवतारीं आपण वराहरूप झालां ।
धरणी धरुनी दाढे हिरण्याक्ष वधियेला. ॥ गाती० ॥ ३ ॥
चतुर्थ अवतारीं आपण नरहरिरूप झालां ।
रक्षुनी प्रल्हादासी हिरण्यकश्यप वधिला. ॥ गाती० ॥ ४ ॥
पांचवे अवतारीं आपण वामन झालां ।
बळी घालुनी पाताळीं शेवटीं द्वारपाळ ठेविला. ॥ गाती० ॥ ५ ॥
सहावें आवतारीं आपण परशुराम झालां ।
फरश घेउनी हातीं सहस्रार्जुन वधियेला. ॥ गाती० ॥ ६ ॥
सातवे अवतारीं आपण दाशरथी झालां ।
वधुनी रावण कुंभकर्ण बिभीषणा सुख दीलें. ॥ गाती० ॥ ७ ॥
आठवे अवतारीं आपण वसुदेवाघरीं ।
वधुनी कंसादिक असुर मारिले भारी. ॥ गाती० ॥ ८ ॥
नववे अवतारीं आपण बौद्धरूप झालां ।
धरुनियां मौन भक्तांघरीं राहिलां. ॥ गाती० ॥ ९ ॥
दहावे अवतारीं आपण झालांसे वारू ।
एका जनार्दनीं वर्णिल त्याचा पैडिभारू. ॥ गाती० ॥ १० ॥

---

१. कौशल्य. २. गहन, खोल. ३. कांसव, कमठ. ४. डुकररूप. ५. पृथ्वी. ६. हा असुर भूलोकाला पाताळांत घेऊन चालला असतां, वराहरूप विष्णूनें यास मारून पृथ्वीचा समुद्धार केला. ७. कुऱ्हाड. ८. 'वैरी' असाही पाठ आहे. ९. बडिवारू, मोठेपणा, डामडौल.

### पद ७९ वें.

गोधन चारावया जातो सारंगपाणी । मार्गीं भेटली राधिका गौळणी ।
कृष्ण दान मागे निरी आसडुनी । तव तैं देखिली यशोदा जननी. ॥ ध्रु० ।
यशोदा म्हणे, 'नाटका हृषीकेशी ! । परनारीसी कैसा झोंबसी ?' ।
येरु रुदतो, सांगतो, मातेपासीं, । 'माझा चेंडु लपविला निरीपासीं'. ॥ १ ॥
राधिका म्हणे, 'यशोदे ! परियेसी । तुझा लटिका लबाड हृषीकेशी ।
चेंडु नाहीं कांहीं नाहीं मजपाशीं' । निरी आसडितां चेंडु पडे धरणीसी. ॥ २ ॥
यशोदा म्हणे, 'चोलका तुम्ही नारी । मार्गीं बसतां क्षण एक मुरारी ।
एका जनार्दनीं विनवी श्रीहरी । नाम घेतां पापें जाती दुरी. ॥ ३ ॥

### पद ८० वें.

जोहार मायबाप ! जोहार । मी मृत्युलोकींचा महार ।
सांगेन कलीचा सारासार विचार । पुढें होणार कीं जी ! मायबाप. ॥ध्रु०॥
ऐका तुम्ही हा एक विचार बरा । विनवितों मी या पामरा नरा ।
रामनाम बळकट धरा । पुढें कामा येईल कीं जी ! मायबाप. ॥ १ ॥
लुकताच लागला कलीचा वारा । असत्यापुढें सत्यास मिळेना थारा ।
देवादिकांचा होईल थरारा । हें मनीं उमजा कीं जी ! मायबाप. ॥ २ ॥
नको नको हा प्रपंच अवघा लटका । जेव्हां येईल यमाजीबाजीचा झटका ।
न लागतां पळ घटका । करितील घोंटाळा कीं जी ! मायबाप. ॥ ३ ॥
एका जनार्दनीं महार होउनी निघालों । सद्गुरूला शरण आलों ।
जन्ममरणापासून मुक्त झालों । मी भाग्याचाच कीं जी ! मायबाप. ॥ ४ ॥

### पद ८१ वें.

जोहार मायबाप ! जोहार । मी विठ्ठलपाटलाचा महार ।
सांगतों सारासार विचार । मी तुमचाच कीं जी ! मायबाप. ॥ ध्रुवपद. ॥
गांव तरी पांचां पाटलांचा । आणि पंचवीस प्रजांचा ।
तेथें सहाजणांचा । कारभार कीं जी ! मायबाप. ॥ जोहार० ॥ १ ॥
गांव तरी होता चांगला । परी ह्या सहाजणांनीं नासिला ।
तुम्हीही त्यासी मिळालां । हें काय बरें कीं जी ! मायबाप. ॥ जोहार० ॥ २ ॥
मैंदाजीबाजीचें वेगळेंची बंड । त्यासीं लोभाजीबाजी मिळाले लंड ।
हे अवघे मिळुनी थोथांड । रचिलें कीं जी ! मायबाप. ॥ जोहार० ॥ ३ ॥

---

१. धेनुसमूह. २. 'चिटवळ' असा अन्य पाठ आहे. ३. सहा शत्रूंपैकीं एक.

एका जनार्दनीं कुऱ्हाडी मोठा । जेणें बाकीस मारिला फांटा ।
अखंड कैलासींचा दारवंटा । मोकळा केला कीं जी! मायबाप. ॥जोहार०॥४॥
अखंड कैलासीं रहाणें । सुखसमाधि असणें ।
गुरु जनार्दनाचें देणें । आहे कीं जी! मायबाप. ॥ जोहार० ॥ ५ ॥

## पद ८२ वें.

जोहार जी! मायबाप! जोहार धनी । मी तो निराकारींची महारिणी ।
माझ्या धन्यास निद्रा लागली म्हणोनी । मी येऊन उभी ठाकली कीं जी! मायबाप॥ध्रु०
माझे धनी येकुलते येक होते । तेव्हां त्यांस कर्म नव्हतें ।
म्हणुन मी तेथें । उभी ठाकली कीं जी! मायबाप ॥ जोहार० ॥ १ ॥
तेव्हां म्हणाल कोण कोण । त्यांचीं नांवें परिसा सकळ ।
मोठे मोठे केले ढीसाळ[1] । संतसभेसी ओढून आणले कीं जी! मायबाप॥जोहार० २
देवकऋषी[2] माझे नारद । तो कोणासी झाला नाहीं रत ।
द्वारके झाला त्याचा माझा संबंध । साठ[3] पुत्र व्याला कीं जी! मायबाप ॥जोहार० ३
सर्वांत ब्रह्मा प्रौढ । तो धरी मजसीं बहुत वेड ।
त्यावरी घातलें कन्येचें[4] लिगाड । मग पस्तावीं पडला कीं जी! मायबाप॥जोहार० ४
ऋषींमाजी पाराशरु । त्याची निर्भर्त्सना केली फारु ।
दिवसाचा करुनी अंधारू । ढीवरीसी[5] रतीवला कीं जी! मायबाप ॥जोहार० ५
ब्रह्मचर्यांमाजी हनुमान । तो धरी मजसी बहूत गुमान ।
मग मकरध्वजाचें बळ जाण । दांत विचकुनी उभे केले कीं जी! मायबाप ॥जो०॥६
मग छळीलें व्यासाचें शुक देव पोर । तेणेंच काढिली पायींची पैजार ।
........................ । मज तोंडीं मारली कीं जी! मायबाप ॥जोहार०॥७॥
ऐशाऐशांच्या ह्या गती । मज नागवे उघडे जिंकों पाहाती ।
त्यांचे तोंडीं पडो माती । नेणूं किती कीं जी! मायबाप ॥ जोहार० ॥ ८ ॥
एका जनार्दनीं विनंती करी । जो करी पंढरीची वारी ।
त्याचेवर बळ न चाले निर्धारीं । येऱ्हवीं झोडपीती कीं जी! मायबाप॥जोहार०॥९.

---

१. उंच, मोठे, थोर, विशाळ. २. देवर्षि. ३. प्रभव, विभव, शुक्ल इत्यादि साठ संवत्सर हे नारदाचे पुत्र होत. [मुहूर्तमाला–पृष्ठें ६-७.] ४. स्वकन्येला (सरस्वतीला) पाहून विधि भुलून गेला—अशी कथा आहे. ५. सत्यवतीशीं.

### पद ८३ वें.

अहो ! रमाबाई । मानवी रमाबाई ॥ ध्रुवपद. ॥
अयोध्येचा हो ! देवारा । भरला [1]हकाराचा वारा ।
डोळे फिरवी गरगरा । मानवी रमाबाई ॥ १ ॥
रमाबाईचा हो शेला । ब्रह्मशेटीनें विणिवीला ।
तुजलागीं पांघरवीला । मानवी रमाबाई ॥ २ ॥
रमाबाईचा घरचारु । चौघा जणांचा विस्तारु ।
साचौंआठरांचा पेंडीभारू । मानवी रमाबाई ॥ ३ ॥
येथुनी जाहलासे सोहळा । रमाबाईला ओवाळा ।
एका जनार्दनीं मोळा । मानवी रमाबाई ॥ ४ ॥

### पद ८४ वें.

जय जगदंबे ! पूर्णकदंबे जगविदबोधे ! ।
देह तुज अर्पिला । तुज म्यां [2]फुलवरा बांधिला. ॥ ध्रुवपद.
पिंड अंड ब्रह्मांड अंतरीं दैवत भिन्नाकृती हो ! ।
शोधुनी पाहतां अवघें चराचर व्यापकधर संपत्ती हो ! ।
भेद भाव त्रिगुणाचा रजतमसत्वाची आरती हो ! ॥
चाल ॥ ऐसें जाणुनी, केली उभवणी, द्वैत सांडुनी ।
तोड ॥ परी तो हरी मनीं अंकिला । तुज म्यां फुलवरा बांधिला. ॥ १ ॥
आई भवानी थोर जाणुनी तुज म्यां उपासीलें हो ! ।
खुळा पांगुळा करुनी आपणाजवळी बैसविलें हो ! ।
हातीं परडी देउन तिनें मज भिकेसीं लाविलें हो ! ॥
चाल ॥ उदो अस्ता भरे, गरगरां फिरे, भुते वावरे ।
तोड ॥ मज व्यर्थ शीण वाटला । तुज म्यां फुलवरा बांधिला. ॥ २ ॥
खंडोबासी नवस करुनी, मुरळी होउनी बैसली हो ! ।
घरीं मागतां पोट भरेना बहु श्रम पावली हो ! ।
आपुले जे कां सखे सज्जन वांचुन भरीं भरली हो ! ॥
चाल ॥ श्वानाचियेपरी, व्यर्थ गुरगुरी, जाय चौंचरी ।
तोड ॥ सुखाचा लेश नाहीं लाधला । तुज म्यां फुलवरा बांधिला. ॥ ३ ॥

---

१. अहंकाराचा. २. मोठेपणा, डामडौल. ३. फुलौरा, पुष्पगुच्छ, पुष्पमाळा. ['फुलौरा' असा शब्द ज्ञानेश्वरींत आढळतो.] ४. उभारणी, उभावणी. ५. पूजिलें. ६. यांचा. [फिरुन भिक्षा मागणें.] ७. अडखळत.

माझे घरीं पाहुणा भैरव येउनी बैसला हो! ।
त्रिगुणाचा त्रिशूळ घेउनी प्रपंच विस्तारिला हो! ।
जोग्या बोलाऊन पत्र पुजून भरड म्यां घातिला हो! ॥
चाल ॥ ऐसी वर्दावळ, सोसिली बळं, झाली निर्फळ ।
तोड ॥ सुखाचा लेश नाहीं लागला । तुज म्यां फुलवरा बांधिला. ॥ ४ ॥
मुंज्याबाची डाक भरोनी मेसाई आळविली हो! ।
त्रिगुणाची तिवय करूनी त्यावर बैसविली हो! ।
धूप दीप नैवेद्य अर्पुनी [1]पंचारती केली हो! ॥
चाल ॥ तिनें जोडिलें, बहु जाचिलें, ............... ।
तोड ॥ मग म्यां लोटुनी दिल्हें तिला । तुज म्यां फुलवरा बांधिला. ॥ ५ ॥
ऐसें दैवत केलें अनंत नवस बहु फेडले हो! ।
परी तें फळ कष्टीं झालें गळां येउनी शेवटीं पडलें हो! ।
............................................................ ॥
चाल ॥ झाले विटेवरी उदास, धरिली कास, ........... ।
तोड ॥ पंढरी पाहुन जीव माझा हर्षला । तुज म्यां फुलवरा बांधला. ॥ ६ ॥
वैकुंठाहुन निधान त्याचे असती जे प्रियकर हो! ।
त्याची गांठ पडली त्याणें मग दिधला अभयकर हो! ।
............................................................ ॥
चाल ॥ परात्पर सोयरा, [2]पुंडलीक बरा, दिधला थारा ।
तोड ॥ तेणें मज बुडतां हात दिधला । तुज म्यां फुलवरा बांधला. ॥ ७ ॥
डोळां घालुनी अंजन देउनी मग मी गेलें [3]राउळीं हो! ।
वीटेवरी जगदंबा एकाएकीं नयनीं देखिली हो! ।
मनोभावें वरदळ वृत्ती देह्याची खुंटली हो! ॥
चाल ॥ एका जनार्दनीं भली, द्वैत हारपली, एक संचली ।
तोड ॥ जन्ममरणपट फाटला । तुज म्यां फुलवरा बांधला. ॥ ८ ॥

**पद ८५ वें.**

कोलाटीण झाल्यें । बाई! मी कोलाटीण झाल्यें ।
वेळुवेगळें बाई! मी कोलाटीण झाल्यें. ॥ ध्रुवपद. ॥
अनादि निर्गुण पूर्ण परात्पर अभेद नमियेला ।
कायावाचामनें शरण गेल्यें मी त्याला ॥

---

१. पांच दीपांची आरती. २. पृष्ठ ५ टीप १ पहा. ३. देवालयांत.

मुळचा संबंध ठाव तेणें मजला दाखविला ।
ज्ञानअंजन घालुनी प्रवृत्तीमार्ग खुंटवीला. ॥ कोलाटीण० ॥ १ ॥
प्रवृत्तीचें वस्त्र फेडुन, सुखी सुखी रीजल्यें ।
परात्पर पेरपुरुष पाहुन, त्यासीं मी गेल्यें ॥
अंगसंगती करूनी त्याचे सुख म्यां हरवीलें ।
..................अजरामृत म्यां सेवीलें. ॥ कोलाटीण० ॥ २ ॥
आशा मैनशा तृष्णा ह्या तीन्ही मेळविल्या रांडा ।
भाव चौवटा करूनी येथें लाविला झेंडा ॥
करून उलट प्राणाचा क्रोध तो मारीला मेंढा ।
मग तो हंकार मेंगा त्यांनीं या भुलवीलें सोंगा. ॥ कोलाटीण० ॥ ३ ॥
पायें सारुनी मागें मारिलीस उफराटी उडी. ।
भ्रांतीलुगडें फिटोनि गेलें काया झाली उघडी ॥
दुरोनी आणूं भव मिळूनी येथें मांडीलीस फुगडी ।
.......................झाली द्वैतपणाची बीघडी. ॥ कोलाटीण० ॥ ४ ॥
परद्वार म्यां केलें जन्म सार्थक झालें ।
पंचवीस दादुले हातीं म्यां धरूनी उठवीले ॥
आंतरग्रहसावलींत येउनी निश्चळ बैसलें ।
एका जनार्दनीं एकीं एकपण मुरलें. ॥ कोलाटीण० ॥ ५ ॥

### पद ८६ वें.

धोंगडें माझें बोलणें । कानोबा ! ॥ ध्रुवपद. ॥
वांकडा म्हणे कृष्णाच्या बापा, 'मी येक देखिलें भूत रे ! ।
त्याचें बीज पहिलें जळोन गेलें, शेषित राहिलें किंचित रे ! ॥
देहेवीण छळतो तेथेंच पीडतो त्याठाय असे मळमूत्र रे ! ।
तेणें जिंकलें कोणकोणातें त्यासीं जिंकणार कोणता रे ! ॥ धोंगडें० ॥ १ ॥
जुनाट जोगडा काळाचा कांकडा डोंगरीं राहतो भोळा रे ! ।
झडपीला हावे नागवाची धांवें पाठी लागला भिल्लु भौंडा रे ! ॥
कर्दळी खोपा उघडुनी झोपा पाहुनी भुलले तोंडा रे ! ।
जग आंधारी महाभेसुरी आपादी याचा चालला लोंढा रे ! ॥ धोंगडें० ॥२॥

---

१. संसारमार्ग. २. परमेश्वर. ३. मनीषा=इच्छा. ४. भक्तिभाव. ५. चौवटा=चतुर्वीट, चव्हाटा.
६. शरीर. ७. वेडेंवांकडें. ८. वांकडा हा कृष्णाचा बाळपणचा संवगडी होय.

कल्लोळ हाडाचा बापचाडाचा अखंड घडतो मडकीं रे! ।
त्यासीं येक बहु संचार झाला हिमालयाचे खडकीं रे! ॥
बहु वैऱ्याची नवरी पाहून, जिवंत भरली धडकी रे! ।
कुणी येक वेळीं पाठीं लागली, भेडसावीलें कडकी रे! ॥ धोंगडें० ॥ ३ ॥
नंगाची खांदी नंगाची दंडी, अति हाडाचा ठेंगा रे! ।
त्यासी येक बहु संचार झाला, येउनी जडला आंगा रे! ॥
सुता आंगाचा परानंगीचा, चीरी फेडतो कांगा रे! ।
त्यासी येक पुटवृक्ष भेटला, डांगांनीं मोडल्या टांगा रे! ॥धोंगडें०॥ ४ ॥
गंगा मांदारी सांगली वरी, रमला तपोवर्गा रे! ।
त्यासीं येक पुत्र[1] जळीं जन्मला त्यानें केले अठरा पर्वे[2] रे! ॥
तोची साक्षी **वेदोनारायण** त्याचें बोलणें बरवें रे! ।
कुरंगणीचें पाडस धुविलें मीरवीलें **अयोध्यापुरीं** रे! ॥ धोंगडें० ॥ ५ ॥
डोळियाचे जवळी द्वीज जन्मला तेंची त्याचें वाहन रे! ।
बांपापरासीं[3] येक तोंडांनीं आगळा[4] **तार**काई[5] केली हनन रे! ॥
शैल्याआत्मज **सौ**तीचा तनया, तुझ्या हातीं त्याचें मरण रे! ।
दिवा न दारीं जो कां रमला नातवंड त्याचें गहन रे! ॥ धोंगडें० ॥ ६ ॥
लंगोटबंधन ढुंगांत शेंपुट **आं**जनी जींत काळतोंडा रे! ।
रातींतून जेणें[6] शेपटीसीं बांधुन संकष्टीं आणिला धोंडा[7]! रे ॥
त्रिभुवनवासी तो देव ऋषी[8], बाप ज्याचा चौतोंडी रे! ।
सोळासहस्र नारी भोगून ब्रह्मचारी[9] म्हणवीसी लंडा रे! ॥ धोंगडें० ॥७॥
**वां**कडा यानें आणा घातला जाणा उकलील वीर कुळागत रे ।
आठापदांची अष्टपदी गाईली तो एकासी अद्भुत रे! ॥
पदापदाचा अर्थ करीतो तो येक असे बहुश्रुत रे! ।
**ए**का **ज**नार्दनीं विनवीतसे भूत नव्हे **का**नोबाचें सूत रे! ॥ धोंगडें० ॥८॥

---

१. व्यास. २. अठरा पर्वें महाभारत. ३. बापाहून. (शिवाहून.) शिवाला 'पंचास्य' असें नांव आहे हें विसरतां कामा नये. ४. श्रेष्ठ. (षडाननकार्तिकेय.) ५. तारकासुर. हा वज्रांग दैत्य+वरांगी यांचा पुत्र. यानें मोठी तपश्चर्या केली, तेव्हां ब्रह्मदेव प्रसन्न झाला. सात दिवसांच्या बालकावांचून अन्याच्या हातानें मृत्यु यावयाचा नाहीं असा विधीनें याला वर दिला. नंतर हा देवांस पीडा देऊं लागला. देव त्रासून ब्रह्मदेवास शरण गेले, तेव्हां त्यासह सकळ देवांनीं शिवाची प्रार्थना केली. त्यानें कार्तिकेयाला निर्माण केलें. नंतर सातव्याच दिवसीं षडाननानें तारकासुरास मारिलें. ६. ज्या मारुतीनें. ७. द्रोणागिरी. ८. नारद. ९. कृष्ण.

## पद ८७ वें.

अरे कृष्णा ! अरे कान्हा मनमोहना ! ॥ ध्रुवपद. ॥
कृष्ण आला परिसोनी मथुरे नारी । चपळा धांवति त्या सुंदरी ।
येकी तें भोजन कवाळ करी । येकली आली मार्जनशिरीं. ॥ अरे० ॥ १ ।
गोपी ह्या भाळल्या तुझिया गुणा । जयजय मानसमनमोहना ।
जीवींजीवीं गुंतल्या नंदनंदना ! । ........................ ॥ अरे० ॥ २ ॥
कृष्ण दृष्टी पाहावया प्राण [1]पीसा । येक ती आलिये गुंतविसा ।
येक ती आलीया मुक्तकेशा । देह्यादेहीं नाठवी कृष्णमानसा ॥ अरे० ॥ ३ ।
कृष्ण दृष्टी पहावया वेगी कामिनी । अस्ताविस्त इंद्रियें बांधिलीं लेणीं[2] ।
येक ती आलीया कर्म सारूनी । तनमन वेघली सारंगपाणी ॥ अरे० ॥ ४ ॥
येकी ते तानवड लेईले पायीं । पाईंच पोह्लार कानीं हो ! बाई ! ।
वांक्यावाळे बांधिले कंठाचे ठायीं । [3]लाहीलाही नेपुरें खोंविती डोई ॥अरे०॥ ५ ॥
येक ती आली याची कनशिरी । नागवें शरीर नेणें सुंदरी ।
मोतियाचे हार नेसल्या नारी । पाटव घेतलें माथ्यावरी ॥ अरे० ॥ ६ ॥
येक ती अर्धांगीं लेइली चोळी । गुढग्या बांधिली मोतियाची जाळी ।
नाकीचें मुक्ताफळ खोविलें भाळीं । कृष्णा दृष्टी पाहावया चकोर [4]साउळी॥अरे०॥७॥
येक ते काजळ [5]सुंदिलें मुखीं । आवडीनें कुंकुम लाविलें नाकीं ।
तांबुलविडिया खोविति मस्तकीं । कृष्ण दृष्टी इंद्रियें नाहीं वोळखी ॥अरे०॥ ८ ॥
येकीनें कडिये घेतली झारी । बाळक विसरली घरिंचे घरीं ।
कृष्ण दृष्टीदर्पणीं न दिसे नारी । पुत्रस्नेहें नाठवी देखुनी हरी ॥ अरे० ॥ ९ ॥
ऐशा रंगीं रंगल्या आल्हादें भारी । आपपर नाठवी देखुनी हरी ।
एका जनार्दनीं वेधल्या नारी । पुनरपि संसारा नुरेची उरी ॥ अरे० ॥ १० ॥

## पद ८८ वें.

सांवळें सुंदर माझें लेंकरूं गुणाचें ।
सबलस गौळणी गाऱ्हाणें देती हरीचें ॥ ध्रुवपद. ॥
ऐका हो ! घरधणी मज सासूची जाचणी ।
मजविण वेगळा कृष्ण न राहे आंगणीं ॥ सांवळें० ॥ १ ॥

---

१. वेडा. २. अलंकार. ३. घाईघाईनें. ४. सांवळी. ५. घातलें.

घरीं कृष्ण दारीं कृष्ण अवघाचि कृष्ण देखिला ।
कपाळकुट जाहलें, लोकीं बोभाट ऐकिला ॥ सांवळें० ॥ २ ॥
आतां काय सांगूं या गांवींचें नवल ।
गोरस पिउनी हरि पळाला, न बोलतां बोल ॥ सांवळें० ॥ ३ ॥
एका जनार्दनीं हरि हा यशोदेचा तान्हा ।
गौळियांचे भाग्यें देखिला चतुर्भुज कान्हा ॥ सांवळें० ॥ ४ ॥

### पद ८९ वें.

आम्ही [1]परात्पर जोशी । [2]होरा सांगूं आलों संतसभेसीं ।
माझें वचन ऐकाल मानसीं । तरी दृढ निश्चयेंसीं परियेसा, नाना ! ॥ ध्रुवपद. ॥
ऐका ऐका राजेश्री ! । प्रजा सन्मुख पाटील पटवारी ।
शेटे [3]महाजन चौधरी । बरवी नगरी वसविली, नाना ! ॥ १ ॥
या पांढराईत जोशी आले । बहुत होरा सांगून गेले ।
त्याचें तुम्ही नाहीं ऐकिलें । दगे पावले थोर थोर, नाना ! ॥ २ ॥
काळाचे फेरे होऊन गेले । थोर नगर धुळीस मिळालें ।
[5]साच मानी माझिया बोलें । जोडी केली आत्मयुक्ती, नाना ! ॥ ३ ॥
[4]धेडा मांगाच्या मान्यता झाल्या । उत्तम [6]योनी भिकेसी लागल्या ।
साच मानी माझिया बोला । उत्तमची पडले अधमा घरीं, नाना ! ॥ ४ ॥
तुझे [7]राहाटीचे दिवस गेले । आंगीं ताठ्यानें फेरे केले ।
मागें कष्ट बहुत झाले । आतां फळ भोगिलें नरदेहाचें, नाना ! ॥ ५ ॥
नंतर काय पाटील बुवाचें । पुढील भविष्य सांगेन साचें ।
वचन ऐका मज जोशाचें । जेणें तुमचें होईल समाधान, नाना ! ॥ ६ ॥
तुम्हांला एका बायकोची संगती घडली । तेणें तुमची [8]महिमा बुडाली ।
जुनी भाकर सरून गेली । गांठ पडली दरिद्राची, नाना ! ॥ ७ ॥
तिचा संग सोडीं दादा ! । बरवा चालेल तुझा धंदा ।
साच मानीं माझिया शब्दा । तरी सदा सर्वदा सुखी होसी, नाना ! ॥ ८ ॥
विकल्पउडदाचा मेळावा । द्वैततांब्याचा पाउड द्यावा ।
संदेहतेलाचा घट भरावा । बोवाळून द्यावा मज जोश्याकारणें, नाना ! ॥ ९ ॥

---

१. मागील-पुढील. २. शुभसमय. [होरा=लग्नार्ध, अडीच घटकांचा काळ.] ३. व्यापारी. ४. कर्मकारमंडळाचा नायक. ५. खरोखर. ६. जाती. ७. वागणूकीचे. ८. 'महिमा' शब्द पुंलिंगी असून त्याचा प्रयोग कोठें कोठें स्त्रीलिंगी आढळतो.

आणिक एक सांगतों मात । टाका कुबुद्धी, पाहूं द्या हात, ।
बहु मान्यता होईल चौघांत । तुम्हां स्त्रीपुरुषांत फार गोडी, नाना ! ॥ १० ॥
आणिक चित्त देईं माझिया बोला । येथून तुझा शनैश्वर[1] गेला ।
जन्मगुरुचा पालट झाला । संग घडला साधूंचा, नाना ! ॥ ११ ॥
नांव काय आवाजीचें । कल्याण होईल बाईचें ।
वचन ऐका मज जोश्याचें । तरी त्याग करणें कुबुद्धीसी, बये ! ॥ १२ ॥
विषम बुद्धीचें नाणें । वोवाळुनी द्यावें मज जोश्याकारणें ।
निश्चयेंसी बरवें होणें । तरी काळ्या वस्त्राचें दान द्यावें, बये ! ॥ १३ ॥
दाहा लेंकरें झालीं आई । परी एकाचें सुख देखिलें नाहीं ।
आतां पुढें सुख पाहीं । होईल तुज एक, बये ! ॥ १४ ॥
एका लेंकीच्या घरीं सवडी । अपार सुख पावसील कुडी ।
माझें वचन नाड कुडी । सत्य तुजपुढें सांगतों, बये ! ॥ १५ ॥
परी विघ्न दिसतें वरल्या आळी । नांड पावती थोर थोर बळी ।
पूर्व पुण्या होईल होळी । फेरे चाली चुकेना, बये ! ॥ १६ ॥
जोशी सांगुन जातो होरा । भोळ्या भाविकां लहान थोरां ।
बहुतां दिवसा आला फेरा । या संतशेजारासन्निध, बये ! ॥ १७ ॥
पूर्ण जोशी जनार्दन । एका देखीला अनंतघन ।
ज्याचे वंशी रघुनंदन । वंश उद्धारक जन्मला, बये ! ॥ १८ ॥

**पद ९० वें.**

सरसर निर्गुणा तूं अवगुणाचा हरी । जवळीं असतां झालासी कैसा दुरी ।
चित्त उलटें चिंतितां निरंतरीं । मन मावळलें न दिसे दशाकारीं ॥ध्रुवपद.॥
जाती कूळ सांडिलें आम्हीं वेगीं । मायमाहेर त्यजियलें तुजलागीं ।
आंग समर्पिलें आंगीच्या आंगीं । शेखीं[2] रतलासी दासी कुब्जेलागीं ॥ १ ॥
तुजसाठीं त्यजिला देहसंग । तुजवीण विटला विषयभोग ।
जळो तुझा उपदेश, सांगसी योग । आम्हां देईं सप्रेम संयोग ॥ २ ॥
एकी म्हणती गे ! सांडा शब्दगोष्टी । शब्दा नातुडे[3] कोरड्या ज्ञानगोष्टी ।
आजीचा सुदीन श्रीकृष्णीं झाल्या भेटी । हर्ष निर्भय स्वानंदें भरे सृष्टी ॥ ३ ॥

१. शनैश्वर=शनि नामक ग्रहाच्या पीडेचा काळ. [बृहत्संहिता–शनैश्वरचार–अध्याय १० पहा.] २. अखेरीस. ३. न स्पर्शे, न मिळे.

एकी म्हणती गे! सांडा ब्रह्मज्ञान । देह जोडले कांहींसे आतां ध्यान ।
भज्यभजक एक जाल भजन । गेली त्रिपुटी[1] मिथ्या मोक्षबंधन ॥ ४ ॥
एक म्हणती गे! चला मांडुं रास[2] । झणीं उगवेल मायामय दिवस. ।
दैवें जोडला श्रीकृष्णराजहंस । शोधा निजतत्व सांडुनी आळस. ॥ ५ ॥
गोपीमंडळी मिनली[3] कृष्णापासी । जैशा रश्मी[4] मिनल्या रविबिंबासी ।
कृष्ण भोगितां नाठवे दिनंनिसी[5], एका जनार्दनीं ऐकतां प्रेमेसी ॥ ६ ॥

**पद ९१ वें.**

अरे! गाढवाच्या लेंका! । संसार गेला फुका. ॥ ध्रुवपद. ॥
संतालागीं नमन करितां लाज वाटे चित्ता ।
संतचरण नावडती, आवडती बायलेच्या लाथा. ॥ अरे!० ॥ १ ॥
अंतकाळीं प्राण जातो, मरतो देतो तिडका ।
आमचीं पोरें भिउनि जातील तोड याचा झटका. ॥ अरे!० ॥ २ ॥
बारा सोळा पोरें झालीं आल्या सुना नातू ।
लक्ष्मी तरी निघोन गेली कमरेवरी हातू. ॥ अरे!० ॥ ३ ॥
'कसें करूं काय करूं' ऐसी करिसील चिंता ।
संतालागीं विन्मुख होतां लाभ नये हाता. ॥ अरे!० ॥ ४ ॥
एका जनार्दनीं म्हणे संसार हा खोटा ।
संतालागीं शरण जातां तुझा नाहीं तोटा. ॥ अरे!० ॥ ५ ॥

**पद ९२ वें.**

दादा! या जनासी काय बा! झालें? ॥ ध्रुवपद. ॥
शिळा तांब्याचें बाहुलें केलें, पाट मांडूनि उंच बैसविलें ।
अलंकारूनि वस्त्र गुंडाळिलें, त्यासी भलतेंच नांव ठेविलें रे! ॥ दादा० ॥ १ ॥
शुद्ध उदकेंकरुनि भिजविलें, गंध पुष्पें लावुनि झांकिलें ।
धूप दावुनि दीप उजळिले, हात दाखवुनियां चालविलें रे! ॥ दादा० ॥ २ ॥
मागें पुढें करुनि भोंवडिलें, आडवें पडुनि दंडवत केलें ।
आपआपणा नाहिं उमजलें, एका जनार्दनिं व्यर्थचि गेलें रे! ॥ दादा० ॥३॥

**पद ९३ वें.**

धन्य तोची जगीं एक हरीरंगीं नाचे ।
राम कृष्ण वासुदेव सदा स्मरे वाचे. ॥ ध्रुवपद. ॥

---

१. भजनीय, भक्त आणि भजन=ध्येय, ध्याता आणि ध्यान ही त्रिपुटी. २. नाच. ३. जमली. ४. किरण. ५. दिवसरात्र.

सुखदुःख समान सकळ जीवांचा कृपाळ।
ज्ञानाचा उद्बोध भक्तीप्रेमाचा सुकाळ. ॥ धन्य० ॥ १ ॥
विषयीं विरक्त जया नाहीं आपपर।
सर्वदा संतुष्ट विश्वव्यापक निर्धार. ॥ धन्य० ॥ २ ॥
जाणिव शाहणिव ओझें सांडुनियां दुरी।
आपण वस्तीकर वर्ततसे संसारीं. ॥ धन्य० ॥ ३ ॥
एका जनार्दनीं नित्य हरीचें कीर्तन।
आसनिं भोजनिं सदा हरीचें चिंतन. ॥ धन्य० ॥ ४ ॥

## पद ९४ वें.

हिणवर बिजवर साजणी। दोघी गडणी।
सुखदुःख बोलती। हितगुज गाती. ॥ ध्रुवपद. ॥
संसार हा बाइ! जायाचा। दोहों दिवसांचा। कैसें विपरित जाहलें।
हिणवर कपाळीं जडलें। दैवें घातलें। मरण कां नाहीं आलें. ॥ हिणवर० ॥१॥
बोलत बिजवर नारी गे!। परोपरी गे!। जननि जनक दुर्बळ।
बहु खट्याळ। कांहीं लालुच चित्तीं करुनी। गौर मांजी केली. ॥ हिणवर० ॥२॥
पंधरावें वरिस गेलें गे!। सोळावें आलें गे!। जाते विषयाची घडी।
दिवसों दिवस मजला। कठिण जहालें। माझी झिजते कुडी ॥ हिणवर० ॥३॥
विडा घेउन मी जाई गे!। तेव्हां पाही गे!। अति निद्रिस्त कैसा।
हातपाय पसरुनी मेदिनी। दांत विचकुनी। घोर राक्षस जैसा. ॥ हिणवर० ॥४
रात्रीं मी निजाया जाईगे!। तेव्हां पाहीं गे!। अंतीं शंख तो करी।
आतां मामाजी उठती। जावा हांसती। भावें चेष्टा करिती. ॥ हिणवर० ॥५॥
मी एक सुख मानितें। मनीं हर्षतें। त्याचे जिवावरी।
नट्टेपट्टे करुनि हिंडत्यें। गांवोगाव फिरत्यें। मजला म्हणती सुंदरी. ॥ हिणवर० ॥६
तूं तरी तयाचे आडोनी। फिरसी साजणी!। मला हिंडतां न ये।
पति मांझा धाकटा हिंडतो। चेंडु खेळतो। लोक हांसती सये!॥ हिणवर० ॥७
मध्यावर्ती भट हा रांडेचा। मेला बटकीचा। मध्यस्थ होउनि नेलें।
सात सात जन्मले कीं गे!। रांडा होतिल गे!। आतां आमुच्या ॥ हिणवर० ॥८

१. ज्ञान. २. माझी. ३. देह. ४ हा 'निद्रित' शब्दाचा अपभ्रंश. ५. जमीनीवर.

विद्याविद्येचें[1] बोलणें । दावी निज खुण । जीवशिवचि जाणे ।
प्रेमें तल्लीन । एक्या भावें होइ शरण । जनार्दनाचे पायीं. ॥ हिणवर० ॥९॥

## पद ९५ वें.

येथेंचि पंढरपुर । माझें येथेंचि पंढरपुर. ॥ ध्रुवपद. ॥
भक्तीं भीमातीर पुरुषार्थ पुंडलिक[2] । आत्मा हा विठ्ठल धूर. ॥माझें० ॥१॥
विठ्ठलस्मरणें विठ्ठल झालों । नाहीं मना हुरहुर[3]. ॥ माझें० ॥ २ ॥
अणुरेणु व्यापक अवघा विठ्ठल । काय म्हणावा दूर? ॥ माझें० ॥ ३ ॥
एका जनार्दनीं सद्गुरुबोधें । भलते ठायीं निर्सूर[4]. ॥ माझें० ॥ ४ ॥

## पद ९६ वें.

राधे राधे राधे राधे मुकुंद मुरारी[5] ।
वाजवितो वेणू हरि हा सांवळा गिरिधारी. ॥ ध्रुवपद. ॥
खांद्यावरि कांबळा हातामध्यें काठी ।
वाजवितो वेणू हरि हा सांवळा[6] जगजेठी. ॥ राधे० ॥ १ ॥
एक एक गौळण एक एक कृष्ण ।
धरिला फेर हरि घालुनियां मध्यें. ॥ राधे० ॥ २ ॥
एका जनार्दनीं रांसमंडळ[7] रचिलें ।
जिकडे पाहावें तिकडे ब्रह्मचि कोंदलें[8]. ॥ राधे० ॥ ३ ॥

## पद ९७ वें.

येथें कांहीं नाहीं लव गुरुचे पायीं. ॥ ध्रुवपद. ॥
चाल झोडि टाक रुका बोलुं नको फोलें[9] ।
भक्तिविणें ज्ञान करिशी नसती गलबल. ॥ येथें० ॥ १ ॥
वाचोनि पढोनि शाहणे जाले म्हणती आम्हीं साधू ।
दयाधर्म नाहीं चित्तीं जाणावे ते भोंदू[10]. ॥ येथें० ॥ २ ॥
टोपीटिळा घालुनि माळा म्हणति आम्ही संत ।
परनारिशी देखतां डोळां चंचळ झालें चित्त. ॥ येथें० ॥ ३ ॥

---

१. विद्या आणि अविद्या यांचें. २. मागें पृष्ठ ९ टीप १ पहा. ३. चटपट. ४. निःसंशय, निश्चित. ५. गोवर्धनपर्वतधारी. ६. श्यामल. ७. नाचाचें मंडळ. ८. व्यापून गेलें. ९. निरर्थक. १०. ठग.

तेथें सर्व पाहीं लव गुरूचे पायीं. ॥ ध्रुवपद. ॥
सांडुनि आशा बोडुनि मिशा भगवीं वस्त्रें नेसा ।
सद्गुरूसी शरण जाउनि चुकवा गर्भवासा. ॥ तेथें० ॥ ४ ॥
संत म्हणती निंदा केली, निंदा नव्हे भाई ! ।
एका जनार्दनीं लागेन सद्गुरुपायीं. ॥ तेथें० ॥ ५ ॥

## पद ९८ वें.

मी आलों रायाचा जोशी । होरा ऐकशी. ॥ ध्रुवपद. ॥
वासना बायको शेजारिण । झगडी कुटिल मोठी दारुण ।
तिचे पायीं नागवण । घर बुडवीशी ॥ मी आलों० ॥ १ ॥
येथून पुढें बरें होईल । भक्ती सुखें दोंद वाढेल ।
फेरी कर्माची खंडेल । धन्य मोकाशी ॥ मी आलों० ॥ २ ॥
मनजी पाटील देहेगांवींचा । विश्वास धरूं नये तयाचा ।
घात करील नेमाचा । पाडील फाशीं ॥ मी आलों० ॥ ३ ॥
एका जनार्दनीं जोशी । होरा सांगतो लोकांसी ।
फेरी चुकवा चौऱ्याशींची । शरण रिघालो संतांसी ॥ मी आलों० ॥ ४ ॥

## पद ९९ वें.

सौरी झालें सौरी सखे ! बाई ! । झालें त्याची नवरी ॥ ध्रुवपद. ॥
सहा दादुले केले परि म्यां । ऐसा नाहीं देखिला दादुला ।
काया वाचा रमलें त्यासीं । ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ सौरी० ॥ १ ॥
नग्न होउनि भोगीला पुरुष म्यां । ऐसा नाहीं देखिला दादुला ।
देतें गोड गोड खाया परि म्यां । ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ सौरी० ॥ २ ॥
केला संसार गोड परि म्यां । ऐसा नाहीं देखिला दादुला ।
याचे मनाची पुरविली खोड परि म्यां । ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ सौरी० ॥ ३ ॥
ऐसी नवरी झालें परि म्यां । ऐसा नाहीं देखिला दादुला ।
एका जनार्दनीं नमिलों पायीं । ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ सौरी० ॥ ४ ॥

---

१. पुनर्जन्मास्तव प्राप्त होणारा गर्भवास. २. चौऱ्याशी लक्ष योनींतील जन्माची. ३. निलाजरी चौचाल, भावणी, मुरळी. ४. नवरे. ५. देहानें आणि वाणीनें.

## पद १०० वें.

येई हो छानाई । मी दळीन एकली ।

एकली दळितां बहु शीणलें । हात लावीं वहिली ॥ ध्रुवपद. ॥

वैराग्य जातें मांडुनी । विवेक खुंटा थापटोनी ।

अनुहात[1] दळण मांडुनी । त्रिगुण[2] वैरण घातलें ॥ येई० ॥ १ ॥

स्थूळ सूक्ष्म दळियेलें । हरि कारणासहित ।

महा कारण दळियेलें । औटे[3] मात्रेसहित ॥ येई० ॥ २ ॥

दशा दोन दळियेल्या । द्वैत अद्वैतासहित ।

याहीं व्यापक दळियेलें । आहें सोहंसहित ॥ येई० ॥ ३ ॥

एकवीस[4] स्वर्ग दळियेलें । चवदा भुवनांसहित ।

सप्त पाताळ दळियेलें । सप्त सागरांसहित ॥ येई० ॥ ४ ॥

बारा सोळा दळियेल्या । सत्रावीसहित ।

चंद्र सूर्य दळियेले । गणांसहित ॥ येई० ॥ ५ ॥

नक्षत्र वैरण घालुनी । नव ग्रहांसहित ।

तेतीस कोटी देव दळियेले । ब्रह्माविष्णुसहित ॥ येई० ॥ ६ ॥

ज्ञान अज्ञान दळियेले । विज्ञानसहित ।

........................ । ........................ ॥ येई० ॥ ७ ॥

मींतूंपण दळियेलें । दोनी तळ्यांसहित ।

एका जनार्दनीं दळियेले । कांहीं नाहीं उरलें ॥ येई० ॥ ८ ॥

---

१. अनुहत ध्वनि=योगादि धारणेनें दश नादांचा ध्वनि ऐकूं येतो तो. या दहा नादांचीं नांवें:– चिनचिनीनाद–शांति होऊन मन स्थिर होतें. शिंगीनाद–एकाग्रता होऊन कवित्वशक्ति येते. तंतीनाद–हा सारंगी सारमंडळासारखा. यापासून संकल्प विकल्प हरतील. ताळनाद–अखंड ध्वनी चाले, वाचा सिद्ध होते. सुस्वरनाद–हा नाद पावा मोहोरीप्रमाणें. यापासून भविष्य वर्तमान कळून येईल. गर्जनाद–हा नाद गर्जनेसारिखा. दूरदृष्टि होईल. शंखनाद–यापासून चौदा विद्या येतील. घोषनाद–हा वेदघोषासारखा सर्वांचे अंतरींचे कळों येईल. भेरीनाद–यापासून सर्व सिद्धि प्राप्त होतील. मेघनाद–यापासून मन चिंतिले ठायीं जाईल. (ज्ञानदेवकृत अभंग.) २. सत्व, रज, आणि तम. ३. अकार, उकार, मकार, आणि अर्धीमात्रा ओंकार. ४. एकवीस स्वर्ग–ज्योति, शीत, विमळ, अभियागता, प्रकाशविख्यात, सदोदितरम्य, सहज, सिद्ध, आनंद, दिव्य, एकांत, अमळ, तृप्ति, निर्मळ, प्रेम, निज, लय, अंति, शिव. (शिवनिबंध.) दुसरें मत:–ज्योति, शीत, नीळ, रम्य, सोहो, जळ, शिव, निज, भुज, प्रळय, सहा, महा, जन, तप, तपनी, योग, आनंद, नित्य, भुव, नित्य, अति. (कथाकल्पतरु.)

### पद १०१ वें.

लंबोदर गिरिजानंदना । पूर्ण करीं मनकामना ॥ ध्रुवपद. ॥
हे मनभावना तव पदसेवना विद्या द्यावी गजानना ॥ लंबोदर० ॥ १ ॥
एका जनार्दनीं विनवितों तुज बुद्धि द्यावी गजानना ॥ लंबोदर० ॥ २ ॥

### पद १०२ वें.

कर जोडुनि विनवितों तुम्हां। तुम्ही 'वासुदेव वासुदेव' म्हणा. ॥ध्रुवपद.।
नका गुंतूं संसारश्रमा । नका गुंतूं विषयकामा ।
तुम्ही आठवा मधुसुदना । तुम्ही 'वासुदेव वासुदेव' म्हणा ॥ १ ॥
नरदेह दुर्लभ जाणा । शतवर्षांची गणना ।
त्यामध्यें दुःखयातना । तुम्ही 'वासुदेव वासुदेव' म्हणा ॥ २ ॥
नलगे तीर्थाचें भ्रमण । नलगे दंड्या मुंडन ।
नलगे [2]पंचाग्नीसाधन । तुम्ही 'वासुदेव वासुदेव' म्हणा ॥ ३ ॥
हेचि माझी तुम्हां विनवणी । जोडितों कर दोन्ही ।
शरण एका जनार्दनीं । तुम्ही 'वासुदेव वासुदेव' म्हणा ॥ ४ ॥

### पद १०३ वें.

बाळसंतोष बाबा ! बाळसंतोष ॥ ध्रुवपद. ॥
आम्ही परात्पर देशी । कोणी नोळखती आम्हांसी ।
टाकुन आलों संतापाशीं । बाळसंतोष ॥ १ ॥
जीर्ण स्वरुपाचा शेला । विषय भोगितां विटला ।
तो मज द्यावा दाते [3]वैहिला । बाळसंतोष ॥ २ ॥
ऐक्यत्वाचें बिरडें जोडी । त्रिगुणाची कसणी फेडी ।
जुनी काचोंली रोकडी । बाळसंतोष ॥ ३ ॥

---

१. 'मम कामना' असाही पाठ आहे. २. पंचाग्निसाधन, 'पंचाग्निसेवन' अथवा 'पंच भ्रिधूम्रपान' हा एक तपश्चर्येचा प्रकार आहे. यांत साधकाच्या चार बाजूंला चार अ पेटविलेले असून त्यांचा धूर सेवन त्यानें करावा असें आहे. या अग्नींचीं नांवें:—दक्षिणाग्नि, गार्ह पत्य, आहवनीय, प्रणीन (संस्कृत अनस) आणि पांचवा अग्नि तपन. [स्तुतिकुसुमांजलि—स्तोत्र २ श्लोक २१ टीका.] रघुवंशाच्या तेराव्या सर्गांत सुतीक्ष्ण नामक ऋषीच्या पंचाग्निसाधनाचें वर्ण आहे तें असें:—'चोहोंकडे ज्वलन पेटवुनी दुपारीं, माथ्यावरी तपतसे जंव सूर्य भारी; बैसोनि मुनि सुतीक्ष्ण म्हणोनि हा कीं, पंचाग्निसाधन करी अबले! विलोकीं ॥' कुमारसंभवाच पांचव्या सर्गांत पार्वतीच्या तपाचें वर्णन आहे. त्यांतही ग्रीष्मऋतूंत पार्वती चोहों बाजूस चा अग्नी पेटवून त्यामध्यें बसून सूर्याकडे एकसारखी टक लाऊन पाहात होती—असा उल्लेख आहे [श्लोक २०पहा.] या 'पंचाग्निसाधन रूप तपविशेषांत सूर्य हाच पंचम अग्नि होय. ['पंचम पंचतपसस्तपनो जातवेदसाम्' शिशुपालवध—सर्ग २ श्लोक ५१]. ३. सत्वर.

पूर्णत्वाची पुरणपोळी । स्नेहावरील तेलवरी ।
प्रबोध लाडू तयावरी ॥ बाळसंतोष ॥ ४ ॥
एका जनार्दनीं मागतां दान । जिताची जाणें जीवपण ।
शेखीं दिलें शिवपण ॥ बाळसंतोष ॥ ५ ॥

पद १०४ थें.

हुंडगी निघाली संसारा । बारीक माझा जुना ॥ ध्रुवपद. ॥
दारची गोदन कां तोडाना । मजला रहाट करून कां घाना ।
माझे रहाटाकडे कां पहाना ॥ १ ॥
तुमचा बैल कां माराना । मजला तात करून कां घाना ॥
माझा ताताकडे कां पहाना ॥ २ ॥
तुमची तलवार कां मोडाना । मजला चात करून कां घाना ।
माझ्या चाताकडे कां पहाना ॥ ३ ॥
तुमची टाळ कां मोडाना । मजला भिंगरी करून कां घाना ।
माझ्या भिंगरीकडे कां पहाना ॥ ४ ॥
तुमचीं वस्त्रें कां फेडाना । मजला पिंजुन पिंजुन कां घाना ।
माझ्या पिंजण्याकडे कां पहाना ॥ ५ ॥
पिंजुन पिंजुन केला पीळु । नव[1] इंद्रिया खेळु ।
एका जनार्दना पीळु ॥ ६ ॥

पद १०५ वें.

देव कां हो! विटेवरि उभा उभा ।
नका पुसुं बाई, वदसि काई, कळलें नाहीं, ।
शेष शिणला, जाल्या दोनें[2] जिभा जिभा ॥ ध्रुवपद. ॥
पुढें दिवसिं सदि सदि युग अठ्ठाविस ।
जाले कि अद्याप बरा कटावरला भिवरातीर ।
वाळवंटिं आहे संतशोभा ॥ देव कां हो० ॥ १ ॥
जेथें गोपाळ लुटिती काला ।
हरि नामें तयाचा गलबला, देव भावाचा भुकेला ।
गणना नाहिं मिळाले संतजन हरि आले तयाच्या लोभा ॥ देव०॥२॥

---

१. दोन श्रोत्र, नेत्र, घ्राण मिळून सहा, मूत्रद्वार, गुदद्वार आणि मुख मिळून नऊ इंद्रियें.
२. सर्पाला 'द्विजिव्ह' अशी संज्ञा आहे.

हरि वैकुंठ सोडोनी रे! ।
आला पुंडलिका लागुनि रे, उभा राहे अद्युनी ।
युगानियुगा भक्तां सांगे, एका जनार्दनीं संतशोभा ॥ देव० ॥ ३ ॥

## पद १०६ वें.

अजकी एक झाले कृष्ण शोभला जी! ।
ऐसा जो भक्तिलागी भुलला जी! ॥ ध्रुवपद. ॥
भक्त जनासि कृपाळु परब्रह्म साकारिले, ।
गोपिकासि क्रीडा करी अद्वैत अकारिलें ॥ अजकी० ॥ १ ॥
सनकादिकाचे जोहो सबल नरहरी ।
भक्तिला चावला कृष्ण गवळ्या घरीं लोणि चोरी ॥ अजकी०॥ २ ॥
अजका भक्तालागी, अजला झाला कृष्ण ।
एका जनार्दनीं कृपा परिपूर्ण ॥ अजकी० ॥ ३ ॥

## पद १०७ वें.

डोई बोडुनि केली खोडी । काया विटंबीली बापुडी. ॥ ध्रुवपद. ॥
चक्र चाळकीं बोडकीं दोघें । भिक्षा मागति विषयासंगें. ॥ डोई ॥ १ ॥
लल्लाटीं लावुनि त्रिपुंड्र टीळा । कांखे अर्धाची भोंपळा ॥ डोई० ॥ २ ॥
हातीं घेऊनि उफराटी काठी। रामनामाच्या करिती गोष्टी ॥ डोई०॥३॥
पंथामाजी पंथ सार । वर बोडकी खालीं गरभार ॥ डोई० ॥ ४ ॥
एका जनार्दनीं गडबडगुंडा। साहित्यशास्त्रा आगळा आहे कोडा॥डोई० ॥ ५ ॥

## पद १०८ वें.

सम चरणींची शोभा । अवघा जगीं विठ्ठल उभा. ॥ ध्रुवपद ॥
विठ्ठलें लाविलें पिसें । जिकडे पाहें तिकडे दिसे. ॥ सम० ॥ १ ॥
पाहतां पाहण्यामाझारी । पाहतें गेलें पाहण्यापरी ॥ सम० ॥ २ ॥
एका जनार्दनीं एकू । विठ्ठलीं अवलोका लोकू ॥ सम० ॥ ३ ॥

## पद १०९ वें.

जीवाचा काय भरंवसा? ॥ ध्रुवपद ॥
अल्पायुषि तूं रे! । प्राण्या! कांहीं सार्थक घे रे!।
करुनि, सद्गुरूशी शरण जाऊनि, गर्जे हरिनामघोषा. ॥ जीवा०॥ १॥

---

१. देह.

गर्वें प्राण्या! कां भुललाशी ? । येऊनि सार्थक काय केलेंशी ? ।
नाहीं स्मरलें श्रीहरिशीं शेवटीं जाशी जैसा तैसा ॥ जीवा० ॥ २ ॥
सज्जनाशीं जाई शरण । एका भावें करी नमन ।
राहे जनार्दन होउन पाहें तूं कैसा. ॥ जीवा० ॥ ३ ॥

## पद ११० वें.

आई! मज म्हणशी अवगुणाचें । मी काय केलें कुणाचें ? ।
जें जें होणार जयाचें । तें कां मजवरि घालिशी. ॥ ध्रुवपद. ॥
भट आलासे माभळ । तेणें वर्णिला जन्मकाळ ।
तो चुकला ग्रहमंडळ । त्याणीं त्यासी ताडिलें ॥ आई० ॥ १ ॥
माय नव्हे गे! मावशी[1] । तिणें मज घेतलें ओसंगासी[2] ।
तिच्या आंगीं होती विवेशी[3] । तिणें तिसी मारिलें. ॥ आई० ॥ २ ॥
कंसें खेळावयालागोन । गाडा[4] पाठविला जाण ।
तो तैसाची आपण । भारें मोडोन गेला. ॥ आई० ॥ ३ ॥
आई! तुझें म्यां काय केलें ? । त्वां मज उखळासीं बांधिलें ।
संगत झाडासी अडखळलों । मग तें गेलें मोडोनी. ॥ आई० ॥ ४ ॥
दहींभाताची आवड मोठी । आई! त्वां दिधली कालवुनि वाटी ।
जेवितां कां गे! घेतली मिठी । मग मी काठी मारिली. ॥ आई० ॥५॥
खेळत होतों यमुनेकांठीं । बकासुरें घातली मिठी ।
मज क्रोध आला पोटीं । मग म्यां उभा चिरीला. ॥ आई० ॥ ६ ॥
केसी तद्वु अघासुर । कंठीं घातला दोर ।
ऐसा क्रूर तो असुर । मग म्यां दाढे रगडिला. ॥ आई० ॥ ७ ॥
आणिक एक सांगतों काहणी । गोधन राखित होतों रानीं ।
पाठीं लागला दावाग्नि । मग म्यां मुखीं ग्रासिला. ॥ आई० ॥ ८ ॥
मातापिता बंदीशाळे । नेऊन घातलीं मातुळें[5] ।
तेथें येउनियां महाकाळें । त्याणें त्यास मारिलें ॥ आई० ॥ ९ ॥
श्रीहरीचें महिमान । अरिमित्रासीं एकचि जाण ॥
एका जनार्दनीं परिपूर्ण । मोक्षपद पावला. ॥ आई० ॥ १० ॥

---

१. पूतना. २. 'उत्संग' शब्दाचा अपभ्रंश. ३. जलीण.४. शकटासर.५. मामानें. (कंसानें.)

## पद १११ वें.

[1]बंदे! हुशार रहना बे! । [2]साहेब राजी रखना बे! ॥ ध्रुवपद. ॥
गांजा दारू [3]मत [4]पीयो [5]यारो! अक्कल गुंग होती ।
[6]अपने [7]पैल्लवका दाम खरच कर, मुखमें [8]मखिया जाती ॥ बंदे०॥ १ ॥
जुवेबाजी मत करो यारो! अक्कल गुंग होती ।
अपने पल्लवका दाम खरच कर, [9]शिरपर [10]जुंतियां पडती ॥ बंदे० ॥ २ ॥
[11]रंडीबाजी मत करो यारो! अक्कल गुंग होती ।
अपने पल्लवका दाम जाकर, हातमें चवरी आती. ॥ बंदे० ॥ ३ ॥
एका जनार्दनका बंदा अक्कल तुजकूं देता ।
दिल[12] चाहे [13]तो सिकले, [14]प्यारे! [15]नहि तो, जा गू खाता ॥ बंदे० ॥४॥

## पद ११२ वें.

[16]गुरुकृपांजन पायो मेरे [17]भाई! । रामबिना [18]कछु जानत नाहीं ॥ ध्रुवपद. ॥
[19]अंदर राम, बाहिर राम, । जहां देखों वहां [20]पूरनकाम ॥ गुरु० ॥ १ ॥
जागत राम [21]सोवत राम । [22]सपनेमें देखे राजा हि राम ॥ गुरु० ॥ २ ॥
एका [23]जनार्दनी अनुभव [24]नीका । जहां देखों वहां [25]रामसरीखा ॥ गुरु०॥ ३ ॥

## पद ११३ वें.

राम [26]मीठा लगा । सब [27]सुख हम त्यागा ॥ ध्रुवपद. ॥
घर [28]बैठे हम करत चाकरी । [29]कबहूं न पडा [30]नागा ॥ राम० ॥ १ ॥
एका जनार्दनकिंकर बोले । पावत मुख [31]मांगा ॥ राम० ॥ २ ॥

## पद ११४ वें.

गोरस बेचन चल गोरी मथुरा, । तुम कैंव ठाडे [32]नंदकिशोरा ॥ ध्रुवपद ॥
मत खेंचो मेरी फारी [33]चुनेरी, । [34]सास [35]बुरी मैंकु देवेंगी [36]गारी ॥ गोरस० ॥ १ ॥

---

१. अरे गुलामा! २. ईश्वर. (हा शब्द फारशी आहे.) ३. नको. ४. पिवूं. ५. हे मित्रांनो. ६. आपल्या ७. पदरचा. ८. माशी. ९. डोक्यावर. १०. जोडे. ११. व्यभिचार. १२. मनास वाटेल. १३. तर. १४. अरे मित्रा! १५. नाहीं तर. १६. मला गुरुकृपा अंजन मिळालें. १७. माझ्या बंधूनो. १८. कांहीं. १९. आंत. २०. पूर्णकाम=तृप्तेच्छ, सफल मनोरथ. (ईश.) २१. निजतां. २२. स्वप्नांत. २३. जनार्दना अनुभव. २४. खरा. २५. रामासारिखा, रामाकृति. २६. मधुर, गोड. २७. राम गोड लागला म्हणून सर्व ऐहिक सुख मी टाकून दिलें. २८. बसून. २९. कधींही मी चाकरीवर गैरहजर नव्हतों. ३०. नागा पडणें=खाडा करणें, पाळी चुकविणें. ३१. जनार्दनाचा (देवाचा) चाकर एकनाथ जें कांहीं मुखानें मागतो तें तो पावतो. ३२. कृष्ण. ३३. चुनडी. ३४. सासू. ३५. वाईट. ३६. शिवी.

चैतनकी मेरी आंगिया फारी, । काय कहूं मैं नंगी नार उघारी ॥ गोरस० ॥२॥
हांकारहुका मेरा गगवा फोरा, । ठाके गोरस सबही मीरा ॥ गोरस० ॥ ३ ॥
एका जनार्दनीं सबही भेटे, । लागा चुटका फेर न छूटे ॥ गोरस० ॥ ४ ॥

## पद ११५ वें.

पंचे तत्वका शोध करीयो । फकीर भयो भाई ॥ ध्रुवपद. ॥
गलां शैली हातमो झोली । अनुहात लंगर नामकी पोली ।
गुरूग्यान बिचारे मनचोरे । ...................... ॥ १ ॥
आशा छांडसें धीर छोडा । लौडाम्यानें जुवान पकडा ।
कामक्रोधका तोडा झगडा । पंचेवीसका मारू भोसडा ॥ २ ॥
सब इंद्रियें कोंड करीयो । दैश इंद्रियें एक ध्यान धरियो ।
गुरुचरण हम सीस धरियो । एका जनार्दनीं स्थिर मन करियो ॥ ३ ॥

## पद ११६ वें.

एकना एक हजार वीरो । इसमे मेरा मौला बसे ॥ ध्रुवपद. ॥
मक्काम्याने अल्ला खडा । और क्या जगा खुल्ला पडा ॥ एकना० ॥ १ ॥
एका जनार्दनका बंदा । जिधर देखे उदर खुदा ॥ एकना० ॥ २ ॥

## पद ११७ वें.

मलंगु फकीर ऐसा मलंगु फकीर ॥ ध्रुवपद. ॥
लिया संतनका आसन । खाया गोधन का है भंग ।
हमे सदा दंगा ॥ ऐसा मलंगु० ॥ १ ॥
लिया संतनका दुमाला । मारा बहुत तुटे जंजाला ।
एका जनार्दनीं केगाला ॥ ऐसा मलंगु० ॥ २ ॥

## पद ११८ वें.

गाफल हुवा । आगे गफलतका कुवा ॥ ध्रुवपद. ॥
दिलमो धन जोबनकि मस्ती । मीनकुवतमो खुल रहे छाती ।
पहेलवानसो करिता कुस्ती । दिवाना भडवा ॥ आगे० ॥ १ ॥
पगडी तेडी पेचकी बाकी । कोई दिन सिरपर ताकी ।
हरदम ख्याल तमासा शोकी । चबेली चुवा ॥ आगे० ॥ २ ॥

---

१. पडला. २. पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं पांच तत्वें. ३. प्रत्येक तत्वाचे पांच प्रकार (भेद) म्हणून पंचवीस तत्वें. ४. १ मुख, १ ब्रह्मरंध्र, २ घ्राण, २ श्रवण, २ नेत्र, १ शिश्न, १ गुदद्वार. ५. जेथें.

सुरत आयनेमो देख भावे । पलखमो काल पकड ले ज्यावे ।
······················· । जैसा चुवा ॥ आगे० ॥ ३ ॥
छोड दे यारो! आशकबाजी । तेरी जात जायगी पाजी ।
एका जनार्दन करले राजी । मंगले दुवा ॥ आगे० ॥ ४ ॥

### पद ११९ वें.

छोडा तनधन गेहका काम । ज्यासे हरिसे बदलाम ॥ ध्रुवपद. ॥
हम तो रामभजनमो बैठे । याबिन साधन सब ही झूटे ॥ छोडा० ॥ १ ॥
कछु नहि जाने मुद्रा माला । पिया नामामृतका प्याला ॥ छोडा० ॥ २ ॥
खाना पिना बिसर पडा । नजरम्याने अल्ला खडा ॥ छोडा० ॥ ३ ॥
एका जनार्दनका बंदा । तिनो लोकमे देखे खुदा ॥ छोडा ० ॥ ४ ॥

### पद १२० वें.

भजनबिन धिग चतुराई ग्यान ॥ ध्रुवपद. ॥
पोथी पुरान बाचत सबही । वामे नहि गुरुग्यान ॥ भजन० ॥ १ ॥
लोक कहे हम अतमग्यानी । ग्यान नही अभिमान ॥ भजन० ॥ २ ॥
एका जनार्दन गुरुका बंदा । भक्तिभजनमो प्राण ॥ भजन०॥ ३ ॥

---

## त्र्यंबककृत पदें.[1]

### पद १२१ वें.

षड्गुणतरुआराम[2] । सबांधव राम । कपींद्रा[3] ! सुखी असे कीं ॥ ध्रुवपद. ॥
कनककुरंगापाठीं स्मरतां । प्रभु सर्वज्ञ काम ॥ कपींद्रा० ॥ १ ॥
निजकांतेतें दुष्टें[4] हरिलें । स्मरतो मंगलधाम ॥ कपींद्रा० ॥ २ ॥
सौमित्रा[5] दुर्वाक्यें छळिलें । त्याचा हा परिणाम ॥ कपींद्रा० ॥ ३ ॥
मजविरहित त्या चिंता कैंची । अखिललोकाभिराम ॥ कपींद्रा० ॥ ४ ॥
त्र्यंबक भंगी एका जनार्दना । करितो विबुधप्रणाम[6] ॥ कपींद्रा० ॥ ५ ॥

---

१. हा कवि एकनाथाच्या शिष्यांपैकीं कोणी असावा. २. षड्गुणरूप वृक्षांचा आराम (बाग). या पदांत अशोकवनांत असलेल्या सीतेची विलापोक्ति आहे. ३. हे मारुते. ४. दुष्ट रावणानें. ५. सुमित्रापुत्राला. (लक्ष्मणाला.) ६. पंडिताला नमस्कार.

## पद १२२ वें.

शुभांगे ! तुला वराया विबुधोद्यानवसंत[1] । आला भगवंत ॥ध्रुवपद.॥

पैल पहा गरुडध्वज[2] झळके । यादववीर अनंत ।
सभंवते यादववीर अनंत. ॥ आला० ॥ १ ॥
पत्र तुझें पहातां घाबरला । क्षणभरि नाहिं उसंत ।
हरिला क्षणभरि नाहिं उसंत ॥ आला० ॥ २ ॥
वरिल तुला जगदीश्वर ज्यातें । शुकसनकादिक संत ।
वंदिती शुकसनकादिक संत. ॥ आला० ॥ ३ ॥
नाभी नाभी स्वप्नीं जल्पे । त्रिभुवनिंचा श्रीमंत ।
हरि तो त्रिभुवनिंचा श्रीमंत ॥ आला० ॥ ४ ॥
अंबे ! सेवी एका जनार्दन । तुज प्रभृति महंत ।
त्र्यंबक तुज प्रभृति महंत. ॥ आला० ॥ ५ ॥

## पद. १२३ वें.

तारि तारी हरि ! दीन रे ! । सद्गुरुराया ! ॥ ध्रुवपद. ॥

आठव नाहीं तव चरणाचा । मंद मी साधनहीन रे ! ॥ सद्गुरु० ॥ १ ॥
[3]जन्मजराभयें व्याकुळ झालों । चिखलीं जैसा [4]मीन रे ! ॥ सद्गुरु० ॥ २ ॥
धांव येकाकी एका जनार्दना । पावतो त्र्यंबक शीण रे ! ॥ सद्गुरु० ॥ ३ ॥

## पद १२४ वें.

कोण सुशीला प्रसवली तुजला साकार मन्मथगाभा रे ! ॥ ध्रुवपद. ॥

श्याम मनोहर कोमल तूं शिशु पाहुनि चित्त निवालें रे ! ।
अंतकाल समय आहे हा निर्दय जागतांच मरण आलें रे ! ॥ कोण० ॥ १ ॥
डोह भयंकर [5]यमभगिनीचा [6]सलिल हलाहल ज्याचें रे ! ।
अंतरिक्षगति पक्षिहि त्रासति नाहि कसें भय याचें रे ! ॥ कोण० ॥ २ ॥
वाटे माय असा गुणसुंदर [7]तनय कधीं न विसंबे रे ! ।
आश्चर्य हें तव सदृश बहु सुत तेणें अनादर अंबे रे ! ॥ कोण० ॥ ३ ॥
देतिल प्राण पिता जननी तव जाय मुला ! बाहेरी रे ! ।
एका जनार्दन रक्षि तयांप्रति त्र्यंबकभीति निवारी रे ! ॥ कोण० ॥ ४ ॥

---

१. देवरूप बागेस फुलविणारा वसंतऋतु. (कृष्ण.) २ गरुडयुक्त ध्वज. ३. जन्म (जनन) जरा (वृद्धत्व) यांचे भयानें (भीतिनें). ४. मत्स्य. ५. यम+भगिनी=यमाची बहीण. (यमुना.) ६. पाणी. ७. मुलगा.

### पद १२५ वें.

निर्भय[1] अचल अभंग, प्रासुनि संग, साधू मही विचरती[1] ॥ ध्रुवपद. ॥
जागृतासि स्वप्नभ्रम कैंचा । गज रथ धेनु तुरंग[2] ॥ साधू० ॥ १ ॥
सत्ता एकानेकीं विलसे । जीवनीं जैंवि तुरंग ॥ साधू० ॥ २ ॥
चिद्वपुविशुद्ध भस्मोद्धूलित । जाळुनि अशुभानंग ॥ साधू० ॥ ३ ॥
दग्धपटासम त्र्यंबक होतां । एका जनार्दनिं संग ॥ साधू० ॥ ४ ॥

### पद १२६ वें.

जा वेगीं शरण गुरूशीं । अतिदुस्तर[3] वैष्णविमाया रे ! ॥ ध्रुवपद. ॥
दुर्लभ कलियुगीं सुरगण[4] वांछिति । मोक्षद मानवि काया[5] रे ! ॥ जा० ॥ १ ॥
नेणुनि निजहित विषयसुखास्तव । घालविलें वय[6] वांया रे ! ॥ जा० ॥ २ ॥
स्त्रीसुतधन लौकिक इच्छुनियां । आर्जविशी किति रायां रे ! ॥ जा० ॥ ३ ॥
एका जनार्दनीं प्रेमें लोला । त्र्यंबक आठवि पाया रे ! ॥ जा० ॥ ४ ॥

### पद १२७ वें.

सदया येईं उदारा रे ! । आजी नंदकुमारा[7] ! ॥ ध्रुवपद. ॥
कालियाचे[8] फणावर नाचे मनोहर । पदद्वय[9] दावीं सकुमारा रे ! ॥सदया०॥१॥
आत्मारामा[10] मनविश्रामा[11] । लालित लीला अपारा रे ! ॥ सदया० ॥ २ ॥
त्र्यंबक वंदी एका जनार्दनीं । एका जनार्दनीं गा रे ! ॥ सदया० ॥ ३ ॥

### पद १२८ वें.

तारक तो जगदीश्वर जाणुनी । आनन्य शरण रिघा[12] । विठोला ॥ ध्रुवपद.॥
ठेवुनियां कर दोनी कटांवर । भक्तांचे भेटी उभा ॥ तारक० ॥ १ ॥
कांस धरावी बळकट भावें। देणार नाहीं दगा ॥ तारक० ॥ २ ॥
त्र्यंबक होउनी साधन हें करी । एका जनार्दनीं गा ॥ तारक० ॥ ३ ॥

### पद १२९ वें.

रामदर्शनासि चला । लाभ हा भला ॥ ध्रुवपद. ॥
रामजन्म रामनवमी नक्षत्र पुनर्वसु ।
समय मध्यान्ह दिवां[13] अवतार जाहला ॥ रामदर्शनासि० ॥ १ ॥
दशरथासि दाशरथी पुत्र जन्मला ।
त्रिभुवनांत जयजयकार जाहला ॥ रामदर्शनासि ० ॥ २ ॥

---

१. फिरतात. २. घोडा. ३. कठिण, दुःखदायक, तरून जाण्यास कठिण. ४. देवांचा समूह ५. शरीर. ६. आयुष्य. ७. कृष्णा. ८. कालिय नामक सुप्रसिद्ध सापाच्या. ९. पाद+द्वय=पाय+युग्म १०. आत्म्याला आराम (सुख) देणाऱ्या. ११. मनाला विसावा देणाऱ्या. १२. जा. १३. दिवसास

भजकाचे कोटि अन्याय हा क्षमा करी ।
उद्धरितां महाराज नाहीं भागला ॥ रामदर्शनासिं० ॥ ३ ॥
[1]शबरि कबरि बदरिफळें पदरिं घेउनी ।
भावबळें भुलोनियां भक्षुं लागला. ॥ रामदर्शनासिं० ॥ ४ ॥
[2]महाविष त्र्यंबकासिं अमृत लाधला ।
पार्वतीसीं थोर आनंद जाहला ॥ रामदर्शनासिं० ॥ ५ ॥

## पद १३० वें.

राम माझा धरिल कसा अभिमान । पाहतो काय निधान ॥ ध्रुवपद. ॥
जपतपसाधन कांहिं न जाणे । पातकी दुष्ट महान ॥ राम० ॥ १ ॥
परघातक मी [3]गुरुवंचक मी । दोष हे काय लहान ॥ राम० ॥ २ ॥
[4]करुणाघन हा निष्ठुर झाला । त्र्यंबक प्राणनिधान. ॥ राम० ॥ ३ ॥

## पद १३१ वें.

दैत्यदानवकुळसंहारिके ! । निजजन भक्तांसी तारके ! ॥
मातापुरवासी रेणुके ! । माहुरक्षेत्रीं विराजसी. ॥ ध्रुवपद. ॥
मूळ प्रकृति माया वरवंटे ! । हे आधारक धूर्जटे ! ॥
पडूं न देसी संकटें । [5]औटपीठें पृथ्वीवरी. ॥ दैत्य० ॥ १ ॥
तुळजापुरचे तुळजाबाई ! । कृपाकटाक्षें मजला पाहीं ॥
सदासर्वकाळ तुझे पायीं । माझी डोई असूं दे. ॥ दैत्य० ॥ २ ॥
महालक्ष्मी तूं कोल्हापुरीं । कोल्हासुर वधुनी निज करीं ॥
विजयसज्ज त्रिपुरांतकसुंदरी । नांदसी मंदिरीं आपुल्या. ॥ दैत्य० ॥ ३ ॥
हे आदिमाये ! सप्तशृंगे ! [6]त्रिपुरांतकप्रिये ! भवभंगे ! ॥
निजदासा तारीं स्वांगें । प्रतापगंगे ! जगदंबे ! ॥ दैत्य० ॥ ४ ॥
एक पीठ तें तुळजापुर । द्वितीय पीठ तें माहुर ॥
तृतीय पीठ तें कोल्हापुर । सप्तशृंग अर्धपीठ. ॥ दैत्य० ॥ ५ ॥
औटपीठें पवित्र स्थळें । गातां हृदयीं [7]पुण्यागळें ॥
त्र्यंबक झड घालुनियां बळें । प्रातःसमयीं ध्यातसे. ॥ दैत्य० ॥ ६ ॥

---

१. श्रमणा नामक सुप्रसिद्ध शबरजातीय स्त्री. २. हालाहल. ३. गुरुला फसविणारा. ४. दयेचा मेघ. ५. देवीचें औट पीठ=तुळजापूर, माहुर, कोल्हापुर आणि अर्ध पीठ सप्तशृंग. ६. शंकरभार्ये! ७. श्रेष्ठ पुण्य.

## पद १३२ वें.

नारायण हरी । जय जय नारायण हरी ॥ ध्रुवपद. ॥
कमलायतलोचना कनकपुष्पप्रिय हसदना ।
कंबुकंठ कमलेशा स्वामी शरदिंदूवदना ॥
कंसांतक कैठभारे ! देवा ! करिं [1]कल्मषदहना ।
कां मजवरि अवकृपा, माझी कशी नये करुणा ? ।
गांजिसि कां या संसारीं. । जय जय० ॥ १ ॥
गोकुलसंरक्षका गोविंदा ! गोरसहरणा ।
गोपिकादि विलासा गोवर्धनधारि कृष्णा ! ।
[2]गोपेकवलभक्षका गोरक्षका मधुसूदना ! ।
गोरोचन प्रियकरा! श्यामसुंदरा! कुंदरदना ! ।
कां बुडविसि भवजळविवरीं. । जय जय० ॥ २ ॥
पद्मनाभ पद्मासनजनका ! ये पंकजपाणी ।
पक्षपात पतिताचा स्मरतां पावसि निर्वाणीं ।
परात्पर पूर्वापर व्याख्या असि ऐकिली श्रवणीं ।
पदपंकज म्हणून रतलों तरि कां कठिणांतःकरणीं ।
मजविषयीं झालासी जरी. । जय जय० ॥ ३ ॥
पांडव नानापरि परमात्म्या ! रक्षियले त्यांशीं ।
पंढरींत [3]पुंडलिकासाठीं पांडुरंग होशी ।
पैठणीं [4]एकनाथस्वामीगृहीं पाणी वाहशी ।
पक्ष धरून [5]दामाजीनिमित्त [6]पडिभार होशी ।
तें संकट नाहीं भारी. । जय जय० ॥ ४ ॥
माता यदि विष देउनि मारुं लागली पुत्रातें ।
[7]मैंहगींत सुतमांस विकित जरि जनिता निजहस्तें ।

---

१. पापसंहारा. २. गवळ्यांचा कवळ (ग्रास) खाणाऱ्या. ३. पृष्ठ ९ टीप १ पहा. ४. पृष्ठ २
र ६ पहा. ५. ज्या दुष्काळांत दामाजीपंतानें सरकारी धान्य गरीब लोकांकडून लुटविलें तो इ०
० १४६० म्ह० शा० श० १३८२ सालीं पडला होता. त्या वेळीं बेदर येथें हुमायून नांवाचा
पणास ब्राह्मणी वंशीय म्हणविणारा यवन राजा होता. तो इ० स० १४५० पासून १४६१
त गादीवर होता. ह्या वंशाचे एकंदर १८ राजे होते. इ० स १३४७ पासून इ० स० १५२६
त ह्यांनीं राज्य केलें. प्रथमतः ह्या वंशाची राजधानी कुलबर्ग्यास होती. पुढें इ० स० १४२६ त
र राजधानी झाली. ६. आसक्त. ७. महागाईत.

मैहीपती अपमान करुनि हरि गृहधनसंपतितें ।
मग शरणागत जावें कोणा सांग मला हरि ! तें ।
मग दिसूं पाहे तेंच करी. । जय जय० ॥ ५ ॥
या अर्थी प्रार्थियलें तुजशीं म्यां यादवराया! ।
या देहा उद्धरशी किंवा नासशि हे काया ।
या दो वचनीं प्रियकर तें मज वद देवकितनया ! ।
यानंतर अधिकोत्तर त्र्यंबकमति कैंची सदया ! ।
उचिता येईल तेंच करीं. । जय जय० ॥ ६ ॥

## पद १३३ वें.

उठीं उठीं उठीं उठीं चूडामणी । उभे नारदतुंबर आंगणीं ।
करी पैरिचरिया तनु संगिनी । तुज स्मरती योगी रंगणीं. ॥ ध्रुवपद. ॥
मनमोहना ! गाइ ने वना । व्रजबाळें आलीं अंगणा ।
हो जागा श्रीमधुसूदना ! । मुख प्रक्षाळुनि करीं भोजना. ॥ उठीं० ॥१॥
अरुणोदयीं निशिं[3]च्या काळा । वृंदावनीं गुंजती कोकिळा ।
पय श्रवति धेनु सोज्वला । रैविरश्मी दिसति प्रांजळा. ॥ उठीं० ॥ २ ॥
यमुनेतीरीं मथुरेच्या स्त्रिया । जप करिती साधन सत्क्रिया ।
त्यांहीं त्यजिले तुजसाठीं धीया । त्यांतें दर्शन देईं मत्प्रिया. ॥ उठीं० ॥ ३ ॥
गीत गातां लज्जित गोपिका । एक दर्शन इच्छिती भाविका ।
तुज अंतर्भाव हा ठाउका । ऊठ माझ्या तानुल्या ! बाळका ! ॥ उठीं० ॥ ४ ॥
श्रुत जननीची काकुळती । मग जागा झाला श्रीपती ।
करी पयपानाची पंगती । तुज त्र्यंबक मागे सद्गती. ॥ उठीं० ॥ ५ ॥

## पद १३४ वें.

देवा! रे! माझी नको माया तोडूं ।
तुजविण कोणाच्या गळां जाऊन मी पडूं? ॥ ध्रुवपद. ॥
होतों अन्यायी अपराधी । परि मी तुज आलों शरण ॥
आतां हेंचि मला देईं । आपुल्या नामाचें स्मरण ॥
चित्ता जरि न आलें तुझिया । याहुनि बरवें मरण ॥
परी संसार वाटे कडू । देवा! रे! ० ॥ १ ॥

---

१. राजा. २. परिचर्या. ३. रात्रीच्या. ४. सूर्याचे किरण.

तुजविना दयावंत ऐसा । मजला न दिसे ये ठाईं ॥
महा महा पामर उद्धरिले । तेथें पामर मी काई ? ॥
परंतु पावन या नामीं । श्रीदावळी साजे पाईं ॥
लोह परिसाची [1]चाडू । देवा ! रे !० ॥ २ ॥
वेदशास्त्रेंही शोधिलीं । आणिक [2]अठरा पुराण ॥
परंतु नामविना कांहीं । आणिक न दिसे साधन ॥
असती [3]योगें [4]याग नाना । परि ते श्रमसाध्यचि जाणा ॥
चातुर्वर्णीं तूंचि गोडू. । देवा ! रे !० ॥ ३ ॥
जंववरी तव आश्रय नव्हता । तरी फार होती चिंता ॥
आतां धैर्य मला आलें । ऐकुनी तव गुण अनंता ! ॥
त्र्यंबकीं ठसावला भाव । अंतरीं जडली बरी दृढता ॥
विनवी हात जोडुजोडू. । देवा ! रे !० ॥ ४ ॥

## पद १३५ वें.

जिननें [5]तुजकू पैदा कीया कर [6]उसका [7]संदेसा रे ! ।
[8]इंद्रजालवत प्रपंच सारा, सुत [9]वंध्येचा जैसा रे ! ॥ ध्रुवपद. ॥
[10]तनजोबनपर आसक्त हुआ, क्या पाया आराम रे ! ।
इंद्रियजन्य सुखातें भाळुनि [11]नेणसि आत्माराम रे ! ॥ जिननें० ॥ १ ॥
क्यौं गफलतमें गाफल हूआ किस लालचपर [12]प्यासा रे ! ।
किरण न जाणुनि भ्रमती हरणें जैशीं [13]उदकाभासा रे ! ॥ जिननें० ॥ २ ॥

---

१. इच्छा. २. पुराणें अठरा आहेत त्यांचीं नांवें:—'ब्राह्मं पाद्मं वैष्णवं च शैवं भागवतं तथा । तथान्यन्नारदीयं च मार्कंडेयं च सप्तमम् ॥ आग्नेयमष्टकं प्रोक्तं भविष्यन्नवमं तथा । दशमं ब्रह्मवैवर्तं लिंगमेकादशं तथा ॥ वाराहं द्वादशं प्रोक्तं स्कांदं चात्र त्रयोदशम् । चतुर्दशं वामनं च कौर्मं पंचदशं तथा ॥ मात्स्यं च गारुडं चैव ब्रह्मांडाष्टादशं तथा ॥.' अठरा उपपुराणें आहेत तीं अशीं:— 'अष्टान्युपपुराणानि मुनिभिः कथितानि तु । आद्यं सनत्कुमारोक्तं नारसिंहमतः परम् ॥ तृतीयं नारदं प्रोक्तं कुमारेण तु भाषितम् । चतुर्थं शिवधर्माख्यं साक्षान्नंदीशभाषितम् ॥ दुर्वाससोक्तमाश्चर्यं नारदोक्तमतः परम् । कापिलं मानवं चैव तथैवोशनसेरितम् ॥ ब्रह्मांडं वारुणं चाथ कालिकाह्वयमेव च । माहेश्वरं तथा शांबं सौरं सर्वार्थसंचयम् ॥ पराशरोक्तं प्रवरं तथा भागवतद्वयम् । इदमष्टादशं प्रोक्तं पुराणं कौर्मसंज्ञितम् ॥ चतुर्धासंस्थितं पुण्यं संहितानां प्रभेदतः ॥.' ३. समाधि. ४. यज्ञ. ५. तुला. ६. त्याचा. ७. काम, कामगिरी, आज्ञा. ८. खोटा, अयथार्थ, मायामय, अतात्विक. ९. वांझेचा. १०. तन (रूप, देहरूप) आणि जोबन (यौवन) यांवर आसक्त (लुब्ध) होऊन तुला कोणतें सुख (आराम) मिळालें ? ११. जाणत नाहींस. १२. कामना, इच्छा. १३. जलाचा आभास.

क्या आसनही किये कुफरसे क्यौंकर हुआ दिवाना रे! ।
आत्मा तूं अविनाश होउनी मानिसि जन्मा मरणा रे! ॥ जिननें० ॥ ३ ॥
तन कियेमे एका जनार्दनलाल खडा बेपर्वा रे! ।
त्र्यंबकपण हें त्याला अर्पुनि भोगि सुखाचा ठेवा रे[४]! ॥ जिननें० ॥ ४ ॥

---

## तुकारामकृत पदें.

### पद १३६ वें.

गजवदन सखा म्यां नमिला हो! ॥ ध्रुवपद. ॥
मुळारंभीं नानारंभीं । वाल्मिकवचनीं आणिला हो! ॥ गज० ॥ १ ॥
शेष फणीवर मेरू भारी । कुत्सित संदेह फिटला हो! ॥ गज० ॥ २ ॥
तुका म्हणे ध्यातो त्याला । नाचत रंगणीं आला हो! ॥ गज० ॥ ३ ॥

### पद १३७ वें.

भक्तांसाठीं तो जगजेठी बसून माळ्यावर । पाखरें उडवी सारंगधर ॥ध्रु०॥
...ामध्यें भक्ति पाहा त्या बोधल्यानें केली । थोट ताटाला कणसें आलीं ॥
...ा तो भगवंत विठ्ठल अनंतरूप ल्याली । कसी देव भक्तांची माउली? ॥
...चे चरणापासीं विनवूं जोडुन दोन्ही कर । पाखरें० ॥ १ ॥
...मदेवाशीं म्हणती ब्राह्मण,'जात तुझी ओंगळ, । निघ बाहेर करसी विटाळ'.॥

---

१. कुफर=पाखंड, दंभ, तूं पाखंडाशीं आसन घालून दिवाणा झालास काय? २. वेडा, पागल. ...जनार्दनाचा लाल (प्रिय पुत्र, आवडता भक्त.) एक (एकनाथ) ह्या देहरूपानें बेपर्वा असतो. ...या पदांत एक चरण हिंदी व एक चरण मराठी अशी भेसळ आहे. ५. हा पंढरपुरच्या ...रंगाचा एक भक्त होता. हा शालिवाहन शके १५३० मध्यें देहूस जन्मला. हा जातीचा वाणी ...। ह्याला दोन बायका होत्या. पहिली बायको दमेकरीण होती ती लवकरच वारली. दुसरी ...को जिजाबाई मोठी कर्कशा होती. ह्याच्या सत्राव्या वर्षी त्याचीं आईबापें वारलीं. ह्याचा मृत्यु ... १५७१ त झाला. ह्याचे अभंग पुष्कळ आहेत. विशेष माहिती भक्तविजय अध्याय ४८ व ... यांत पहावी. या शूद्र कवीविषयीं आणखी माहिती कै० हंस यांच्या निबंधांत व रा० रा० ...० वि० माडगांवकर यांच्या पुस्तकांतही आहे. ती जिज्ञासु वाचकांनीं पहावी. ६. 'प्रथमारंभीं ...ारंभीं' असा पाठ आहे. ७. शार्ङ्गधर. ८. हा धामणगांवचा पाटील होता. याचें आडनांव जग- ... जातीचा शूद्र. ह्याच्या बायकोचें नांव ममताई. मुलाचें नांव यमाजी. मुलाच्या बायकोचें नांव ...ीरथी. हीं सर्व माणसें त्याचे सारखींच भगवद्भक्त होतीं. विशेष माहिती भक्तविजय अध्याय ... यांत पहावी. ९. पृष्ठ १५ टीप ३ पहा.

गेला देउळामागें त्यानें केले दगडाचे टाळ । हरीनें फिरविलें देऊळ. ॥
अगाध लीला त्याची द्वारका एका खांबावर । पाखरें० ॥ २ ॥
[1]जनाईच्या घरीं देवें भरल्या पाण्याच्या घागरी । चहूं हातांनीं रांजण भरी ॥
दळण कांडण करून शेणिची पाटी डोईवरी । गवऱ्या वेंचून आणी घरीं ॥
प्रल्हादाला कसें तारिलें जळत अग्नीवर । पाखरें० ॥ ३ ॥
[2]चोख्यामेळयाचे घरीं देवानें सोडिली द्वादशी । तेव्हां तें श्रुत झालें रायासीं ॥
नेलें पाचारुन रायें तेव्हां शिक्षा दिधली त्यासी । देवा! तूं मार त्याचा खासी ॥
अगाध तूझी माव कळेना तुका म्हणे जोडुनि कर । पाखरें० ॥ ४ ॥

## पद १३८ वें.

देखिलें स्वप्न । स्वप्न अवसरीं । जणुका मी पंढरपुरीं ॥ ध्रुवपद. ॥
करुन एक चित्त । चित्त सत्वर । सोडिले प्रपंच घरदार ॥
मिळाले संत । [3]संतांचे भार । हर्षलें मन माझें फार ॥
चाल ॥ जाऊं संगातीं । हरिनाम गर्जताती । विणा टाळ मृदंग वाजती ॥
टीप ॥ वाजति झणकारी । जणुका मी पंढरपुरीं ॥ १ ॥
सहज मीं गेलों । गेलों [4]राउळाला । पाहिला गरुड आणिला मेळा ॥
सभा मंडप । मंडप न्याहाळिला । कर कटावरी ठेविला ॥
चाल ॥ पाहिला दृष्टी । सत्यभामे घेतल्या भेटी । उभा पांडुरंग जगजेठी ॥
टीप ॥ जगजेठी कैवारी । जणुका मी पंढरपुरीं ॥ २ ॥
वाहुनी तुळसी । तुळसी बुका माळा । गंधाक्षता प्रेमळा ॥
दास विनवीतो । विनवितो दयाळा । ................ ॥
चाल ॥ हरि! नांव तुझें घेतां । कधीं भेटसी रुक्मिणीकांता ।
चरणावरि ठेवुनी माथा । तुकाराम तुला विनविता ॥
टीप ॥ विनवितो वारंवारीं । जणुका मी पंढरपुरीं ॥ ३ ॥

## पद १३९ वें.

देहीं मठ बांधिला ज्याणें । योगीयानें ॥ ध्रुवपद. ॥
आत्मा गोसावी निर्गुण । त्याचे शिष्य पांचजण ।
पंचप्राण आणि उदान । .................... । करी जतन ॥ १ ॥

---

१. पृष्ट २३ टीप ४ पहा. २. हा पंढरपुरचा वतनदार, जातीचा अतिशूद्र श० १२०० मध्यें झाला. याची समाधि पंढरपुरास महाद्वारापुढील नामदेवाच्या पायरीजवळ आहे. विशेष माहिती भक्तविजय अध्याय २३ येथें पहावी. ३. साधूंचे समुदाय. ४. देवालयाला.

दहा दरवाजे मठाला । दोनी दीपद्वारें त्याला ।
योगी बसले निरंजनाला । अग्नीच्या जळती ज्वाळा । तें पाहून ॥२॥
पाण्यामध्यें जळतें पाणी । धन्य देवाची करणी ।
विरळा जाणे गुरुज्ञानी । देव पृथ्वीचा धनी । करी पाळण ॥ ३ ॥
पाणी भरलें नाभीकमळीं । अंतरबाह्य धुनी[1] चालली ।
गुरुपुत्रानें पाहिली । .................. । द्यावी सांगून ॥ ४ ॥
तुकाराम पुसे खूण । इतकें द्यावें मज सांगून ।
नाहीं तरि करावें श्रवण । .................. । धरावें ध्यान ॥ ५ ॥

## पद १४० वें.

सखी पुसे सखयेसी । सद्गुरुची महिमा कैसी ।
तें गुज सांगें मजपाशीं । सखये बाई ॥ १ ॥
सद्गुरुराज दयाळ मोठा । तोडी अहंकाराच्या वाटा ।
नेउन बसवी मूळपीठा । सखये बाई ॥ २ ॥
कायावाचामनोभावें । सद्गुरूला शरण जावें ।
आपुलें स्वहित विचारावें । सखये बाई ॥ ३ ॥
तुका म्हणे अहो! बाई! । ऐसें नवल सांगूं काई? ।
पुन्हा जन्ममरण नाहीं । सखये बाई ॥ ४ ॥

## पद १४१ वें.

तमाशा संतांघरीं । निर्गुणपुरीं ॥ ध्रुवपद. ॥
गांवावर एक बाभुळ । खालीं शेंडा वरती मूळ ।
खालीं कळस वर देउळ । गत आहे न्यारी ॥ तमाशा० ॥ १ ॥
फुला आधीं गुंफिला तुरा । याचा अर्थ करी चातुरा ।
कोण पुरा असेल चतुर । खोविल शिरीं ॥ तमाशा० ॥ २ ॥
घोडा रोंवुन बांधिला खुंट । नगाऱ्यावर चढविला उंट ।
कोण पुतळा असेल बळिवंत । अर्थ विचारी ॥ तमाशा० ॥ ३ ॥
दिवा वाऱ्या घालीतसे सेव । ह्याचा घ्याहो तुम्हीं अनुभव ।
तुका वैकुंठींचा राव । गत आहे न्यारी ॥ तमाशा० ॥ ४ ॥

---

१. नदी.

### पद १४२ वें.

कलियुगीं विठ्ठलपद पहा ॥ ध्रुवपद. ॥

शुकसनकादिक निशिदिनीं गाती । अष्ट दिशा दहा ॥ कलि०॥ १ ॥
हस्त कटी समचरण विटेवरी । अष्ट दिशा दहा ॥ कलि० ॥ २ ॥
तुका म्हणे पतीत[1] जगासी । उद्धरी जडदेहा ॥ कलि० ॥ ३ ॥

### पद १४३ वें.

कसि रे! विट जोडली [2]पुंडलिका । मनीं भाव धरुनियां निका[3] ॥ध्रुवपद.॥

मायबापाची सेवा करुनी । विठ्ठल आणिला सखा ॥ कसि रे० ॥ १ ॥
खांदीं कावडी वाहे पाणी । [4]एकनाथाचे फुका ॥ कसि रे० ॥ २ ॥
भीमातिरीं रहिवास केला । तुकीं उतरला तुका ॥ कसि रे० ॥ ३ ॥

### पद १४४ वें.

पार्वतीवर । नमिला म्यां शिव शंकर ॥ ध्रुवपद. ॥

शंभू कैलासशिखरीं । पार्वती आदिमाया सुंदरी ।
बैसुनी शंकराचे शेजारी । जोडूनी कर ॥ नमिला० ॥ १ ॥
गिरिजा पुसे शंकरासी । तरि मी काय होय तुम्हांसी ।
शंकर म्हणे माता होशी । मी तुझा कुमर ॥ नमिला० ॥ २ ॥
ऐकुनि बोलली गिरिजा । मी तरी तुमची आत्मजा ।
तुम्ही पिता शंभूराजा । माझें माहेर ॥ नमिला० ॥ ३ ॥
बोलिला नंदी ते अवसरीं । ऐका म्हणे त्रिपुरारी! ।
गिरिजा शंकराची अंतुरीं[5] । तुम्ही भ्रतार ॥ नमिला० ॥ ४ ॥
बोलिले मग स्वामी कार्तिक । नंदि! तुम्हांसी काय ठाउक? ।
गिरिजा माची बहिणीची लेंक । माचरू थोर ॥ नमिला० ॥ ५ ॥
बोले [6]वीरभद्र आपण । तुम्ही लबाड चौघेजण ।
गिरिजा शंकराची बहीण । नातें साँचार[7] ॥ नमिला० ॥ ६ ॥
ब्रह्मा विष्णु त्रिनयन । हे काय होती तिघेजण ।
तुका म्हणे द्यावें निवडून । तुम्ही चतुर ॥ नमिला० ॥ ७ ॥

### पद १४५ वें.

येथें कोणाचें काय बा! गेलें । ज्याचें त्याणेंच अनहित केलें ॥ ध्रुवपद. ॥

---

१. पापी. २. पृष्ट ९ टीप १ पहा. ३. खरा, स्पष्ट, दृढ. ४. पृष्ट २६ टीप ६ पहा. ५. बायको. ६. शिवपार्षद. ७. खरोखर.

संतीं सांगितलें ऐकेना । स्वतां बुद्धीही असेना ।
वृत्ती निबरली पिकेना । मूढ कोणाचें ऐकेना ॥ येथें० ॥ १ ॥
अन्य यातीचे संगतीं लागे । साधुजनामध्यें न वागे ।
केल्यावीण पराक्रम सांगे । जेथें सांगे तेथेंचि भीक मागे ॥येथें० ॥ २ ॥
नीत टाकुनि अनीत चाले । भडभड भकतेंच बोले ।
मंद होउनी उन्मत्त डोले । अखेर फार वाईट झालें ॥ येथें० ॥ ३ ॥
तुका म्हणे कांहीं नेम । चित्तीं न धरी अधम ।
सांग पडलासे भ्रम । अंतीं कुटील त्यासी यम ॥ येथें० ॥ ४ ॥

## पद १४६ वें.

'विठ्ठल विठ्ठल' बोल मना ! कर साधन सोपें । होइ जागा आवरी झोंप ॥ध्रुवपद.॥
पंच विषयीं झोंप आली केली तिणें गर्दी । हालविली मर्दाची मर्दी ॥
हित आपुलें नेणोनियां होसि तिचा वर्जी । ऐसा कैसा बेदरदी ॥
न्यादाराधनपुत्रीं विषयावरि लोलुप ॥ होइ जागा० ॥ १ ॥
ांति तुजला कशि पडली जडली क्रिया आधि । नाना परिची उपाधी ॥
रामराम' हा घ्या मंत्र हो तारक सिद्धी । मुख्य साधन हें तूं साधी ॥
डिघडि पळपळ विसरूं नको लागोंदे चोप ॥ होइ जागा० ॥ २ ॥
ोंप नव्हे हा काळ तुजला ग्रासाया पाहतो । आयुष्य घेउनियां जातो ॥
ाशवंत हा नरदेह क्षणभंगुर मूर्ती । पडशिल काळाचे हातीं ॥
रिभजनाविण तुजवरता काळ करिल कोप । होइ जागा० ॥ ३ ॥
[३]गजळवत संसार सख्या! झोंप किती घेशी । आतां तूं सावध कधीं होशी ॥
ीस पंचवीस साठींचा आला आकारासी । उघडी डोळा घ्याइ हरीशीं ॥
ुका रामाशी हरिभजनीं नित्य नामजप । होइ जागा० ॥ ४ ॥

## पद १४७ वें.

जगजीवन दीनदयाळा रे! ॥ ध्रुवपद. ॥
नित्य निरंजन सज्जनरंजन । भक्तजनप्रतिपाळा रे! ॥ जगजी० ॥ १ ॥
ीन तुझें नुमजे मज साधन । अंगीकारी निज बाळा रे! ॥ जगजी० ॥ २ ॥
दुस्तर हा भवसागर पामर । दंशितसे यमकाळा रे! ॥ जगजी० ॥ ३ ॥
ीन तुका विनवी कर जोडुनी । नाम तुझें जगपाळा रे! ॥ जगजी० ॥ ४ ॥

---

१. जातीचे. २. कुटणें=ठेंचणें, चेंचणें. ३. मृगजलाप्रमाणें असत्य.

माळा रोऊनी मेडीचारी । कान्हो टगाळ क्रीडा करी ।
मज धाडोनी पैल थडी ॥ जागारे० ॥ १ ॥
चारी कोनीं दाही दिशा । शेत पिकलें आलें ब्रह्मरसा ।
काळ मोडील तूं निजलास कसा ॥ जागारे० ॥ २ ॥
तुका म्हणे आम्ही जागलों । एका सद्गुरु शरण गेलों ।
जन्मोजन्मीचें दुःख विसरलों । जागारे० ॥ ३ ॥

### पद १५६ वें.

गुरु बोलिला साचार[1] । मूळ विस्तार ॥ ध्रुवपद. ॥
गुरु बोलतसे ही खुण । अकाराची महिमा जाण ।
मूळ विस्तार कंठती नयन । अवघा अपार ॥ गुरु बोलिला० ॥ १
मुळीं ध्वनी अंबरीं[2] झाली । ब्रह्मा म्हणोनि हाक झाली ।
ब्रह्मा असतां हो नंदनीं । अवघा आकार ॥ गुरु बोलिला० ॥ २ ॥
ध्वनी माथां सिद्ध असतां । वेदें[3] शास्त्रें[4] हो गर्जतां ।
येवढें ब्रह्मांड रचितां । मूळ विस्तार ॥ गुरु बोलिला० ॥ ३ ॥
नाम जिचें मूळ प्रकृती । आदि पुरुषाची हो! शक्ती ।
तिनें सेजे निजउनी पती । मांडिला आकार ॥ गुरु बोलिला० ॥ ४ ॥
येवढें ब्रह्मांड गोळा केलें । पतीस कळों नाहीं दिलें ।
देव ते भिउनी गेले । ही नसती कंवटाळीण कोण आकार ॥गुरु बोलिला० ५
ब्रह्मा विष्णु उमाकांत[5] । हीं बाळें तिचे आज्ञेंत ।
नेत्र उघडुनी निश्चित । तनु दिसे स्वरूप आकार ॥ गुरु बोलिला० ॥ ६ ॥
ब्रह्मसुखाच्या समुद्रांत । बुडाले जीव समस्त ।
तिला मूळपीठ म्हणत । आइका उभर ॥ गुरु बोलिला० ॥ ७ ॥
हिनें चैतन्य झांकिलें । अरूप रूपासी आणिलें ।
अनंत ब्रह्मांडींचे पुतळे । नाचवी पहा रे! ॥ गुरु बोलिला० ॥ ८ ॥
निर्गुणासी गुण लाविले । निराकार आकारलें ।
अनंतासी नाम ठेविलें । जिवित्वासी लाविलें पार ॥ गुरु बोलिला० ॥ ९ ॥
मायबाप नसतां ती जन्मली । पतीस न कळतां गरोदर झाली ।
हें ब्रह्मांड रचिलें नाना विकारीं । पहा आकार ॥ गुरु बोलिला० ॥ १० ॥

---

१. सत्य. २. आकाशांत. ३. चार वेद. ४. सहा शास्त्रें. ५. शिव.

असो ऐशी ती आदिशक्ति । ती विच्छाया धरिली चित्तीं ।
तिसी कुणबी न म्हणती । पहा दूरवर ॥ गुरु बोलिला० ॥ ११ ॥
तुका म्हणे सावधान । परिसा मायेचें कारण ।
सप्त पाताळ मायेनें । ग्रासीलें पहा रे ! ॥ गुरु बोलिला० ॥ १२ ॥

### पद १५७ वें.

गस्त आली जागा लोकांनो ! । पडली संसारभ्रांती ॥ ध्रुवपद. ॥
निजल्याची निज गेली । व्यर्थ जागोनी काय रे ! ।
गुरुवांचोनि प्राणी जन्मला । त्याची जन्मली माय रे ! ॥ गस्त० ॥१॥
काळें रोगें शिडी लाविली । लाविली ब्रह्मांडपुरीं ।
हा काळ सर्वांला लागला । कांहीं उरूं नेदी उरी ॥ गस्त० ॥ २ ॥
गस्त करी चार सहा । अठरा हाका जो मारी ।
अनुहात तुतारी । वेद डफ हा हातीं ॥ गस्त० ॥ ३ ॥
[1]गीता सांगे सद्गुरु । अर्थ शोधुनी पाहे रे ! ।
तुका म्हणे सत्य सत्व । सत्य होउनी राहे रे ! ॥ गस्त० ॥ ४ ॥

### पद १५८ वें.

ज्याचें सुख त्याला सुख त्याला । काय असे भलत्याला ॥ ध्रुवपद. ॥
एक जेउनि तृप्त झाला । एक हाका मारी अन्नाला ॥ ज्याचें० ॥ १ ॥
एक नदी उतरुनि गेला । एक हाका मारी तारूला ॥ ज्याचें० ॥ २ ॥
एक मोक्षमार्गी गेला । एक अधोगती चालिला ॥ ज्याचें० ॥ ३ ॥
तुका वैकुंठासी गेला । हाका मारितो लोकांला ॥ ज्याचें० ॥ ४ ॥

### पद १५९ वें.

भूत जबर लागलें ग बाई ! । झाली झडपण करूं गत काई? ॥ ध्रुवपद.॥
नादाबिंबाच्या पडल्या गांठी । तंव त्या भुतानें मारिली मिठी ॥ भूत० ॥ १ ॥
भूत जडलें जाईना अंगा । आतां कसी गत करूं मला सांगा ॥ भूत० ॥ २ ॥
निंबु नारळ कोंबडा उतारा । तंव त्या भुतानें धरिला थारा ॥ भूत० ॥ ३ ॥
शेळी बोकड द्या भुताला । भूत जाइना देवऋषीला ॥ भूत० ॥ ४ ॥
आले [2]पंचाक्षरी केली [3]भाळदोरी । तंव त्या भुतानें धरिलें थारी ॥भूत० ॥ ५ ॥
जाणाई जोतीबा खंडोबा आला । भूत जाइना त्याच्या बाला ॥भूत० ॥ ६ ॥
सुपचाट्टूचे केले देवऋषी । तंव त्या भुतानें धरिलें केशी ॥ भूत० ॥ ७ ॥

---

१. भगवद्गीता. २.मांत्रिक.३. गाय लाथ मारील म्हणून जी दोरी घालतात ती=अडची भाळी.

भूत जडलें पुंडलिकाला । पुन्हा जन्म नाहीं दासाला ॥ भूत० ॥ ८ ॥
भूत जडलें नारदाला । कीर्तनीं छंद लागला त्याला ॥ भूत०॥ ९ ॥
भूत जडलें प्रल्हादासीं । त्यानें वधिलें पितयाशीं ॥ भूत० ॥ १० ॥
भूत चतुर्भुज पितांबरधारी । त्यानें मनुष्यपण नेलें वारीं ॥ भूत० ॥ ११ ॥
तें भूत उभें भिंवरेतटीं । साधुसंतांसी देतें भेटी ॥ भूत० ॥ १२ ॥
भूत झडपी साधुसंत । तुका म्हणे पंढरीनाथ ॥ भूत० ॥ १३ ॥

### पद १६० वें.

खेळ खेळुनी निराळा राही । सांडी या विषयाची घाई रे !।
तेणेंच खेळें बसवंत होसी । ऐसें सत्य जाण माझे भाई ! रे ! ॥ ध्रुवपद.॥
एका घायीं खेळतां न सांपडेची । डायी दो घाल्या न तगसील भाई ! रे ! ।
त्रिगुणाची फेरी थोर कष्टी होशील । या चौघांची तरी धरी सोयी रे ! ॥ १ ॥
सिंपियाचा पोर एक खेळिया नामा । त्यानें विठ्ठल बसवंत केला रे ! ।
आपुल्या सवंगड्या शिकउनी घाई । त्यानें संतत फड जागविला रे ! ॥खे०॥२॥
ज्ञानदेव मुक्ताई वटेश्वर चांगा । सोपान आनंदें खेळती रे ! ।
कान्हो गोवारी तेणें बसवंत केला । आपणा भोंवती नाचती रे ! ।
सकळ ही मिळोनियां एकचि घाई । त्याच्या ब्रह्मादिक लागती पायीं रे ! ॥खे०॥३॥
राम बसवंत कबीर खेळिया । जोडा बरवा मिळाला रे ! ।
पांचा सवंगड्या एकच घायी । तेथें नाद बरवा उठला रे ! ।
ब्रह्मादिक सुरवर मिळोनियां । त्यांनीं तो हरि खेळिया निवडिला रे! ॥खेळ०॥४॥
ब्राह्मणाचा पोर एक एका भक्त । त्यानें जन खेळकर केले रे ! ।
जनार्दन बसवंत करोनी । त्यानें वैष्णवांचा मेळा मेळविला रे ! ।
एक धाई खेळतां आपणचि । बसवंत झाला रे ! ॥ खेळ० ॥ ५ ॥
आणिक ही खेळिये होउनी गेले । वर्णाया वाचा मज नाहीं रे ! ।
तुका म्हणे गडिया हो हुशार खेळा । पुढिलांची धरुनी सोई रे ! ।
एका घायीं खेळतां जो चुकेल । पडेल चौऱ्यांशीचे डायी रे ! ॥ खेळ० ॥ ६ ॥

### पद १६१ वें.

खेळ ग ! फुगडी फुगडी । नको जाऊं तूं रडी. ॥ ध्रुवपद.॥

---

१. भीमातीरीं. २. डावांत, फाशांत, फेऱ्यांत. ३. देवश्रेष्ठ. ४. चौऱ्याशीं योनींत जन्म घे- ण्याच्या फेऱ्यांत.

फुगडी खेळ ग ! तूं पिंगा । आलिस माझ्या संगा ।
फुगडी खेळ रे ! श्रीरंगा । सोडुन धांगडधिंगा ॥ खेळ ग० ॥ १ ॥
फुगडी खेळ गे ! फेराची । हो बाईल दिराची ।
लज्जा सोड गे ! मनाची । गांवच्या लोकांची ॥ खेळ ग० ॥ २ ॥
फुगडी खेळ गे ! लखोटा । धर माझा आंगोठा ।
बळकट घाल गे ! कांसोटा । सोडुन [1]च्यारी वाटा ॥ खेळ ग० ॥ ३ ॥
फुगडी खेळ गे ! शिवशक्ती । हरी नामाची भक्ती ।
तुकया स्वानंद गर्जती । पदोपदींच्या कीर्ति ॥ खेळ ग० ॥ ४ ॥

### पद १६२ वें.

पहा पहा सांवळा कैसा धीट । बोल बोलूं नये ते बोलतो उद्धट ।
याच्या बोलण्याचा कोणा नये वीट । याच्यावरुनी देह ओवाळूं [2]चैतुष्ट॥ध्रुवपद.
ाणें माझी लपविली पिंवळी गोटी । उलटा भोंवऱ्याची चोरी लावी पाठी ।
ाई कंचुकीची सोडोनियां गांठी । हृदय सखोल एकांत घाली मिठी ॥पहा०॥१॥
अवचित माझ्या डोळ्यांत गेलें कणू । फुंकून काढितां वाटलें समाधानु ।
ाहाणा कानडा तुझा गे ! नारायणू । चुंबन देतां हरपलें देहभानू॥पहा०॥२॥
ावनीत पाहुनी लावितो लाडीगोडी । राधिका पाहुनी राजस डोळे मोडी ।
आगमनिगमा नकळे त्याची खोडी । स्वामी तुकया शरण हात जोडी॥प०॥३॥

### पद १६३ वें.

तुझे अंगींचा उतारा । बाबा ! [3]बाळसंतोष ॥
तो मज देई गा दातारा । बाबा ! बाळसंतोष ॥
पुन्हा नये मी संसारा । बाबा ! बाळसंतोष ॥ १ ॥
तुझ्या मस्तकीं टोप । बाबा ! बाळसंतोष ॥
देतां होईल प्रताप । बाबा ! बाळसंतोष ॥
विलया जाईल महा पाप । बाबा ! बाळसंतोष ॥ २ ॥

---

१. विहंगम, पिपीलिका, मीन आणि कपिल हे चार मार्ग वेदांतांत प्रसिद्ध आहेत. २. चार देह–स्थूलदेह–औटप्रमाण, लिंगदेह म्हणजे सूक्ष्मदेह–अंगुष्ठप्रमाण, कारणदेह–अंगुळप्रमाण, महाकारणदेह–मसूरप्रमाण. (पंची०). (२) स्थूलदेह–नेत्राचें पांढरें बुबुळ तें. सूक्ष्मदेह–काळें बुबुळ तें. कारणदेह–पिंगट काळें बुबुळ तें. महाकारणदेह–जी काळी बाहुली नेत्रांतील मसूरप्रमाण असते तें. (गोरक्षादिकांचें मत.) (३) स्थूल–आरक्त, सूक्ष्म–शुभ्र, कारण–श्याम, महाकारण–नीलवर्ण. (अभंग तुकोबाचा.) ३. बाळसंतोष=या जातींतील भिकारी 'बाळसंतोष' या शब्दाचा घोष करून भिक्षा मागत फिरतात.

शाल्व पितांबर सकलाद । बाबा ! बाळसंतोष ॥
ज्ञान कंचुकी ही शुद्ध । बाबा ! बाळसंतोष ॥
तुका म्हणे मी प्रसिद्ध । बाबा ! बाळसंतोष ॥ ३ ॥

**पद १६४ वें.**

प्रसूत झाली बाळा । वाजवा म्हणती थाळा[1] ॥ ध्रुवपद. ॥
दुध पाजुनी केला थोर । निघाला शिंदळ चाहाडखोर ।
राजद्वारीं पायीं दोर । दरवडाखोर दिवसाचा ॥ प्रसूत० ॥ १ ॥
घरीं उपास करी माय । परनारीसी द्रव्य खाय ।
भांग पिउनी डुलत जाय । झुलपें सोडी मोकळीं ॥ प्रसूत० ॥ २ ॥
ऐसे बिसणीचे[2] ढंग । परनारीसी करी संग ।
कोटी पूजा होती भंग । पदोपदीं ब्रह्महत्या ॥ प्रसूत० ॥ ३ ॥
त्याचे पूर्वजांची माळ । नरकीं नेऊनी टाकी काळ ।
उदरीं जन्मला चांडाळ । काय पाड तयाचा? ॥ प्रसूत० ॥ ४ ॥
पावुनी नरदेहनिधान[3] । करीं विठोबाचें ध्यान ।
तुका म्हणे समाधान । तरीच आलों संसारा ॥ प्रसूत० ॥ ५ ॥

**पद १६५ वें.**

मस्करी ज्याची त्याला । येईल कामाला ॥ ध्रुवपद. ॥
ऐक मात नारदाची । मस्करी केली कृष्णाची ।
गवळण मागितली तयाची । बायको झाला ॥ मस्करी० ॥ १ ॥
मस्करी केली रावणानें । राज्य गमाविलें त्यानें ।
भस्मासुर कीं मस्करीनें । भस्म झाला ॥ मस्करी० ॥ २ ॥
ऐसा मस्करीचा संग । महादेवाचें गळलें लिंग ।
कीचक द्रौपदीचे संगें । कुळासहित गेला ॥ मस्करी० ॥ ३ ॥
ऐसी मस्करी आहे थोर । सदाशिव पाडी वैर ।
तुका विनवी जोडुनी कर । कीं मस्करीला ॥ मस्करी० ॥ ४ ॥

---

१. मुलाचा जन्म झाला म्हणजे थाळा वाजवून लोकांस कळविण्याची चाल आहे. २. बिसनी= व्यसनी, इष्कबाज, फंदी, चंगीभंगी. ३. मनुष्यदेहरूप ठेवा.

## पद १६६ वें.

येई गा! तूं येई गा! तूं पंढरीच्या राया! ।
तुजवीण शीण वाटे, क्षीण झाली काया[1]. ॥ ध्रुवपद. ॥
याति हीन, मति हीन, कर्म हीन माझें, ।
सर्वेहि लज्जा सोडुनि बापा! शरण आलों तूज. ॥ येई० ॥ १ ॥
दीननाथ दीनबंधु नाम तुम्हा साजे ।
पतितपावन[2] ऐसि जगीं ब्रीदावळि गाजे. ॥ येई० ॥ २ ॥
विटेवरी उभा नीट, कटीवरी कर ।
तुका म्हणे आम्हा हेंचि ध्यान निरंतर. ॥ येई० ॥ ३ ॥

## पद १६७ वें.

कां हो! तुम्हि निर्मळ हरिगुण गाना? ।
नाचत आनंदरूपें पंढरीसी जाना? ॥ ध्रुवपद. ॥
काय गणिकेची[3] याती अधिकार मोठा ।
पापी अजामीळ[4] तोही नेला वैकुंठा. ॥ कां० ॥ १ ॥
काय नेणो तरले किती अनंत अपार ।
पंच महापापी त्याच्या नाहीं पापा पार. ॥ कां० ॥ २ ॥
पुत्राचिये मिसें नष्ट म्हणे 'नारायण' ।
कोण हें कर्तव्य तुका म्हणे त्याचें पुण्य. ॥ कां० ॥ ३ ॥

---

१. शरीर. २. पातकीजनांस पूत करणारा. ३. वेश्येची. जनकाच्या राजधानींत पिंगळा नामक एक अतिरूपवती वेश्या होती. वेश्याजनाच्या रीतीप्रमाणें जो अधिक पैसा देईल त्याच्या संगतीनें रात्र घालवावी असा तिचा क्रम होता. एके दिवशीं तिनें आधीं आलेल्या पुष्कळ धनवंत पुरुषांस, अधिक द्रव्य देणारा कोणी आणखी दुसरा पुरुष मिळेल या आशेनें परत लाविलें; मग तिनें मध्यरात्र होईपर्यंत पुष्कळ वाट पाहिली, परंतु कोणी पुरुष त्यादिवशीं मिळाला नाहीं. तेव्हां परम पुरुष जो परमेश्वर त्याचा त्याग करून ह्या लौकिक पुरुषांची इच्छा करितें ही किती अयोग्य गोष्ट आहे? असा तिला पश्चात्ताप होऊन ती विरक्त झाली आणि परमेश्वरास शरण गेली. मग तिला ईश्वरानें उत्तम गति दिली—अशी कथा आहे. (नवनीत.) ४. हा एका विद्वान् अग्निहोत्री ब्राह्मणाचा मुलगा होता. तो एकदां वनांत दर्भ आणण्याकरितां गेला होता. तेथें तो एका सुस्वरूप शूद्रस्त्रीस भुलून भ्रष्ट झाला. याला दहा मुलें झालीं. त्यांत कनिष्ठ नारायण नामक मुलगा याचा परम आवडता होता. मरणसमयीं पुत्राच्या मिषानें 'नारायण' असें ईश्वराचें नाम याच्या मुखीं आलें, तेव्हां विष्णुदूतांनीं यास वैकुंठास नेऊन याचा उद्धार केला—अशी कथा आहे.

### पद १६९ वें.

साधनिं सुख कैसें हो! धर्मार्थ कामस लोभें. ॥ ध्रुवपद. ॥
संसारसिंधु तराया श्रीरामनामनौका ।
ब्रह्मांडिं कीर्ती भराया परजाया मातृ विलोका ।
सर्वांगीं शुचि पसरुनियां परधन पाथरसम लेखा ।
जीवेश्वर ऐक्य कराया गुरुवचनीं संशय टाका. ॥ साध० ॥ १ ॥
मिष्टान्न बांधुनि पोटावरतें घालों केंवि म्हणावें? ।
पायाळावांचुनि भूमंडळ काय करावें? ।
वांजेसि ऋतु देउनियां कासया मास गणावे? ।
अभिमानाचें बळ जेथें फळ नाहीं श्रम हे दुणावे. ॥ साध० ॥ २ ॥
वाचांश समुळि त्यजावा लक्षांत लक्षित जावें ।
अभीमान तो वर्जावा ब्रह्मत्वें गुरुसि भजावें ।
.................................... ।
हें संमत असेल ज्यातें तेणें तुकया बोध करावा. ॥ साध० ॥ ३ ॥

### पद १६९ वें.

पांडुरंगे! येई हो! । जीवाचे जिवलगे! ॥ ध्रुवपद. ॥
कनवाळु कृपाळू भक्तांलागीं होई ।
गजेंद्राचा धांवा तुवां केला विठाई! ॥ पांडुरंगे० ॥ १ ॥
भक्ताचे कैवारे! कष्टलिशी विठ्ठले! ।
अंबरुषीकारणें जन्म दहा सोसिले ॥ पांडुरंगे० ॥ २ ॥

---

१. दुसऱ्याची स्त्री. २. माना, समजा. ३. दगडासारखें. [प्रस्तर=पाथर.] ४. पृष्ठ ३३ टीप १ पहा. ५. अंबरीष–हा सूर्यवंशोत्पन्न नाभाग राजाचा पुत्र. हा मोठा दानशूर, पराक्रमी आणि भगवद्भक्त होता. एकदां द्वादशीच्या दिवशीं दुर्वास ऋषि याच्या घरीं अतिथि म्हणून आला. तेव्हां राजानें त्यास भोजनार्थ राहवून घेतलें. नंतर मुनि आपलें आन्हिक कर्म करण्यासाठीं नदीतीरीं गेला. या दिवशीं द्वादशी थोडी म्हणजे साधनद्वादशी होती. तेव्हां व्रतभंग होऊं नये म्हणून राजानें, तिथि संपली नाहीं तों देवास नैवेद्य समर्पण करून, भोजन न करतां देवाचें तीर्थ प्राशन करून पारणें सोडलें. हें जाणून मुनि संतप्त झाला. त्यानें आपल्या जटेंतील केंसापासून एक अक्राळ विक्राळ कृत्या (राक्षसी) उत्पन्न करून राजावर सोडिली. तेव्हां विष्णूच्या सुदर्शनचक्रानें त्याचा नाश केला आणि त्या मुनीचा पाठलाग केला. हें पाहून दुर्वास भीतिग्रस्त असा विष्णूस शरण गेला. विष्णूनें 'परत अंबरीषाकडे जा, तो निराहार आहे, त्याचें समाधान कर म्हणजे चक्र तुला सोडील' असें सांगितलें. त्यावरून निरुपाय होऊन तो अंबरीषाकडे परत आला. दुर्वासास पा-

प्र्‍ल्हादाकारणें[1] स्तंभीं अवतार केला ।
विदारोनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला. ॥ पांडुरंगे० ॥ ३ ॥
उपमन्याकारणें[2] कैशी धांवशी लवलाही ।
पाजीं प्रेमपान्हा क्षीरसागरवासी विठाई! ॥ पांडुरंगे० ॥ ४ ॥
कौरवें पांचाळी सभेमाजि आणिली ।
वस्त्राहरणीं[3] वस्त्रें कैसीं जालीं माउली ॥ पांडुरंगे० ॥ ५ ॥
दुर्वास पातला धर्म छळावया वनीं ।
धांवशी लवलाही शाखा देंठ घेउनी. ॥ पांडुरंगे० ॥ ६ ॥
कृपाळु माउली भक्तिमुक्तिभांडार ।
करीं माझा अंगीकार तुका म्हणे वो! विठ्ठले! ॥ पांडुरंगे० ॥ ७ ॥

## पद १७० वें.

विठ्ठला! पंढरीच्या पाटला! । ऐक गाऱ्हाणें. ॥ ध्रुवपद. ॥
तुझिया चरणाशीं अंतरलों । आत्मपदीं विसरलों, ।
म्हणुनि मायेच्या कुशीं आलों । भवपुरीं बुडालों ।
तारु सांपडला. ॥ विठ्ठला० ॥ १ ॥
कां या पंढरीचा मिराशी । पूर्ण ब्रह्म होशी ।
धांऊन आलों बा! तुजपाशीं । विनंती परियेशी ।
................ ॥ विठ्ठला० ॥ २ ॥

---

हतांच राजास हर्ष झाला. त्यानें सुदर्शनाची स्तुति करून दुर्वासाला त्यापासून मुक्त केलें आणि यथेच्छ भोजन दिलें—अशी कथा आहे. (भागवत—नवम स्कंध—अध्याय ४-६.)

१. पृष्ठ ३४ टीप १ पहा. २. उपमन्यु—वसिष्ठकुलोत्पन्न व्याघ्रपाद नामक मुनीचा ज्येष्ठ पुत्र. हा असतां बहुतकरून घरींच खेळत असे. एकदां हा दुसऱ्या आश्रमांतील मुलांसह खेळत असतां तेथें यानें गाईचें दूध काढतांना पाहिलें, व तेथील मुलांच्या मातेनें तेथील मुलांस व यास गोरस पान करण्यास दिलें व तें तो प्याला. नंतर तो आपले घरीं आल्यावर आपले मातेजवळ गोरस मागूं लागला. तेव्हां त्याच्या मातेनें नित्याप्रमाणें पिष्ट पाण्यानें कालवून त्याला दिलें परंतु तें तो न घेतां 'काल मी त्या दुसऱ्या आश्रमांत दूध प्यालों तसें दे' असें म्हणूं लागला. तेव्हां त्याची आई जरा खिन्न होऊन म्हणाली कीं, 'असें दूध तुला मिळण्यायोग्य तुम्हीं नाहीं, कारणं पूर्वजन्मीं तुझ्या हातून ईश्वराराधन घडलें नाहीं.' यावरून त्यानें ईश्वराराधन करून आकल्प आयुष्य व समग्र क्षीरसागराचें आधिपत्य अशीं संपादन केलीं—अशी कथा आहे. हा शैव होता व कृष्णासही यानेंच शैवी दीक्षा दिली. हा धौम्य ऋषीचा ज्येष्ठ भ्राता व तंडी ऋषीचा शिष्य होता. (विशेष माहिती महाभारत—अनुशासनपर्व—अध्याय १४ यांत, अथवा सौरपुराण—अध्याय ३६ यांत पहावी.) ३. पृष्ठ ४ टीप १ पहा.

देह कुर्वंडी शत केले । दिवान आंगा आलें ।
.................... । ........ठली धरणें कां बसविलें ।
घेई हवाला. ॥ विठ्ठला० ॥ ३ ॥
करुणा ऐकुनियां जगजेठी । बाष्प दाटला कंठीं ।
प्रेमें धरियला निजपोटीं । हात ठेविला पाठीं ।
तुका गौरविला. ॥ विठ्ठला० ॥ ४ ॥

### पद १७१ वें.

सोडीं पैलव जाउं दे मजला हरी! ॥ ध्रुवपद. ॥
धरला पल्लव न सोडी माझा यानें । काय करावें या नंदाचिया कान्हे ।
बाइ! मी एकली न येती काय जाणे । मोठे अवघड धरियले रानें. ॥ सोडीं० ॥ १ ॥
वेळ लागलिया कोपतील घरीं । सासु दारुण सासुरा आहे भारी ।
तुज मज बोलतां नये उरी । ........................... ॥ सोडीं० ॥ २ ॥
सख्या वेशा होत्या मजपाशीं । तुझे पाउले मी पाहत केव्हांची ।
खोटें अंतर मग सांपडशी कैशी । एकाएकीं आंगीं तूं जडलाशी ॥ सोडीं० ॥ ३ ॥
ऐशी भागली करतां उत्तर । शक्ति मावळल्या आसोडितां कर ।
स्वामी तुकयाचा भोगी हा चतूर । भोग भोगुनि राखितो लोकाचार ॥ सोडीं० ॥ ४ ॥

### पद १७२ वें.

ऐशा गोपिका त्या कामातुर नारी. ॥ ध्रुवपद. ॥
गाइ गोपाळ यमुनेच्या तटीं । चेंडु चवगुण खेळतो वाळवंटीं ।
कृष्ण पाहावयाचा हेत धरुनियां पोटीं । 'चला चला पाहुं' म्हणती दृष्टीं. ॥ १ ॥
............................ । चित्तीं विव्हळ त्या देखावया हरी ।
मिष पाणियाचें करति या घरीं । बारा सोळा मिळोनियां परस्परी ॥ २ ॥
चिरे चोळी त्या धुतां विसरती । ऊर्ध्व लक्ष्य लागलें कृष्णमूर्ति ।
न आठवे कोण कुळ कोण याती । झाल्या तटस्थ सकळ नेत्रपातीं. ॥ ३ ॥
दंतधावन्याची मुखामाजि हात । वाद्यें वाजति, ऐकति जन मात ।
करती श्रवण हे कृष्णवेणूगीत । स्वामि तुकयाचे पूरवी मनोरथ. ॥ ४ ॥

### पद १७३ वें.

गोपाळा कृष्णाचीं । मंजुळ गाणीं ........ ची ॥ ध्रुवपद. ॥

---

१. पदर. २. वसन, लुगडें.

............नृत्य करी मुरारी । गोपाळ जग ........ ।
नट नाटक रंग ज्याचा । प्रिय गोपी ............ ॥ १ ॥
सुगंध अक्षतेचा मळव .... । ........ नाभी रेष आंगीं ॥
सोनसळा झळकला पहा....जो । थोर समुदाय झाला ॥ २ ॥
जयजया वेद गर्जे....जाला । आनंद सांठवेना ।
गोपी आणि गोपाळा । ........ सवर्णे पूर्ण माधवी लीळा. ॥ ३ ॥
विनवीतो दास तुका । ........ जनार्दनी देखा ।
देखिली कृष्णमूर्ति । भाव धरोनियां देखा ॥ ४ ॥

## पद १७४ वें.

सौरी[1] झालों बाई ! । लागलों संतांपायीं. ॥ ध्रुवपद. ॥
बांधुनि बुचडा, माथा उघडा । आंगीं विभूतीचा[2] पटा ।
आला गेला, भोगी मला । मोकळे मार्ग चारी. ॥ सौरी० ॥ १ ॥
काजळ कुंकू लेउनि गेलों । केतकीच्या बना ।
बारा सोळा पोरें झालीं । दादला[3] येइना मना ॥ सौरी० ॥ २ ॥
तुका म्हणे सौरी झालों । दादला माझा भ्याला ।
संगें येती रांडा पोरें । काय सांगूं त्यांना ? ॥ सौरी० ॥ ३ ॥

## पद १७५ वें.

पुरे एकचि पुत्र मायपोटीं । हरिस्मरणें उद्धरी कुळें कोटी. ॥ ध्रुवपद.॥
सूर्यवंशीं[4] जन्मला भगीरथ[5] । गंगा आणोनी पूर्वज केले मुक्त. ॥पुरे०॥१॥

---

१. निर्लज्ज, अविनय, बेफाम. २. भस्माचा. ३. नवरा. ४. 'धन्य वंशीं' असाही अन्य पाठ आहे. ५. भगीरथ—पूर्वी रामाचा पूर्वज सगर नामक राजा होता, त्याला दोन स्त्रिया होत्या. त्याच्या दोन स्त्रियांपैकीं एकीस साठ सहस्र व एकीस एकच पुत्र होता. त्याचें नांव असमंजस. सगरानें नव्याण्णव अश्वमेध यज्ञ करून पुन्हा शंभराव्या यज्ञासाठीं अश्व सोडला. तेव्हां इंद्रास धाक पडला कीं, 'जर शंभर यज्ञ शेवटास गेले तर यास माझें पद मिळेल.' या भीतीनें इंद्रानें तो घोडा पळवून पाताळांत कपिलऋषीच्या आश्रमांत नेऊन ठेविला. सगराचे साठ सहस्र पुत्र अश्वरक्षणास होते, ते अश्व पृथ्वीवर कोठें दिसेना म्हणून पाताळलोकीं त्याच्या शोधार्थ गेले. तेथें कपिलमुनीच्या आश्रमांत घोडा पाहून त्यास ताडन करूं लागले. तेव्हां त्या ऋषीनें डोळे उघडून रागानें पाहतांच ते सर्व सगरपुत्र एका क्षणांत जळून भस्म झाले. हें वर्तमान सगरास कळल्यानंतर त्यानें आपला नातू अंशुमान् यास कपिलऋषीच्या सांत्वनार्थ पाठविलें, तेव्हां त्यानें कपिलाला प्रसन्न करून त्याच्या आज्ञेनें घोडा नेऊन सगराचा यज्ञ पुरा केला. व आपल्या चुलत्यांचा उद्धार होण्याविषयीं प्रार्थना केली, तेव्हां 'गंगेशिवाय सद्गति होणार नाहीं' असें कपिलानें सांगितलें. तेव्हां गंगेला खालीं आण-

गौतमानें आणिली गोदावरी । आपण तरोनी दुसऱ्यां तारी. ॥ पुरे०॥२॥
पांच वर्षांचें ध्रुव[1] बाळक तान्हें । अढळपदीं स्थापिलें बहुमानें. ॥ पुरे० ॥३॥
तेज:पुंज शीतळ सौख्य दोनी । एक चंद्रप्रकाश त्रिभुवनीं. ॥ पुरे० ॥ ४ ॥
पहा कैसा तो पुंडलिक[2] धीट । उभा केला देव, दिली वीटे[3]. ॥ पुरे० ॥५॥
रामरूपी जन्मला कीर्तिवंत । अंजनीचे उदरीं हनुमंत. ॥ पुरे० ॥ ६ ॥
तुका म्हणे हरिसी विन्मुख । गांधारीचे उदरीं शत मूर्ख. ॥ पुरे० ॥७ ॥

## पद १७६ वें.

ज्याचें सुख त्याला सुख त्याला, । काय असे भलत्याला? ॥ ध्रुवपद. ।
एक जेवुनी तृप्त झाला । एक हांका मारी अन्नाला. ॥ ज्याचें० ॥ १ ॥
एक नदी उतरुन गेला । एक हांका मारी तारूला. ॥ ज्याचें० ॥ २ ॥
एक मोक्षमार्गी गेला । एक अधोगती[4] चालिला. ॥ ज्याचें० ॥ ३ ॥
तुका वैकुंठासी गेला । हांका मारितो लोकांला. ॥ ज्याचें० ॥ ४ ॥

---

ण्याकरितां तप आरंभिलें, परंतु त्याचा हेतु तडीस न जातां त्यास मृत्यु आला. पुढें त्याचा पुत्र दिलीप यानें तप केलें, पण तोही मरण पावला. अखेरीस भगीरथानें अत्यंत कठिण तपश्चर्या करून गंगेस प्रसन्न करून खालीं आणलें. व सगरपुत्रांचा उद्धार केला. गंगेला भगीरथानें आणिलें म्हणून 'भागीरथी' असें म्हणतात—अशी कथा आहे.

१. ध्रुव—उत्तानपाद राजास त्याच्या सुनीति नामक भार्येपासून झालेला पुत्र. या राजास सुनीति व सुरुचि अशा दोन भार्या होत्या, त्यांत सुनीति ही नावडती होती, त्यामुळें तिचा पुत्र ध्रुव हाही नावडता होता. एकदां याचा सावत्र भाऊ राजाच्या मांडीवर बसला असतां हाही बसण्यास गेला, पण हें सुरुचीला आवडलें नाहीं व तिनें त्याचा धिक्कार केला. तेव्हां हा रडत रडत आपल्या मातेकडे (सुनीतीकडे) गेला व झालेली गोष्ट तिला सांगितली, तेव्हां तिलाही फार वाईट वाटून ती म्हणाली, परमेश्वराची आराधना केल्याशिवाय हें ऐश्वर्य कोठून प्राप्त होणार? तेव्हां त्याला पश्चात्ताप होऊन लागलाच अरण्यांत जाऊं लागला, इतक्यांत मार्गामध्यें ध्रुवाला नारद भेटले. त्यांनीं 'तूं लहान आहेस, परत जा' असें सांगितलें, पण त्यानें ऐकिलें नाहीं. नारदमुनींस याची दया येऊन त्यांनीं यास एक मंत्र व भगवद्ध्यान यांचा उपदेश केला. अल्पकाळांत यास भगवंतांनीं भेट दिली म्हणून याच्या मनांत स्तुति करावी असें वाटलें; पण सामर्थ्य नसल्यामुळें हस्त जोडून उभा राहिला. तेव्हां हें जाणून परमेश्वरानें त्यास सामर्थ्य दिलें, व यानें स्तुति केली. तीवरून परमेश्वर संतुष्ट होऊन 'तूं छत्तीस सहस्र वर्षें पित्याच्या मागें राज्य कर व या स्थानीं परत ये' असा वर दिला. हें सर्व वर्तमान उत्तानपाद राजास कळलें, व तो समारंभपूर्वक सामोरा येऊन ध्रुवास परत नगरास घेऊन गेला, व त्याला राज्याभिषेक करून आपण अरण्यगमन केलें—अशी कथा आहे. (भागवत—स्कंध, ४ अ० ८-९.) २. पृष्ठ ९ टीप १ पहा. ३. पृष्ठ २१ टीप १ पहा. ४. नरकाला.

### पद १७७ वें.

विठाई! सांवळे! डोळसे! रंगा येई हो! ॥ ध्रुवपद. ॥

चौका भरिला आसनीं । पाचारिली कुळस्वामिणी ।
विठाई! पंढरपुरवासिनी! । धांवुनी येई हो! ॥ विठा० ॥ १ ॥
तुझें श्रीमुख चांगलें । पाहतां मन माझें रंगलें ।
देखुनी भवभय भंगलें । धांवुनी येई हो! ल्वकरी. ॥ विठा० ॥ २ ॥
रज तम धूपारती । पंचही प्राण पंचारती ।
ओंत्राळिली सत्वर गती । धांवोनियां येई हो! ॥ विठा० ॥ ३ ॥
मन मेंढा मारुनि मुठीं । आशा मनशा तृष्णा त्रुटी ।
भावभक्तिनैवेद्य ताटीं । भरोनी यावें हो! हंकारा ॥ विठा० ॥ ४ ॥
डंका अनुहात गजर । येउनी आंगामध्यें संचार ।
घेउनी आपुला पुनःकार । आरोग्य करीं तुकयासी. ॥ विठा० ॥५॥

### पद १७८ वें.

स्वस्थ बसावें । हरि ठेविल तैसें रहावें. ॥ ध्रुवपद. ॥

कोणे दिवसीं भोजनासी पक्वान्नें, । कोणे दिवसीं खाया न मिळती अन्नें, ।
कोणे दिवसीं नवरंगीं पिकलीं पानें, । बहु विडे खाणें. ॥ हरि० ॥ १ ॥
कोणे दिवसीं दारु हॅवया उडती, । कोणे दिवसीं तास मशाला झडती, ।
कोणे दिवसीं दिव्यांत ना बत्ती । गडप निजावें. ॥ हरि० ॥ २ ॥
कोणे दिवसीं हौदा गज अंबारी, । कोणे दिवसीं चळचळाट दरबारीं, ।
कोणे दिवसीं पायीं निघाली स्वारी, । तिडकत जावें. ॥ हरि० ॥ ३ ॥
कोणे दिवसीं शाल दुशाला माहलीं, । कोणे दिवसीं शेज नवी पलंगीं, ।
कोणे दिवसीं बाज मोडकी, खालीं । स्वस्थ निजावें. ॥ हरि० ॥ ४ ॥
कोणे दिवसीं माळ बुक्याची गर्दी, । कोणे दिवसीं भजन प्रेमानंदीं, ।
कोणे दिवसीं आपआपणा छंदीं । तुकयानें गावें. ॥ हरि० ॥ ५ ॥

### पद १७९ वें.

साजणी! लिंबलोण उतरा गे! वेगें करोन ॥ ध्रुवपद. ॥

---

१. 'तेथें मन माझें रंगलें' असा अन्य पाठ आहे. २. 'विठाबाई! दयाळे!' असा अन्य पाठ आहे. ३. पांच दीपांची आरती. ४. चंद्रज्योती. ५. दृष्टीचा अथवा पिशाचबाधेचा विकार न व्हावा म्हणून मीठ मोहऱ्या व निंबाचीं पानें हीं लहान मुलावरुन ओंवाळून टाकणें यास 'निंबलोण उतरणें' असें म्हणतात. हा एकप्रकारचा तोडगा आहे.

राम सकुमार सांवळा । दृष्टी होइल माझे बाळा ।
सखये ! झाली सांज वेळा । घननीळ न्हाणिला. ॥ साजणी० ॥ १ ॥
चरणीं शोभति वांकी वाळे । माथां जावळ सोनसळे ।
रत्नजडित पिंपळवण । तेज झळके अपार ॥ साजणी० ॥ २ ॥
मेघश्याम हा श्रीधर । नखें अर्धचंद्राकार ।
रूप पाहतां मनोहर । तेथें सकळ उपमा त्या ॥ साजणी० ॥ ३ ॥
तुका म्हणे एक वेळा । भेटी देईं घननीळा ! ।
सुख होइल सकळां । जिवलग सखया हो ! ॥ साजणी० ॥ ४ ॥

**पद १८० वें.**

रामरसायण सेवि मना ! रे ! ॥ ध्रुवपद. ॥
भवरोगाप्रति औषध हेंचि । वेंचुनि नलगे कांहीं धना रे ! ॥राम०॥१॥
इंद्रियदमन पथ्यें ज्याचीं । त्यागीं तूं विषय परि वमना रे ! ॥राम०॥२॥
गातां हरिहर मुक्तचि हेंची । व्यर्थ तुका मग जाशि वना रे ! ॥राम०॥३॥

**पद १८१ वें.**

पोटापुरतें देईं । मागणें लइ नाहीं लइ नाहीं. ॥ ध्रुवपद. ॥
पोळी साजुक अथवा शिळी । देवा ! देईं भुकेच्या वेळीं ॥मागणें०॥१॥
वस्त्र नवें अथवा जुनें । देवा ! देईं अंग भरून ॥ मागणें० ॥ २ ॥
देवा ! कळणा[2] अथवा कोंडा । आम्हां देईं भुकेच्या तोंडा ॥मागणें०॥३॥
तुका म्हणे आतां । नका करूं पाया परता ॥ मागणें० ॥ ४ ॥

**पद १८२ वें.**

शुद्ध सत्वाचा केवढा मोठा. ॥ ध्रुवपद. ॥
अनंत युगाचा देव्हारा । निजबोधाचा घूमारा ।
आंगीं आउतिचा भरला वारा । या मल्हारी देवाचा. ॥ शुद्ध०॥ १ ॥
बोध ब्रीद बांधिला गांठा । आंगीं वैराग्याचा पटा ।
........................ । दावी वाटा भक्तीच्या. ॥ शुद्ध० ॥ २ ॥
उदर कोठें बा ! संगातीं । घोळ वाजवी अनुहातीं ।
ज्ञान भंडाराचें पोतें । रितें नव्हे कल्पांतीं. ॥ शुद्ध० ॥ ३ ॥
लक्ष चौऱ्यायशीं घर चारी । या देवांची केली वारी ।
प्रसन्न झाले देव मल्हारी । सोहंभावें राहीलों. ॥ शुद्ध०॥ ४ ॥

---

१. श्यामल. २. कळण (एकाच्या डाळीचें सार). कळणाकोंडा=गरीबाचें अन्न. ३. पृष्ठ ८ टीप १ पहा.

या देवाचें भरतां वारें । गुरगुर करी वेडेचार ।
आंगीं प्रेमाचें फेपरें । दास तुकया भुंकेना. ॥ ५ ॥

## पद १८३ वें.

रामकृष्ण वासुदेवा! । जाणवी जीवासी ।
वाजवी चिपुळ्या । पाई घागऱ्या घोळ ॥ ध्रुवपद. ॥
रामनाम दोन अक्षर । सुलभ आणि सोपार ।
आतां मागितलें अपार । सेवटलें गोड तें करा गा! ॥ १ ॥
गाय वासुदेव वासुदेव । भिन्न नाहीं आणिका वासुदेवा ।
दान जाणुनि करी हेवा । ना उरे उरी करि ठेवा ॥ २ ॥
नीज घेउनियां फिरती । येकवेळां जाणविती ।
धरुनि राहावें हेंचि चित्तीं । नाधरी कांहीं काम हातीं गा! ॥ ३ ॥
सुपात्रीं सर्व भाव । मी तो सर्वी वासुदेव ।
जाणताती कृपाळूव । जया भिन्न नाहीं ठाव गा! ॥ ४ ॥
जीवदान करी उदार । अवलोकी चराचर ।
नाहीं वासुदेवीं विसार । तुका म्हणे तया नमस्कार गा! ॥ ५ ॥

## पद १८४ वें.

सर जाऊं दे परता । मुळीं भेटलासी आतां ।
नाट[1] लागलें संचिता । खेपा खुटलिया ॥ ध्रुवपद. ॥
गोरस घेउनी । सात निघाल्या गौळणी ।
तंव ती कृष्णाची करणी ! काय करी तेथें ॥
झाला पानसरा । मिठी घातली पदरा ।
आधीं दान माझें सारा । मग चला पंथें ॥ सर० ॥ १ ॥
आंसडि पदरा । धरि आणिक दुसरा ।
येरी झोंबती करा । काय वेडा होसी ॥
आलों गेलों बहु वेळां । नेणो गोरा कीं सांवळा ।
सर परता गोवेळा[2] ! । काय बोलतोसी ? ॥ सर० ॥ २ ॥
आम्ही येथें अधिकारी । मागें केली तुझी चोरी ।
आतां कळलियावरी । मागें केलें त्याचें ।

---

१. क्षय. २. हे गवळ्या!

बोलिल्या हांसोनी । आम्ही सासुरवासिनी ।
कां रे! झोंबसी दुरोनी । करी मात कांहीं.॥ सर० ॥ ३ ॥
बापा परनारी । कैशापरिणी पदरीं ।
तया काळलियावरी । तुज मज ॥
नाहीं जडला जिव्हारीं । फाकों नेदी तया नारी ।
जेथें वर्म तें घरीं । जाऊं पाहे तियेचें ॥ सर० ॥ ४ ॥
तया हातीं सांपडल्या । हाटींपाटी चुकविल्या ।
कृष्ण मिळणीमिळाल्या । त्याही न फिरती ॥
तुका म्हणे खंती । वायां न धरावी चित्तीं ।
होतें तुमच्या संतचित्तीं । वोढवलें आजी. ॥ सर० ॥ ५ ॥

## पद १८५ वें.

उगला राहें न करीं चाळा । उगला राहें न करीं चाळा ॥ ध्रुवपद. ॥
हरि तुझी कांति रे! सांवळी । मी रे! गोरी गोमटी[1] चांपेकळी ।
तुझ्या दर्शनें होइन मी रे! काळी। मग हे वालिन वालि जन ॥उगला०॥१॥
किती सांगूं मी तुज रे! गोवळा । तुझा खखडु रे! कांबळा ।
........अरे! नंदबाळा! । हलगजा! ........ ॥ उगला० ॥ २ ॥
तुझ्या आंगिची उ[2]रमट घाणी । चोरुनी खाशी दहिं दुध लोणी ।
घरींचें बाहेरील आणोनी । मी रे! चांदणी सकुमार ॥ उगला० ॥ ३ ॥
तुज तव हांसतिल हे जन । धिक्कारितील मजला देखुन ।
तुझ्या आंगींचें लक्षण पाहुन । मजला होईल विटंबन. ॥ उगला० ॥ ४ ॥
तुज तव लाज भय शंका नाहीं । मज तव सज्जन पिसुन पाहीं ।
आणिक मा[3]त मी तुज सांगूं काई। कैसी भीड तुजला माझी नाहीं ॥उगला०॥५॥
वचन मोडून देहांत । कळलें न साहेचि मात ।
तुकया स्वामी गोपीनाथ । जीवन्मुक्त करूनि भोगी ॥ उगला० ॥ ६ ॥

## पद १८६ वें.

आम्ही गोंधळी गोंधळी । गोविंदा गोपाळाचे मेळीं. ॥ ध्रुवपद. ॥

---

१. अशाच प्रकारचा एका हिंदी कवीनें कोटिक्रम केला आहे तो असा:—सुन्ना कहत सुनारसें उत्तम मेरी ज़ात । कारे मूंकी लालडी तुळे हमारे साथ ॥ १ ॥ मैं तो बनकी लालडी लालहि मेरा रंग । कारा मूं तबसे हुआ तुला नीचके संग ॥ २ ॥ यांत सोनें व गुंज यांच्यांत भांडण लाविलें आहे. २. उग्र. ३. गोष्ट.

आमचा घालावा गोंधळ । वाजवी हरिनाम समूळ ॥ आम्ही० ॥ १ ॥
दहा पांच घाला जेऊं । तुमच्या गोंधळाला येऊं ॥ आम्ही० ॥ २ ॥
काम क्रोध बकरीं मारा । पुजा रखुमाईच्या वरा ॥ आम्ही० ॥ ३ ॥
गुण गाऊं चोंडक्यासी[1] । चुकवूं लक्ष चौऱ्यांसीं[2] ॥ आम्ही० ॥ ४ ॥
जेथें विठूचें राउळ[3] । तेथें तुकयाचा गोंधळ ॥ आम्ही० ॥ ५ ॥

## पद १८७ वें.

अति बरवंटा आली बाळा । सुलक्षण गोंधळा हो ! ॥ ध्रुवपद. ॥
सुंदर रूप साजिरें कुंडलें मनोहर गोमटीं हो ! ।
नागर नागखोपा केशर कस्तुरी मळवटी हो ! ॥
विशाळ वैकुंठ नेत्र वैजयंती तळपे[4] कंठीं हो ! ।
कासे पीतांबर सुगंध चंदनाची उटी हो ! ॥ अति० ॥ १ ॥
राजस तेजस्वीराशी मिरवी शिरोमणी वेल्हाळा हो ! ।
कोटी रविशशिप्रभा लोपल्या सकळा हो ! ॥
.............................................. ।
न कळे ब्रह्मादिकां अनुपम हेची लीळा हो ! ॥ अति० ॥ २ ॥
सावळे सकुमार गोरी भुजा शोभती चारी हो ! ।
सखोल वक्षस्थल सुढाळ[5] पदक झळके वरी हो ! ॥
कटीं क्षुद्रघंटिका शब्द करिताती मधुर हो ! ।
गर्जती चरणीं वांक्या अभिनव संगित रत्नें करीं हो ! ॥ अति० ॥ ३ ॥
अष्टआंग मंडित वरून रूपी ठेवणी हो ! ।
चैतन्य वोतलें सगुण लावण्याची खाणी हो ! ॥
सर्वकालसंपन्न मंजुळ बोले हर्षवदन हो ! ।
बहु रूपें नटला आदिशक्ती नारायणी हो ! ॥ अति० ॥ ४ ॥
घटस्थापना केली पंढरपुर महानगरीं हो ! ।
आश्रम आणि मंडप दिधला तींहि तालावरी हो ! ॥
आरंभिला गोंधळ चंद्रभागेचिया[6] तीरीं हो ! ।
आली भक्त कान्हाई विठाबाई योगेश्वरी[7] हो ! ॥ अति० ॥ ५ ॥

---

१. हें एक वाद्य आहे. २. पृष्ठ ८ टीप १ पहा. ३. देवालय. ४. झळके. ५. सुंदर, तेजस्वी. ६. पृष्ठ ८ टीप ८ पहा. ७. पृष्ठ ४ टीप १ पहा.

सप्त कोटी चामुंडा अष्ट कोटी भैरव हो ! ।
आरतिया कुरवंड्या करिती पुष्पाचे वर्षाव हो ! ॥
नारद तुंबर ब्रह्मा गायनं करिती गणगंधर्व हो ! ।
रजचरण चुकविती तुकयाचा भवबंध हो ! ॥ अति० ॥ ६ ॥

### पद १८८ वें.

नाचत पंढरी जाऊं रे खेळया ! विठ्ठल रुक्मिणी पाहूं रे ! ॥ ध्रुवपद. ॥
बाराही सोळा गडियांचा मेळा सतरावा बसंत याचा खेळया रे ! ।
जाती शब्द द्वारा नाचती टिपरी घाई अनुहात मादळा रे ! ॥ नाचत० ॥ १ ॥
साचौंआगळा अठरा निराळा गाऊं वाजवूं चाळा रे ! ।
विसरल्या चारा पक्षिणी घेऊं पाणी तारुंदी भव बाळा रे ! ॥ नाचत० ॥ २ ॥
अनंत तेथीचा मुक्यासी वाचा देतो, बहिरे ऐकती कानीं रे ! ।
आंधळ्यासी डोळे पांगळ्यासी पाय तुका म्हणे वृद्ध होती तरुण रे ! ॥ नाचत० ॥ ३ ॥

### पद १८९ वें.

नाचत जावें त्याच्या गांवा रे ! खेळया सुख देई विसांवा रे ! ।
पुढें गेली ती निंडाळ जाली वांतील त्याची सीमा रे ! ॥ ध्रुवपद. ॥
भीमातीरीं वसविली एक नगरी तीचें नांव पंढरपुर रे ! ।
तेथील मोकासी चार भुजा त्यासी बायला सोळा हजार रे ! ॥ नाचत० ॥ १ ॥
बळीया आगळा पाळीन गोपाळा रीग नाहीं कळिकाळा रे ! ।
पुंडलीक पाटिल केली कुळवाडी झाला बहु दुःखा वेगळा रे ! ॥ नाचत० ॥ २ ॥
दोनी चाहाट भरला घनदाट अपार मिळाले वारकरी रे ! ।
न जाऊं म्हणती आम्ही वैकुंठा जी पंढरी देखिली रे ! ॥ नाचत० ॥ ३ ॥
संतसज्जन मांडलें दुकान जें पाहिजे तें आहे रे ! ।
भक्ती नी मुक्ती फुकाचे साठी कोणी न पाहे तिजकडे रे ! ॥ नाचत० ॥ ४ ॥
बहुत दिवस होती मज आस आज घडले सायास रे ! ।
तुका म्हणे होय तुमचें पुण्य भेटी तया पायांपासीं रे ! ॥ नाचत० ॥ ५ ॥

### पद १९० वें.

दाते हो ! दान करा जातों पंढरपुरा ।
न्या मज तेथवरी हैंकीमाचा सोयरा. ॥ ध्रुवपद. ॥

---

१. सपाट, समान, सरसपाट. २. पृष्ठ ९ टीप १ पहा. ३. मालकाचा.

पांगुळ झालों देवा ! नाहीं हात न पाय ।
बैसलों जयावरी सैयराट तो जाई ।
खेटतां कुपकाटे खुट दरडीना पाई ।
आधार नाहीं कोणी मज बाप ना माई ॥ दाते हो० ॥ १ ॥
हिंडतां गव्हानें गा ! शीणलों मीं येरझारीं ।
न मिळेची दाता कोणी जन्मदुःखातें निवारी ।
कीर्ति ये संतांमुखीं तोची दाखवा हरी ।
पांगुळ्यां पाय देतो नांदे पंढरपुरीं ॥ दाते हो० ॥ २ ॥
या पोटाकारणें गा ! झाले पांगिले जन ।
न सरेची मायबाप नाहीं भीके खंडणा ।
पुढां राहीं म्हणती ऐकें तया नाहीं करुणा ।
श्वान हें लागे पाठी आशा मज बहु दारुण ॥ दाते हो० ॥ ३ ॥
काय मी चुकलों बा ! मज नेणवेना कांहीं ।
न कळेची पापपुण्य तेथें आठवची नाहीं ॥
मीमाजी भुललों गा ! दीपपतंगा सोई ।
द्या मज जीवदान संत अनुभव काई ॥ दाते हो० ॥ ४ ॥
दुरुनी आलों मीं गा ! दुःख तें झालें दारुण ।
यावया येथवरी होतें हेंची कारण ।
दुर्लभ तुम्हां भेटी पायीं झालें दर्शन ।
विनवितो तुका संत दोनी कर जोडून ॥ दाते हो० ॥ ५ ॥

### पद १९१ वें.

खेळत होतों सुरकवडी । माझी घोंगडी हरपली ॥ ध्रुवपद. ॥
कानोबाच्या पडलों गळां । येई गोपाळा देई झाडा ॥ खेळत० ॥ १ ॥
मी तों हर्षें उघडा झालों । अवघा लोभ आहे रे ! ॥ खेळत० ॥ २ ॥
तुका म्हणे बुद्धी साचे । ठाईंचे ठाईं मजपासीं ॥ खेळत० ॥ ३ ॥

### पद १९२ वें.

सौरी झालें बाई ! नाहीं त्याचे पाई ॥ ध्रुवपद. ॥

---

१. वेडावांकडा. २. कुतरा. ३. निर्लज्ज, अविनय.

तुका म्हणे वेगीं हरी म्हणा जगीं ।
सांडुन देई सर्व कांहीं करा भक्तिलागीं ॥ चाल० ॥ ५ ॥

### पद १९७ वें.

या या गुरूसि शरण रिघावें । तनुमनधन सर्वेही अर्पावें ॥ ध्रुवपद. ॥
माया अविद्येनें भांबावीले । म्हणुनि शरण गुरूसि गेले ॥ याया० ॥ १ ॥
गुरुनें हस्तकीं मजला धरिलें । बोधपलंगावर बसवीलें ॥ याया० ॥ २ ॥
निजस्वरूप होतें चुकलें । गुरु ज्ञान दृष्टीं ओळखीलें ॥ याया० ॥ ३ ॥
जे जे सद्गुरूसी शरण गेले । तुका म्हणे स्वरूपीं लीन झाले ॥याया०॥४॥

### पद १९८ वें.

देह अभिमानानें बुडाला । तुझा तूंचि विसरला हिताला ॥ ध्रुवपद. ॥
तूंचि आहेसि सर्वांठायीं । स्थूळ सूक्ष्म कांहींच नाहीं ॥ देह० ॥ १ ॥
आतां तरि तूं सावध होई । चारी देह निरसूनि राही ॥ देह० ॥ २ ॥
काय करशील मुंडोनि डोई । गुरुचरणांसि लीन होई ॥ देह० ॥ ३ ॥
तुझा तूंचि शोधूनि पाही । तुका म्हणे निर्हेत राही ॥ देह० ॥ ४ ॥

### पद १९९ वें.

कानया सामलो मारी वात ॥ ध्रुवपद. ॥
नंदका छोरा[१] दधिदुध खावन । मेटकी लेकर हात ॥कानया०॥ १ ॥
गोधन चाटत गोधन धूवत । मुरली लेकर हात. ॥ कानया० ॥२ ॥
मोर मुकुट पीतांबर शोभे । हमके करत नाच ॥ कानया० ॥ ३ ॥
कहे तुकाराम नंदका छोरा । बांसरी[२] बजावे दिनरात ॥कानया०॥ ४ ॥

### पद २०० वें.

आज लहूं निरबान । गुरुजी ॥ ध्रुवपद ॥
तुमारे चरनपर दुरवा राखूं । सीस[३] करूं कुरबान ॥ गुरुजी०॥ १ ॥
पांचपचीस हत्ती सवारूं । उपर लाल निशान ॥ गुरुजी० ॥ २ ॥
एकवीस हजार सब घोडे । हाथ लिये नव बान ॥ गुरुजी० ॥ ३ ॥
चारो महालमें धुम मचाई । किया मुलुख मैदान[४] ॥ गुरुजी० ॥ ४ ॥
दास तुका कहे सल्ला हमारा । लगा उन्मनी ध्यान ॥ गुरुजी० ॥५॥

---

१. मुलगा. २. पांवा. ३. मस्तक बळि देऊं. ४. वैराण, उजाड.

## पद २०१ वें.

[1]छांडे धन मंदिर बन बसाया । मागत टुकडा घरघर खाया ॥ ध्रुवपद. ॥
[2]तिनेसों हम करते सलाम । [3]ज्या मुख बैठा राजा राम ॥ छांडे० ॥ १ ॥
तुलसीमाला [4]बभूत [5]चढावे । हरजीके गुण निर्मल गावे ॥ छांडे० ॥ २ ॥
कहे तुका जो [6]सांई हमारा । हिरण्यकश्यप [7]ऊन्हे मारहि डारा ॥छांडे० ॥३॥

## पद २०२ वें.

मंत्र तंत्र नहिं मानत [8]साखी । प्रेमभाव नहिं अंतर राखी ॥ ध्रुवपद. ॥
राम कहे [9]तांके पग [10]हूं लागूं । देखत कपट अभिमान दूर [11]भागूं ॥मंत्र०॥१॥
अधिक याती कुल हीन नहिं जानूं । जाने [12]नारायण सो प्रानी मानूं॥मंत्र०॥२॥
कहे तुका जीव तन [13]डारू बारी । राम [14]उपासी हूं [15]बलिहारी ॥ मंत्र०॥३॥

## पद २०३ वें.

हरिसों मिलनदे एकहि [16]बेर । [17]पीछें तूं [18]फिरे ना वे घर ॥ ध्रुवपद. ॥
मात सुनो [19]दुति आवे [20]मनावन । जाया करति [21]भरजोबन ॥ हरिसो० ॥१॥
हरिसुख मोहि कहिया न जाये । तब तूं बूझे आगो पाये ॥ हरिसो०॥२॥
देखहि भाव [22]कछु [23]पकरि हात । [24]मिलाइ तुका प्रभु साथ ॥ हरिसो० ॥ ३॥

## पद २०४ वें.

क्या कहुं नहिं बुझत लोका । लेजावे जम मारत धका ॥ ध्रुवपद. ॥
क्या जीनेकी पकडी आस । हातों लिया नहिं तेरा घांस ॥ क्या० ॥ १ ॥
किसे [25]दिवाने कहता [26]मेरा । जब जावे तन तूं सबसें [27]न्यारा ॥क्या० ॥ २ ॥
कहे तुका तूं [28]भया दिवाना । अपना बिचार करले जना ॥ क्या० ॥ ३ ॥

## पद २०५ वें.

कब मरूं पाऊं चरन तुम्हारे । ठाकुर मेरे जीवन प्यारे ॥ ध्रुवपद. ॥
जगरडे ज्याकुं सो मोहि मीठा । मीठा दर आनंदमहि पैठा ॥ कब० ॥१॥

---

१. सजिलें. २. त्यांला. ३. ज्यांच्या मुखांत रामनाम असतें त्यांला मी नमस्कार करतों. ४. भस्म. ५. लावी. ६. स्वामी, मालिक. ७. त्यानें. ८. प्रमाण, साक्ष. ९. त्याचे पायां. १०. मीं. ११. पळतों. १२. जो प्राणी नारायणाला जाणतो त्यालाच मानतों. १३. जाळून टाकीन. १४. उपासक. १५. जय हो. १६. वेळ. १७. परत. १८. पुनः. १९. दूती. २०. समजवण्यासाठीं. २१. भरज्वानी. २२. थोडी. २३. धरली. २४. भेटविली. २५. वेडा, पागल. २६. माझा. २७. वेगळा. २८. झालास.

भला पाऊं जनम इन्हे बेर । बस मायाके असंग फेर ॥ कब० ॥ २ ॥
कहे तुका धनमानहि दारा । वोहि लिये गुंडलिया पसारा ॥ कब० ॥३॥

पद २०६ वें.

दासों[1] पाछे दौरे राम । सोवे खडा आपें मुकाम ॥ ध्रुवपद. ॥
प्रेम सरडी बांधी गले । खैंच चले उधर[2] चेले ॥ दासों० ॥ १ ॥
आपने जनसुं भूल[3] न देवे । करहि धर आगें बाट बतावे ॥ दासों० ॥२॥
तुका प्रभु दीनदयाला । वारि रे ! तुज पर हुं गोपाला ! ॥ दासों० ॥३॥

पद २०७ वें.

ऐसा कर घर आवे राम । और धंदा सब छोडहि काम ॥ ध्रुवपद. ॥
इतने गोते काहे खाता । जब तूं आपना भूल न होता ॥ ऐसा० ॥ १ ॥
अंतरजामी[4] जानत साचा । मनका एक उपर बाचा ॥ ऐसा० ॥ २ ॥
तुका प्रभु देसबिदेस । भरियाखाली नहिं लेस ॥ ऐसा० ॥ ३ ॥

पद २०८ वें.

राम कहो जीवना फल सोही । हरिभजनसुं विलंब न पाई ॥ध्रुवपद.॥
कवनका[5] मंदर कवनकी झोपरी[6] । एक रामबिन सबहि फुंकरी[7] ॥ राम० ॥१॥
कवनकी काया कवनकी माया । एक रामबिन सबहि जाया[8] ॥राम०॥२॥
कहे तुका सबहि चलनार । एक रामबिन नहिं बा ! सार[9] ॥ राम० ॥३॥

पद २०९ वें.

काहे भुला धनसंपत्ती घोर । रामराम सुंन[10] गाउहो बाप रे ! ॥ध्रुवपद.॥
रोज लोक सब कहे तूं आपना । जब काल नहीं पाया ठाना ॥काहे०॥१॥
माया मिथ्या मनका सब धंदा । तजो अभिमान भजो गोविंदा ॥काहे०॥२॥
राजारंक डोंगरकी राई । कहे तुका करे ईलाही[11] ॥ काहे० ॥ ३ ॥

पद २१० वें.

काहे[12] रोवे आगले मरना । गंव्हार तूं भुला आपना ॥ ध्रुवपद. ॥
केतें[13] मालुम नहिं पडे । नन्हे[14] बडे गयेसो ॥ काहे० ॥ १ ॥

१. दासांच्या मागें. २. तेथें, तिकडे. ३. दगा. ४. अंतःकरणांतील. ५. कोणाचें. ६. झोंपडी. ७. व्यर्थ, फुकट. ८. जाणारें, नाशवंत. ९. उत्तम. १०. ऐक. ११. परमेश्वर. १२. कश्यास. १३. कोठें. १४. लहानथोर.

बापभाई लेखा नाहीं । पाछे तूंही चलणार ॥ काहे० ॥ २ ॥
काले [1]बाल सफेत भये । खबर पकडो तुका कहे ॥ काहे० ॥ ३ ॥

## पद २११ वें.

क्या मेरे राम कवन सुख सारा । कह कर दे पुछूं दास तुम्हारा. ॥ध्रुवपद.॥
तनू [2]जोबनकी कोन बराई । ब्याध पीडा दिस काटहि खाई ॥ क्या० ॥ १ ॥
कीर्त बधाऊं तों नाम न मेरा । काहे झुठा पछताऊं घेरा ॥ क्या० ॥ २ ॥
कहे तुका नहिं समझत मात । तुम्हारे शरण हे जोडहि हात ॥ क्या० ॥ ३ ॥

## पद २१२ वें.

देखत आखों झुटा कोरा । तो काहे छोडा घरबार ॥ ध्रुवपद. ॥
मनसुं किया चाहिये पाख । उपर [3]खाक पसारा ॥ देखत० ॥ १ ॥
कामक्रोधसो संसार । वो सिरभार चलावे ॥ देखत० ॥ २ ॥
कहे तुका वो संन्यास । छोडे आस [4]तनकीहि ॥ देखत० ॥ ३ ॥

## पद २१३ वें.

रामभजन सब सार मिठाई । हरि संताप जनम दुखदाई ॥ ध्रुवपद. ॥
दुधभात घृत [5]सकरपारे । हरते भूक नहि अंतरारे ॥ राम० ॥ १ ॥
खावते जुग सब चलि जावे । खटा मिठा फिर पछतावे ॥ राम० ॥ २ ॥
कहे तुका रामरस जो पीवे । बहुरि फेरा वो कबहु न [6]खावे ॥ राम० ॥ ३ ॥

## पद २१४ वें.

[7]बारबार कहे मरत अभागी । बहुरी मरन संका तोरे भागी ॥ ध्रुवपद. ॥
येहि तन करते क्या न होय । भजन भगति करे वैकुंठे जाय ॥ बार० ॥ १ ॥
रामनाम मोल नहिं बेचे कवरि । वोहि सब माया छुरावत [8]सगरी ॥ बार० ॥ २ ॥
कहे तुका मनसुं मिल राखो । रामरस जिव्हा नित्य चाखो ॥ बार० ॥ ३ ॥

## पद २१५ वें.

कान्हारे ! मनमोहना लाल । सबहि विसरु देखे गोपाल ॥ ध्रुवपद. ॥
मै भूली घरजानी वाट । गोरस बेचन [9]आई [10]हाट ॥ कान्हारे० ॥ १ ॥
कहां पग डारु देखे [11]अनेरा । देखे तो सब [12]वोहिने घेरा ॥ कान्हारे० ॥ २ ॥
हुं तो थकित भैर तुका । [13]भाँगारे सब मनका धोका ॥ कान्हारे० ॥ ३ ॥

---

१. केंस. २. यौवनाची. ३. धूळ पसरली. ४. शरीराची. ५. पक्वान्नविशेष, शंकरपाळे. ६. रामभजन केल्यानें पुनर्जन्माचा फेरा चुकतो—असा भाव. ७. पुनः पुनः. ८. सगळी. ९. आल्यें. १०. बाजाराला. ११. अनाडी. १२. त्यानेंच. १३. पळाला.

### पद २१६ वें.

क्या मेरे लाल कबन चुकी भई । क्या मोहियासी बेर लगाई ॥ ध्रुवपद. ॥
हरिबिन रहिया न जाये जिहिरा । कबकी थाडी देखे रहा ॥ क्या० ॥ १ ॥
काई सखी अजि ज्यावे बुलावन । बाराहि डाख उसपर तन ॥ क्या० ॥२॥
तुका प्रभु कब देखे पाऊ । पासी औ अफेरना जाऊ ॥ क्या० ॥ ३ ॥

---

## कान्होबाकृत पदें.

### पद २१७ वें.

.................................... ॥ ध्रुवपद. ॥

देखिला माय भिंवरातीरीं । कर मिरविले कीं कटावरी ।
पाउलें समचरण साजिरीं । नाम अनंत अति गोड ॥ १ ॥
शंखचक्रांकित भूषणें । जडित मेखळा चिद्रत्नें ।
पीतांबर उटी शोभे सांवळेपणें । लोपलीं तेणें रतितेजें ॥ २ ॥
श्रवणीं कुंडलें देती ढाळ । दशांगुळीं मुद्रिका माळ ।
दंतपंक्ति हिरे झळाळ । मुख निर्मळ सुखराशी ॥ ३ ॥
कटिं करदोडा वांकी वेळा । बाहीं बाहवटी, पदक गळां ।
मृगनाभिचा रेखीला टीळा । लवति डोळां विद्युल्लता ॥ ४ ॥
ऐशी सुंदरपणाची साम्यता । काय वर्णूं तें मी आतां ।
तुकयाबंधु म्हणे अच्युता ! प्रसवली माता पिता ते धन्य ॥ ५ ॥

### पद २१८ वें.

चुराचुराकर माखन खाया । गौलनका नंदकुमार कन्हैया ॥ ध्रुवपद. ॥
काहे बढाई दिखावत मोही । जानत हूं प्रभुपन तेरा सबही ॥ चुरा० ॥ १ ॥
और बात सुन उखल सो गला । बांधलिया अपना तूं गोपाला ! ॥ चुरा० ॥ २ ॥
फेरता बनबन गाय चरावत । कहे तुकयाबंधु लेकरी लेले हात ॥ चुरा० ॥ ३ ॥

---

१. उभी. २. हा तुकारामाचा धाकटा भाऊ होय. ३. भीमातटीं. ४. कांति, शोभा. ५. कस्तुरीचा. ६. श्रीकृष्णा. [अच्युत=विष्णु (कृष्ण). 'भक्तेभ्योऽच्युतपूर्वत्वात् अच्युतः परिकीर्तितः । आश्रितानां च्युतिर्यस्मान्नास्ति सोऽच्युत ईरितः ॥' विवृत्तिसहितं विष्णुनामसहस्रम्. पृ० ८.] ७. चोरून चोरून. ८. लोणी. ९. मला कां तूं आपला मोठेपणा दाखवितोस? १०. मी तुझा सगळा प्रभुपणा जाणतों. ११. काठी.

## रामदासकृत पदें.[1]

### पद २१९ वें.

कृपाळू रघुवीरें खादलीं भिल्टीबोरें[2] ।
उच्छिष्ट आदरें अंगिकारी रे! ॥ ध्रुवपद. ॥
वैभवीं नाहीं चाड । देवातें भावचि गोड ।
पुरवितो कोड । अनन्याचें रे! ॥ कृपाळू० ॥ १ ॥
दुर्लभ ब्रह्मादिकासी । सुलभ वानरासी ।
काय तयापाशीं । भावेंविण रे! ॥ कृपाळू० ॥ २ ॥
रामीं रामदास म्हणे । देव हा दयाळूपणें ।
उठवितो रणें । वानरांचीं रे! ॥ कृपाळू० ॥ ३ ॥

### पद २२० वें.

जन्मलाचि नाहीं तो मरेल काई? ।
जिणें मरणें दोन्हीं नाहीं रे! ॥ ध्रुवपद. ॥
जनीं जीवन्मुक्त । वर्ततात हरिभक्त ।
सद्गुरुबोधें ते अच्युत रे! ॥ जन्मला० ॥ १ ॥
जिणें आणि मरणें । येणें आणि जाणें ।
साधु तो अचळ पूर्णपणें रे! ॥ जन्मला० ॥ २ ॥
सेवितां साधूचे चरण । बाधीना दक्षिणायण ।
रामीं रामदासीं निजखुण रे! ॥ जन्मला० ॥ ३ ॥

### पद २२१ वें.

रघुवीर सुरवरदानी । भक्तांचा अभिमानी ।
योगी मुनिजन ध्यानीं । राहाती समाधानीं ॥ ध्रुवपद. ॥
भूषणमंडित माळा । तेजाचा उमाळा ।
सुंदर सुमनमाळा[3] । भोंवता मधुकरपाळा[4] ॥ रघुवीर० ॥ १ ॥
पीतवसन घन साजे । मुरडीव वाक वाजे ।
वर तोडरी ब्रीद गाजे । कीर्ति विशाळचि माजे. ॥ रघुवीर० ॥ २ ॥

१. या सुप्रसिद्ध भक्तवर्य कविविषयीं माहिती पुढील पुस्तकांत आहे ती इष्ट तर पहावी:—रामदासाची बखर, रामदासस्वामीचे समग्र ग्रंथ, अर्वाचीन (भारतवर्षीय) कोष, जुनें नवनीत, काव्येतिहाससंग्रहांतील रामदासाचें चरित्र, चौबळकृत रामदासाचें चरित्र. २. भिल्लिणीचीं (श्रमणा नामक शबरीची) बोरें. ३. पुष्पमाळा. ४. भ्रमरसमूह.

अभिनव कार्मुकपाणी । निगम गाति पुराणीं ।
विगलित होते वाणी । समजतसे शूलपाणी ॥ रघुवीर० ॥ ३ ॥
राम सकळ जन पाळी । भक्तांला सांभाळी ।
जन्ममरण दुःख टाळी । अगणित सौख्य नेव्हाळी ॥ रघुवीर० ॥ ४ ॥
दास म्हणे मज हित । माझें कुळदैवत ।
जे जन होती रत । ते सकळही तरत ॥ रघुवीर० ॥ ५ ॥

### पद २२२ वें.

समर्थाचा गाभा । भीम भयानक उभा ।
पाहतां सुंदर शोभा । लांचावे मन लोभा ॥ ध्रुवपद. ॥
हुंकारे भुभुकारे । काळ म्हणे अरे! बारे! ।
विघ्न तगेना थारे । धन्य हनुमंता रे! ॥ सम० ॥ १ ॥
दास म्हणे वीर गाढा । घर्षित घनसर दाढा ।
अभिनव हाचि पवाडा । पाहातां न दिसे जोडा ॥ सम० ॥ २ ॥

### पद २२३ वें.

रावण सीता दडवी । भीम निशाचर बडवी ।
अघटित तें घडवी । वर रजनीचर ते रडवी ॥ ध्रुवपद. ॥
जाउनि सीता शोधी । सकळांचा विरोधी ।
वानर मोठा क्रोधी । त्रिकुटीजन रोधी ॥ रावण० ॥ १ ॥
मोठी आली धाडी । पुच्छानें पछाडी ।
होती ताडातोडी । कंठीं झोडाझोडी ॥ रावण० ॥ २ ॥
दैत्यीं केले चाळे । सुरवर बंदीशाळे ।
त्या रागें उफाळे । वन्हीचे उबाळे ॥ रावण० ॥ ३ ॥
वनीं वनें कडकावी । बळकट शिक्षा लावी, ।
भुजाबळें भडकावी । लंकेतें धडकावी. ॥ रावण० ॥ ४ ॥
सीता शोधून गेला । हलकल्लोळ केला ।
भेटे राघवाला । दास्यत्वें निवाला. ॥ रावण० ॥ ५ ॥

### पद २२४ वें.

वेध लागला रामाचा । सुरवर विश्रामाचा ॥ ध्रुवपद. ॥

---

१. चापहस्त. २. नवलाई, कौतुक, नवल. ३. मारुति. ४. राक्षस.

तेथें सुरवर नर किन्नर विद्याधर । गंधर्वांचा मेळा ।
तेथें न्यूनें कोकिळा मंजुळकिळा । झुळकी रम्य रसाळा ।
तेथें गायनकळा रंग आगळा । बाहे अमृतवेळा ।
तो सुखसोहळा देखुन डोळा । लाचावें मनमेळा ॥ वेध० ॥ १ ॥
येकताल मृदांगें श्रुतिउपांगें । गाती नवरस रंगें ।
एकरंग सुरंगे दाविती संगें । सप्तस्वरेंचि आंगें ।
एक अनेक रागें आलापयोगें । त्रिकट ताल सुधांगे ।
एक झक्टि किटकिट थरिक थरिक । वाजति चपळांगे ॥ वेध० ॥ २ ॥
तेथें खणखणखणखण टाळ वाजती । झणझणझणझण यंत्रें ।
तेथें दणदणदणदण मृदंग मंजुळ । तालबद्ध परतंत्रे ।
तेथें चणचणचणचण शब्द बोलती । वाणी चपळ सत्पात्रें ।
तेथें घणघणघणघण घंटा वाजती । आनुदाते शूळमंत्रे ॥ वेध० ॥ ३ ॥
तेथें झगझगझगझग झळकति रत्नें । खचित बैसे शोभा, ।
तेथें धगधगधगधग तेज आगळें । लावण्याचा गाभा, ।
तेथें मगमगमगमग सुगंध परिमळ । सत्य दयेति लोभा ।
**प**वनतनुज **दा**साचें मंडण । निकट राहिला उभा ॥ वेध० ॥ ४ ॥

### पद २२५ वें.

**रा**मा ! चाल रे ! झडकरी । त्रिभुवन हरुषे भारी ॥ ध्रुवपद. ॥
**श**रयूनदीतिरीं **अ**योध्यापुरी । रमणीय रचिली भारी ।
तीसीं प्रतिमल्ल सरी ऐसीच दुसरी । नाहीं पृथ्वीवरी ।
ते **वै**कुंठमंदिरीं गमन सुंदरी । त्यामधें थोरी ।
ऐसें जाणोनि श्री**कौ**सल्योदरीं । आनंद सचराचरीं ॥ **रा**मा० ॥ १ ॥
तेथें ऋषिकुळ सकळ नांदति निर्मळ । उत्साहाचेनि उसळे ।
तेथें धोत्रें सोज्वळें झेलिती करतळें । विभूतिचे गोळे ।
ते ध्यानीं नाकळे, मना नाढळे । तें रूप पाहती डोळे ।
आणि क्रूर विशाळें वधिलीं ढिसाळें । पावोनि यत्नें फळे ॥ **रा**मा० ॥२॥.
तेथें [१]ब्रह्मनंदिनी श्रापबंधिनी । असतां निज[२]पतिवचनीं ।
ते **रा**मागमनी ऐकत क्षणी । हरुषत अंतःकरणीं ।

---

१. अहल्या. २. गोतममुनि.

म्हणे त्या **श्री**चरणीं होतां मिळणी । पालटेन पाषाणी ।
ऐसें चिंतुनि दिवसरजनी । पथा पाहतां लोचनीं ॥ **रामा**० ॥ ३ ॥
तेथें सुरवर नाचति वाद्यें वाजती । पुष्पें जि मुनी वरुषति ।
तेथें गंध वातगती नेत दिगांतीं । घ्राणा होतसे तृप्ती ।
तेथें दिशा झळकती सफळ वनस्पती । पद शुभ बोलती ।
आला म्हणती **राम सी**तापती । जयजयकारें गर्जती ॥ **रामा**० ॥ ४ ॥
तेथें **द**शरथमानसीं **राम**श्रवणशशी । तुंबळ सुखसिंधूसी ।
तेथें **ज**नकसरितेसि मिळणी कैसी । होताहे गजरेसी ।
तेथें भक्तचकोरासी आनंद अहर्निशीं । पाहताती उदयासी ।
ऐसें देखुनि भक्तीनवमीसी । प्रगटत **राम**दासीं ॥ **रामा**० ॥ ५ ॥

**पद २२६ वें.**

**रा**में सजिलें वितंड । परम चंड ।
**रा**में उचलिलें **त्र्यं**बक । **कौ**शिकऋषि पुलकांक[1] ।
**रा**में ओढिलें **शि**वधनु । **सी**तेचें तनुमनु ।
**रा**में भंगिलें **भ**वचाप । असुरां सुटला कंप ॥ ध्रुवपद. ॥
फरफरफरफर वोढिति कुंजर[3] । धनुष्य आणिलें भूपें ।
हरहरहरहर अति पण दुष्कर । सुंदर **र**घुपतिरूपें ।
वरवरवरवर **र**घुपति वोढीत । **द**शमुख संतापे ।
करकरकरकर कर शकारारे । थरथरथर भू कंपे ॥ **रामें**० ॥ १ ॥
कडकडकडकड भग्न कडाडे । तडतडतडक फुटे ।
गडगडगडगड गगन कडाडी । धडधडधड धडक उठे ।
भडभडभडभड रविरथ चुके । घडघडीत अव्हाटे ।
खडखडखडखड खचित दिग्गज । चळित कुळाचळ[4] कुटे ॥ **रामें**० ॥ २ ॥
दुमदुमदुमदुम दुमित भुगोले । स्वर्गमृत्यु पाताळे ।
घुमघुमघुमघुम घुमकट कर्णीं । **वि**धीस बैसले टाळे ।
हळहळहळहळ अति कोल्हाळ हळ । हरसी पंचक डोले ।
खळखळखळखळ उचंबळत । जळसिंधुसी मोहो आंदोळे ॥ **रामें**० ॥ ३ ॥

---

१. श्रीरामपदीं. २. रोमांचित. ३. हत्ती. ४. कुलपर्वत.

धकधकधकधक धकीत धरणी । धराबधिर झाले नयन ।
चकचकचकचक चकीत निशाचर । करविले दीर्घशयन ।
थकथकथकथक थकीत सुरवर । वरुषती पुष्पें तसे ।
लखलखलखलख रत्नमालिका । जनमकालिक लग्न ॥ **रामें०** ॥ ४ ॥
जयजयजयजय जयति **र**घुराज वीरा । गर्जती जयकारें ।
धिमधिमधिमधिम नृपदेव दुंदुभि । गगन गर्जलें गजरें ।
तरतरतरतर मंगळतुरें । विविध वाद्यें सुंदरें ।
समरसरसरस **दा**सा मानसीं । **रामसी**ता वधूवरें ॥ **रामें०** ॥ ५ ॥

## पद २२७ वें.

रंगीं नाचतो **त्रि**पुरारी लीलानाटकधारी ।
मंदरजावर त्रिपुरसुंदर [1]अर्धनारीनटेश्वर ।
नाचे **शं**कर सकळ कळाकर । विश्वासी आधार ॥ ध्रुवपद. ॥
झुळझुळझुळझुळ शिरिं **गं**गाजळ । झळझळ मुगुटीं किळ ।
कळलळलळलळ लळित कुंडलें । भाळीं इंदुज्वाळ ।
सळसळसळसळ सळकती रसना । वळवळवळिती व्याळ ।
हळहळहळहळ कंठीं हेळाहळ । गायनस्वर मंजुळ ॥ रंगीं० ॥ १ ॥
थबथबथबथब गळती सद्या । रुंडमाळिका कंठीं ।
चपचपचपचप हस्तक लवती । दस्तक धरी [3]धूर्जटी ।
खडखडखडखड व्याघ्रांबर । गजचर्म परवंटी ।
भडभडभडभड धूसर उधळत । चिताभस्म निजउटी ॥ रंगीं० ॥ २ ॥
किणिकिणिकिणिकिणि वाजति किंकिणि । घणघणघण खणाणी ।
झणझणझणझण वांकी चरणीं । दणदणदण धरणी ।

---

१. शिवाची प्रतिमा अर्धस्त्री आणि अर्धपुरुष अशी असून तिची पूजा कित्येक ठिकाणीं करतात. या आकृतीवरून त्याला अर्धनारीश, अर्धनारीश्वर, अर्धनारीनटेश्वर, असें नांव आहे. या मूर्तींतील दक्षिणार्धीं शिव आणि वामार्धीं पार्वती अशी योजना असते. याचा विग्रह:— 'अर्धं नार्या अर्धनारी सा ईश्वरा यस्य सोऽर्धनारीश्वर:' [अनर्घराघव-रुचिपत्युपाध्यायकृत टीका—पृष्ठ २७२. काव्यमाला.] सोलापुर जिल्ह्यांत शिवाची अशी अर्धनारीनटेश्वर मूर्ति ज्यांत आहे असें एक मंदिर आहे. अशा रूपाविषयींचा उल्लेख संस्कृत ग्रंथांत अनेक स्थळीं आढळतो. कुमारसंभव—सर्ग १ श्लोक ५०; अनर्घराघव—अंक ७ श्लोक ३६; कीर्तिकौमुदी—सर्ग १ श्लोक ३; मालविकाग्निमित्र—अंक १ श्लोक १; स्तुतिकुसुमांजलि—स्तोत्र २१ वें पद्य. २. महाविष. ३. शिव.

खणखणखणखण टाळ उमाळे । रुणझुण वेत्रें पाणी ।
गुणगुणगुणगुण वर्णिति वाणी । खुणखुणखुण निर्वाणीं ॥ रंगीं० ॥३॥
टिमिटिमिटिमिटिमि मृदंग गंभीर । डिमिडिमिडिमि डिंडिमर ।
धिमिधिमिधिमिधिमि दुंदुभि गर्जे । झिमिझिमिझिमि झल्लर ।
घुमघुमघुमघुम येवज गमकत । दुमदुमदुम अंबर ।
ततथै ततथै धिकिटधिकिट । म्हणती विद्याधर ॥ रंगीं० ॥ ४ ॥
थरथरथरथर कंपित गमके । गरगरगर भ्रमर ।
सरसरसरसर कंपित चमके । घुरघुरघुर गंभीर ।
परपरपरपर म्हणती सुरवर । हरहरहर शंकर ।
वरवरवरवर दासा दिधला । तरतरतर दस्तुर ॥ रंगीं० ॥ ५ ॥

## पद २२८ वें.

आठवे मनीं आठवे मनीं । आठवे मनीं सदा राम चिंतनीं ॥ ध्रुवपद.॥
मुगुटी किरिटी वक्रभृकुटि । रम्य गोमटीं नयनांबुजें ॥ आठवे० ॥ १ ॥
मकरकुंडलें ठाणदंडले । तेज खंडले मेघदामिनी ॥ आठवे० ॥ २ ॥
बाणली उटी कास गोमटी । किंकिणी कटी क्षुद्र घंटिका ॥ आठवे० ॥३॥
पदक मेखळा फांकती किळा । रुळती गळां मुक्तमाळिका ॥ आठवे० ॥४॥
ते सुलक्षणें रत्नभूषणें । वीरकंकणें शोभती करीं ॥ आठवे० ॥ ५ ॥
रम्य रंगलें चाप चांगलें । सैन्य भंगलें त्रिकुटाचळीं ॥ आठवे० ॥ ६ ॥
आंदु नेपुरें वांकी गजरे । तीं मनोहरें पाउलें बरीं ॥ आठवे० ॥ ७ ॥
हृदय कवळी मूर्ती सांवळी । दास न्याहळी कुळदैवत. ॥ आठवे० ॥८॥

## पद २२९ वें.

नवमी करा नवमी करा । नवमी करा भक्ति नवमी करा ॥ ध्रुवपद. ॥
अष्टमीपरी नवमी बरी । तये दुसरी नै पवे सैरी ॥ नवमी० ॥ १ ॥
राम प्रगटे, भेद हा तुटे । अभेद ऊमटे तेचि नवमी ॥ नवमी० ॥ २ ॥
शीघ्र नवमी येतसे ऊर्मी । रामदास मी अर्पिली रामीं ॥ नवमी० ॥ ३ ॥

## पद २३० वें.

दीनबंधु रे! दीनबंधु रे! दीनबंधु रे!। राम दयासिंधु रे!॥ ध्रुवपद. ॥
भिलैटीफळें भक्तवत्सलें । सर्व सेविलीं दास प्रेमळें ॥ दीनबंधु० ॥ १ ॥

---

१. सांखळया. २. पैंजण, तोरड्या. ३. न पावे. ४. बरोबरी. ५. श्रमणा शबरीनें दिलेलीं बोरें

चरणीं उद्धरी दिव्य [1]सुंदरी । शापबंधनें मुक्त जो करी ॥ दीनबंधु० ॥२॥
वेदगर्भ जो शिव चिंतितो । वानरारिसा गूज सांगतो ॥ दीनबंधु० ॥ ३ ॥
राघवीबिजे रावणानुजे । करुनि पावला निजराज्य जे ॥ दीनबंधु० ॥४॥
[2]पंकजाननें दैत्यभंजनें । दास पाळिला विश्वमोहनें ॥ दीनबंधु० ॥ ५ ॥

## पद २३१ वें.

ऐसें ध्यान समान न दिसे राम निरुपमलीळा ।
सांवळें सुंदर रूप मनोहर शोभती [3]सुमनमाळा ॥ ध्रुवपद. ॥
मुगुटकिरीटीं कुंडलें मंडित गंडस्थळावरि शोभा ।
केयूर दंड उदंड विभूषण लावण्याचा गाभा. ॥ ऐसें० ॥ १ ॥
सरळ कुरळ नयन कमळदळश्याम सकोमळ साजे, ।
झळके इंद्रनील [4]तेंळपे रत्नकीळ मुनिजन ध्यानीं विराजे ॥ ऐसें० ॥२॥
भाळ विशाळ रसाळ विलेपन परिमळ अनिळविलासी ।
[5]मृगमद केशर धूसर आंगीं हसितवदन सुखराशी ॥ ऐसें० ॥ ३ ॥
कटितट वेकट कासे पीतपट मिरवत उटी सुगंधे ।
रुळत कलोळ [6]सुढाळ माळिका डोलती तेणें छंदे ॥ ऐसें० ॥ ४ ॥
जडितपदक वीरकंकण किंकिणी आंदु नेपुर वाजे ।
सकळ रिपुकुळ निर्मळ ऐसे वांकी तोडर ब्रीद गाजे ॥ ऐसें० ॥ ५ ॥
करिं शरचापविलास दानवां काळरूप मनिं भासे ।
दास म्हणे रणकर्कश रामें अंतक तोही भासे ॥ ऐसें० ॥ ६ ॥

## पद २३२ वें.

मिरासीचा ठाव मिरासीचा ठाव मिरासीचा ठाव धरा रे ! ।
जेथुनि आले तिथेंचि जाउनि मागुती वास करा रे ! ॥ ध्रुवपद. ॥
अज्ञानदारिद्र्य निरसलें ज्ञानलक्ष्मी ते कोण पुसे ।
आपणचि सर्वही अहंकारगोत्र जघातघेपा तेथ नेतसे ।
एकपद तेथें विपट नाहीं सर्वही सिद्धी विलसे ।
ऐसी हे मिरासी टाकियेली थोर मस्तकीं अभिमानपिसें ॥ मिरासीचा० ॥ १ ॥
संतसनकादिक नारद तुंबर वृत्ती तेही लक्षिली ।
नागवे उघडे आपदा भोगुनि जीवेसी सदृढ धरिली ।

---

१. अहल्या. २. कमलमुखें. ३. पुष्पमाळा. ४. शोभे. ५. कस्तूरी. ६. सुंदर. ७. सांवळ्या.

वडिलांची जन्ममृत्युभूमी तेही सर्वकाळ यत्न केली ।
धिगीधिगी तें जिणें पूर्वजांची वृत्ती असोनि हातींची गेली ॥मिरासीचा०॥२॥
एकला एकला मी रामदास वृत्तीलागीं होय पिसा, ।
तन मन धन सर्वही अर्पुनि सोडिली जीवित्वआशा ।
निःकामता कोणी पाठीसी नाडले येकचि थोर कोंवसा ।
हे वृत्ती रक्षील माझा राम त्याचा मज भरंवसा ॥ मिरासीचा०॥ ३ ॥

### पद २३३ वें.

आलिया अंगेंचि होइजे देव । कोंदाटला ब्रह्मकटाव ॥ ध्रुवपद. ॥
भवसिंधूचें जळ आटलें । संसाराचें मूळ तुटलें ॥ आलिया० ॥ १ ॥
निजधनाची लाधली ठेवी । रंक पावले राजपदवी ॥ आलिया० ॥ २ ॥
अरे! काळाची वेळ चुकली । आनंदाची लुटी फावली ॥ आलिया०॥३ ॥
जे मायेनें जन्म दाविला । ते मायेचा ठाव पुसिला ॥ आलिया० ॥ ४ ॥
रामदासासि राम भेटला । थोर संदेह हा तूटला ॥ आलिया० ॥ ५ ॥

### पद २३४ वें.

वेडिया स्वामीच होउनि राहें । हे उपाधी तुज न साहे ॥ ध्रुवपद. ॥
अरे! तुझाचि तूं सकळ । तरी वांयाचि कां तळमळ ॥ वेडिया० ॥ १ ॥
स्वामी सेवकपण हें वाव । अभिमानासी कैंचा ठाव ॥ वेडिया० ॥ २ ॥
अमंगळे जाणसी साचे । काय भूषण सांगसी त्याचें ॥ वेडिया० ॥ ३ ॥
मीपणाचें मूळ तुटावें । आनंदाचें सुख लुटावें ॥ वेडिया० ॥ ४ ॥
रामदासचि नांव हें फोल । तेथें कायसे लागती बोल ॥ वेडिया०॥ ५ ॥

### पद २३५ वें.

देवाची करणी । ऐसी ही ॥ ध्रुवपद. ॥
पहा दशगुणें आवरणोदकीं । तारियेली धरणी ॥ ऐसी० ॥ १ ॥
सुरवर पन्नग निर्मुनियां जग । नांदवी लोक तिन्ही ॥ ऐसी० ॥ २ ॥
अंडज जारज स्वेदज उद्भिज । निवडिलिया खाणी ॥ ऐसी० ॥ ३ ॥

---

१. साप. २. चार प्रकारचे प्राणी:—उद्भिज, अंडज, स्वेदज व जरायुज. उद्भिज म्हणजे भूमि भेदून अंकुरादिरूपानें वर येणारे वृक्ष, तृण इत्यादि; अंडज म्हणजे अंड्यापासून झालेले पक्षी, सर्प इत्यादि; स्वेदज म्हणजे घामानें आणि उबेनें उत्पन्न झालेले मत्कुणादि, आणि जरायुज म्हणजे मनुष्यपश्वादिक प्राणी. 'जरायु' नांवाचे चर्मानें मनुष्य पश्वादिकांचे गर्भ वेष्टित असतात, म्हणून

रात्री सुधाकर तारा उगवती । दिवसा तो तरणी ॥ ऐसी० ॥ ४ ॥
सत्तासूत्रें वर्षत जळधर । पीक पिके धरणी ॥ ऐसी० ॥ ५ ॥
आपण तरी त्रिये निज निर्गुण । दासा हृदयभुवनीं ॥ ऐसी० ॥ ६ ॥

### पद २३६ वें.

गुरुदातारें दातारें । अभिनव कैसें केलें ॥ ध्रुवपद. ॥
एकचि वचनें न बोलत बोलुनि । मानस विलया नेलें. ॥ गुरु० ॥१॥
भूतसंगें कृतनैश्वर ओझें । निजबोधें उतरिलें ॥ गुरु० ॥२ ॥
दास म्हणे मज मीपणविरहित । निजपदीं नांदविलें ॥ गुरु० ॥ ३ ॥

### पद २३७ वें.

भावबळें तरले । मानव ॥ ध्रुवपद. ॥
सारासारविचार विलोकुनि । भव हा निस्तरले ॥ मानव० ॥ १ ॥
रामनाम निरंतर वाचे । निजपदीं स्थिरले ॥ मानव० ॥ २ ॥
दास म्हणे सुख सागरे डोहीं । ऐक्यपणें विरालें ॥ मानव० ॥ ३ ॥

---

त्यांस 'जरायुज' म्हणतात. जरायु म्हणजे व्यावहारिक महाराष्ट्र भाषेंत 'वार' म्हणतात, तेव्हां ज्या प्राण्यांस उपजतेवेळीं वारेचें वेष्टण असतें ते प्राणी जरायुज. स्वेदज, अंडज आणि उद्भिज्ज यांजविषयीं विशेष माहिती मनुस्मृतींत आहे:—'पशवश्च मृगाश्चैव व्यालाश्चोभयतोदत: । रक्षांसि च पिशाचाश्च मनुष्याश्च जरायुजा: ॥ ४३ ॥ अंडजा: पक्षिण: सर्पा नक्रा मत्स्याश्च कच्छपा: । यानि चैवंप्रकाराणि स्थलजान्यौदकानि च ॥ ४४ ॥ स्वेदजं दंशमशकं यूकामक्षिकमत्कुणम् । ऊष्मणश्चोपजायंते यच्चान्यत्किंचिदीरितम् ॥ ४५॥ उद्भिज्जा: स्थावरा: सर्वे बीजकांडप्ररोहिण: । ओषध्य: फलपाकांता बहुपुष्पफलोपगा: ॥ ४६ ॥ [म०स्मृ० अ० १ ला.] भावार्थ:—पशु, मृग, दोन दंतपंक्तींनें युक्त असे व्यालादिक (सिंहादिक), राक्षस, पिशाच, आणि मनुष्य हे जरायु, म्हणजे गर्भाचें जें आवरणचर्म त्यांत प्रथम होऊन नंतर त्यांतून उत्पन्न होतात, अतएव ते जरायुज होत. पक्षी, सर्प, मगर, मत्स्य आणि कांसव हे प्रथम अंडाचे ठायीं उत्पन्न होतात म्हणून हे अंडज होत, स्थलाचे ठायीं होणारे सरठादिक व उदकाचे ठायीं होणारे शंखादिक ते क्रमानें स्थलज व औदक जाणावे. डांस, माशा, यूका, मक्षिका, ढेंकूण हे घर्मापासून उत्पन्न होतात, अतएव ते स्वेदज होत आणि असे जे दुसरे प्राणी उष्मापासून होतात ते उष्मज होत. बीज व भूमी यांचा भेद करून जे उत्पन्न होतात (वृक्ष) ते उद्भिज्ज होत. ते दोन प्रकारचे आहेत; कितीएक बीजापासून होणारे व कितीएक त्या त्या शाखा भूमींत लावल्यानें होणारे. जे कितीएक [व्रीहि, यव इत्यादि] वृक्ष पुष्कळ फलपुष्पांनीं युक्त होऊन फलें पक्व झाल्यानेंच आपण नष्ट होतात ते औषधि होत. [म० स्मृ० प्रा० भा०].

१. चंद्र. २. सूर्य.

## पद २३८ वें.

देह दंडिसी मुंड मुंडिसी । भंड दाविसी नग्न उघडा ॥ ध्रुवपद. ॥
भस्मलेपनें तृणआसनें । माळभूषण सोंग हें मूढा ॥ देह० ॥ १ ॥
अन्नत्याग रे! हृदययोग रे! । फट काय रे! हिंडसी वनीं ॥ देह० ॥२॥
ऐक सांगतों रामदास तो । ज्ञानयोग रे! साधितां बरें ॥ देह० ॥ ३ ॥

## पद २३९ वें.

हें काय तें काय । योग काय भोग काय ॥ ध्रुवपद. ॥
बाहेर जटाभार काय । अंतरीं संसार काय ॥ हें काय० ॥ १ ॥
बाहेर काषाय दंड काय । आंत अवघें भंड काय ॥ हें काय० ॥ २ ॥
बाहेर सात्विक ध्यान काय । आंत मद्यपान काय ॥ हें काय०॥ ३ ॥
रामदास म्हणे पाहे । व्यर्थ भगल करून काय ॥ हें काय० ॥ ४ ॥

## पद २४० वें.

मिश्रित सारासार । अरे! निवडी तोचि चतुर ॥ ध्रुवपद. ॥
ब्रह्म निरंजन अद्वय सत्य । मायाजनपर द्वैत अनित्य ॥ मिश्रित० ॥ १ ॥
मेळविलें जळ अमृत दोनी । हंस जसा पय घे निवडोनी ॥ मिश्रित० ॥२
पारखीविण खरें निवडेना । मूढ कसें जनहित कळेना ॥ मिश्रित० ॥ ३॥
दास म्हणे निजकौतुक मोठें । अनुभव बोलती शाब्दिक खोटें ॥ मि०॥४

## पद २४१ वें.

पळा पळा ब्रह्मपिसा येतो जवळी, ।
रामनामें हांक देउनी डोई कांडोळी, ।
वृत्ति शेंडी बंधनेंविण सदा मोकळी, ।
संसाराची धुळी करुनि आंगीं उधळी. ॥ ध्रुवपद. ॥
प्रपंचउकरड्यावरी बैसणें ज्याचें ।
भोंता पाळा फिरोनि पाहे जन हे अविद्येचे, ।
धांवुनि बैसे उठोनि पळे दृश्य वाटेचें ।
अदृश्याचें रान घेतां नचले कवणाचें. ॥ पळा० ॥ १ ॥
आउट हात गज नवां ठायीं उतळले ।
दाहावा ठाव म्हणउन तेथें ठिगळ दिधलें ।

ऐसें मन हें चंचल निवृत्तीसी गुंतलें ।
परतुनियां आलें म्हणउनि जीवेंचि मारिलें. ॥ पळा० ॥ २ ॥
मीपणाचें शहाणपण जळालें माझें ।
कोण वाहे देहबुद्धी वस्त्रांचें ओझें ।
नलगे आम्हां मान अपमानाचें ओझें ।
तुझी शुद्धी घेतां गेलें मीपण माझें. ॥ पळा० ॥ ३ ॥
आम्ही जन धन देखुनि विचार करितों ।
आपण ऐसे पिसे म्हणउनि उमज धरितों, ।
अर्थे भेटों येती त्यांस वेड लावितों ।
**रामीं राम**दास ऐसें अबद्ध बोलतों ॥ पळा० ॥ ४ ॥

### पद २४२ वें.

कल्याणधामा! । **रामा**! कल्याणधामा! ॥ ध्रुवपद. ॥
दुःख निवारण नामक सुखा ये । सुखमूर्ती गुणग्रामा[1]! ॥ **रामा**० ॥१॥
**दास** उदास करी तव कृपा । अभिनव नामगरिमा[2] ॥ **रामा**० ॥ २ ॥

### पद २४३ वें.

तूं ये रे! **रामा**! । काय वर्णूं महिमा ॥ ध्रुवपद. ॥
सोडविले देव तेहतिस कोटी । तेंवी सोडवी आम्हां ॥ तूं० ॥ १ ॥
**राम लक्ष्मण भरत शत्रुघ्न** । पुढें उभा **हनुमान्** ॥ तूं० ॥ २ ॥
**दास** म्हणे भवबंध निवारी । **रामा**! गुणधामा! ॥ तूं० ॥ ३ ॥

### पद २४४ वें.

हे **रा**घवा! देईं तुझें भजन ॥ ध्रुवपद. ॥
अनुताप त्यावरी भक्तियोग । मानिती हे सज्जन ॥ हे० ॥ १ ॥
कीर्तन करावें नाम उद्धरावें । अंतरीं लागो ध्यान ॥ हे० ॥ २ ॥
**दा**स म्हणे मन आत्मनिवेदन । सगुण समाधान ॥ हे० ॥ ३ ॥

### पद २४५ वें.

नाम मंगळधाम **ह**रीचें हो! । संतसज्जनां विश्राम ॥ ध्रुवपद. ॥
सकळ सकळ धर्म अचळ । अर्थकाम स्मरणें स्वानंदाभिराम ॥ नाम० ॥१॥
गरळचाळशम **शिव**मनोरम । **दास** उदास पूर्णकाम ॥ नाम० ॥ २ ॥

---

१. गुणसमुदाया! २. नाममाहात्म्य.

### पद २४६ वें.

*संगत साधूची मज जाहली । अक्षय पदवी आली ॥ ध्रुवपद. ॥
सर्व मी सर्वात्मा ऐसी अंतरीं दृढमती झाली, ।
जागृतीसहित अवस्था तूर्या स्वरूपीं समूळ विराली ॥ संगत० ॥ १ ॥
बहुजन्माची जपतपसंपत्ती विमळ फळेंसि आली ।
मी माझें हे सरली ममता समुळीं भ्रांति निमाली ॥ संगत० ॥ २ ॥
**रा**मीं अभिन्न **दा**स ऐसी हे जाणिव समूळहि गेली ।
न चळे, न ढळे, अचळ कृपा हे श्री**गु**रुरायें केली ॥ संगत० ॥ ३ ॥

### पद २४७ वें.

अणुपासुनि जगदाकार । ठणठकार **र**घुवीर ॥ ध्रुवपद. ॥
**रा**माकार जाहली वृत्ती । दृश्यादृश्य न ये हातीं ॥ अणु० ॥ १ ॥
**रा**मीं हारपलें जग । **दा**स म्हणे कैंचें मग ॥ अणु० ॥ २ ॥

### पद २४८ वें.

[1]दशशतकरवंशीं अवतरणा । **द**शमुखकुळसंहरणा ।
**द**शशतवदनाग्रजरूप मदना । **द**शरथनृपनंदन गुणसदना ॥ ध्रुवपद. ।
**कौ**सल्यात्मज निजसुखकरणा । **कौ**शिकमखपाळन **शि**वस्मरणा ।
[2]राजीवलोचन **जा**नकीरमणा । भवचिंताहरणा ॥ दशशत० ॥ १ ॥
निजचरणीं **अ**हल्याउद्धरणा । **भा**र्गववीरक्षितिपाळाहरमर्दना ।
**वा**लिकार्मुकधरणा । **अं**जनिसुतसेवित तव चरणा ॥ दशशत० ॥ २ ॥
दशदिशाव्यापकगुणसगुणा । आत्माराम समस्ताभरणा ।
जीवकदंबकपोतसंस्मरणा । **रा**मदास वंदित तव चरणा ॥ दशशत० ॥ ३ ॥

### पद २४९ वें.

**रा**मा विसरावें मग कासया जावें? ।
स्वहित दुरी तेव्हां दुःख पाळवीं घ्यावें ।
रौरव [3]कुंभपाक अहोरात्र भोगावे ।
तेधवां कोण सोडी वर्म न पडे ठावें ॥ ध्रुवपद. ॥
भजनीं कानकोंडें **राम** न म्हणे तोंडें ।
आदळे दुःख आंगीं भोग भोगितां रडे ।

---

१. सूर्यवंशीं. (दशशतकर=सहस्रांशु, सूर्य.) २. कमलाक्ष. ३. नरकविशेष.

कर्तृत्व आपुलेंचि कैसें नाठवे एव्हडें ।
देवासी बोल ठेवी कैंवी स्वसुख जोडे? ॥ रामा० ॥ १ ॥
विषयीं चित्त गोवी, हृदयस्थ नाठवी ।
कामक्रोधलोभसंगें त्रास नुपजे जीवीं ।
ममता दुःख परी आपणातें वाहवी ।
विनवी रामदास भवसागर तरवी ॥ रामा० ॥ २ ॥

### पद २५० वें.

साजिरें हो ! । रामरूप साजिरें हो ! ॥ ध्रुवपद. ॥
रूप प्रगटलें लावण्य लाजिलें । मानसीं बैसलें ॥ राम० ॥ १ ॥
सर्वांगें सुंदर ठाण मनोहर । दासाचा आधार ॥ राम० ॥ २ ॥

### पद २५१ वें.

देखिला हो ! राघव देखिला ॥ ध्रुवपद. ॥
रूप रामाचें लावण्य साचें । ध्यान विश्रामाचें ॥ राघव० ॥ १ ॥
चंचळ मानस पाहे वास । रामीं रामदास ॥ राघव० ॥ २ ॥

### पद २५२ वें.

शरण मी राघवा हो ! ॥ ध्रुवपद. ॥
अंतरध्याना ! गुणनिधाना ! । मज पहा हो ! ॥ शरण० ॥ १ ॥
भजन कांहीं घडत नाहीं । हें साहा हो ! ॥ शरण० ॥ २ ॥
रामदास धरून कास । येक भावो ॥ शरण० ॥ ३ ॥

### पद २५३ वें.

रे! मानवा! उगीच आमुचीं जिणीं । आम्हा ध्यानीं भेटिची शि[1]राणी ॥ध्रुवपद.॥
रापरीस वानर भले । जिहीं डोळां राम देखियेले ।
ज्यासी रघुराज हितगुज बोले । कोण्या भाग्यें भगवंत भेटले? ॥ रे० ॥ १ ॥
रामीं मि[2]नेले ते असो [3]नीचयाती । त्यांच्या चरणाची वंदीन माती ।
नित्य नव्हाळी गाऊनि करूं किती । तेणें रघुनाथीं उपजेल प्रीती ॥ रे० ॥ २ ॥
रामीं रामदास म्हणे ऐका करूं । थोर आम्ही तैसाचि भाव धरूं ।
भक्ति प्रेमाचा दावूं निर्धारू । तेणें आम्हा भेटेल रघुवीरू ॥ रे० ॥ ३ ॥

---

१. आवड, कौतुक. २. मिळाले. ३. हलक्या जातीचे.

## पद २५४ वें.

कैंचें घर कैंचें दार । मिथ्या सकळही व्यापार ।
अंतीं सोइरा रघुवीर । कां भुललासी? ॥ १ ॥
कोणी नव्हेति रे! कोणाचीं । सकळही सांगाती दैवाची ।
धरी सोई त्या रामाची । कां भुललासी? ॥ २ ॥
बहु अवघड आहे घाट । कैसी नकळे उरकेल वाट ।
होईं रघुविरजीचा भाट । कां भुललासी? ॥ ३ ॥
फिर माघारां परतोन पाहें । एकधर्मचि होउनि राहे ।
धन जोडिलें न राहे । कां भुललासी? ॥ ४ ॥
ऐसी करावी बा! जोडी । राहे येथें तेथें गोडी ।
सोडीं मिथ्या प्रपंचवोढी । कां भुललासी? ॥ ५ ॥
केव्हां जाईल नकळे श्वास[1] । राहे तें घर पडेल वोस ।
ये कुडिया उपजेल त्रास । कां भुललासी? ॥ ६ ॥
सावध होईं रे! बा! ऐसा । वोढीं जळते घरिंचा वासा[2] ।
स्मर माझ्या रमाधीशा । कां भुललासी? ॥ ७ ॥
संसार पाण्याचा बुडबुडा । याचा नको करूं ओढा ।
तूं समजसी ना मूढा! । कां भुललासी? ॥ ८ ॥
करीं सीताराम मित्र । होईल देह तुझा पवित्र ।
वरकड भिंतीवरील चित्र । कां भुललासी? ॥ ९ ॥
कां रे? बैसलास निश्चळ । करिशिल अनर्थास मूळ ।
सांडुनी विश्रांतीचें स्थळ । कां भुललासी? ॥ १० ॥
मुख्य असूं द्यावी दया । नाहीं तर सर्वेही जाईल वायां ।
मिठी घालीं रामपाया । कां भुललासी? ॥ ११ ॥
करिशील डोळ्याचा अंधार । पाहे जनासी निर्वैर ।
सांडी धनसंपत्तीचें वारें । कां भुललासी? ॥ १२ ॥
अंगीं धनसंपत्तीचें वारें । खाया मिळतील भुतें पोरें ।
कामा नयेत रे! निर्धारें । कां भुललासी? ॥ १३ ॥

---

१. श्वास जाणें=मरणें, जीव जाणें. २. जळते घराचा वांसा ओढणें=मिळेल त्यांत संतुष्ट असणें, थोडक्यांत गोडी मानणें, जें हातीं लागेल तें घेऊन संतुष्ट राहणें.

रामदासाचें जीवन । तूं कां न करीसी साधन ।
राम तोडिल भवबंधन । कां भुललासी? ॥ १४ ॥

### पद २५५ वें.

बाई! मी हो मी हो! जाहली खरी ।
खरी गुरुदास अखिल पदार्थी उदास ॥ ध्रुवपद. ॥
इह पर नश्वर जाणुनि हृदयीं । आलासे बहु त्रास ॥ बाई० ॥ १ ॥
नित्यानित्यविवेक[1] विचारुनि । सेवितो ब्रह्मरसास ॥ बाई० ॥ २ ॥
तुर्या[2] उल्लंघुनि उन्मनी सेवुनी । स्वस्वरूपीं निजवास ॥ बाई० ॥ ३ ॥
निजतृप्तीसी देउनि तृप्ति । केला अनुभवग्रास ॥ बाई० ॥ ४ ॥
रामदास प्रभु नित्य उदास । सच्चरणीं विश्वास ॥ बाई० ॥ ५ ॥

### पद २५६ वें.

कोण मी मज कळतची नाहीं । सारासारविचार शोधुनी पाहीं ॥ ध्रुवपद. ॥
नारी म्हणों तरी नरची भासे । नर म्हणों तरी समूळ विनासे ॥ कोण० ॥ १ ॥
दास म्हणों तरि रामचि आहे । राम म्हणों तरि नाम न साहे ॥ कोण० ॥ २ ॥

### पद २५७ वें.

आतां तरि जाय जाय जाय । धरिं सद्गुरुचे पाय ॥ ध्रुवपद. ॥
संकल्प विकल्प सोडुनी राहे । दृढ धरूनी पाय पाय पाय ॥ आतां० ॥ १ ॥
रामस्मरण ज्या मुखिं नाहीं । त्याणें वांचुनी काय काय काय ॥ आतां० ॥ २ ॥
मानवतनु ही नये मागुती । बरें विचारुनि पाहें पाहें पाहें ॥ आतां० ॥ ३ ॥
आत्मानात्मविचार न करितां । व्यर्थ प्रसवली माय माय माय ॥ आतां० ॥ ४ ॥
सहस्र अन्याय जरि त्वां केले । कृपा करील गुरुमाय माय माय ॥ आतां० ॥ ५ ॥
रामदास म्हणे नामस्मरणें । भिक्षा मागुनि खाय खाय खाय ॥ आतां० ॥ ६ ॥

### पद २५८ वें.

अरे नर! सारविचार कसा ॥ ध्रुवपद. ॥
क्षीर नीर एक हंस निवडिती । काय कळे वायसा? ॥ अरे० ॥ १ ॥
माया ब्रह्म एक संत जाणती । सारांश घेती तसा. ॥ अरे० ॥ २ ॥
दास म्हणे वंद्य निंद्य वेगळे । कर्मानुसार ठसा. ॥ अरे० ॥ ३ ॥

---

१. नित्य काय आणि अनित्य काय याचा विचार. २. चवथी अवस्था.

## पद २५९ वें.

अरे मन! पावन देव धरीं । अनहित न करी ॥ ध्रुवपद. ॥
नित्यानित्यविवेक करावा । बहुजना उद्धरी ॥ अरे० ॥ १ ॥
आत्मा कोण अनात्मा कैसा । परपार उतरी ॥ अरे० ॥ २ ॥
दास म्हणे तुझा तूंची सखा रे! । हित तुझें तूं करीं. ॥ अरे० ॥ ३

## पद २६० वें.

अरे! नर! सारविचार करीं । मन बरें विवरीं ॥ ध्रुवपद. ॥
सारासारविचार न येतां । वाहसी भवपुरीं ॥ अरे० ॥ १ ॥
सकळ चराचर कोठुनि जालें । कोठें निमालें तरी ॥ अरे० ॥ २ ॥
दास म्हणे जरी समजसी तरी । मुळींची सोय धरीं ॥ अरे० ॥ ३

## पद २६१ वें.

भूतकाळीं कर्म केलें वर्तमानीं आलें ।
त्याचें सुख मानूनियां भोगितों आपुलें. ॥ ध्रुवपद. ॥
सुखदु:खभोग जाला तोचि मागिल ठेवा ।
आतां दु:ख मानूं नको करीं रामसेवा ॥ भूतकाळीं० ॥ १ ॥
बाईल मेली पोर मेलें द्रव्य नाहीं गांठीं ।
तळमळ लागली जीवीं कां रे! होशी कष्टी ॥ भूतकाळीं० ॥ २ ॥
जें जें दु:ख होतें जीवा तेंचि मागिल कर्म ।
आतां त्याचें सुख मानीं स्मर रामनाम ॥ भूतकाळीं० ॥ ३ ॥
नामाविण राहूं नको असा फजित होशी ।
पुन्हा घडि नये बापा! नरकामध्यें जाशी ॥ भूतकाळीं० ॥ ४ ॥
भविष्याचा धोका तुझे हातामध्यें आहे ।
पळभर विसरूं नको नाहीं कोणी साह्य ॥ भूतकाळीं० ॥ ५ ॥
सावध होई सावध होई किती सांगूं तुजला ।
परिणाम कठिण मोठा शरण जाई गुरुला ॥ भूतकाळीं० ॥ ६ ॥
दास म्हणे जालें तें तरी होउनियां गेलें ।
नको नको म्हणतांहि भोगवितें केलें ॥ भूतकाळीं० ॥ ७ ॥

## पद २६२ वें.

एकला जगदंतर जाहला । आणीक कोणीच नाहीं तयाला ॥ ध्रुवपद. ॥

ारी खाणी चारी वाणी । हालवी बोलवीं चालवी त्याला ॥एकला ०॥ १ ॥
क धरी एक त्यागीत आहे । आपणा आपण भोगवीत आहे ॥एकला०॥२॥
ास म्हणे हा बहुविध तमासा । पाहिक तो मग होईक तैसा ॥ एकला०॥३॥

**पद २६३ वें.**

ज्या ज्या वेळे जें जें होईल तें तें भोगावें ।
विवेकाला विसरुनी आपण कष्टी कां व्हावें? ॥ ध्रुवपद. ॥
एकदां एक वेळ बहु सुखाची गेली ।
एकदां एक वेळ जिवा बहु पीडा झाली ॥ ज्या ज्या० ॥ १ ॥
एकदां मागूं जातां मिळती षड्रस पक्वान्न ।
एकदां मागूं जातां न मिळे भाजीचें पान. ॥ ज्या ज्या० ॥ २ ॥
सुकृत दुष्कृत दोन्ही पूर्वदत्ताचें फळ ।
ऐसें प्राणी जाणेना तो मूर्खचि केवळ ॥ ज्या ज्या० ॥ ३ ॥
देह दुःखास मूळ ऐसें बरवें जाणोन ।
सुखदुःखाविरहित **रा**मदास आपण ॥ ज्या ज्या० ॥ ४ ॥

**पद २६४ वें.**

घटका गेली पळें गेलीं तास वाजे झणाणा ।
आयुष्याचा नाश होतो **राम** कां रे! म्हणाना? ॥ ध्रुवपद. ॥
एक प्रहर दोन प्रहर तीन प्रहर गेले ।
विषयाच्या संगामुळें चारी प्रहर गेले ॥ घटका० ॥ १ ॥
रात्र कांहीं झोंप कांहीं स्त्रीसंगें गेली ।
ऐशी आठा प्रहरांची वासलाद झाली ॥ घटका० ॥ २ ॥
**दास** म्हणे तास वाजे सकळ स्मरण देतो ।
वेळोवेळां **राम** म्हणा म्हणोनि झणकारितो ॥घटका०॥ ३ ॥

**पद २६५ वें.**

**लंकेहुनि अयोध्ये** येतां । **राम लक्ष्मण सीता** ।
**हनुमंतें अंजनी** माता । दाखविली **रामा** ॥ १ ॥
चवघें केला नमस्कार । काय बोले **रघुवीर** ।
तुझ्या कुमरें आम्हा थोर । उपकार केला ॥ २ ॥

सीताशुद्धि येणें केली । लक्ष्मणाची शक्ति हरिली ।
लंका जाळुनी निर्दळिली । राक्षससेना ॥ ३ ॥
अहिरावण महिरावण । घात करिती आमुच्या प्राणा ।
देवीरूपें दोघांजणा । रक्षिलें यानें ॥ ४ ॥
अठरा पद्म वानरभार । श्रमें युद्ध केलें फार ।
शिळासेतु सागर । समाप्त केला ॥ ५ ॥
माते! तुझ्या उदरीं जाण । हनुमान जन्मला रत्न ।
येवढें माझें रामायण । याचेनि योगें ॥ ६ ॥
ऐकुन पुत्राची ही स्तुति । माता तुच्छ मानी चित्तीं ।
व्यर्थ कां बा! रघुपति । वाहसी भार ॥ ७ ॥
हा कां माझ्या उदरीं आला । गर्भाहुनी नाहीं गळाला ।
आपण असतां कष्टविला । श्रीराम माझा ॥ ८ ॥
माझिया दुग्धाची प्रौढी । कळिकाळाची नरडी मुरडी ।
रावणादिक हे बापडीं । घुंगुरटीं तेथें ॥ ९ ॥
असत्य रामा वाटेल बोली । दुग्धधारा सोडियेली ।
शैला उदरीं खोंचविली । त्रिखंड तेव्हां ॥ १० ॥
वेणीदंड परताळिला । लंकेलागीं वेढा दिधला ।
आणुनी रामाशीं दाखविला । अंजनीमातें ॥ ११ ॥
सीता बोले अंजनीशी । कां कोपशी बाळकाशीं ।
रामें आज्ञा हनुमंताशीं । दिधली नव्हती ॥ १२ ॥
आश्चर्य वाटलेंसे रामा । म्हणे माते! धन्य महिमा ।
पादपद्में चवघां जणां । वंदिलें भावें. ॥ १३ ॥
अत्यंत बिलग सखा । हनुमंत भक्त निका ।
रामदास पाठीराखा । महारुद्र तो. ॥ १४ ॥

**पद २६६ वें.**

गणपति गणराज धुंडिराज महाराज ।
चिंतामणि मोरेश्वर याविण नाहीं काज ॥ ध्रुवपद. ॥
अकार उकार मकार । तुझी शुंडा अनिवार ।
ब्रह्म विष्णु महेश हे तरि । तुझेच अवतार ॥ गणपति० ॥ १ ॥

१. सीतेचा शोध.

त्रिगुणें[1] तूं गुणातीत । नामरूपा विरहित ।
पुरुषनाम प्रकृतींत । अंत नाहीं हा ॥ गणपति० ॥ २ ॥
सच्चिदानंद देवा ! । आदि अंत तुलाच ठावा ।
दास म्हणे वरद भावा । कृपादृष्टीं हा ॥ गणपति० ॥ ३ ॥

### पद २६७ वें.

प्रगट निरंजन प्रगट निरंजन प्रगट निरंजन आहे, ।
आगम निगम संतसमागम सद्गुरुवचनें पाहे. ॥ ध्रुवपद. ॥
आत्मविचारें शास्त्रविचारें गुरुविचारें बोध ।
मीपण तूंपण शोधुनि पाहतां आपण आपणा शोध. ॥ प्रगट० ॥ १ ॥
जडाशि चंचळ चालविताहे चंचळ स्थीर न राहे ।
प्रचीत आहे शोधुनि पाहे निश्चळ होऊन राहे ॥ प्रगट० ॥ २ ॥
भजनीं भजन आत्मनिवेदन श्रवणमनन साधा ।
दास म्हणे निजगुज शोधितां होत नसे भवबाधा ॥ प्रगट० ॥ ३ ॥

### पद २६८ वें.

पाहा पाहा या जगांत राम आहे । राम आहे राम आहे राम आहे ॥ध्रुवपद.॥
जग हें अवघें रामच सारा । अंतरिं पाहें करीं विचारा ॥ पाहा० ॥ १ ॥
एक सुवर्णी बहु अलंकारा । तद्वत् पाही सर्व पसारा ॥ पाहा० ॥ २ ॥
विनाकच्छु नाहीं थारा । रामच रामही घे घे सारा ॥ पाहा० ॥ ३ ॥
दास म्हणे हा रामच भरला । भरला उरला बोलच खुंटला ॥ पाहा० ॥ ४ ॥

### पद २६९ वें.

गुरुदातारें दातारें । अभिनव कैसें कैसें केलें ॥ ध्रुवपद. ॥
एकचि वचनें न बोलत बोलुनी । मानस विलया नेलें ॥ गुरु० ॥ १ ॥
भूतसंगें कृतनश्वर वोझें । निजबोधें उतरिलें ॥ गुरु० ॥ २ ॥
दास म्हणे मज मीपण विरहित । निजपदीं नांदविलें ॥ गुरु० ॥ ३ ॥

### पद २७० वें.

मिश्रित सारासार । अरे निवडी तोची चतुर ॥ ध्रुवपद. ॥
ब्रह्म निरंजन अद्वय सत्य । माया जनपर द्वैत अनित्य ॥ मिश्रित० ॥ १ ॥

---

१. सत्त्वरजस्तमोगुणें.

पारखीवीण खरें निवडेना । मूढ कसें जनहित कळेना ॥ मिश्रित० ॥२॥
मेळवीलें जळ अमृत दोनी । हंस जसें पय घे निवडोनी ॥ मिश्रित० ॥३॥
**दास** म्हणे निज कौतुक मोठें । अनुभव बोलता शाब्दिक खोटें ॥ मिश्रित० ॥४॥

## पद २७१ वें.

वदन सुहास्य रसाळ हा **रा**घव । सर्वांगीं तनु सुनीळ हा **रा**घव ॥ ध्रुवपद. ॥
मृगनाभी रेखिला टीळा हा **रा**घव । सर्वांगीं सुमनमाळा हा **रा**घव ॥ १ ॥
साजिरी वैजयंती हा **रा**घव । पायीं तोडर गर्जती हा **रा**घव ॥ २ ॥
सुंदर लावण्यखाणी हा **रा**घव । उभा कोदंडपाणी हा **रा**घव ॥ ३ ॥
सकळ जीवांचें जीवन हा **रा**घव । **रा**मदासासी प्रसन्न हा **रा**घव ॥ ४ ॥

## पद २७२ वें.

त्रिविधतापहारक हे गुरुपाय । भवसिंधूसी तारक हे गुरुपाय ॥ ध्रुवपद. ॥
स्वात्मसुखाचें बीज हे गुरुपाय । ज्ञानाचें निजगुज हे गुरुपाय ॥ १ ॥
............................ । भक्तिपंथासी लाविती हे गुरुपाय ॥ २ ॥
सहजशांतीचे आगर हे गुरुपाय । पूर्णकृपेचे सागर हे गुरुपाय ॥ ३ ॥
**रा**मदासाचें जीवन हे गुरुपाय । सकळ जीवांसी पावन हे गुरुपाय ॥ ४ ॥

## पद २७३ वें.

सुंदर **रा**माबाई सबरा भरीत सर्वाठायीं हो ।
निगमा पार नाहीं ते म्यां वर्णावी ते काई हो ॥ ध्रुवपद. ॥
शरयूतीरवासिनी वेधक मुनिमानस मोहिनी हो ।
सुरवरसंजीवनी कैसी शोभत पद्मासनीं हो ।
उदार येकवचनीं दुर्लभ तापस तपसाधनी हो ।
दशरथनृपनंदिनी प्रगटे ऋषिवचनालागुनी हो ॥ सुंदर० ॥ १ ॥
निजमस्तकीं वीरजगुंठी त्रिपुंड्र रेखिला लल्लाटीं हो ।
सुरेख संदटा भृकुटी तेणें सतेज नासापुटी हो ।
नव वानर गोमटी श्रवणीं कुंडलांची थाटी हो ।
लावण्याची पेटी उपमे न पुरे मन्मथकोटी हो ॥ सुंदर० ॥ २ ॥
कटितटि सोनसळा माजी सौदामिनिचा मेळा हो ।
सुवास नाभीकमळा तेणें पडे मधुकरपाळा हो ।

वामे धरणीबाळा वनितामंडित ते वेल्हाळा हो ! ।
चरणस्पर्शें शिळा अहिल्या उद्धरिली अवलीला हो ! ॥ सुंदर० ॥ ३ ॥
विशाळ वक्षस्थळीं विराजित उटी चंदन पातळी हो ! ।
कंठीं एकावळीमाजी कौस्तुभमणि झळफळी हो ! ।
अधरीं प्रवाळपाळीमध्यें शोभे [1]दंतावळी हो ! ।
रसना रसकल्लोळी वाचा बोलत मंजुळी हो ! ॥ सुंदर० ॥ ४ ॥
[2]आजानुबाहू सरळ सुनीळ गगनाहुनी कोमळ हो ! ।
सुपाणि रम्य स्थूळ देखुनी रवितेज सोज्वळ हो ! ।
मुद्रिका फांकती कीळ तेणें सतेज गृहमंडळ हो ! ।
[3]शरकार्मुक सह मेळे शोधित असुरतरुचीं मुळें हो ! ॥ सुंदर० ॥ ५ ॥
चिद्गगनाचा गाभा तैसी सुनीळ अंगप्रभा हो ! ।
देखुनि चिद्घन शोभा जैशी कांती चढली नभा हो ! ।
रतिनायक वल्लभा देखुनी नागर सांडी दंभा हो ! ।
प्रथमारंभ स्तंभाभरणें भूषित शामल शोभा हो ! ॥ सुंदर० ॥ ६ ॥
भरत बिभीषण पृष्ठीं सविता गुण मानित उत्कंठी हो ! ।
जोडुनि करसंपुष्टी ध्यानीं मारुति गान वेष्टी हो ! ।
देखुनियां सुखपुष्टी झाली प्रेमरसाची वृष्टी हो ! ।
सुख संतुष्टें हर्षें परमेष्ठी कोंदे कमळा सृष्टी हो ! ॥ सुंदर० ॥ ७ ॥
नव पंकजलोचनी विस्मित करुणामृतसिंचनी हो ! ।
शिवसंकटमोचनी दुर्धर [4]रजनीचरभंजनीं हो ! ।
भवभयसंकोचनी भक्तां निर्भयपदसूचनी हो ! ।
रघुकुळउल्हासिनी भोजें विलसत चंद्राननी हो ! ॥ सुंदर० ॥ ८ ॥
अव्यक्त पार जीचा विचार खुंटे [5]साहा [6]अठरांचा हो ! ।
सुकाळ स्वानंदाचा यावा अंतरला दुःखाचा हो ! ।
जगदुद्धार मातेचा उत्तीर्ण नव्हें मी हे वाचा हो ! ।
रामदासीं भेदतरंग तुटोनि गेला साचा हो ! ॥ सुंदर० ॥ ९ ॥

---

१. दंतपंक्ति. २. गुडघ्यापर्यंत ज्याचे बाहु पोंचतात असा. ३. शरचाप. ४. राक्षसनाशीं. ५. सहा शास्त्रांचा. ६. अठरा पुराणांचा.

## पद २७४ वें.

ब्रह्मीं माया उदो[1] । त्रिगुण काया उदो ।
तत्वच्छाया उदो । चारी खाणी[2] उदो ॥ १ ॥
चारी वाणी[3] उदो । अनंत योगी उदो ।
विद्या बुद्धी उदो । नाना विधी उदो ॥ २ ॥
कारण सिद्धी उदो । आगम निगम उदो ।
साधन सुगम उदो । ज्ञान संगम उदो ॥ ३ ॥
देवा भक्तां उदो । योगी मुक्तां उदो ।
अनंत सिद्धां उदो । उदो दासा उदो ॥ ४ ॥

## पद २७५ वें.

श्रीगुरुचे चरणकंज हृदयीं स्मरावे ॥ ध्रुवपद. ॥
निर्गम[4] निखिल साधारण सुलभाहूनी सुलभ बहू ।
इतर योगैयाग[5] विषमपंथिं कां शिरावें ॥ श्रीगुरु० ॥ १ ॥
नरतनुदृढनावेसी बुडवुनि अति मूढपणें ।
दुष्ट नष्ट कुंकरसुकरतनु[6] कां फिरावें ॥ श्रीगुरु० ॥ २ ॥
रामदास विनवी तुज अझुनि तरी समज उमज ।
विषयवीष पीउनीयां फुकट कां मरावें ॥ श्रीगुरु० ॥ ३ ॥

## पद २७६ वें.

येईं हो ! रामाबाई[7] ! । माझे येईं हो ! रामाबाई ! ॥ ध्रुवपद. ॥
अनंतरूपें व्यापें दानवदर्पें पूर्णप्रतापें ।
तव नामें कळिकाळ कांपे ॥ येईं० ॥ १ ॥
तुझा छंद लागला गे ! माये ! निशिदिनिं या जीवासी ।
तुजविण मी परदेसी ॥ येईं० ॥ २ ॥
रामीं रामदासीं आराम करणें हेंचि तुला उचित ।
झणी उपेक्षिसी काय आतां उरला माझा अंत ॥ येईं० ॥ ३ ॥

---

१. उत्कर्षानें असो, उदय पावो. २. जारज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज अशा चार खा० आहेत. ३. परा (कान), पश्यंती (डोळे), मध्यमा (घ्राण) आणि वैखरी (जिव्हा) अशा वाणी चा समजतात. ४. वेद. ५. यज्ञ. ६. कुत्र्याची अथवा डुकराची तनु (देह). ७. उपास्य देवाला स्त्री देऊन संबोधन करणें हें भक्तिप्रेमातिरेकाचें दर्शक होय.

## पद २७७ वें.

लो लो लागला लो । आदिशक्तिचा लागला लो ।। ध्रुवपद. ।।
अंतरिं लो बाहिर लो । जिकडे तिकडे लागला लो ।। १ ।।
[1]अंडज लो [2]जारज लो । [3]स्वेदज लो उद्भिज लो ।। २ ।।
देवा लो दानवा लो । सिद्ध साधका लागला लो ।। ३ ।।
दास म्हणे तोचि जाणे । सद्गुरुवचनीं सुख बाणे ।। ४ ।।

## पद २७८ वें.

मारुती सख्या बलभीमा! हो! ।। ध्रुवपद. ।।
अंजनीचें वचनांजन लेउनि । दाखविशी बलसीमा रे! ।। मारु० ।। १ ।।
वज्रतनु बलभीम पराक्रम । संगीतगायन सीमा रे! ।। मारु० ।। २ ।।
दास म्हणे हो रक्षीं आम्हां । त्रिभुवनपालन सीमा रे! ।। मारु० ।। ३ ।।

## पद २७९ वें.

नि[4]दान पाहाशी किती । दयाळा निदान पाहाशी किती ।
रामराया! निदान पाहाशी किती ।। ध्रुवपद. ।।
धांव धांव गा! सीतापती । तुज वेगळी नाहीं [5]गती ।
नानाशास्त्रें मौ[6]नावती । नाम तारक वेद बोलती ।। निदान० ।। १ ।।
जळीं पाषाण तारिले जड । मी काय तुज त्याहूनि जड ।
आतां पुरवीं जीवींचें कोड । मनीं घेतला विषयीं मोड ।। निदान० ।।२।।
तुझ्या भेटीचें आर्त मोठें । मज न गमे कांहीं केल्या कोठें ।
तुजवांचोनी सर्वही खोटें । दीन बालक तुझें धाकुटें ।। निदान० ।।३।।
वृत्ती जडली पायापाशीं । जेवीं गुळाशीं गुंतली माशी ।
देहीं असोनि गुप्त कां होशी । दास उदास देहभावाशी. ।। निदान० ।।४।।

## पद २८० वें.

धांव रे! रामराया! । किती अंत पाहाशी. ।। ध्रुवपद. ।।
प्रा[7]णांत मांडिलासे, नये करुणा कैसी । पाहीन धणिवरी चरण झाडीन केशीं ।
नयन शीणले बा! आतां केधवां येशी ।। धांव रे० ।। १ ।।

---

१. अंड्यापासून होतात ते. २. ज्याच्या सभोंवतीं जारेचें वेष्टन असतें ते. ३. घामापासून होतात ते. ४. अंत. ५. आधार. ६. मौन धरतात. ७. मृत्यु.

मीपण अहंकारें अंगीं भरला ताठा । विषयकर्दमांत[1] लाज नाहीं लोळतां ।
चिळस उपजली ऐसें झालें बा! आतां ॥ धांव रे० ॥ २[2] ॥
मारुतीस्कंधभागीं शीघ्र बैसोनि यावें । राघवा! वैद्यराजा! कृपा औषध द्यावें
दयेचे पद्महस्त माझे शिरीं ठेवावे ॥ धांव रे० ॥ ३ ॥
या भेवीं रामदास थोर पावतो व्यथा । कौतुक पाहातोसी काय जानकीकांता!
दयाळा! दीनबंधु! भक्तवत्सला! आतां ॥ धांव रे० ॥ ४ ॥

### पद २८१ वें.

अनाथ मी हीन दीन दरिद्री, भजन नेणें कांहीं ।
तुजविण मज या जगीं पाहतां कोणीच नाहीं ॥ ध्रुवपद. ॥
ज्ञान कळेना, ध्यान कळेना, मन वळेना, देवा! ।
विद्या नाहीं वैभव नाहीं ऐसा पूर्वील ठेवा ॥ अनाथ० ॥ १ ॥
युक्ति असेना, बुद्धि असेना, शांति वसेना अंगीं, ।
रामदास म्हणे दयाळा! ऐसा मी भवरोगी ॥ अनाथ० ॥ २ ॥

### पद २८२ वें.

रामा! तुज कल्याण मागणें । रामा! तुज कल्याण मागणें ॥ ध्रुवपद.
तूं जगजीवन तूं मनमोहन । कोण आहे तुजविणें ॥ रामा० ॥ १ ॥
आम्ही हरिजन तूं जनपावन । बोलती वेदपुराणें ॥ रामा० ॥ २ ॥
देवही आले भक्त मिळाले । आनंदें तुझे गुणें ॥ रामा० ॥ ३ ॥
भक्त सुखी ऋषि सुखी । दास म्हणे तुझें देणें ॥ रामा० ॥ ४ ॥

### पद २८३ वें.

कपि सकळही प्रयाणकाळीं । प्रेमें वोसंडती दोहीं डोळीं ।
नित्य आठवे सुखाची नव्हाळी । म्हणती रामा तुझी सवे लागली ॥ १
जो तूं अगोचर ब्रह्मादिकां । ध्यानीं नातुडसी [3]पंचमुखा ।
तो तूं आम्हां झालासी निजसखा । प्रेम दिधलें वायुसुता ॥ २ ॥
तुझ्या वोळगे सुरांशी न लगे हो ठावो । आम्हीं वानरें निकट उभीं राहों
न्याहार धरुनि वदन तुझें पाहों हो । परि धाला[4] नाहीं आमुचा भावो ॥ ३

### पद २८४ वें.

रामा! कृपा बहुत असों देणें । आम्ही धन्य जाहालों तुझे गुणें ॥ ध्रुवपद.

---

१. विषयरूप चिखलांत. २. 'बोभाई' असा अन्य पाठ आहे. ३. शंकरा. ४. तृप्त झाला.

रामा! गोड लागती तुझ्या गोष्टी। हर्षें गुदगुल्या होताती पोटीं।
म्हणुं सांपडलीच नियाची मुठी। वाटे धरावी तुझी हनुवटी ॥रामा० ॥ १ ॥
राम आलिंगोनी सप्रेमें बोले। तुम्ही मजलागिं हे कष्ट केले।
सुखी करोनी सर्व गौरविलें। रामदासीं हनुमंत ठेले ॥ रामा० ॥ २ ॥

पद २८५ वें.

वळी मन रामपदीं निवळी. ॥ ध्रुवपद. ॥
तीक्ष्ण तनु अति चंचळ। अंतराळें कवळी. ॥ वळी० ॥ १ ॥
दास म्हणे हरिदास हटेला। रामपदाजवळी. ॥ वळी० ॥ २ ॥

पद २८६ वें.

अंकित[1] मी तुझा दीन। न करावें पराधीन। न पाहें मानी खाण ॥ ध्रुवपद. ॥
तो तुझें पाडस। वरि पडे भवपाश। पडों पाहे आकाश ॥ अंकित० ॥ १ ॥
निज ब्रिदें[2] साच करीं। दिनासी अंगीकारीं। रामदास चरणिं धरीं ॥अंकित० ॥२॥

पद २८७ वें.

जागा जागा झटका रे!। गुरुपदिं जाउनि हटका रे! ॥
रामरसायण घ्या तुम्हि घुटका। तरीच होइल सुटका रे! ॥ ध्रुवपद. ॥
औट[3] हाताचा मळा रे!। रमतिल बारा[4] सोळा[5] रे! ॥
विधातियानें जप मांडिला। अमृताची वेळा रे! ॥ जागा० ॥ १ ॥
नऊ दरवाजे[6] खिडकी रे!। कितीक खाशिल गिरकी रे! ॥
•••................ प्राण्या!। चिन्मय स्वरूप वोळखी रे! ॥ जागा० ॥ २ ॥
असाच होशी धीट रे!। पाहे उलट्या नीट रे! ॥
रामदास दाखवी मज। मोक्षपदाची वाट रे! ॥ जागा० ॥ ३ ॥

पद २८८ वें.

जें जें लिहिलें भाळीं[7] तें तें कोण चूकवी?।
होणारासी चुकवूं जातां अवश्य भोगवी ॥ ध्रुवपद. ॥
सुख दुःख सर्वैहि आपुल्या प्रारब्धाधीन।
उगेंच रुसावें भलत्यावरतें हें मूर्खपण. ॥ जें जें० ॥ १ ॥

---

१. सेवक. २. ब्रीद=खुणा. ३. साडे तीन हातांचा. ४. द्वादशदलचक्र. ५. षोडशदलचक्र.
६. इंद्रियें. ७. नशिबीं.

संपत्ति विपत्ति दोन्ही पूर्वदत्ताचें फळ ।
ऐसें जाणेना जो प्राणी मूर्खचि तो केवळ. ॥ जें जें० ॥ २ ॥
ज्याचें केलेंस तेंचि त्याला लाभ तैसाची ।
अधिक उणें होऊं नेदी इच्छा रामाची. ॥ जें जें० ॥ ३ ॥
माता पीता वनिता[1] यांनीं उगेच पाहावें ।
बरें वाईट कर्म ज्याचें त्यानें भोगावें. ॥ जें जें० ॥ ४ ॥
दे हें सुख दुःख मुळ ऐसें बरवें जाणून ।
सुखदुःखविरहित रामदास आपण. ॥ जें जें० ॥ ५ ॥

## पद २८९ वें.

तुम्हि चिंता हो! मानसीं । राम शरयूतीरनिवासी. ॥ ध्रुवपद. ॥
जडिलीं कुंडलें श्रवणीं । राम लावण्याची खाणी. ॥ तुम्हि० ॥ १ ॥
रूप सांवळें सुंदर । ज्यासि ध्यातसे शंकर. ॥ तुम्हि० ॥ २ ॥
सूर्यवंशाचें मंडन । रामदासाचें जीवन. ॥ तुम्हि० ॥ ३ ॥

## पद २९० वें.

अपराधी आहें मोठा । मारणें कृपेचा सोंटा. ॥ ध्रुवपद. ॥
स्वामिराय सुखाचे कंद । नेणुनि केला हा निज छंद ।
तेणें पावलों हे बंद । झालों निंद्य सर्वस्वी. ॥ अपराधी० ॥ १ ॥
तारीं तारीं दत्तात्रया! । वारीं माझ्या तापत्रया[2] ।
तुझे पाय काशी गया । आहे साच मजलागीं. ॥ अपराधी० ॥ २
आतां अंत पाहसी काय । तूंची माझा बापमाय ।
रामदास तुझे पाय । वारंवार वंदितो. ॥ अपराधी० ॥ ३ ॥

## पद २९१ वें.

हरिभक्तिलागीं त्यागी । तोचि जगीं वीतरागी[3] रे! ॥ ध्रुवपद. ॥
आपुल्या भावा त्यजुनि स्वभावा । बिभिषण भजे राम भावा रे! ॥हरि०॥ १
आपुल्या कांता[4] त्यजुनि स्वकांतां[5] । अन्नार्पिती विश्वकांता[6] रे! ॥ ह० ॥ २
हरिविण अन्य त्यजी तोचि धन्य । म्हणे कलियुगीं रामदास रे! ॥ ह० ॥ ३

---

१. स्त्री, बायको. २. तीन प्रकारचे ताप. ३. विरक्त, त्यक्तसंसार. ४. स्त्रिया. ५. आपापल्या नवऱ्यांना. ६. कृष्णाला. ऋषिपत्न्यांनीं श्रीकृष्णास अन्न दिलें ही कथा श्रीमद्भागवत—दशमस्कंध अध्याय २३ यांत आहे. [काव्यसंग्रह—वामनपंडितकृत काव्यें भाग पहिला—पृष्ठ ४७०—४७९ पह

## पद २९२ वें.

कैवारी हनुमान । आमुचा कैवारी हनुमान ॥ ध्रुवपद. ॥
पाठीं असतां तो जगजेठी । वरकड काय गुमान ॥ आमुचा० ॥ १ ॥
नित्य निरंतर भजकां रक्षी । धरुनियां अभिमान ॥ आमुचा० ॥ २ ॥
दास हा रक्षिल हाचि भरंवसा । वदतसें त्याची आण ॥ आमु०॥३॥

## पद २९३ वें.

तूं भज रे! भज रे! भज रे! मानवा! या रघुवीरा! ध्रुवपद. ॥
नरदेहीं आलिया प्राणी । जो राम वदेना वदनीं ।
यम घालिल जेव्हां झडणी । सोडविता नाहीं कोणी ॥ तूं० ॥ १ ॥
पळ पळ हें आयुष्य जातें । नरदेह नये मागुन तें ॥
तूं शरण जा संतांतें । ते निजपद दाविती तूतें ॥ तूं० ॥ २ ॥
रामदास विनंति करी । गुरुकृपा आह्मांवरी ।
सबाह्य अभ्यंतरीं । अवलोकीं चराचरीं ॥ तूं० ॥ ३ ॥

## पद २९४ वें.

नारत कामीं, रामीं रम रे! ॥ ध्रुवपद. ॥
अरे! मन मित्रा! तूं माझ्यावरी ।
प्रीति रामीं सुखधामीं रे! ॥ नारत० ॥ १ ॥
साधन सुगम हें सुखकर येणें ।
जिकोनी इंद्रियग्राम शमदम नेमी रे! ॥ नारत० ॥ २ ॥
स्वप्नीं सृष्टी आपणच जेविं ।
लक्षुनि हा चिद्भास जगनगहेमी रे! ॥ नारत० ॥ ३ ॥
अर्पुनि श्रीपदिं गोपाळा जो ।
तोचि तूं आत्माराम रामदासस्वामी रे! ॥ नारत० ॥ ४ ॥

---

१. पर्वा. २. 'नानापरी रक्षी' असा अन्य पाठ आहे. ३. 'जो रामनाम न वदे वाणीं' असा अन्य पाठ. आहे. ४. 'त्याला यम पाडिल भरणीं' अन्य पाठ आहे. ५. झडप. ६. इंद्रियसमुदाय.

## पद २९५ वें.

[1]होतें वैकुंठींच्या [2]कोणीं । शिरलें अयोध्याभुवनीं ।
लागे कौसल्येच्या स्तनीं । तेंची भूत गे ! ॥ ध्रुवपद. ॥
जातां [3]कौशीकराउळीं । अवलोकिली भयंकर काळी ।
ताटिका [4]निर्दाळी । तेंची भूत गे ! ॥ होतें० ॥ १ ॥
मार्गीं जातां वनांतरीं । पाय पडला [5]शिळेवरी ।
पाषाणाची झाली [6]नारी । तेंची भूत गे ! ॥ होतें० ॥ २ ॥
जनकाचे अंगणीं गेलें । शंकराचें धनुष्य भंगिलें ।
[7]वैदेहीदेहीं संचारले । तेंची भूत गे ! ॥ होतें० ॥ ३ ॥
जेणें [8]सहस्रार्जुन वधिला । [9]तात्काळ भ्याला त्याला ॥
धनुष्य देउनि देहें रक्षिला । तेंची भूत गे ! ॥ होतें० ॥ ४ ॥
पितयाचे भाकेसी । कैकयीच्या वचनासी ।
मानुनि गेलें अरण्यासी । तेंची भूत गे ! ॥ होतें० ॥ ५ ॥
चवदा संवत्सर तापसी । अखंड हिंडे वनवासीं ।
[10]सांगातें घे भुजंगासी । तेंची भूत गे ! ॥ होतें० ॥ ६ ॥
वाळीचें निर्दाळण । सुग्रीवाचें पाळण ।
तारी पाण्यावरी पाषाण । तेंची भूत गे ! ॥ होतें० ॥ ७ ॥
मारिले रावण कुंभकर्ण । तोडिलें अमरांचें ध्यान ।
[11]राज्यीं स्थापिला बिभीषण । तेंची भूत गे ! ॥ होतें ॥ ८ ॥
वामांगीं स्त्रियेला धरिलें । शरयुतीरीं धांवुन आलें, ॥
तेथें भरतासी भेटलें । तेंची भूत गे ! ॥ होतें० ॥ ९ ॥

---

१. रामदास स्वामी पळून गेले ते शके १५६६. परत मातोश्री व बंधु यांस भेटावयास आले त्या वेळीं त्यांचे मातोश्रींनीं (राणूबाईनीं) 'तूं भूतचेष्टा कोठून शिकून आलास ?' असें विचारलें. त्यास स्वामींनीं हें उत्तर दिलें. २. कोनांत. ३. विश्वामित्राच्या यज्ञमंडपांत. ४. 'निर्दाळोनं मेली' असा अन्य पाठ आहे. ५. 'दगडावरी' अन्य पाठ आहे. ६. अहल्या. ७. 'वैदेहीअंगीं संचरलें' अन्य पाठ आहे. ८. यदुकुलोत्पन्न कृतवीर्याचा पुत्र कार्तवीर्य यास सहस्र हस्त असल्यामुळें हें नांव प्राप्त झालें. एकदां हा मृगयेनिमित्त अरण्यांत गेला असतां हा जमदग्नीच्या आश्रमांत गेला. तेथें जमदग्नीनें कामधेनूच्या आश्रयानें राजाचा आदर सत्कार केला परंतु तो संतुष्ट न होतां ती कामधेनु हरण करूं लागला. तेव्हां परशुरामानें त्यास मारिलें. (भारत—वनपर्व—अध्याय ११७.) ९. 'तोही तात्काळचि भ्याला' अन्य पाठ आहे. १०. 'सांगातें भुजंग पोसी' अन्य पाठ आहे. ११. 'रक्षी मरणीं बिभीषण' अन्य पाठ आहे.

सर्व भूतांचें हृदय । जाहला तोची **रामपाय** ॥
**रामदास** नित्य गाय । तेंची भूत गे! ॥ होतें० ॥ १० ॥

### पद २९६ वें.

मजला सोडवा, आतां कोणी तरी धांवा हो! ॥ ध्रुवपद. ॥
भावोजी! मी धरितें पाय । सांगा चुकलें तरि मी काय? ॥
विनवा **दुर्योधनराय** । हा न्याय करा हो! ॥ मज० ॥ १ ॥
माझा जळला अहंकार । चुकल्यें चुकल्यें मी फार, ॥
आतां करा तुम्ही उपकार । मज आधार करा हो! ॥ मज० ॥ २ ॥
कैसा येइना जगदीश । घेतलें निद्रेचें मीष ॥
राखाया **द्रौ**पदीस । विनवी **दास कृ**ष्णातें ॥ मज० ॥ ३ ॥

### पद २९७ वें.

**हर हर शंभू** गा । भवाब्धितारक नौका समजुनी ॥ ध्रुवपद. ॥
**त्रि**पुरमथन **कै**लासभूपति, अंकीं अपर्णा, शिरिं **गं**गा, ।
संगें **ग**जानन बाळहि राजे, ऐसा **शं**भू आलिंगा ॥ हर० ॥ १ ॥
कामादिक हे षड्रिपु वैरी मार्गीं करिती दंगा ।
त्यासी विदारण श्रीगुरुचरण धरिसी, पावसी भवभंगा ॥ हर० ॥ २ ॥
अन्य देवता फिकी छाया टाकुनि घालिसि पिंगा ।
**दास** म्हणे वायां शिणविसि काया हरहरहर **शि**वलिंगा. ॥हर० ॥३॥

### पद २९८ वें.

**रामावांचून** .... हें तर .... जाणावी ॥ ध्रुवपद. ॥
मोलाविण प्राप्त झाली विषाची कांडी ।
चोकट झाली म्हणून काय लावावी तोंडीं ॥ **रामा**० ॥ १ ॥
सोनियाची सुरी जरी देखिली........ ।
चोखट झाली म्हणून काय खोवावी उरीं ॥ **रामा**० ॥ २ ॥
मेंद चाकर म्हणे नलगे मुशारा ।
शेवटीं याचे संगतीचें फळ विचारा ॥ **रामा**० ॥ ३ ॥

---

१. प्राणीमात्रांचें. २. 'नाम त्याचें रामराय' अन्य पाठ. ३. द्रौपदीनें दु:शासनाची विनवणी तिचें वर्णन. ४. कृष्ण. ५. ढोंग. ६. त्रिपुरासुराला मारणारा. ७. पार्वती. ८. शोभे. चोखट, चखोट, चांगली. १०. नीच—ठक नोकर.

**दास** म्हणे जेणें घात आपुला होय ।
शेवट याचे संगतीनें करावें काय? ॥ **रामा०** ॥ ४ ॥

### पद २९९ वें.

जगजीवन पतितपावन भाव धरुनि स्मरा रे! ।
तेणें दुःख हरोनि सुख होवोनि भव तरा रे! ॥ ध्रुवपद. ॥
कुंटण गणिका अति पातका करोनि देखा जगीं मिरवि शिका ।
परि अंतीं नामस्मरणें पक्षिमिसें गेली **विष्णुच्या** लोका रे! ॥जग०॥
गजचरणीं नक्रें धरूनि वोढी पाणियांत बळें करुनि त्या. ।
दुःखें दीर्घ स्वरें हांक देतां त्वरित केला उद्धार रे! ॥ जग० ॥ २
**अ**हिल्या बाळा पतिशापें झाली शिळा दीनरात ध्यास तिला, ।
**रा**घवपदीं पूर्ण दीन होतां पदरजें पूर्ववत केली रे! ॥ जग० ॥ ३
**ज**नककुमरी रूप सैंवरी पाहुनि अंतरीं तृप्त झाली रे! ।
खरी म्हणोनि **दा**स करी विनवणी लघुथोरां रे! ॥ जग० ॥ ४ ॥

### पद ३०० वें.

धरीं धीर राहें स्थीर अरे! तूं मना! ।
क्षणभरि तरि भज श्रीरघुनंदना. ॥ ध्रुवपद. ॥
चंचळ चपळ वेगें नाटोपे कोणा ।
**सृष्टीकर्ता ब्रह्मा** तोही नाडला जाणा ॥ धरीं० ॥ १ ॥
हाचि समयो टळला मग कैंचा श्री**राम**? ।
जपतांचि नाम माझा हरला भवभ्रम. ॥ धरीं० ॥ २ ॥
सांवळा सकुमार **राम** कोदंडधारी ।
पर होउनि परता **राम**दासा अंतरीं ॥ धरीं० ॥ ३ ॥

### पद ३०१ वें.

सावधान सावधान । वाचे बोला **ना**रायण ॥ ध्रुवपद. ॥

---

१. वेश्या. २. मिथिलापुरींतील पिंगला वेश्या इनें एक पोपट पाळिला होता. त्याचें नांव ‘राघोबा’ ठेविलें होतें. पुढें मरणसमयीं त्या राघोबा पोपटाचा तिला निदिध्यास लागल्यामुळें तरली. त्या कथेचा उल्लेख येथें आहे. [मोरोपंतानें एके ठिकाणीं म्हटलें आहे:—‘अभिधान शुका तुझें पढवुनियां, मोक्ष पिंगळा लाहे.’ वेंकटेशप्रार्थना—६३; आनंदतनयकृत काव्यें—गणिकोद्ध काव्यसंग्रह—पृष्ठ ५५-५६ पहा.] ३. पृ० ३२ टी० ५ पहा. ४. स्वयंवरीं. ५. कोदंड=धनुष्य

दश वर्षें बालपण । वीस वर्षें तारुण्य ।
आंगीं चढे मदन । मग कैंचें व्यवधान ॥ सावधान० ॥ १ ॥
तीसांची होय भरती । दारा पुत्रा लागे प्रीति ।
त्याचीच पडे भ्रांती । ही स्वरुपें स्थिती ॥ सावधान० ॥ २ ॥
चाळीस वर्षें झालीं । डोळां चाळीशी[1] आली ।
नेत्रांशीं भूल पडली । न दिसति जवळी ॥ सावधान० ॥ ३ ॥
पन्नास वर्षें होती । हालती दंतांच्या पंक्ती ।
श्याम[2] केश शुभ्र होती । त्याशीं, 'म्हातारा'[3] म्हणती ॥ सावधान० ॥ ४ ॥
साठीची बुद्धी नाठी । हातीं घेउनियां काठी ।
वसासा लागे पाठी । गांजिताती कारटीं ॥ सावधान० ॥ ५ ॥
सत्तरीची हेचि रचना । बसविल्या उठवेना ।
उठवल्या हालवेना । हालवल्या चालवेना ॥ सावधान० ॥ ६ ॥
चार विसा मिळोन ऐशीं । मग तो झाला तापशी ।
जलावीण जैशी माशी । तैशी होय कासावीशी ॥ सावधान० ॥ ७ ॥
नव्वावरतीं पडतां पूज्य । मग ते होताती दुजे ।
अवघे म्हणती माजे माजे । न येती कोण काज ॥ सावधान० ॥ ८ ॥
शतायुषी पुरुष झाला । परि तो वांया गेला ।
**रा**मदास याचे बोला । विरला सावध तो झाला ॥ सावधान० ॥ ९ ॥

## पद ३०२ रें.

आतां तरि सावध होई अवधि कांहिं न उरली भरली जात घडी ॥ध्रुवपद.॥
[आ]युर्नश्यति अतिगती शरण होई श्री**गुरु**प्रती चुकवीन पडे काळउडी ॥ १ ॥
[आ]शा आहे मुख पसरुनि ग्रासितसे विश्व सकळ करी विवेक देशघडी ॥२॥
[आ]जचि निज स्वहित करी आळस न करी लवपळभजी **दा**सहि विनवीत घडीघडी॥

१. वयाच्या चाळिसाव्या वर्षाच्या सुमारास आलेली दृष्टीची मंदता, दृष्टिमांद्य. २. काळे. [३]. म्हातारा कोणाला म्हणावें हें येथें सांगितलें आहे. ४. 'साठी आणि बुद्धि नाठी,' अशी प्रचा[र]तील म्हण आहे. कोशकारांनीं या दासांच्या पंक्तीचा समावेश उदाहरणार्थ आपल्या कोशांत अ[वश]्य करावा. नाठी=नीच, हलकट, क्षुद्र. ५. वसासा=उसासा=उच्छ्वास=अतितृष्णा, धापा टा[क]णें, सुसकारा. ६. आयुष्य नाश पावतें.

### पद ३०३ रें.

राहिं राहिं माधवा! गृहीं राहीं रे! ॥ ध्रुवपद. ॥
तुज आवडे तें तें मी देइन रे! ।
तुजवांचुनि मज कोणी नाहीं रे! ॥ राहिं० ॥ १ ॥
अर्ध क्षण जरि तुज न पाहिलें, ।
मग मज गोड न लागे कांहीं रे! ॥ राहिं० ॥ २ ॥
पोटीं धरुनि म्हणे रडुं नको आतां ।
हास्य करुनि मजलागीं पाहीं रे! ॥ राहिं० ॥ ३ ॥
दास तुझे गोकुळवासी ।
यासि सुख देईं लवलाहीं रे! ॥ राहिं० ॥ ४ ॥

### पद ३०४ थें.

हरि मथुरेसि हो! चालिला । टाकुनियां गोकुळा. ॥ ध्रुवपद. ॥
येथें राहुनि काय करावें? । क्षण एक न गमे मला. ॥ हरि० ॥ १ ॥
अक्रूरानें सज्ज करुनि रथ । रामकृष्ण बसविला. ॥ हरि० ॥ २ ॥
मला वाटतें बरोबर जावें । होइल बहुत गलबला ॥ हरि० ॥ ३ ॥
जावा नणदा दीर अतिरागिट । काय करूं जीवाला ॥ हरि० ॥ ४ ॥
दास विनवी कर जोडुनियां । दे सुख त्या गोपींला ॥ हरि० ॥ ५ ॥

### पद ३०५ वें.

धांव माय! बहिणि! सख्ये! नंदकुमरि! गे! ।
येइना कशी तुला लाज माझी गे! ॥ ध्रुवपद. ॥
काम क्रोध मल्ल दैत्य बहुत माजले ।
कोण यांसि आवरील सांग शोकले! ।
क्षणत्रुटी वदनिं घेतां नाम चांगलें ।
काय मी वो! करूं आतां चित्त मोहिलें? ॥ धांव० ॥ १ ॥

---

१. त्वरेनें, लवकर. २. अक्रूरानें बलराम व कृष्ण यांस मथुरेस नेलें त्या वेळीं गोपींनीं केलेला विलाप. ३. उपास्य देवतेचा निर्देश स्त्रीलिंगेंकरून करण्याचा संप्रदाय सर्वप्रसिद्ध आहे. तुकारामादिक कवीही विठोबास 'विठाई' 'विठाबाई' वगैरे शब्दांनीं संबोधनपूर्वक आळवितात असे त्यांच्या काव्यांवरून दिसून येतें. असा परिपाठ संस्कृत काव्यांतही क्वचित् दृष्टीस पडतो. ४. 'शोकले' 'सखुले' इत्यादि लाडकीं नांवें आहेत. ५. अगदीं अल्पकाळ. त्रुटी=निमेषद्वयकाळ.

आशा ममता मोहपाशें ठेलें बांधुनी ।
घडिपल आयुष्य घटत झल्लरी ध्वनी ।
भवजलधी[1] दुर्घट हा केविं तरूं जनीं ? ।
नाहिं नाहिं अन्य हा उपाय तरणी गे ! ॥ धांव० ॥ २ ॥
गाति जन नाम 'दिनानाथ' सुस्वरीं ।
तरि तव दासा बिरुद[2] सत्य तूं करीं ।
विनउं किति सांग ? आतां जोडिल्या करीं ।
वाट तुझी पाहुं किती अनंतरूपि गे ! ॥ धांव० ॥ ३ ॥

## पद[3] ३०६ वें.

आम्हि अपराधी खरे विठोबा ! पतीतपावन[4] तूं रे ! ॥ ध्रुवपद. ॥
अपराधाच्या अपार रासी पहातां दृष्टि न पुरे, ।
साधु संत तव नाम सांगती स्मरतां दोष न उरे. ॥ आम्हि० ॥ १ ॥
तरला वाल्मिक नामें अजामिळ[5] गणिका[6] तरली कीं रे ? ।
चरणरजें[7] केलि दिव्य अहल्या[8] सीताकांतरघुवीरें. ॥ आम्हि० ॥ २ ॥
समुद्र मथितां रत्नें निघालीं चतुर्दश[9] प्रियकरें ।
विष घेउनियां सीतळ[10] केलें नामें तुझ्या सुंदरें. ॥ आम्हि० ॥ ३ ॥
शिळासेतु बांधिला सागरीं तारियलीं गिरिवरें ।
दास नवल म्हणे रावण मर्दुनि मुक्त केलीं सुरवरें[11]. ॥ आम्हि० ॥ ४ ॥

## पद ३०७ वें.

पाहुं चला मुकुंद, पाहुं चला मुकुंद, पाहुं चला मुकुंद. ।
बाई ! धरि आपुला छंद, मुरली वाजवितो मंद, गीत गातो गोविंद. ॥ ध्रुवपद. ॥
पावां वाजवितो गोपाळ, गळां शोभे वनमाळ[12], ।
कोटी तरणी[13] तेजाळ, कृष्ण देवकीचा बाळ वेगीं दावा हो ! ॥ पाहुं० ॥ १ ॥
करीं स्वतांचें कौज[14], न धरीं लौकिकाची लाज, ।
देह[15] विडंबिलें आज, पाहुं चला यदुराज ॥ पाहुं० ॥ २ ॥

---

१. भवसागर. २. बाणा, प्रतिज्ञा. ३. पृ० ४ टीप १ पहा. ४. पापी जनांस पावन करणारा. ५. पृ० ८१ टीप ४ पहा. ६. पद २९९ वरील टीप पहा. ७. पायांच्या धुळीनें. ८. अहल्या गोतम ऋषीच्या शापानें शिला झाली होती तिला रामाचा पाय लागतांच मानवदेही झाली. ९. चौदा रत्नें सुप्रसिद्ध आहेत. १०. शिवानें रामनामस्मरणानें आपल्या विषप्राशनानें झालेला देहाचा दाह शांत केला—या पौराणिक कथेवर लक्ष्य आहे. ११. देवश्रेष्ठ. १२. मागें पृ० ३२ टीप १ पहा. १३. सूर्य. १४. कार्य, काम. १५. 'देह' शब्द पुल्लिंग व नपुंसकलिंग आहे.

सांडी शरीराचा रंग, चित्त झालेंसे भंग, ।
धरा कृष्णजीचा संग, पाहुं चला श्रीरंग ॥ पाहुं० ॥ ३ ॥
रामदासाचि आस, जीव जाहला उदास, ।
धरूं मी कवणाची कास, सहज प्रकाश प्रगटला हो! ॥ पाहुं० ॥ ४ ॥

## पद ३०८ वें.

[1]धाडूं नको वनिं राम । कैकयी! ॥ ध्रुवपद. ॥
राज्यधनादिक सर्वही देतों । पशुदासांसह [2]धाम ॥ कैकयी० ॥ १ ॥
काकुळती मी फार करीतसें । [3]देहोधार श्याम ॥ कैकयी० ॥ २ ॥
दुष्टपणें मज न कष्टवावें । धरिसी [4]बुद्धिसी श्याम ॥ कैकयी० ॥ ३ ॥
येवढें महत्व या लोकीं । कां करिसी [5]दुर्नाम ॥ कैकयी० ॥ ४ ॥
हा [6]रामदासप्रभु वनीं जातां । होइन मी निर[7]भान ॥ कैकयी० ॥ ५ ॥

## पद ३०९ वें.

स्मर [8]हरमानसमोहन राम ॥ ध्रुवपद. ॥
दशरथनंदन, [9]दशमुखअंतक । अयोध्यापति श्याम. ॥ स्मर० ॥ १ ॥
जानकिप्रियकर, वानरस्वामी । भक्तजना सुखधाम. ॥ स्मर० ॥ २ ॥
[10]ऋषिमुखपालन बंधविमोचन । दास करी निष्काम. ॥ स्मर० ॥ ३ ॥

## पद ३१० वें.

राम भजें भज कृष्ण हरी हर सार्थक होय जिणें, ।
चुकविल [11]दुष्कृत दुस्तर पुनरपि गर्भदरीं निजणें. ॥ ध्रुवपद. ॥
देह अशाश्वत, वैभव चंचळ, शाश्वत मूर्खपणें, ।
निष्ठुर काळ सदा तुज लक्षी द्वारिं धरी [12]धरणें. ॥ राम० ॥ १ ॥
मृगजळ साच कसें परि होइल ऐक अतां श्रवणें ।
[13]वीज लवोनि सरे सुख, जाइल सर्व तुझें करणें. ॥ राम० ॥ २ ॥
वाल्मिक [14]कल्मष जाळित रावव तेंचि धरीं म्हणणें, ।
फिरती हें कीं [15]सांकडें तनुला जन्म जरा मरणें. ॥ राम० ॥ ३ ॥

---

१. या पदांत कैकयीच्या दुराग्रहास्तव रामास वनांत धाडतांना दशरथानें केलेला विलाप आहे. २. घर. ३. श्याम (काळ्या) देहाला धरणारा मी (दशरथ). ४. काळी बुद्धी धरणें=मनांत कपट वाळगणें. ५. बेअब्रू, बदलौकिक. ६. रामदास स्वामीचा प्रभु (स्वामी) राम. ७. 'जाईल माझा प्राण' असा अन्य पाठ आहे. ८. हराच्या मनाला मोहविणारा. ९. रावणहंता. १०. ऋषिप्रमुखाचें पालन करणारा. ११. पाप. १२. 'द्वारिं धरणें धरणें' हा शब्दसंप्रदाय कोशकारांस संग्रहणीय आहे. १३. अल्प काळांत—असा भाव. १४. पाप, पातक. १५. यातना, दुःख.

दास म्हणे मनभृंगरुपें करिं सेविं द्वय चरणें, ।
सावध सावध होईं जागृत उन्मनि होसि क्षणें. ॥ राम० ॥ ४ ॥

पद ३११ वें.

अभिमानी पूर्ण ब्रिदाचा, दासांचे लाड पाळी ।
कनुवाळ माय माझी, घडी घडी ते सांभाळी ॥ ध्रुवपद. ॥
अभिमानीं भरली हुंडी, मातेच्या लज्जेसाठीं ।
जीवविली पद्मावती, जयदेवा केली भेटी ।
.................................................. ।
बोलविला वेद रेडा, ज्ञानेश्वरवचनासाठीं ॥ अभिमानी० ॥ १ ॥
कबिराचे मागीं बैसे, जाठ्याचें शेत राखी ।
सुरदास मिराबाई, गुंतलासि त्यांचे भाकीं ।

---

१. सखर. २. बाण्याचा. ३. ही जयदेवकवीची महा पतिव्रता स्त्री. हिला जयदेव वारल्याची कोणी खोटी बातमी सांगितली ती ऐकून ही गतप्राण झाली. तेव्हां जयदेवानें अष्टपद्या गाण्यास आरंभ केला. त्या त्यानें इतक्या मधुर व करुणरसभरित गाइल्या कीं जवळच्या मनुष्यांसही गहिंवर आला. आठवी अष्टपदी सरतांच हिनें डोळे उघडिले व जयदेवास पाहून तीस अत्यानंद झाला. ४. 'प्रसन्नराघव' व 'गीतगोविंद' या ग्रंथांचा कर्ता. ५. मागें पृ० २ टीप १ व पृष्ट ३० टीप ७ पहा. ६. हा एक महान् साधू होऊन गेला. ह्याचा जन्म शके १०७० त काशींत झाला व शके १३७०त मगर येथें तो मरण पावला. ह्याच्या गुरूचें नांव रामानंद. ह्याचे श्रुतगोपाळ व धर्मदास हे दोघे पट्टशिष्य होते. ह्यानें 'शुकनिधान' या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. त्याशिवाय पदें व दोहरेही अनेक आहेत. हा मरण पावला त्या वेळेस त्याच्या अर्ध्या देहाच्या तुळशी व अर्ध्या देहाचा सब्जा झाला. साधुसंतांस भोजन देण्यासाठीं एका सावकाराकडे यानें आपली स्त्री गहाण ठेविली— इत्यादि आख्यायिका प्रसिद्धच आहेत. (भक्तविजय—अध्याय ५-६ पहा.) ७. हा भगवद्भक्त व हिंदीभाषेचा कवि होता. 'सूरसागर' हा ग्रंथ व कांहीं पदें त्यानें केलीं आहेत. ८. मिराबाईची कथा भक्तविजय—अध्याय ३८ यांत आहे ती अशी:—ही उदेपुर येथील एका राण्याची सुरूपसंपन्न कन्या होती. हिनें कोणाशीं लग्न न करितां श्रीकृष्ण हाच आपला पति मानून त्याची सेवा करूं लागली व साधुसंत पुरुषांबरोबर मोकळेपणानें भगवच्चर्चा करूं लागली; तेणेंकरून दुष्ट लोक राण्याची कुटाळकी करूं लागले. तेव्हां त्यानें हिला विष पिण्यासाठीं दिलें. त्याचें हिनें श्रीकृष्णास नैवेद्य दाखवून पान केलें. तेव्हां हिला कांहीं न होतां श्रीकृष्णाचा गळा मात्र निळा झाला. पुढें हिच्या प्रार्थनेनें श्रीकृष्णाचा गळा पूर्ववत् झाला. हिचीं हिंदीभाषेंत पदें बरींच आहेत. हिनें आपल्या पदांच्या शेवटीं 'मिराके प्रभु गिरिधर नागर' असा उल्लेख केला आहे. हीच कथा लोकहितवादीकृत ऐतिहासिक गोष्टी व उपयुक्त माहिती, भाग दुसरा, पृ० ६१-६२ यांत लिहिली आहे ती अशी:—मिराबाई ही मेरठ्याच्या (जोधपुर प्रांत) राजाची मुलगी असून ती उदेपूरच्या राजास दिली होती. तिची सासू देवीउपासक असून तिचें व सुनेचें बनेना, सबब तिजला राजवा-

पैठणीं एकनाथ, गंधाचा वाहे धाकी ।
शबरीचीं उच्छिष्ट बोरें, आवडीनें देव चाखी ॥ अभिमानी० ॥ २ ॥
बोधल्या तुकोबाची, दाविली साक्ष जगासीं ।
विसोबा खेचराचीं, पाऊलें देव सोशी ।
रामीं हो रामदासा, त्रिकाळीं दर्शन त्याचें ।
हें काय करणें त्याचें, सत्ता हो! भगवंताची ॥ अभिमानी० ॥ ३ ॥

## पद ३१२ वें.

प्रपंचपडदा पडली झांपड, राम दिसेना डोळां रे! ॥ ध्रुवपद. ॥
दिवसा निजूं निजूं रात्रीं निजूं निजूं। निज निज व्यर्थचि गेलें रे! ॥ प्रपंच० ॥ १ ॥
दिवसा झोंपीं रात्रीं झोंपीं । झोंपेन दिधला टोला रे! ॥ प्रपंच० ॥ २ ॥
रामदास म्हणे व्यर्थचि गेलें । सार्थक नाहीं केलें रे! ॥ प्रपंच० ॥ ३ ॥

## पद ३१३ वें.

साधन कांहीं तरि करीं रे! मना! तूं ॥ ध्रुवपद. ॥
चित्तीं स्फुरणा चिदात्मा धरिं खूण ।
चित्त निरोधुनी स्मर आपणा तूं ॥ साधन० ॥ १ ॥
धांवति वृत्ति विवेकें आंवरि रे!।
स्मरण धरुनि मागें पुढें आपणा तूं ॥ साधन० ॥ २ ॥
तन्मयपर हरी प्रिय सर्वात्मा ।
सतत भजन करिं दासपणें तूं ॥ साधन० ॥ ३ ॥

---

ड्यांतून काढून दिलें होतें. एकवेळ तर तिला राजानें (नवऱ्यानें) विष दिलें होतें, परंतु त्यापासून तिचें कांहीं झालें नाहीं! पुढें ती श्रीकृष्णाची भक्ति करून द्वारकेस व वृंदावनास यात्रा करी. नवऱ्यानें तिला नेमणूक करून दिली होती. पुढें उदेपुराहून तिला बोलावणें आलें. त्या वेळीं ती श्रीद्वारकेस देवाजवळ निरोप घेण्यास म्हणून गेली, व तेथें स्वरचित पद्यें म्हणूं लागली. तों द्वारकाधिशाचे मूर्तीचे दोन भाग होऊन मिराबाई त्यांत शिरली व ती मूर्ति पूर्ववत् जडून गेली! त्यानंतर उदेपुरास व द्वारकेस तिची मूर्ति बसविली आहे.

१. मागें पृ० २६ टीप ६ पहा. २. श्रमणा नामक शबरीचीं (भिल्लीणीचीं). ३. मागें पृ० ६९ टीप ८ पहा. ४. पृ० ६९ टीप ५ पहा. ५. नामदेवाचा गुरू. हा सराफीचा धंदा करणारा ब्राह्मण होता. ह्याच्या पायांखालीं सदैव सांबाची पिंडी असे. ६. चैतन्यस्वरूप परमेश्वर. ७. अडवून, कोंडून. ८. मनोवृत्ति. ९. विचारानें.

### पद ३१४ वें.

गुरुमुखें निजगुज जाण जाण ॥ ध्रुवपद. ॥

भासे जीवा अहंमति पुरतां । धांवे मन तेथें कोण कोण ॥ गु० ॥ १ ॥

[1]जाणिव वृत्तिस मानिशि आत्मा । निद्रेमाजि नसे कांहीं भान भान ॥ गु० ॥२॥

[2]अवस्थात्रयपर [3]तुर्य प्रकाशक । प्रत्यय स्वयें धरिं खूण खूण ॥ गु० ॥ ३ ॥

ज्या करितां दिसे अनंत चराचर । दासपणीं उरे तेंचि पूर्ण पूर्ण ॥ गु० ॥ ४ ॥

### पद ३१५ वें.

तो हा सज्जनधन, विठ्ठल आनंदघन ।

ब्रह्मादिक स्तविती ज्याच्या श्रीचरणीं अर्पूनि मन. ॥ ध्रुवपद. ॥

ये रीती प्रशांतज्ञानी परा भक्ती अनुसंधानीं ।

[4]दामाजी योगेश्वर अवघे येकसरें करिती ध्यान. ॥ तो० ॥ १ ॥

चिज्जड सारें विवेक वृत्ती सांख्ययोग विरोध मुखी ।

साधक या साधिति अभ्यासें, जें चिन्मात्र ज्ञान ॥ तो० ॥ २ ॥

दास भावी ज्याचे पाय, आन नेणेचि उपाय ।

ऐशाहीनें नाशति भक्ती म्हणऊनि बोले पण घालुन. ॥ तो० ॥ ३ ॥

### पद ३१६ वें.

माया रे ! अनिवार । हरि ! तुझी ॥ ध्रुवपद. ॥

[5]षड्रिपु वैरी मजला गांजिती । कसा तरेन भवपार ॥ हरि० ॥ १ ॥

पहूं जातां अंत न लागे । शेषहि थकला फार ॥ हरि० ॥ २ ॥

बाळकृष्णा ! कृपा करावी । दास विनवी वारंवार ॥ हरि० ॥ ३ ॥

### पद ३१७ वें.

काय सांगूं या समर्थाची थोरी । [6]भजकासी आपणाऐसा करी. ॥ ध्रुवपद. ॥

---

१. ज्ञान. २. जागृति, स्वप्न व सुषुप्ति. ३. तुर्येविषयीं मुकुंदराजकृत ग्रंथांत पुढील विवेचन आहे:—"तुर्येची परिपक्कता । तेचि उन्मनी अवस्था । निंबोळियांस मधुरता । जैसी पक्कदशें ॥१॥ तुर्या ते शुद्धवासना । तेथें हाची कडवटपणा । उन्मनी बुझ निर्वासना । म्हणूनि गोड ते ॥२॥ जैसी साकर उदकीं विरे । परी तेथिंची मधुरता उरे । तैसी तुर्या स्वरुपीं मुरे । ते उन्मनी गा ॥ ३ ॥ अवस्था पंचमा नास्ति । ऐसी हे वेदश्रुति । म्हणूनि तुर्येची परिणामस्थिती । ते उन्मनं कीं. ॥ ४ ॥" [विवेकसिंधु]. ४. मागें पृ० ६६ टीप ५ पहा. ५. कांम, क्रोध, मोह, मद, लोभ व मत्सर हे सहा शत्रु. ६. भक्तासी.

सद्गुरुराजा तन्मय छत्रपती । मज करोनि सेवे आदिपती ।
'सोऽहं'[1] शब्द सनद देऊनि हातीं । श्रीहाट[2] ठेविला मुद्रांकितीं हो ! ॥काय०॥१॥
अहंकाराचें दुर्ग आवरिलें । तयावरी मजला पाठविलें ।
पूर्वद्वारें त्रिकुट[3] देखियेलें । रजदृष्टी ब्रह्यासि जिंकियेलें हो ! ॥ काय० ॥ २ ॥
तेथुनि ऊर्ध्वपंथें पश्चिममार्ग पाहें । सत्वगुणी श्रीहाटीं विष्णु आहे ।
तया वळंघोनि वरुता जाय । तम गोल्हाटीं[4] रुद्र दिसताहे हो ! ॥ काय० ॥३॥
ज्ञानशस्त्र घेवोनियां हातीं । केली तमोअज्ञानाची शांती ।
पुण्यगिरी तेथुनी देखे पुढती । शुद्ध अधिष्ठानी विश्वमूर्ती हो ! ॥ काय० ॥ ४॥
उभा राहोनि तया गिरिवरी । देखे भ्रमरगुंफा गडदवोवरी ।
औटपीठावरुती शोभे बरी । परमानंद आहे तया घरीं हो ! ॥ काय० ॥ ५ ॥
बोध बळिया प्रवेशलों तेथें । अहंकार जाहला वाताहत ।
विजय दुंदुभी वाजती अनुहात । ब्रह्मदृष्टींत पावलों निज विश्रांत हो ! ॥काय०॥६॥
भक्तिनिशाण चढविलें वरी । जे कां ब्रह्म भासत चराचरीं ।
रामनाम गर्जती जयजयकारीं । दासपणा न उरे तेथें उरी हो ! ॥ काय० ॥७॥

**पद ३१८ वें.**

नवल[6] नेणों कोणी तूं सांग ब्रह्मज्ञानी. ॥ ध्रुवपद ॥
चहुं रंगावेगळी गाय दुभते माझ्या घरीं ।
मांजर बाई ! चोरटें मोठें टपलें लोण्यावरी. ॥ नवल० ॥ १ ॥
लोण्याकडे मांजर टपलें पाहिं गे ! उमाबाई ! ।
लोण्यानें तें मांजर खादलें[7] नवल सांगों काई ? ॥ नवल० ॥ २ ॥
आकाशीं करुनि कुमार तिघे पुत्र व्याली ।
पुत्राचें तें लग्न नाहीं आपण बाइल झाली. ॥ नवल० ॥ ३ ॥
बायको कशी दादल्यासकट[8] पांच पुत्र व्याली ।
तेथोनियां वोसें[9] करुनि मुळचे घरा आली. ॥ नवल० ॥ ४ ॥
दास करी आस तुझी मिथ्या सकळ माया ।
केशवाचि कृपा झाली न ढळे अमरकाया. ॥ नवल० ॥ ५ ॥

---

१. 'तो मी' अशी. २. पृ० १७ टीप ३ पहा. ३. श्रीहाट, गोल्हाट व लक्षाट यां.. त्रिकूट म्हणतात. ४. पृ० १७ टीप ४ पहा. ५. १ तुळजापूर, १ माहूर, १ कोल्हापूर, ½ सप्तशृंग [पृ० ६५ पद १३१ कडवें ५ पहा.] ६. हें कूटपदांपैकीं आहे. ७. खाल्लें. [हेंच क्रियापद पद २१९ मध्यें आहे.] ८. नवऱ्यासह. ९. ओसाड, उजाड.

### पद ३१९ वें.

आणुनि दे सखे! कृष्ण घराला। विरहानळें देह तप्तचि झाला. ॥ध्रुवपद.॥
कृष्णसख्याविण उद्वस[1] वाटे। काय करूं तनधनसदनाला ॥ आणु० ॥ १ ॥
मीनें[2] जळाविण तैसी मी झालें। इच्छित चातक जेंवि घनाला ॥ आणु० ॥२॥
दास म्हणे मज आस नसे दुजी। दाखविं पदद्वय यदुकुलकमला! ॥आणु०॥३॥

### पद ३२० वें.

भावें संतसमागमें राहीं. ॥ ध्रुवपद. ॥
मूर्तिमंत ईशअवतार समजुनि। वेळोवेळीं पायीं ठेविं डोई. ॥भावें० ॥ १ ॥
कृपाकटाक्ष ज्ञान ध्यानपर सर्व सिद्धी। भागवती अंतीं गति लाहीं[3]. ॥भावें०॥२॥
दास अवंचक सतत करोनी। भक्ति न सोडी सहसाही. ॥ भावें० ॥ ३ ॥

### पद ३२१ वें.

व्यर्थ या जन्मासि आलों, ऐसें वाटे देवा! रे!।
तुझिया प्रीतीलागीं कांहीं, नाहीं घडली सेवा रे! ॥ ध्रुवपद. ॥
पोटीं इंद्रियपोषणाची, इच्छा मोठी धनमानाची।
केली दांभिक भक्ती तेथें, कैंचा प्रसाद मेवा रे! ॥ व्यर्थ० ॥ १ ॥
दास तुझा म्हणवायास, लज्जा अंतरीं जीवास।
धरिली तुझी दृढ कांस, पांडुरंगा देवा! रे! ॥ व्यर्थ० ॥ २ ॥

### पद ३२२ वें.

आतां तरि भज भज हरी सुखधाम[4]. ॥ ध्रुवपद. ॥
श्रवणिं मननिं बहु किति तरि शिणशिल। न घडेचि कधिं विश्राम[5]॥आतां०॥१॥
ध्यान धरुनि बहू धरिशि धारणा। तुटतिल सकळहि काम ॥ आतां० ॥ २ ॥
हरि जगमय निरतिशय जाणुनि। दासा भजनिं आराम[6] ॥ आतां० ॥ ३ ॥

### पद ३२३ वें.

ध्यानीं प्रगटावें भुवनसुंदरा! ॥ ध्रुवपद. ॥
श्रमलों मी बहू योगसाधनीं। नाटोपे मन कांहीं गुरुवरा! ॥ ध्यानीं० ॥ १ ॥
अचिंत्य चिन्मय विग्रह[7] तुजला। चिंतावें किति तरी सुखकरा! ॥ध्यानीं०॥२॥
निजदासाचें कोडें[8] पुरविता। तुजविण कोण असे श्रीवरा[9]! ॥ ध्यानीं० ॥३॥

---

१. ओसाड, भयाण. २. मासा. ३. मिळवीं. ४. सौख्यसदन. ५. सुख, विसांवा. ६ विश्राम, विसांवा. ७. देह. ८. कौतुक पुरविणारा. ९. श्रीपते!

### पद ३२४ वें.

मजला उद्धरिं सद्गुरुनाथ, तूं मायबाप दीनांचा ॥ ध्रुवपद. ॥
माझा सद्गुरुब्रह्मानंद । दाविला निजस्वरुपीं आनंद ।
मी बहु झालों परमानंद । लागला छंद गुरुचरणीं. ॥ मजला० ॥१॥
कामक्रोधमदमत्सर । हेचि दैत्य परम दुर्धर ।
यांनीं गांजिलें मज फार । करिं [1]संहार [2]येयांचा ॥ मजला० ॥ २ ॥
मी मज गेलों होतों विसरून । नाहीं स्वरूपाची ओळखण ।
तुझिये चरणप्रसादें करून । झालों लीन मजमाजीं ॥ मजला० ॥३॥
दास सांगतसे सर्वांस । दृढ तुम्ही धरा या पायांस ।
चुकेल तुमचा हो ! भवपाश । सोडा आस सर्वांची ॥ मजला० ॥४॥

### पद ३२५ वें.

माझे सद्गुरुनाथे ! आई ! । तूंचि व्यापक सर्वांठायीं. ॥ ध्रुवपद. ॥
तूंचि ब्रह्मारूपें झाली । उत्सृजी क्रम हा व्याली ।
हें न जाणत कितिएक मेलीं । मजसारिखे मरणप्रवाहीं ॥माझे० ॥१॥
तूंचि विष्णुरूप होऊन । [3]प्रतिपाळिसि सर्वीं आपण ।
मजकरितां होसि सगुण । सर्वश्रेष्ठत्व तुझ्या ठायीं ॥ माझे० ॥ २ ॥
तूंचि [4]रुद्ररूप साचार । करि सृष्टयादिक [5]संहार ।
तुझे पराक्रम अतिथोर । [6]नेणे कोणी [7]भुवनत्रयीं ॥ माझे०॥ ३ ॥
दास म्हणे हो ! कर जोडून । तोडीं जन्ममरणबंधन ।
माझि हेचि विनंति तुजलागुन । दृढनिश्चयेंसि तव पायीं.॥माझे०॥४॥

### पद ३२६ वें.

तें हें ब्रह्म [8]विटेवरि नटलें । बाळकृष्ण रूप [9]थिटलें ॥ ध्रुवपद. ॥
मज चरणिं दृढनिश्चय धरितां । भवबंधनदुःख सुटलें ॥ तें हें० ॥१॥
दर्शन करितां पाप पळालें । काळाचें बळ खुटलें ॥ तें हें० ॥ २ ॥
दास म्हणे मज प्रेमळ झालें । प्रेमरसें नाम नटलें ॥ तें हें० ॥ ३ ॥

---

१. नाश. २. यांचा. ३. सांभाळ करिसी. ४. शंकर. ५. नाश. ६. जाणत नाहीं. ७. स्वर्ग, मृत्यु व पाताळ यांत. ८. पृ० २१ टीप पहा. ९. लहानसें, छोटेंसें.

## पद ३२७ वें.

चातुर चातुरसे चटका. ॥ ध्रुवपद. ॥
एक एक गुणपरवाडी डारूं । तत मेरी तोरींगये तटका ॥ चातुर० ॥ १ ॥
सुनत देखत गुण प्रगट लोकनमे । अजब लागे चटका ॥ चातुर० ॥ २ ॥
रामदास साही सब घटव्यापक । आनंदकी घटका ॥ चातुर० ॥ ३ ॥

## पद ३२८ वें.

रघुराजके दरबार घमडी गाजतु है ॥ ध्रुवपद. ॥
तथैथैथै पेखवाज वाजतु है । सुरवर मुनिवर देखन आवतु है ॥ रघु० ॥ १ ॥
नारद तुंबर किन्नर सुरवर गावतु है । शंख भेरी सुनके रोमें थरकतु है ॥रघु०॥२
लाल धुसर तवके उडावतु है । रामदास तहां बलि ज्यावतु है ॥ रघु० ॥ ३ ॥

## पद ३२९ वें.

नैनंनमो रघुबीर । ललामो रे! ॥ ध्रुवपद. ॥
ललित तनु नव नागरलीला । जब तब देखत थीर ॥ लला० ॥ १ ॥
कर शरचाप सलिलजलोचन । ठाँड भये रणधीर ॥ लला० ॥ २ ॥
रामदास की प्रेमकी पीरित । नैनंन झरपत नीर ॥ लला० ॥ ३ ॥

## पद ३३० वें.

मियां! मनु आसा लगावे वो! ॥ ध्रुवपद. ॥
मिलना है तो मिललेरी गोरी! । मिलन जीव न दासा ॥मियां०॥१॥

## पद ३३१ वें.

हात चक्र और त्रिशुल बिराजे अलख जगाउं तिरनगरीमें ।
श्रीकृष्णके दर्शन कारन आये सदाशिव गोकुलमें ॥ ध्रुवपद. ॥
जटामुगुटसे बहती गंगा चंद्रमा जीके अपारे ।
गले भुजंगकी माल बिराजे रूप बना है अधीक रे! ॥
शेष नाग जब रहा लपटके, आलम भक्ती दुर्धर रे! ।
कोन मुलुखसे आया जोगी देखा गोकुल नगर रे! ॥
आपहि ब्रह्मा आपहि बिष्णु आपहि निरहंकार रे! ।
जिनकी काया वोही जाने, उनकी माया अपरंपार रे! ॥
खडरस्तेसे अलख जगाता आया भोला शंकर रे! ।
धवले नंदीपर बैठा महादेव चलके आये नगर रे! ॥ हात० ॥ १ ॥

---

१. विचित्र, चमत्कारिक. २. मृदंग. ३. देवश्रेष्ठ. ४. केंस. ५. डोळ्यांमध्यें. ६. सलिलज+लोचन=कमल+नयन. ७. उभे राहिले. ८. प्रीति, आवड. ९. डोळ्यांतून. १०. पाणी. ११. सर्पाची.

आलम[1] सारा देख तमासा धाक पडा सब गोकुलमें ।
आवाज करतें, सवाल करते, गये नंदके महालमें ॥
माता जसोदा बैठी महालमें आवाज उतरा कानोंमें ।
आवाज सुनके सवाल सुनके खडी रही दरवाजामें ॥
धर जोगीका[2] सुरुप देखती, विचार करती है मनमें ।
थाली[3] भरके कंचन[4] लायी, 'लेव बावाजी! झोलीमें.' ॥
महादेव कहते, 'हम नहिं लेते, तुम ले जाव अपने घरमें ।
चार खूंटका[5] सोना चांदी भरा हमारे झोलीमें ॥
मानिक मोतीं पाच पितांबर जो चाहेसो है घरमें ।
जलदी लाव माई! बालक तेरा दर्शन कर आया काशीमें' ॥हात०॥ २ ॥
कहे जसोदा, 'सुन बावाजी! यह बात तो नहिं होनेकी, ।
कलका जन्मा बालक मेरा बाहेर तो नाहिं लानेकी ॥
सुरत तुमारी काली पीली नजर तुमारी बादलकी ।
मेरा बालक डरके मर जाय, नजर[6] लगी कोइ पापिनकी ॥
इस नगरीमें बहूत बालक जा सुरत[7] देख उनकी ।
अजान[8] तानक[9] बालक मेरा खबर नहीं कोई तनमनकी' ॥ हात० ॥ ३ ॥
कहे बावाजी, 'सुनो जसोदा! तेरा बालक नहीं डरनेका ।
तीन लोगको वोही डरायगा[10], दाता है त्रिभुवनका ॥
ऐसा बालक कभी न जन्मे काम सुदारो कैकोंका[11] ।
नारद तुंबर सनक सनंदन मुनी नाम लेत श्रीकिसनका' ॥ हात० ॥ ४ ॥
जब दिलमें यह समझी जशोदा ले आयी श्रीकिसनकू ।
चार हस्त चक्रधर मूर्ति देखो पद्मा ती सोहे[12] उनकू ॥
भयीं दोनोंकी नजरा नजरी संसार माया संसारकू ।
हंसकर[13] बोले ज्योंहि सदाशिव जनम लिया गौलीघरकू ॥
अनंत कालमें दोनों मिलके खबर नहीं कुइ तनमनकू ।
लगी ज्योतसे ज्योत निरंजन निराकार कहे नाम उनकू ॥

---

१. जग, लोक. २. जोगी, बैरागी. ३. ताट भरून सोनें आणलें. ४. सोनें. ५. मुलूख. ६. कोण्या पापिणीची दृष्टि लागेल. ७. तोंड, चेहरा. ८. अज्ञान. ९. तान्हा. १०. तीन लोकांना तोच भय घालणारा. ११. पुष्कळ लोकांचें काम सुधारणारा (चांगलें करणारा) बालक कधीं जन्मणार नाहीं. १२. शोभे. १३. हंसून.

रामदास भजन बोले तेरा नाम सबके घटमें ।
हात चक्र और त्रिशुल बिराजे अलख जगाउं तिरनगरीमें ॥ ५ ॥

### पद ३३२ वें.

मांबुजाननं मांबुजाननं मांबुजाननं मांबु देहि मे ॥ ध्रुवपद. ॥
योगिरंजनं चापभंजनं[1] । जनकजापतिं विश्वमोहनं ॥ मांबुजा० ॥ १ ॥
त्रिबुधकारणं शोकहारणं । अरिकुलांतकं भयनिवारणं ॥ मांबुजा० ॥२॥
जयकृपालयं दासपालयं । चरणपंकजं[2] देहि मे लयं ॥ मांबुजा० ॥ ३ ॥

---

## केशवस्वामीकृत[3] पदें.

### पद ३३३ वें.

भगवद्भक्तविरोधी । तो मज मानेना मानेना. ॥ ध्रुवपद. ॥
प्रपंच बरवा बोधी । तारक मार्ग निषेधी ।
असत्समागम वेधी । ................ ॥ तो० ॥ १ ॥
विचारमंदिर पाडी । कोरुनि[4] संशय काढी ।
भूतदयांबर फाडी । केली दुर्मती गाढी ॥ तो० ॥ २ ॥
अकर्मपंथें चाले । जाणपणें बहु डोले, ।
शमदम परते केले । कोण तयाशीं न बोले ॥ तो० ॥ ३ ॥
गुणमयिचें घर वसवी । नसती चिंता डसवी ।
रतिपति[5] अंतरिं वसवी । सर्वसखा हरि रुसवी ॥ तो० ॥ ४ ॥
सज्जनचरणा न लवे । प्रबोधपानें न निवे ।
सर्वगताप्रति न शिवे । केशवप्रभुचें रूप जो नव्हे ॥ तो० ॥ ५ ॥

---

१. शिवचापभंजनं. २. पदकमलं. ३. हा कवि रामदासपंचायतनांतील प्रख्यात साधु होय. हा भागानगर (निजाम हैद्राबाद) येथील राहणारा. याच्या गुरूचें नांव काशीराजस्वामी. यानें 'एकादशीचरित्र' हा ओंवीबद्ध ग्रंथ केला आहे व कांहीं पदें व अभंगही केले आहेत. हा जातीचा महाराष्ट्र ब्राह्मण. हा शके १५५० मध्यें होता. हा समाधिस्थ कधीं झाला हें समजत नाहीं. ह्याची समाधी कलबुर्गा येथें आहे. मोरोपंतानें ह्या कवीविषयीं उल्लेख 'सन्मणिमालें'त केला आहे. तो असा:—'मजवरि दया करो तो ब्रह्मज्ञ, ख्यात, केशवस्वामी । मागतसें हरिचरणस्मृतिवर या नमुनि केशवस्वा मी ॥ ९ ॥' ह्या कविविषयीं जास्ती माहिती 'रामदासचरित्र,' 'भरतखंडाचा अर्वाचीन कोश,' 'केशवस्वामीकृत पदें व अभंग' इत्यादि पुस्तकांत पहावी. ४. अत्यंत सूक्ष्म शंका घेणें. ५. मदन.

### पद ३३४ वें.

तंववरी सुख नाहीं सुख नाहीं. ॥ ध्रुवपद. ॥

सज्जनसेवा न करी । श्रवणीं आवडी न धरी ।
उसळे ममता लहरी । आठवेना निज श्रीहरी ॥ तंव० ॥ १ ॥
'हरि हरि' न म्हणे वाचे । देहबुद्धि घेउनि नाचे ।
द्वैत विकारें ज्याचें । निजात्म विसरे साचें ॥ तंव० ॥ २ ॥
उपाधि पहातां भुलतो । भले भले म्हणतां खुलतो ।
परोक्षज्ञानें उलतो । अनुभवावांचुनि डुलतो ॥ तंव० ॥ ३ ॥
असन्मानें तळमळी । विषयवासना खळबळी ।
अंतरीं मीपण वळवळी । हर्षामर्षें डळमळी ॥ तंव० ॥ ४ ॥
मत्सर चित्तीं खेळे । विकल्पकर्दमीं[1] लोळे ।
त्रितापअनलें पोळे । निजरूपीं नुघडी डोळे ॥ तंव० ॥ ५ ॥
सद्गुरुभजनीं लाजे । भ्रमांबुपानें[2] माजे ।
संकट पडतां गाजे । जाणपणें बहु माजे. ॥ तंव० ॥ ६ ॥
भेदगिरीवरि वेंघे । तरलों म्हणुनी सांगे ।
अद्वय निद्रा नेघे । केशवप्रभुचें रूप नव्हे आंगें. ॥ तंव० ॥ ७ ॥

### पद ३३५ वें.

विवेक जागा केला । म्हणुनी सुख झालें सुख झालें ॥ ध्रुवपद. ॥

भेद भयंकर मेला । संशय अवघा गेला ।
आत्मा होउनि ठेला । ................ ॥ म्हणु० ॥ १ ॥
परतें केलें कामा[3] । हृदयीं धरिलें रामा ।
आलों मंगलधामा । मीपण नकळे आम्हां ॥ म्हणु० ॥ २ ॥
सरली मायाममता । अंतरीं भरली समता ।
निज गति आली हातां । प्रकाशलीसे समता ॥ म्हणु० ॥ ३ ॥
अनुभवतरुवरि चढलों । समाधिडोहीं बुडलों ।
अद्वय रामीं जडलों । स्वयंप्रकाशें घडलों ॥ म्हणु० ॥ ४ ॥
जिताचि सुटलों पाहीं । उपाधि उरली नाहीं ।
निश्चल आपुल्या ठायीं । केशव कांहींबाहीं ॥ म्हणु० ॥ ५ ॥

---

१. विकल्परूप चिखलांत. २. भ्रम हेंच अंबु (जल) त्याच्या प्राशनानें. ३. इच्छा; विषयवासना.

## पद ३३६ वें.

तो मज बहु माने बहु माने ॥ ध्रुवपद. ॥.
नाठवि धन सुत दारा । आवरिला मन वारा ।
नेणे कामविकारा । गुरुपदिं केला थारा ॥ तो० ॥ १ ॥
साधुशिं हृद्गत सांगे । ब्रह्म सनातन मागे ।
अक्षय पंथा लागे । असंग होउनि जागे ॥ तो० ॥ २ ॥
चिन्मय तीर्थी राहे । देव निरंतर पाहे ।
गर्जन तर्जन साहे । केवळ निजसुख लाहे ॥ तो० ॥ ३ ॥
साधक म्हणुनी नेणे । सिद्ध मी ऐसें न म्हणे ।
सर्वहि ब्रह्मचि जाणे । परम दशा हे बाणे ॥ तो० ॥ ४ ॥
वाग्विलासपण सोडी । सर्वही गर्व ओढी ।
अद्वय संपत्ति जोडी । अखंड घे निज गोडी ॥ तो० ॥ ५ ॥
अव्यक्त मुद्रा त्याला । अक्षय भजनें जाला ।
मुळिंचे ठाया आला । केशवस्वामी झाला ॥ तो० ॥ ६ ॥

## पद ३३७ वें.

आहे तेंही ब्रह्म नाहीं तेंही ब्रह्म ब्रह्मची अवघें जाणा ।
कल्पना योग सरती मागें परी न मुकती ब्रह्मपणा ॥ ध्रुवपद. ॥
मी ब्रह्म झालों म्हणों आतां तरी ब्रह्म नव्हे ऐसें कायी ।
ब्रह्मेवीण आन[1] न दिसे कांहीं दिसे तितुकें ब्रह्म पाहीं ।
होय नव्हे ऐसा संशयची नाहीं निश्चयेंशीं तेंची आहे ।
भेदाभेद आतां तेथें कैचें जग आत्मास्थिती नांदताहे ॥ आहे० ॥ १ ॥
वर्णाश्रमधर्म[3] साच मानुनीयां यथाविधी आचरती ।
स्वमताचा देहीं अभिमान धरुनियां पृथक् पृथक् वाद करिती ।
पाषांडाच्या बळें होती तोंडागळे भेदची साच म्हणती ।
आम्ही ब्रह्म नव्हे म्हणती सर्वथा तरी ब्रह्मरूपेंची आहती ॥ आहे० ॥ २ ॥
जळची लवणा वेगळें दिसे, परी वेगळेंची नाहीं जाण ।
तैसें आदीमध्येंअंतीं ब्रह्मची असे तेथें कैंचें न्यून पूर्ण ।
कर्ता कर्म जें अभिन्न झालें तेथें बद्ध आणि मुक्त कवण ।
गुरुकृपें केशवीं ऐक्य म्हणों तरी मुळींच नाहीं भिन्नपण ॥ आहे० ॥ ३ ॥

---

१. शाश्वत. २. अन्य. ३. चारवर्णांचे आणि आश्रमाचे नेमलेले आचारधर्म.

## पद ३३८ वें.

धन्य ते ज्ञानी धन्य ते ज्ञानी धन्य ते हरिभक्त योगी ।
देही असोनी विदेही झाले, त्यासी नाहीं त्रिगुण मागी ॥ ध्रुवपद.॥
जनवन विजन हरिरूप आपण जाणोनी राहिलें पाहीं ।
पाहातें पहाणें ग्रासुनियां देख निवालें आपुल्या ठायीं ।
स्वानंदाचें सुख सर्वदां सेविती क्रीडती आनंदडोहीं ।
यापरी अनुभवीं अनुभवें लाधलें भवबंध त्यालागीं नाहीं ॥ धन्य०॥ १ ॥
निजबोधें परी पूर्णत्वें संचलें अखंड दंडायमान ।
उदोअस्तु दोनी गिळुनी राहिले नेणती भेदाचें भान ।
ब्रह्मा धरुनी मशालावरी देखतीं वस्तु समान ।
भिन्नाभिन्न भान सांडुनी समूळ सर्वांसीं वंदिती जाण ॥ धन्य०॥ २ ॥
ब्रह्म होउनियां ब्रह्मीं लीन होणें वृत्तीविण उत्साह ।
माझें तुझें हें नाठविच कांहीं राहिले भावाभाव ।
मनाचें मूळ अमूळ झालें राहिला देहभाव ।
गुरुकृपें केशवीं यापरि अनुभवी भोगिती अनुभव ॥ धन्य०॥ ३ ॥

## पद ३३९ वें.

ते खुण वेगळी बा! येथें विरळा जाणे ।
जाणीव ग्रासिली हो! त्यासीं बाणेतरीं बाणे ॥ ध्रुवपद. ॥
वेदांतशास्त्रवक्ता अतिनिःसीम पाहीं ।
सिद्धांत बोलतांही उरी न ठेवी कांहीं ।
लयलक्ष ध्यान मुद्रा दावी आपुल्या ठायीं ।
वेडेवेडे चार केले तरी मोक्ष तो नाहीं ॥ ते० ॥ १ ॥
अष्टांग योग जाणे जाणे मंत्र यंत्र कला ।
लक्षांश चुकला कीं भाग्यमंद आंधळा ।
.................................................. ।
मी कोण हेंची न कळणें कळा सर्व विकळा ॥ ते० ॥ २ ॥
सारांश हाचि निका तुम्हीं सावध ऐका ।
मोक्षासीं मिळवी तें वर्म आतुडें फुका ।
देउनी चित्त संतां निजतत्व ओळखा ।
जिताची सुटका हो! प्राप्ती केशवीं देखा ॥ ते० ॥ ३ ॥

## पद ३४० वें.

लटकी अविद्या माया रे! । लटकी द्वैत भ्रांती रे! ।
लटिका जीव शीव भाव लटिके स्वर्ग नरक प्राप्ती रे! ॥ १ ॥
संचित क्रियमाण रे! । लटिकें झालें जाण रे! ।
लटिकें प्रारब्ध मजला सद्गुरुची आण रे! ॥ २ ॥
लटिके वर्णाश्रम रे! । लटिकें क्रिया कर्म रे! ।
अवघें लटिकें झालें केशव पहातां परब्रह्म रे! ॥ ३ ॥

## पद ३४१ वें.

त्याचा बालक मी बालक मी ॥ ध्रुवपद. ॥
निःशब्द शब्दीं बोले । मीपण ग्रासोनी डोले ।
संशय विलया नेले । जड जीवां चिद्घन केलें. ॥ त्याचा० ॥ १ ॥
मंगळ समचिर[1] नेसे । निजपदिं निश्चळ बैसे ।
सहजीं सहज विलसे । अपार तोषें हासे ॥ त्याचा० ॥ २ ॥
परम परात्पर सेवी । सुखघनीं आवडी ठेवी ।
भोगी अद्वय देवी । न करी उठवाठेवी ॥ त्याचा० ॥ ३ ॥
अखंड उघडा झाला । निजांगें लेणें त्याला ।
मुळिंच्या ठायां आला । निगम[2] स्तविता झाला ॥ त्याचा० ॥ ४ ॥
निर्मळ होउनि वागे । एकपणेंविण जागे ।
निजपदिं निद्रा लागे । केशव प्रभुशीं सांगे. ॥ त्याचा० ॥ ५ ॥

## पद ३४२ वें.

ऐसे जाणती ते योगी । परमानंद भोगी ॥ ध्रुवपद. ॥
समाधिनिर्णयींचा निर्धार । तोची साक्षात्कार ॥ ऐसे० ॥ १ ॥
समाधि हरपली जे ठायीं । तोची आत्माराम पाहीं ॥ ऐसे० ॥ २ ॥
समाधि ग्रासुनि सुख घेणें । केशवस्वामी होणें ॥ ऐसे० ॥ ३ ॥

## पद ३४३ वें.

संतसमागम काशी रे! । क्षणभर वस्तिशि जासी रे! ।
हरती पातकराशी रे! । पावशि ब्रह्मपदासीं रे ॥ ध्रुवपद. ॥

---

१. वसन. २. वेद.

गुरुचरणीं मन ठेवुनियां । भजन रसायण सेवुनियां ।
चिन्मय लेणें लेउनियां । राहसि तन्मय होउनियां ॥ संत० ॥ १ ॥
गुरुचरणींचा वासी[1] रे! । समाधि त्याची दासी रे! ।
पदोपदीं त्या काशी रे! । बोले केशव जोशी रे! ॥ संत० ॥ २ ॥

## पद ३४४ वें.

अनुतापें जो राहे । म्हणउनि वानप्रस्थ ॥ ध्रुवपद. ॥
सकळ सहता आहे । म्हणउनि वानप्रस्थ ॥ १ ॥
सहजस्थितीची सोय । म्हणउनि वानप्रस्थ ॥ २ ॥
निरंजनीं जो राहे । म्हणउनि वानप्रस्थ ॥ ३ ॥
निर्विषयीं जो होय । म्हणउनि वानप्रस्थ ॥ ४ ॥
देहदंडणीं होय । म्हणउनि वानप्रस्थ ॥ ५ ॥
सकळ फळें जो खाय । म्हणउनि वानप्रस्थ ॥ ६ ॥
आत्मप्राप्तीची सोय । म्हणउनि वानप्रस्थ ॥ ७ ॥
ज्ञानाग्नी तपताहे । म्हणउनि वानप्रस्थ ॥ ८ ॥
केशवीं सुख लाहे । म्हणउनि वानप्रस्थ ॥ ९ ॥

## पद ३४५ वें.

काम्यकर्म[2] हा त्याग करी । तो सन्याशी ॥ ध्रुवपद. ॥
त्रिताप अग्नीपासुनी च्युत । तो सन्याशी ॥ १ ॥
जन्म कर्म होउनी टाकी । तो सन्याशी ॥ २ ॥
आपणा आपण पिंड देतो । तो सन्याशी ॥ ३ ॥
सुखसूत्र सांडी हेतु । तो सन्याशी ॥ ४ ॥
मुक्तपणेसीं स्नान करी । तो सन्याशी ॥ ५ ॥
'ब्रह्मैवाहं' भिक्षा सेवी । तो सन्याशी ॥ ६ ॥
पुनः पुनः अनुतापें शुद्ध । तो सन्याशी ॥ ७ ॥
ऐक्यरूपें एकांतीं राहे । तो सन्याशी ॥ ८ ॥
केशवीं अनुभव लाहे । तो सन्याशी ॥ ९ ॥

## पद ३४६ वें.

विठोबा! आवरीं आपुली माव ॥ ध्रुवपद. ॥
आपल्या सालें शहाणे झालों । अजुनी कां अभाव ॥ विठोबा० ॥ १ ॥

---

१. वास करणारा. २. इष्ट फल देणारें कर्म, इच्छा धरून केलेलें कर्म.

दुसऱ्यासीं जें कष्टी करणें । पहावा हा उत्साह ॥ विठोबा० ॥ २ ॥
केशवीं हे नीति नव्हे कीं । सोडी हा स्वभाव ॥ विठोबा० ॥ ३ ॥

## पद ३४७ वें.

हरिगुणछंदा नाठवि कंदा । विषयकंदा भुलले जे ॥ ध्रुवपद.॥
जन्माशीं आले वायांची गेले । जींहीं नाहीं केलें आत्महित ॥ हरि० ॥ १ ॥
मी माझें म्हणतां वय गेलें वृथा । विवेक पुरता करीचिना ॥ हरि० ॥ २ ॥
वाचेशिं नाम अंतरीं प्रेम । न साधी यमनियमादिक ॥ हरि० ॥ ३ ॥
गुरुतें शरण होउनियां जाण । श्रीहरिध्यान न साधीलें ॥ हरि० ॥ ४ ॥
पळ एक घडी नेघेची गोडी । केशवीं जोडी[1] गमाविली ॥ हरि० ॥ ५ ॥

## पद ३४८ वें.

फटफट प्राण्या! काय केलें । वय गमाविलें ॥
सार्थक आपुलें नाहीं केलें । नरदेह वायां गेलें ॥ ध्रुवपद. ॥
बालत्वांत कांहीं न केलें । तारुण्यीं सर्वही केलें ।
तेंही विषयभोगीं नेलें । अशक्त वृद्धीं झालें ॥ फट० ॥ १ ॥
'मी मी' माझें म्हणोनी भ्रमलें । सावध नव्हे वहिलें ।
कोण मी हें न पाहिलें । प्रपंचीं भुललें ॥ फट० ॥ २ ॥
शरण श्रीगुरूस नाहीं गेलें । शमदम वर्जीयेलें ।
भक्ति विरक्ति न धरियेलें । केशवीं न पाहिलें ॥ फट० ॥ ३ ॥

## पद ३४९ वें.

अवघें दर्शन कीं दर्शन कीं । व्यापक हरि हा सर्वही लोकीं. ॥ ध्रुवपद ॥
रवि शशि मृगजल दिसे । तैसा स्वरूपीं जगदाभासे ॥ अवघें० ॥ १ ॥
शम दम साधन करितां । दर्शन होतें वृत्ती स्थिरतां ॥ अवघें० ॥ २ ॥
हेमीं नग हे होती तैसी । केशवीं आनंदज्योती ॥ अवघें० ॥ ३ ॥

## पद ३५० वें.

आतां भय नाहीं, भय नाहीं । स्वरुपीं जडलों पाहीं ॥ ध्रुवपद. ॥
मी मज होतों चुकलों । श्रीगुरुरायें धरुनी दिधलों ॥ आतां० ॥ १ ॥
मी माझ्या उगमा आलों । तळ अंतर बाह्य आपण भरलों ॥ आतां० ॥ २ ॥
यमनियमीं आरूढलों । केशवीं आनंदरूप घडलों ॥ आतां० ॥ ३ ॥

---

१. संगति, प्राप्ति, सहवसति.

## पद ३५१ वें.

काय ध्यावें बा! काय टाकावें । जें जें पाहावें तें स्वरूप स्वभावें ॥ ध्रु०॥
जलामाजी बुडवीतां कुंभ पाहे । आंत बाहेर उदक अवघें आहे ॥ काय०॥१॥
जिकडे जाय तिकडे आकाश आहे । तैसा सर्वव्यापक हरी पाहे ॥काय०॥२॥
उंच नीच वर्णावर्णभेद । संत असंत म्हणणें तोची बाध ॥ काय० ॥ ३ ॥
आपणावांचूनि सृष्टींत दुजें नाहीं । ऐसा अनुभवी तोची मुक्त पाहीं॥का०॥४॥
दृश्यादृश्य अवघा हरी पाहीं । केशवीं पाहातां तों खंडची नाहीं ॥काय०॥५॥

## पद ३५२ वें.

हरि जवळीच आहे । मनीं विचारुनी पाहें ॥ ध्रुवपद ॥
महावाक्य[1] विवरूनी । तत्वें तत्वा निरसुनी पाहें ॥ हरि० ॥ १ ॥
शमदम साधनें वृत्ती स्थिरावून । हरीचें दर्शन तेथें होय ॥ हरि०॥ २ ॥
अंतरीं तोची बाहेर तोची । केशवीं पाहातां आनंद लाहे ॥ हरि०॥ ३ ॥

## पद ३५३ वें.

अवघा हरि एक हरि एक । नाहीं दुसरें देख ॥ ध्रुवपद. ॥
कनकचि नगासि[2] आलें । तैसें स्वरुपीं जग हें झालें ॥ अवघा० ॥ १ ॥
उदकीं तरंग होती । तैसी ब्रह्मीं जग उत्पत्ति ॥ अवघा० ॥ २ ॥
जलची जैं सागर । तैसा हरि हा विश्वाकार ॥ अवघा० ॥ ३ ॥
तंतूचि पट हा होय । तद्वत् केशव सर्वही पाहे ॥ अवघा० ॥ ४ ॥

## पद ३५४ वें.

तैसा परमात्मा परमात्मा । व्यापक नभवत् आत्मा ॥ ध्रुवपद. ॥
नाना घट मठ दिसती । पृथ्वी आदी मध्य अंतीं ॥ तैसा० ॥ १ ॥
बुंद्बुदे तरंग लहरी । परि ते एकचि जैसें वारी[3] ॥ तैसा० ॥ २ ॥
प्रकाश रश्मी[4] पाहतां । मिळोनि एकचि जैसा सविता[5] ॥ तैसा०॥ ३ ॥
नानावर्णीं मात्रा दिसती । आकारावांचुनी शब्दचि नुठती ॥ तैसा०॥४॥
नाना जिव हे जाण । परि तें एकचि अंतःकरण ॥ तैसा० ॥ ५ ॥
विचरे सर्वांठायीं । वायो अलिप्तरूपें पाहीं ॥ तैसा० ॥ ६ ॥
देहीं अनेक वृत्ती । केशवीं स्वसुखीं एकची होती ॥ तैसा० ॥ ७ ॥

---

१. 'तत्त्वमसि' 'ब्रह्मेदं सर्वम्' या उपनिषद्वचनांस महावाक्य म्हणतात, कारण यांत महातत्त्वाचें प्रतिपादन आहे. २. अलंकारास. ३. उदक. ४. किरण. ५. सूर्य.

## पद ३५५ वें.

ते हे मुळमाया मुळमाया । नाना दावित काया. ॥ ध्रुवपद. ॥
रविरश्मीं[1] मृगजळ झाली । कनकीं नगत्वें शोभा आली ॥ ते हे० ॥ १ ॥
रज्जु अहिवत्[2] दावी । शुक्ती ठायीं रजत[3] अभावी ॥ ते हे० ॥ २ ॥
उदकीं तरंग लहरी । पृथ्वी नानाघट आकरी ॥ ते हे० ॥ ३ ॥
अरंग आकाशीं । चमकत चपला[4] तेथें कैशी ॥ ते हे० ॥ ४ ॥
जाणिव मीपण देहीं । केशवीं तें भिन्नची नाहीं ॥ ते हे० ॥ ५ ॥

## पद ३५६ वें.

त्याला सुख कैंचें सुख कैंचें ? । विषयीं मन हें ज्याचें ॥ ध्रुवपद. ॥
क्षुश्वळ[5] देहा मानित सार[6] । जेणें विवेकसार असार ॥ त्याला० ॥ १ ॥
कोण मी कोठील न करि विचार । प्रपंचसुख हें मिरवित फार ॥ त्याला० ॥२॥
पोटाखालीं वय हें दवडी । न धरी सत्संगीं आवडी ॥ त्याला० ॥ ३ ॥
मुषका टपत जैसा बोका । निशिदिनिं चिंतित तैसा पैका ॥ त्याला० ॥ ४ ॥
चटपट गोष्टी बोले । अनुभव नाहीं उगाचि डोले ॥ त्याला० ॥ ५ ॥
मी मी माझें मोहें भ्रमला । केशवस्वामी नाहीं कळला ॥ त्याला० ॥ ६ ॥

## पद ३५७ वें.

दृश्यातीत रे ! सदोदीत रे ! । भगवंत रे ! नांदे नित्य रे ! ॥ ध्रुवपद. ॥
पाहे डोळां रे ! वेळोवेळां रे ! । तरीच भोगिसी सुखसोळा रे ! ॥ दृश्या० ॥१॥
रूपेंवीण रे ! परिपूर्ण रे ! । नारायण रे ! असें जाण रे ! ॥ दृश्या० ॥ २ ॥
विश्व प्रकाश रे ! पाहें परेश रे ! । केशव सांगतसे उपदेश रे ! ॥ दृश्या० ॥३॥

## पद ३५८ वें.

गुरुच्या एका बोलें । मीपण[7] माझें गेलें ।
निज रूपें देखीलें । सुखरुप मन हें झालें ॥ ध्रुवपद. ॥
काय मी वर्णूं आतां । श्रीगुरु दिनानाथा ? ।
ठेवितां चरणीं माथां । स्वरूप आलें हातां ॥ गुरुच्या० ॥ १ ॥
ओळंगतां गुरुराव । निरसतो देहभाव ।
प्रपंच झाला वाव । जन्म मरण नाहीं ठाव ॥ गुरुच्या० ॥ २ ॥
सद्गुरुकृपें पाहीं । निज प्राप्ति याच देहीं ।
निगम वृत्ती ठायीं । केशवीं उरी नाहीं ॥ गुरुच्या० ॥ ३ ॥

---

१. सूर्यकिरणीं. २. सर्पप्रमाणें. ३. रुपें. ४. वीज. ५. क्षुद्र, नीच. ६. श्रेष्ठ, थोर. ७. अहंता, अहंपणा.

## पद ३५९ वें.

तारक दिक्षा देउनियां । भजनीं कर्णें लाउनियां ॥ ध्रुवपद. ॥
रक्षा वेगीं मज रक्षा । दाउनि केवळ अपरोक्षा ॥ तारक० ॥ १ ॥
शम दम संपत्ति देउनियां । अलक्ष्य भुवना नेउनियां ॥ तारक० ॥ २ ॥
मीपण निपटुनि घेउनियां । म्हणे केशव केशव देउनियां ॥ तारक० ॥ ३ ।

## पद ३६० वें.

येईं बा ! तूं येईं बा ! । उचलोनि कडिये घेईं बा ! ॥ ध्रुवपद. ॥
अचल सुखाच्या दातारा । सकल जनाच्या उद्धारा ॥ येईं० ॥ १ ॥
अचिंत्य भुवना मज नेईं । अलक्ष्यलाभाप्रति देईं ॥ येईं० ॥ २ ॥
विश्व माना निज माना । म्हणे केशव मुनिजन निधाना ॥ येईं० ॥ ३ ।

## पद ३६१ वें.

निश्चल झालें मन माझें । केली दया निज गुरुराजें ॥ ध्रुवपद. ॥
विचारदीपक लावुनियां । राम हिरा करिं घेउनियां ॥ निश्चल० ॥ १ ॥
गोपति परती ठेउनियां । गोपति बरवा सेवुनियां ॥ निश्चल० ॥ २ ॥
अक्रिय ठाया नेउनियां । म्हणे केशव केशव होउनियां ॥ निश्चल०॥३।

## पद ३६२ वें.

चिन्मयतीर्थी नाहलों मी । हरिपदिं निश्चल झालों मी ॥ ध्रुवपद. ॥
गुरुचा बालक होउनियां । भजन प्रयोगा येउनियां ॥ चिन्मय० ॥ १ ॥
अक्षय निजवच्छायेशीं । हारविलें मोहमायेशीं ॥ चिन्मय० ॥ २ ॥
श्रद्धाश्राद्ध करूनियां । केशव मीपण हरूनियां ॥ चिन्मय० ॥ ३ ॥

## पद ३६३ वें.

दीनदयाळ धनी माझा । प्राणविसांवा गुरुराजा ॥ ध्रुवपद. ॥
भेटतसे मज भेटतसे । परमानंद मनीं दाटतसे ॥ दीन० ॥ १ ॥
मन भय जाल निवारक हा । संशय सागर तारक हा ॥ दीन० ॥ २ ॥
सकळ श्रमाचा नाशक हा । म्हणे केशव अक्षय तोषक हा ॥ दीन० ॥ ३

## पद ३६४ वें.

भज रे ! मना ! भवनाशक हा । अंतर्ज्योतिप्रकाशक हा ॥ ध्रुवपद. ॥
निज पद गौरवदायक हा । पंडित मंगल नायक हा ॥ भज० ॥ १ ॥

जन्म मरण भयदर्पक हा । अलभ्य लाभविवर्धक हा ॥ भज० ॥ २ ॥
गोवर्धनगतिभक्षक हा । म्हणे केशव त्रिभुवनरक्षक हा॰॥ भज० ॥ ३ ॥

## पद ३६५ वें.

[1]संविती हृदयाप्रति आली । साधन संपत्ति दुरी झाली ॥ ध्रुवपद. ॥
हरला हरला शीण माझा । फळला तारक गुरुराजा ॥ संविती० ॥ १ ॥
सबाह्य राघव भरलासे । कर्मसमुच्चय सरलासे. ॥ संविती० ॥ २ ॥
आनंद अंतीं झालों । केशवस्वामी मी झालों ॥ संविती० ॥ ३ ॥

## पद ३६६ वें.

विचार काशी केली रे ! । सर्वेही माया गेली रे ! ॥ ध्रुवपद. ॥
पावन झालों आम्हीं रे ! । स्थिरावलों निजधामीं रे ! ॥ विचार० ॥ १ ॥
अनुभव गंगेमाझारीं । [2]मज्जन घडलें [3]निर्धारीं ॥ विचार० ॥ २ ॥
त्रिपुटी ग्रासुनि शिव पाहें । म्हणे केशव अद्वयपदीं राहें ॥ विचार० ॥३॥

## पद ३६७ वें.

[4]भवार्णवासीं भ्याना कां । [5]संतसभेसीं याना कां ? ॥ ध्रुवपद. ॥
मीपण [6]सांडुनी ध्याना कां । चिन्[7]मय राघव ध्याना कां ॥ भवा० ॥ १ ॥
निरंजनभुवना जाना कां । सर्व क्रिया वर्जाना कां ॥ भवा० ॥ २ ॥
मतिविण [8]संविती ल्याना कां । केशवस्वामी व्हाना कां ॥ भवा० ॥ ३ ॥

## पद ३६८ वें.

तुझी मूर्ती हृदया आली रे ! । [9]सम्यग्गति मज जाली रे!॥ध्रुवपद.॥
जालें रे! सुख जालें रे! । अद्वय वैभव आलें रे ! ॥ तुझी० ॥ १ ॥
मंगलधामा निज रामा ! । अखंड भजतां तुज आम्हां ॥ तुझी० ॥ २ ॥
केशवस्वामी कळलासी । वळलासी अति फळलासी ॥ तुझी० ॥ ३ ॥

## पद ३६९ वें.

म्हणउनि पावन जालों मी । पूर्ण सुखें निवालों मी ॥ ध्रुवपद. ॥
संतसमागम मज घडला । आनंदघन हरी सांपडला ॥ म्हण० ॥ १ ॥

---

१. ज्ञान, जागृति. २. स्नान. ३. निश्चयानें. ४. भव+अर्णव=संसार+सागर. ५. 'संतसेवेसी' असा अन्य पाठ. ६. 'टाकुनी' अन्य पाठ. ७. 'रामरसायण प्याना' असा पाठभेद आहे. ८. 'सुगती' असा अन्य पाठ. ९. उत्तम गति.

सबाह्य अंतरीं हरी पाहों । मीपण[1] ग्रासोनी स्थिर राहों ॥ म्हण० ॥ २ ॥
मति गति परती मति जाली । म्हणे केशव चवचवी आली ॥ म्हण० ॥ ३ ॥

## पद ३७० वें.

म्हणउनीया गति न घडे रे ! । निज सुख ठायीं न पडे रे ! ॥ ध्रुवपद. ॥
भैवहर[2] शंकर सेविसि ना । हृदयसरोजीं[3] ठेविशिना ॥ म्हण० ॥ १ ॥
श्रवणें मननें विवळीसीना । अमल प्रयोगें निवळीसीना ॥ म्हण० ॥ २ ॥
जाणीव नेणीव सोडीसीना । म्हणे केशव केशव जोडीसीना ॥ म्हण० ३ ॥

## पद ३७१ वें.

फळला रे ! मज फळला रे ! । सर्वही राघव कळला रे ! ॥ ध्रुवपद. ॥
जगजीवनगतिनाशक हा । सम्यग्बोधप्रकाशक हा ॥ फळला० ॥ १ ॥
विचारसागर नागर हा । परम मनोहर शंकर हा ॥ फळला० ॥ २ ॥
केवळ मंगळदायक हा । तारक केशव नायक हा ॥ फळला० ॥ ३ ॥

## पद ३७२ वें.

काम कुनाम हा सारावा । भेद भयंकर मारावा ॥ ध्रुवपद. ॥
तारावा जन तारावा । शोकभयनिधि वारावा ॥ काम० ॥ १ ॥
संशय गिरिवर उडवावा । कामसमुच्चय बुडवावा ॥ काम० ॥ २ ॥
विश्रमयोगें श्रम न्यावा । म्हणे केशव प्रभु मनिं ध्यावा ॥ काम० ॥ ३ ॥

## पद ३७३ वें.

राम सैनातन[4] वरिजे रे ! । अपार माया तरिजे रे ! ॥ ध्रुवपद. ॥
क्षणक्षणा कां मरिजे रे ! । सज्जन सेवा करिजे रे ! ॥ राम० ॥ १ ॥
कवळुनियां हरी धरिजे रे ! । प्रेमरसें जन भरिजे रे ! ॥ राम० ॥ २ ॥
जाणीव नेणीव हरिजे रे ! । म्हणे केशव केशव वरिजे रे ! ॥ राम० ॥ ३ ॥

## पद ३७४ वें.

अखंड आम्हीं तुज पाहों । उपाधि निरसुनी स्थिर राहों ॥ ध्रुवपद. ॥
रमणीय नामा सुखधामा । स्वयंप्रकाशा निजरामा ॥ अखंड० ॥ १ ॥
सकळ विकारातितसारा । अविकारा निजदातारा ॥ अखंड० ॥ २ ॥
अतिमंगळ केशव कैमनीया[5] । म्हणे केशव सैज्जनभजनीया[6] ॥ अखंड० ॥ ३ ॥

---

१. अहंता. २. संसारनाशक. ३. कमळांत. ४. शाश्वत, सदोदित. ५. रमणीया. ६. सज्जनांनीं भजन करण्यास योग्य.

## पद ३७५ वें.

अखंड खंडेराया! रे! । भजनें दुरि करिं माया रे! ॥ ध्रुवपद. ॥
म्हणउनि पायां लागतसें । अक्षय निजपद मागतसें ॥ अखंड० ॥ १ ॥
प्रपंच[१] मन्मथ मल्लारी । त्रिपुरारी मम श्रम वारी ॥ अखंड० ॥ २ ॥
देउनि तारकपद सेवा । केवल मंगल करिं देवा ॥ अखंड० ॥ ३ ॥
निश्चळ ठेउनि त्रिकाळीं । अतिगतीनें मज सांभाळीं ॥ अखंड० ॥ ४ ॥
प्रेमपुराप्रति मज नेंई । म्हणे केशव अद्वय निज [२]देही ॥ अखंड० ॥ ५ ॥

## पद ३७६ वें.

गुरुनें कृपा केली गा! । चिंता ममता गेली गा! ॥ ध्रुवपद. ॥
अवघा भासे आनंद । अवलोकितां गोविंद ॥ गुरुनें० ॥ १ ॥
देहबुद्धी गेली लया । मिळणी होतां चिन्मया ॥ गुरुनें० ॥ २ ॥
केशव म्हणे गुरुकृपा । ऐक्य झालें स्वरूपा ॥ गुरुनें० ॥ ३ ॥

## पद ३७७ वें.

गुरुच्या वचनें मेलों गा! । असत्य जीवें गेलों गा! ॥ ध्रुवपद. ॥
मरोनि झालों पैं आम्हीं । जिताचि मेलों श्रीरामीं ॥ गुरुच्या० ॥ १ ॥
मीपण माझें हारपलें । पूर्व अवघें पालटलें ॥ गुरुच्या० ॥ २ ॥
केशव म्हणे गुरुवचनीं । [३]समरस झालों चिद्गगनीं ॥ गुरुच्या० ॥ ३ ॥

## पद ३७८ वें.

गुरुमूर्तिचा पट गा गा! । भाग्यें झाला मज पैं गा! ॥ ध्रुवपद. ॥
आतां न तीयें कवणासीं । अभय झालें आम्हासी ॥ गुरु० ॥ १ ॥
असेन भलते ठायीं गा! । परि मन हें गुरुच्या पायीं गा! ॥ गुरु० ॥ २ ॥
केशव म्हणे गुरुराया! । सगळी ओपिली हे [४]काया! ॥ गुरु० ॥ ३ ॥

## पद ३७९ वें.

रतलों तरलों जैं आम्हीं । जिताची मुक्त गुरुरामीं ॥ ध्रुवपद. ॥
सद्गुरु हृदयीं भरला गा! । मनोरथ माझा पुरला गा! ॥ रतलों० ॥ १ ॥
पहातां गुरुचें निजरूप । सबाह्य झालों सुखरूप ॥ रतलों० ॥ २ ॥
केशव म्हणे गुरुभक्ती । पायां लागति निजमुक्ती ॥ रतलों० ॥ ३ ॥

---

१. 'प्रचंड' असा अन्य पाठ. २. 'सुख देईं' असा अन्य पाठ. ३. तन्मय, एकमय. ४. देह.

## पद ३८० वें.

मनोरथ माझा पुरवीयेला । संदेह नाहीं उरवीयेला ॥ ध्रुवपद. ॥
सुखरुप केलें मज पैं गा! । काय मी वर्णू गुरुला गा! ॥ मनोरथ० ॥ १ ॥
उतराई मी नव्हें कांहीं । म्हणोनि लागतसें पायीं ॥ मनोरथ०॥ २ ॥
केशव म्हणे गुरु अद्वया । निजपदीं ठेवियेली काया[1] ॥ मनोरथ० ॥ ३ ॥

## पद ३८१ वें.

अवघें झालें परब्रह्म । हाता आलें निजवर्म ॥ ध्रुवपद. ॥
गुरुच्या एका बोलें गा! । मीपण[2] माझें गेलें गा! ॥ अवघें ॥ १ ॥
जें मी पाहें स्वरूप । तें मज भासे निजरूप ॥ अवघें० ॥ २ ॥
पावलों त्या स्वरूपा । केशव म्हणे गुरुकृपा ॥ अवघें० ॥ ३ ॥

## पद ३८२ वें.

अवघें माझें सरलें गा! । परी सद्गुरुभजन उरलें गा! ॥ ध्रुवपद. ॥
ज्ञानही परतें सांडीन मी । परि गुरुपदीं आसन मांडीन मी! ॥अवघें०॥ १॥
विकारशून्य गुरुरायो । भजतां नाठवे देहभावो ॥ अवघें० ॥ २ ॥
केशव म्हणे निजदाता । तत्पदीं बुडी देइन आतां ॥ अवघें० ॥ ३ ॥

## पद ३८३ वें.

सुखसिंधूच्या पोटा आलों । आम्हीं सुखचंद्र जालों ॥ ध्रुवपद. ॥
माझें अंग मज गोड वाटे । सेवीं तंव तंव आनंद दाटे ॥ सुख० ॥ १ ॥
मज पाववुनी नामबोध । तोही स्वानंदें स्वरूपीं वेध ॥ सुख० ॥ २ ॥
अंग ग्रासोनी अनंग[3] झालों । म्हणे केशव अंगींच धालों[4] ॥ सुख० ॥ ३ ॥

## पद ३८४ वें.

किती आळसी जालेती । व्यर्थ तोंडीं घाला माती ॥ ध्रुवपद ॥
कां रे! सत्वर उठाना! । राजा राम कां लुटाना? ॥ किती० ॥ १ ॥
राम निजबोधें ओळखाना? । मोक्ष शब्दज्ञानें माना ॥ किती० ॥ २ ॥
राम स्वानंदें कवळाना । तन्मय केशवराजीं कां व्हाना ॥ किती० ॥ ३ ॥

## पद ३८५ वें.

तेथें स्वामी पहुडला सोयरा । तेथें नाहीं दृश्याचें देखणें ॥ ध्रुवपद. ॥

---

१. शरीर. २. अहंपण. ३. अंगरहित. ४. तृप्त झालों.

अष्टभावमंचक साजीरा । वरी शांती शेजे हे अवधारा ।
विज्ञान पुष्पीं अखंड निर्धारा । जेथें माझ्या स्वामीचें पहुडणें ॥ तेथें०॥१॥
स्वानुभूती स्वामीची अंतुरी । अखंड प्रेमें रळी यातें करी ॥
क्रीडेलागीं अलक्ष्य वोवरी । आत्मक्रीडा होतसे अंतरी ॥ तेथें० ॥ २ ॥
चैतन्याचे दीप प्रकाशती । स्वानंदाचीं भूषणें शोभती ॥
सहजाचे उपभोग भोगीती । आपेआप स्वलीला रमती ॥ तेथें० ॥ ३ ॥
स्वबोधाचीं कपाटें दिधलीं । माजी प्रकृती पुरुष एकलीं ॥
आत्मसुख भोगासीं रतलीं । गुरुकृपें केशवीं वंदीलीं ॥ तेथें० ॥ ४ ॥

**पद ३८६ वें.**

सद्गुरुराया ! रे ! सखया ! श्रीगुरुराया! रे ! ।
श्रवणें मननें अद्वय भजनें हरिली माया रे ॥ ध्रुवपद. ॥

---

१. अष्ट सात्विक भाव. सात्विकभाव—हे शरीरविकार आहेत, यांचे चार भेद मानतात. ते असे:—"१ **कायिक** २ **मानसिक** ३ **आहार्य** आणि ४ **सात्विक.** (१) **कायिक**–शरीराचे जे चलनवलनादि व्यापार, आणि मनोविकार उत्पन्न झाल्यावर मुखावर होणारीं त्या त्या मनोविकारास योग्य अशीं चिन्हें. हे सर्व कायिकअनुभाव होत. (२) **मानसिक**–जसा मनोविकार उत्पन्न झाला असेल किंवा नाटकांत पात्रास त्या त्या प्रसंगीं जो मनोविकार उत्पन्न झाल्याचें अभिनयानें दाखवावें लागतें, तशी मनाची स्थिति असल्याचें दाखविणें किंवा ब्रह्मानंद समाधि इत्यादिक. (३) **आहार्य**–वेष धरून अभिनयद्वारा जें भाव तें. जसें:—विष्णूचें सोंग घेऊन चतुर्भुज होणें, सोंड लावून गणपति होणें, इत्यादिक. ह्याचा नाटकांत मात्र उपयोग आहे. (४) **सात्विक**–सत्वगुणापासून उत्पन्न होणारे जे शारीरिक विकार ते. हे आठ आहेत. त्यांचीं नांवें व लक्षणें. (१) स्तंभ.–शारीरिक सर्व धर्म कायम असतां कांहीं कारणांनीं अकस्मात् गतिनिरोध होतो तो. (२) स्वेद.–घाम श्रमापासून उत्पन्न झालेला असला तर तो सात्विकभावांत गणला जाणार नाहीं; कारण तो मनोविकाराचें कार्य नव्हे. (३) रोमांच.–क्रोध, भय, हर्ष, राग, इत्यादिकांपासून अंगावर कांटे उभे राहतात ते. (४) स्वरभंग.–आवाज बदलणें. सर्दी झाली असतां जो आवाज बदलतो तो मनोविकारजनित नसल्यामुळें स्वरभंग समजूं नये. (५) वेपथु.–अंगास कंप सुटणें. हर्ष, भीति इत्यादिकांपासून हा होतो. साधारण एखाद्या वेळीं अंग कांपूं लागतें त्यास वेपथु म्हणत नाहींत; कारण तो कंप मनोविकारापासून उत्पन्न झालेला नसतो. (६) वैवर्ण्य.–शरीराचा रंग पालटणें. (७) अश्रू.–स्पष्टच आहे. (८) प्रलय.–चेष्टानिरोध. स्तंभांत गतिनिरोध असतो, व ह्यांत चेष्टानिरोध असतो. निद्रेंतही चेष्टानिरोध आणि गतिनिरोध असतो; पण तो मनोविकारजनित नसल्यामुळें तेथें स्तंभ किंवा प्रलय मानीत नाहींत. येणेंप्रमाणें हे आठ सात्विकभाव आहेत." [रसप्रबोध–पृष्ठ ६-८ पहा.] ३. निजणें. २. शय्या (हें 'रूपक' फार सुंदर आहे.) ४. स्त्री. ५. थट्टा. ६. प्रकृति आणि पुरुष यांच्या संयोगानें हें सर्व जगत् निर्माण झालें आहे असें सांख्यमत आहे.

मस्तकिं हस्तक ठेऊनियां वनमाळी दाखविला ।
संशयजाळी जाळुनी वेगें हरीरस चाखविला ॥ सद्गुरु० ॥ १ ॥
अक्रिय गतीनें संम्यक् रीतीनें अपार निववीलें ॥
विवेक परता सारुनि ताता ! जिवेंवीण जिवविलें ॥ सद्गुरु० ॥ २ ॥
मंगलवदना ! मंगलसदना ! गतिविण पावविलें ॥
केशव म्हणे मज केशव देउनी गुरुपदीं नांदविलें ॥ सद्गुरु० ॥ ३ ॥

### पद ३८७ वें.

धन्य जालों वो! बाई ! धन्य जालों वो ! ॥
देखीयेला राम मनेंविण धालों वो ! ॥ ध्रुवपद. ॥
पूर्वपुण्य सकल माझें सफल झालें आजी, ।
सांपडला रामचंद्र संतसभेमाजी ॥ धन्य० ॥ १ ॥
व्यष्टीसमष्टीसीं राम दिसे दृष्टी ।
रामरायाविण नाहीं दुजी गोष्टी ॥ धन्य० ॥ २ ॥
केशवराज स्वामी सबाह्य अंतर्यामीं ।
आलिंगितां मुक्त आम्हीं सहज सर्व कामीं ॥ धन्य ॥ ३ ॥

### पद ३८८ वें.

आम्हीं हरि पाहूं हरि पाहूं । निश्चळ होउनी राहूं ॥ ध्रुवपद ॥
सांडुनी कर्णकुचाळे । राहों विवेक मंडप शाळे ॥ आम्हीं० ॥ १ ॥
निवृत्ति दरकुटीमाजी । अद्वयआसन घालुनी आजी ॥ आम्हीं० ॥२॥
सबाह्य अंतर्यामीं । नित्य निरामय केशवस्वामी ॥ आम्हीं० ॥ ३ ॥

### पद ३८९ वें.

त्यांचें तोंड नका पाहूं । त्यांचेजवळी नका राहूं ॥ ध्रुवपद. ॥
भजनहीन भांडा । त्या काळमुख्या रांडा ॥ त्यांचें० ॥ १ ॥
त्या वाढविती झिंगा । घालीती धांगडधिंगा ॥ त्यांचें० ॥ २ ॥
केशव म्हणे पाहीं । घरबुडी त्याच्या पायीं ॥ त्यांचें० ॥ ३ ॥

### पद ३९० वें.

मज मी सांपडलों सांपडलों । गुरुपदीं जाउनी जडलों ॥ ध्रुवपद. ॥
हातीं घेऊनी बोध दिवटी । पहातां सर्वेची शेवटीं ॥ मज० ॥ १ ॥

---

१. उत्तम. २. 'दाउनी' अन्य पाठ. ३. तृप्त झालों. ४. चित्तांत. ५. 'दरडीमाजी' असाही पाठ आढळतो. ६. घराचा नाश.

तीनी पेणें उल्लंघीतां । चवथें नगरीं राहूं जातां ॥ मज० ॥ २ ॥
पूर्ण आनंदाचा प्रताप । केशवीं तो आपोआप ॥ मज० ॥ ३ ॥

## पद ३९१ वें.

जाली मज माधवीं ओळखी ॥ ध्रुवपद. ॥
[1]पदकंजीं गुंजारव मानसें । गुंतुनी होय सुखी ॥ जाली० ॥ १ ॥
संतश्रोतीं सांगीतली खूण । तिहुनी कोण सुखी? ॥ जाली० ॥ २ ॥
केशव प्रभू करुणाघन चिद्घन । कोटी अनंग नखी ॥ जाली० ॥ ३॥

## पद ३९२ वें.

अनन्य केलें बा! गुरुराया! । हरली सकळ माया ॥ ध्रुवपद. ॥
त्रिपुटी ग्रासुनियां सुख देशी । प्राणविसावा होशी ॥ अनन्य० ॥ १ ॥
चिंता ममता हे तंव नेणें । सर्वही राघव जाणे ॥ अनन्य० ॥ २ ॥
केशवस्वामीच्या दातारा । स्वरुपीं दिधला थारा ॥ अनन्य० ॥ ३ ॥

## पद ३९३ वें.

कोणा भित नाहीं भित नाहीं, । भेदचि गिळिला पाहीं ॥ ध्रुवपद. ॥
उघड समाधि भोगी । मोठा निर्दय जाला योगी ॥ कोणा० ॥ १ ॥
चित्सुख पर्वत झाला । कांहीं उपाय न चले त्याला ॥ कोणा० ॥ २ ॥
अक्षय पदींचा राजा । केशव म्हणे [2]जनिता माझा ॥ कोणा० ॥ ३ ॥

## पद ३९४ वें.

सुख आलें सुखा । तुम्हीं राम लुटा फुका ॥ ध्रुवपद. ॥
लुट मोठी पाहीं । तंव घेणार कोणी नाहीं ॥ सुख० ॥ १ ॥
ज्ञानगर्वें जातां । तंव लुट नये हातां ॥ सुख० ॥ २ ॥
केशव म्हणे उठा । तुम्हीं साधुसंग लुटा ॥ सुख० ॥ ३ ॥

## पद ३९५ वें.

धांव विभो! करुणाकर! माधव! देव! दयानिधे! देवकीनंदन ॥ ध्रुवपद. ॥
हे [3]करुणाकर! दीनजनोद्धर! हा भव दुस्तर ह्यांतुनि उद्धर ॥ धांव० ॥ १ ॥
काममदादिक गांजिति हे अति धांव रमापति! सेवकहितकर! ॥ धांव० ॥ २ ॥
जननमरणभय हरण करीं त्वरें चरणिं शरण तव केशव [4]किंकर ॥ धांव० ॥ ३ ॥

---

१. चरणकमलीं. २. पिता, जनक. ३. करुणेचा आकर (खाण). ४. चाकर.

### पद ३९६ वें.

तो मज अठवतो गुरुराजा । प्राणविसांवा माझा ॥ ध्रुवपद. ।
श्रवणीं पाजुनियां अमृत । मस्तकिं ठेऊनि हस्त ॥ तो० ॥ १ ॥
विवेकसिंधूचीं चिद्रत्नें । लेवविलीं मज यत्नें ॥ तो० ॥ २ ॥
अखंड देउनियां स्मरणाशीं । द्वैतभयातें नाशी ॥ तो० ॥ ३ ॥
अक्षयप्राप्तीचा सुखदाता[1] । केशव म्हणे आतां ॥ तो० ॥ ४ ॥

### पद ३९७ वें.

घडिघडिघडि चरण तुझे आठवती रामा ! ।
आसनिं शयनिं भोजनिं गमनिं छंद तुझा आम्हां ॥ ध्रुवपद. ॥
दृश्यातीत पूर्णब्रह्म नित्य निर्विकारा ।
अंबुजदल[2]नयन मुनीमानसविहारा ॥ घडि० ॥ १ ॥
सर्वसाक्षि सर्वोत्तम सर्व गुरुरूपा ।
प्रेमचित्ता सौख्यसिंधू दशरथकुलदीपा ॥ घडि० ॥ २ ॥
मात तात भ्रा[3]त नाथ तूंचि एक पाहीं ।
के[4]शव म्हणे करिं कृपा शरण तुझ्या पायीं ॥ घडि० ॥ ३ ॥

### पद ३९८ वें.

नमन तूर्येच्या चरणांला । अनुभव जोगवा घाला ॥ ध्रुवपद. ।
लेउनी सत्वाचें भूषण । इथवरी जाहलें येणें ॥ नमन० ॥ १ ॥
शमदम परडी हे वेउनियां । विवेकदीप लाउनियां ॥ नमन० ॥ २
अखंड गोंधळ हा त्रिकाळीं । प्रपंचस्नेह जाळीं ॥ नमन० ॥ ३ ॥
केशवस्वामीची मूळमाता । प्रसन्न जहाली आतां ॥ नमन० ॥ ४

### पद ३९९ वें.

आतां मी नये बाई ! नये बाई ! । पु[5]नरपि या संसारा ॥ ध्रुवपद.
प्रपंच घ[6]रधणी घरधणी । वाईट याची क[7]रणी ॥ आतां० ॥ १ ॥
सासरा अहंकार अहं[8]कार । जळो याचें घर ॥ आतां० ॥ २ ॥
सासू कल्पना कल्पना । जाच ईचा सोसेना ॥ आतां० ॥ ३ ॥
काम क्रोध हे दिरभावे । जाच किती सोसावे? ॥ आतां० ॥ ४ ॥

---

१. 'घनदाता' असा अन्य पाठ आहे. २. कमलदलेक्षण. ३. 'प्राणनाथ' अन्य पाठ. ४. शवप्रभु तुजविण मज आणिक नलगे कांहीं' असा पाठभेद. ५. पुन्हा. ६. नवरा. ७. ८. मीपणा, गर्व.

तृष्णा नणदुली नणदुली । वाईट ईची बोली ॥ आतां० ॥ ५ ॥
केशवस्वामीची[1] निजदासी[2] । जाइन त्याचे पासीं ॥ आतां० ॥ ६ ॥

## पद ४०० वें.

कांसवीचें[3] तूप । तैसें संसाराचें रूप ॥ आम्हीं देखिलें रे ! ॥ ध्रुवपद. ॥
वांजीलागी बाळ । अरे ! तैसा भवजाळ ॥ आम्ही देखिलें रे ! ॥ १ ॥
अमृतसागरींचें वीष । तैसें केशवीं हें दृश्य ॥ आम्ही देखिलें रे! ॥ २ ॥

## पद ४०१ वें.

या नांव ज्ञान या नांव ज्ञान । ब्रह्म समाधान यातें म्हणिजे ॥ ध्रुवपद. ॥
आहे तें सोडूनि नाहीं तें पाहिजे । पहाणें हारपे तेथें राहिजे ॥ या० ॥ १ ॥
जे ठायीं राहिजे तो ठाव होयीजे । होणें न होणें अवघें विसरिजे ॥ या० २ ॥
विसराचा आठव, आठवाचा विसर । जाणें तो ईश्वर केशव म्हणे ॥ या० ३ ॥

## पद ४०२ वें.

सोनियाचा[4] दीन आम्हा उगवला माय ! ।
बहुत भाग्यें देखियले श्रीहरीचे पाय ॥ ध्रुवपद. ॥
डोळेयांचा डोळा मज दाखविला डोळां ।
हृदयकमळीं चरण त्याचे धरिन वेळो वेळां ॥ सोनि० ॥ १ ॥
त्रैलोक्याचें धाम जेथें नाहीं रूप नाम[5] ।
एकाएकीं हातीं माझ्या तोचि दिला राम[6] ॥ सोनि० ॥ २ ॥
शुद्धबुद्धि निजानंद गहन अविनाश ।
द्वैतदशेवीण तेथें केला क्षेत्रवास ॥ सोनि० ॥ ३ ॥
गुणातीत सदोदीत तूंच देवराजा ।
केशव म्हणे प्राणसखा भेटला हा माझा ॥ सोनि० ॥ ४ ॥

---

१. केशवाच्या स्वामीची—देवाची. २. वामनपंडितांची 'तांडव' ह्या शब्दावर ज्याप्रमाणें प्रीति आहे, त्याप्रमाणें केशवस्वामीची 'निज' ह्या शब्दावर फार प्रीति आहे असें दिसतें. ३. कांसवीला आंचळ वगैरे नसतात; ती आपल्या पिलांचें पोषण प्रीतिपुर:सर प्रेक्षणानें करिते, म्हणूनच एका कवीनें म्हटलें आहे:—'कांसवांचीं पिलीं, कूर्म दृष्टीनें सांभाळीं.' ४. कृष्ण कालिय नामक सर्पास मारून, यमुनेच्या डोहांतून बाहेर आला त्या वेळीं कोणी गोपी म्हणते. ५. जो नामरूपातीत आहे. ६. मनाला आनंद देणारा ['राम' या शब्दाची व्याख्या वामनपंडितांनीं अशी लिहिली आहे:— 'मुनिमनें रमती रघुनंदना! तुजमधें दशकंधरसूदना । म्हणुनि निर्गुण जानकिनायका! म्हणति 'राम' तुतें गतिदायका!'—रामस्तव१].

## पद ४०३ वें.

दीनानाथ ! दीनबंधु ! शरण तुला रे ! ॥ ध्रुवपद. ॥

विषयाचे लोभें मन भ्रमलेंसे भारी ।
[1]गृहपुत्रकलत्र हे झाले सुखकारी ।
आतां याचें दुःख मज सोसवेना हरी ! ।
म्हणोनियां विनवितों [2]कमलावरा ! रे ! ॥ दिनानाथ० ॥ १ ॥
भवा[3]ब्धिचा तरणोपाय नकळेचि कांहीं ।
[4]साधुसंगेसेवा मज घडलीच नाहीं ।
शि[5]श्नोदरव्यापाराचे पडलों प्रवाहीं, ।
तेथुनियां त्वरें आतां काढीं मजला रे ! ॥ दिनानाथ० ॥ २ ॥
चित्तशुद्धीची आतां मज वाट तुम्ही द्यावी, ।
वेदशास्त्रां [6]पुराणांची गति सूचवावी ।
[7]नवविध भक्ति निरंतर करवावी ।
केशव चैतन्य म्हणे भूषण तुला रे ! ॥ दिनानाथ० ॥ ३ ॥

## पद ४०४ वें.

भक्तिभावा भूलला महाराज । नित्य सेवकां घरीं करी काज ॥
[8]न्यून कामें करी न धरि लाज । तरी नाहीं फिटलें त्याचें व्याज॥ध्रुवपद०।
महा संकट मांडलें अर्जुनातें । तया दिवसा लपविलें [9]सूर्यातें ॥
त्याचीं घोडीं धूतसे चहुं हातें । ऋण भक्तांचें फेडिलें भगवंतें ॥ भक्ति० ॥ १ ।
द्रौणास्त्राची महा भीति होती । तेव्हां गर्भीं रक्षिला परिक्षीती ॥
गोकूळ पीडितांना [10]सुरपती । गोवर्धन धरिला तेव्हां हातीं ॥ भक्ति० ॥ २ ॥
सभेसी द्रौपदी करितां उघडी । स्वयें नेसविता झाला तो लुगडीं ॥
शिवादिकांचा योग सिद्धि नेला । गुरुकृपे केशव सुखी झाला ॥ भक्ति० ॥३।

---

१. घर+मुलगा+बायको. २. लक्ष्मीकांता. ३. संसारसिंधूचा. ४. साधुसमागम व त्यांची सेवा ५. 'सृष्टीद्रव्य' असा अन्य पाठ. ६. पृष्ट ६८ टीप २ पहा. ७. "भक्त म्हणतात कीं, देवाची भक्ति नऊ प्रकारची आहे. ती नवविधा भक्ति व तीं पूर्वी कोणीं कोणीं केली त्याविषयीं पुढील दोन श्लोक आढळतात:—श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ श्रीकांतः श्रवणे परीक्षितिरभूद्वैयासिकी कीर्तने प्रल्हादः स्मरणेऽध्रिपद्मभजने लक्ष्मीः पृथुः पूजने । अक्रूरस्त्वभिवंदने कपिपतिर्दास्येऽथ सख्येऽर्जुनः सर्वे स्वात्मनिवेदने बलिरभूत्कैवल्यमेषां पदम् ॥" ८. हलकीं. ९. जयद्रथवधसमयीं. १०. इंद्रानें अतिवृष्टि केली तेव्हां गोकुळाला पीडा झाली.

### पद ४०५ वें.

तो हरि सांपडला सांपडला । मोठा लाभ जाहाला[७] ॥ ध्रुवपद. ॥
ज्यातें स्मरतां मीपण[१] जाय । आत्मा प्राणविसावा माय ॥ तो हरि० ॥ १ ॥
स्थावर[२] जंगम[३] नाहीं जेथें । आम्हीं मिरास[४] केली तेथें ॥ तो हरि० ॥ २ ॥
केशव स्वामी मेघश्याम । सबाह्य कवळुनि आत्माराम ॥ तो हरि० ॥ ३ ॥

### पद ४०६ वें.

मायातीता ! राघवा ! विश्वरूपा ! । सदोदिता दशरथकुळदीपा ! ॥ध्रुवपद.॥
ध्यान तूझें मज लागलेंसे पाहीं । तुजपरतें आणिक नाहीं कांहीं ॥माया०॥१॥
सीताकांता ! मदनारीप्राणनाथा ! । जगज्जनका ! नुपेक्षावें आतां ॥माया०॥२॥
मनमोहना ! करुणाघना[५] ! रामा ! । म्हणे केशव विसरों नको आम्हां ॥माया०॥३॥

### पद ४०७ वें.

गुरुविण न दिसे शिष्य आम्हां । शिष्याविण सद्गुरु नये[६] कामा ॥ध्रुवपद.॥
अणुमात्र संदेहँ जेथें नाहीं, । ऐसें जाणे तो सहज गुरु पाहीं ॥ गुरु० ॥ १ ॥
शिष्यबोधें गुरुत्व पूर्ण आहे । गुरुबोधें शिष्यत्व कैचें काय ॥ गुरु० ॥ २ ॥
गुरु शिष्य नेणुनि नांदे गुरु । सहजानंदीं केशव तदाकारु ॥ गुरु० ॥ ३ ॥

### पद ४०८ वें.

यमुनेचे तिरीं हो ! । बाइ ! म्यां देखिले हरी हो ! ।
पालवीं[८] धरूनियां मजसीं । प्रेम रेंळिया[९] करी हो ! ॥ ध्रुवपद. ॥
मारून बोध खडा हो ! । फोडिला कर्मघडा हो ! ।
द्वैत लुगडें फेडिलें हो ! । सांगूं कवणापुढें हो ! ॥ यमुनेचे० ॥ १ ॥
ऐकली[१०] आली म्हणूनि हो ! । त्यांसि फावलें तें त्यां हो ! ।
सद्गुरुकृपे केशवराजीं[११] हो ! । भोगिलें मातें हो ! ॥ यमुनेचे० ॥ २ ॥

### पद ४०९ वें.

मन हें पिसोवलें[१२] पिसावलें । हरिपदीं लंपट झालें ॥ ध्रुवपद. ॥
गुणमयि ठाईं लय पावे । घडी घडी तेथचि धांवे ॥ मन० ॥ १ ॥
सर्वेहि हरि ऐसें जग भासे । म्हणउनि खदखद हांसे ॥ मन० ॥ २ ॥

---

१. अहंकार. २. अचल. ३. चल. ४. वतन. ५. दयामेघा. ६. उपयोगीं पडत नाहीं. ७. भ्रांति. ८. पल्लवीं, पदरीं. ९. थट्टा. १०. एकटी. ११. केशवाच्या राजानें (कृष्णानें.) १२. वेडें झालें.

सर्वहि हरि ऐसें गुज सांगे । सप्रेम नाचों लागे ॥ मन० ॥ ३ ॥
केशवस्वामीची निज गोडी । मेलों तरी न सोडीं ॥ नम० ॥ ४ ॥

### पद ४१० वें.

भजनीं मन माझें वनवळलें । अगणित भाग्य फळलें ॥ ध्रुवपद. ॥
म्हणवुनि स्वरुप मी झालों । अचळपदा[2]प्रति आलों ॥ भजनीं० ॥ १ ॥
ममता मारुनियां चुर[3] केली । माया मोहिनी मेली ॥ भजनीं० ॥ २ ॥
केशवस्वामीच्या निजभजनीं । हारपली दिन रजनी ॥ भजनीं० ॥ ३ ॥

### पद ४११ वें.

गे ! माई ! लागली फार गोडी ।
जयाकारणें वृ[4]त्ति झाली वेडी ॥ ध्रुवपद. ॥
जो गोकुळीं गोधनें राखे । जो स्वानंदें [5]गोचर दे[6]खे ॥
ज्याचे प्रकाशें त्रैलोक्य झांके । तो येवोनी हृदयीं ठाके ॥ गे माई० ॥ १ ।
जो नंदाच्या घरींचा बाळ । जो काळाचा महाकाळ ॥
जो दीनबंधु त्रैलोक्यपाळ । त्याचें प्रसिद्ध नाम गोपाळ ॥ गे माई० ॥ २ ॥
जें साधूंचें निजमाहेर । जें विश्रांतिचें मूळ घर ॥
जो विश्वंभर परात्पर । नामें तारितो भ[7]व दुस्तर ॥ गे माई० ॥ ३ ॥
जो सा[8]युज्यपददाता । ज्याचे मस्तकीं पाय वंजी धा[9]ता ॥
ज्याचे पाय शिव वंदी माथां । त्याचें रूप मज दावीं आतां ॥ गे माई०॥ ४ ।
जें साराचें निजसार पाहीं । थारा त्याविणें कोठेंचि नाहीं ॥
ज्याचें स्वं[10]रूप नकळेचि कांहीं । दास केशव शरण त्याचे पायीं ॥ गे माई० ॥५।

### पद ४१२ वें.

ज्याच्या चरणाची वंदितां माती । पाप ताप समूळ लया जाती ॥ध्रुवपद.॥
[11]श्रुति गाती बडिवार ज्याचा । वारंवार करीन संग त्याचा ॥ ज्याच्या० ॥ १ ॥
ज्याच्या संगें निःसंग करी माय । ब्रह्मानंदाकारणें त्याचे पाय ॥ ज्याच्या० ॥ ३ ॥
आत्माराम निःकाम धाम पाहीं । म्हणे केशव त्याविणें सखा नाहीं॥ज्याच्या०॥ ४ ॥

---

१. देवाची. २. सायुज्यपदाप्रति, ध्रुवपदाला. ३. 'दूर' असा अन्य पाठ आहे. ४. मनोवृत्ति. ५. गाईची चरण्याची जागा, कुरण. ६. 'चाखे' असा अन्य पाठ आहे. ७. संसार. ८. मोक्ष. ९. ब्रह्मदेव. १०. 'जयाचा पार' असा अन्य पाठ. ११. वेद.

## पद ४१३ वें.

छेदोनि संतसंगें भवकंदा। बोध गणाधीश वंदा ॥ ध्रुवपद. ॥
धंदा सर्वही हा मग नासे। स्वरूप चिन्मय भासे ॥ छेदोनि० ॥ १ ॥
स्वरूपावांचुनियां स्थळ नाहीं। ऐसें कळलें पाहीं ॥ छेदोनि० ॥ २ ॥
केशवीं केशव हा घन दाटे। केशव म्हणे आटे ॥ छेदोनि० ॥ ३ ॥

## पद ४१४ वें.

नवल झालें, सांगूं मी आतां काय हो!।
अनुभवसुख सांगतां नये माय! हो! ॥ ध्रुवपद. ॥
संतसंगें श्रीरंग भेटला हो!।
मायासिंधु तत्काळ आटला हो! ॥
हृदयकमळीं घननील[१] दाटला हो!।
माझे जिवींचा संदेह फिटला हो! ॥ नवल० ॥ १ ॥
सहज उभी होती आर्त[२] भुवनीं[३] हो!।
तंव तेथें आले ते देवचूडामणी[४] हो! ॥
पदरीं धरिलें गोपाळें प्रीति करूनि हो!।
आलिंगितां देहभाव[५] गेला विसरूनि हो! ॥ नवल० ॥ २ ॥
लोक मजला म्हणती झाली वेडी हो!।
क्षणक्षणा मागुतीं दृष्टी मुरडी हो! ॥
सद्गुरुकृपे केशवीं पूर्ण गोडी हो!।
तेथें संसार झाला दुःखघडी[६] हो! ॥ नवल० ॥ ३ ॥

## पद ४१५ वें.

म्हणउनि भव[७] नेणों भव नेणों। अवघा राघव जाणों ॥ ध्रुवपद. ॥
वंदुनि सद्गुरुराया। केली देशधडी[८] हे माया ॥ ह्मण० ॥ १ ॥
मारुनि द्वैत[९] पसारा। केला राम सनातन[१०] धारा[११] ॥ ह्मण० ॥ २ ॥
जाणिव[१२] नेणिव[१३] दोनहि गेलीं। केशव स्वामिच्चि संगति ठेली ॥ ह्मण० ॥ ३ ॥

---

१. मेघश्याम (कृष्ण.) २. दुखित. ३. 'अंतरभुवनीं' असा अन्य पाठ. ४. देवश्रेष्ठ (कृष्ण.) ५. देहाभिमान. ६. 'दुःखथडी' असे पाठांतर. ७. संसार. ८. माया नाहींशी केली. ९. भेद. बुद्धि. १०. शाश्वत. ११. वतन. 'थारा' अन्य पाठ. १२. ज्ञान. १३. अज्ञान.

### पद ४१६ वें.

तोंवरि निजसुख नाहीं रे! । ऐसें कळलें पाहीं रे! ॥ ध्रुवपद. ॥
संतसमागम जोडेना । संशय मंडप मोडेना ॥ तोंवरि० ॥ १ ॥
गुणमय रंजनी नासेना । बोधतमारी प्रकाशेना ॥ तोंवरि० ॥ २ ॥
केशवस्वामी भेटेना, । सबाह्यांतरी दाटेना ॥ तोंवरि० ॥ ३ ॥

### पद ४१७ वें.

पाचारा म्हणे पाचारा । माझे जिविंचा सोयरा **राम** राणा ॥ ध्रुवपद. ॥
निःकाम मंदिरीं सुमन सेजेवरी । चालावें झडकरी देवराया! ॥ पाचारा० ॥ १ ॥
शुद्ध सत्व हार गुंफोनि साचार । सद्भावें उपचार सिद्ध केले ॥ पाचारा० ॥ २ ॥
**के**शवराजस्वामी! चालावें झडकरी, । लोटली शर्वरी, उदयो झाला ॥ पाचारा० ॥ ३ ॥

### पद ४१८ वें.

चालावें **ह**रि चालावें ।
पदोपदीं सुख आपुलें ध्यावें ॥ ध्रुवपद. ॥
चिच्छशक्ति बाळा **रु**क्मिणी वेल्हाळा ।
पाचारी **गो**पाळा शीघ्र यावें ॥ चालावें० ॥ १ ॥
**के**शव स्वामी निजभक्ति वेल्हाळ ।
निजभक्तवत्सल हृदयींचा **गो**पाळ हृदयीं आला ॥ चालावें० ॥ २ ॥

### पद ४१९ वें.

सुखरूप झालें मन माझें । केली दया निज गुरुराजें ॥ ध्रुवपद. ॥
विवेक दीपक लावुनियां । **रा**म हिरा करीं घेउनियां ॥ सुख० ॥ १ ॥
गोमति परती सारुनियां । गोपति बरवा सेवुनियां ॥ सुख० ॥ २ ॥
अक्षय ठाया येउनियां । म्हणे **के**शव **के**शव होऊनियां ॥ सुख० ॥ ३ ॥

### पद ४२० वें.

आम्ही सोयरे केले संत । झालों परम भाग्यवंत ॥ ध्रुवपद. ॥

---

१. रात्रि. २. बोधरूपी सूर्य. ३. बोलवा. ४. पुष्पशय्या. ४. रात्रि. ५. सूर्योदय. ६. सुंदरा ७. दयाळू. [वत्सल—वत्स आणि अंस या शब्दांपुढें यथानुक्रम काम आणि बल या अर्थी ल प्रत्यय होतो. 'वत्सांसाभ्यां कामबले' ५।२।९८ या सूत्रानें वत्सल आणि अंसल असे शब्द होतात.

सुखघनीं मन ठेवुनियां । देहबुद्धीचा[1] केला अंत ॥ आह्मी० ॥ २ ॥
सबाह्यांतरीं सुख । अभ्यंतरीं देखिला भगवंत ॥ आह्मी० ॥ ३ ॥
स्वरूपीं पावलों स्वरूपीं । राहिलों म्हणे केशवपंत ॥ आह्मी० ॥ ४ ॥

### पद ४२१ वें.

डोळा लवतो स्फुरते माझी बाही[2] । शुभ चिन्हें दिसती आजी मायी ! ॥ध्रुवपद॥
आजि शकुन[3] होताती वेळोवेळां । माझ्या स्वामीचें रूप देखेन डोळां ॥ १ ॥
समस्त गोपिका आम्हीं मथुरेसीं जाऊं । मन मुरे तंव कृष्णजीस पाहूं ॥२॥
गुरुकृपे केशवीं मनोभावा । तो ठावची नाहीं कोणा ठावा ॥ ३ ॥

### पद ४२२ वें.

मुद्रा मज लागली खेचरी । बाइ हो ! तिचें नाम अगोचरी ।
कांहीं केल्या नव्हे हो ! गोचरी । प्रत्यक्ष अनुभवी हो सुंदरी ॥ ध्रुवपद. ॥
अवघड अवघड बाइये । ब्रह्म मुद्रा जाणे हो सखये ।
सहज लावूनी बैसले योगीये । तेचि ब्रह्मसुखाचे भोगीये ॥ मुद्रा० ॥ १ ॥
नयनाचें राहिलें देखणें । श्रवणीं परिसलें ऐकणें ।
वाचेचेंही खुंटलें बोलणें । नवल निज मुद्रेचें करणें ॥ मुद्रा० ॥ २ ॥
ऐसी मुद्रा ज्यासी हो ! लागली । समूळ त्याची भ्रांती हो ! खुंटली ।
सद्गुरुकृपे केशवीं बाणली । संसाराची भ्रांती हो ! तूटली ॥ मुद्रा० ॥ ३ ॥

### पद ४२३ वें.

नरदेह जातोरे उगला[4] । घालूनी ममतेचा घाला ।
सावध हो कां रे ! वहिला,[5] । सत्वर[6] लागें भजनाला ॥ ध्रुवपद. ॥
शांती नाहीं रे ! बरवी । तोंवरी कैंची तुज पदवी[7] ॥
आशा पापिणी हित बुडवी । प्रपंचातें रे ! गोंवी[8] ॥ नर० ॥ १ ॥
'माझें माझें' रे ! म्हणसी । व्यर्थचि प्राण्या ! भुललासी ॥
संचित[9] केलें सायासीं[10] । अंतीं[11] टाकुनियां जासी ॥ नर० ॥ २ ॥
जन्मा येउनि आतां । कांहीं तरि करिं रे ! सार्थकता ॥
केशव माधवीं अनुसरतां । पावन झाला पद गातां ॥ नर० ॥ ३ ॥

---

१. अहंकाराचा. २. बाहु, भुज. ३. शकुनाविषयीं विशेष माहिती 'बृहत्संहिता'—अध्याय ८६-८८-९० यांत आणि मुहूर्तमाला—यात्राप्रकरण श्लो० ९६-१०५ यांत पहावी. ४. व्यर्थ. ५. लवकर, शीघ्र. ६. 'सादर' असा अन्य पाठ. ७. सायुज्यपदवी. ८. गुंतवी, घाली. ९. मिळविलें. १०. कष्टानें. ११. 'प्रांतीं' असा अन्य पाठ.

## पद ४२४ वें.

गोमय उपाधि त्यागावा । चिन्मय लाभचि घ्यावा ॥ ध्रुवपद. ॥
आणिक न म्हणावें हित कांहीं । हरिविण बरवें नाहीं ॥ गोम० ॥ १ ।
सर्वही शिव भासे । भासे तितुकें नाहिसे ॥ गोम० ॥ २ ॥
शिव मीं शिव मीं हे किती बोलों । शिवपद ग्रासुनि [१]डोलों ॥ गोम० ॥३।
यापरि सांपडला शिव आजी । केशव म्हणे मज माजी ॥ गोम० ॥ ४ ।

## पद ४२५ वें.

बरवें जाणावें जाणावें । जाणणें मात्रचि व्हावें ॥ ध्रुवपद. ॥
प्रपंच कैंचा म्यां सांडावा । आत्मा कैंचा घ्यावा ॥ बर० ॥ २ ॥
आत्मा परिपूर्ण परिपूर्ण । म्हणतां उरले कवण ॥ बर० ॥ ३ ॥
केशवराजीं हा निजबोध । बोधा न घडे हा भेद ॥ बर० ॥ ४ ॥

## पद ४२६ वें.

राम गडी केला, गोपाळ गडी केला ।
कडिये धरूनि मला पैलथडी नेला ॥ ध्रुवपद. ॥
देउनि भेटी घालुनि मिठी । घट्ट केली माया ॥
[३]भेंडभडीत उजेड झाला । लागेन तुझ्या पायां ॥ १ ॥
सप्रेम वेदें आत्मबोधें नांदविलें पाहीं ॥
केशव म्हणे मज केलें ठायींच्या ठायीं ॥ २ ॥

## पद ४२७ वें.

पिंड ब्रह्मांड ग्रासुनि पाहा । पाहातें पाहाणें होऊनि राहा ॥ ध्रुवपद. ॥
कांहीं कळलें तरि कळलें तेणें । कळणेंपणही गळलें जेणें ॥ पिंड० ॥२॥
कळलें मिथ्या हें कळलें जेव्हां । कळणेपणाची [४]प्रचीत तेव्हां ॥ पिंड० ॥ ३ ॥
रवा कर्पूराचा सांडावा । केशव म्हणे परिमल घ्यावा ॥ पिंड० ॥ ४ ॥

## पद ४२८ वें.

येरित जागृति झाली वो ! भ्रांति गेली वो ! दिशा उजळली पाहें ।
[५]अवस्थात्रयाची ही बोळवण उरला आपण हेंही ह्मणणें न साहे ॥ ध्रुवपद. ॥

---

१. 'घालों' असा अन्य पाठ आढळतो. २. आत्मबोध. ३. लखलखित. ४. अनुभव, प्रतीति.
५. स्वप्न, सुषुप्ति व तुर्या ह्या आणखी तीन अवस्था.

संतचरणीं मन निश्चळ झालें, केवळ गेली तळमळ तेणें ।
सर्व प्रकाशक भेटला भेद कुंठला, आतां तळमळ नेणें ॥
नेणणें जाणणें जाहलें जाणणें ऐसें केलें जेणें त्यासी उत्तीर्ण[1] होणें ।
न घडे न घडे मज सर्वथा जाण तत्वता आत्मप्रवीणपणें ॥ येरित० ॥ १ ॥
आदि मध्य अंत तव कांहीं जेथें अणु नाहीं तेथें प्रवेश केला ।
निर्गम नाहिं नाहीं तेथुनि मजलागुनी हाही संकल्प गेला ॥
व्याप्यव्यापक भावविरहीत देव सदोदीत एकाएकीं संचला ।
बोध्य बोधक शक्ति कायसी सिद्ध अविनाशी ऐसा ऊकद्ध झाला ॥ येरित० ॥२॥
शरण जाणें कवण कवणासी सिद्ध अविनासी परिपूर्ण गे माये ।
उघडें बोलणें ऐसें बोलतां नये सांगतां कोण ऐकत आहे आहे ॥
आहे तें आहे सहज मंगळ नित्य निर्मळ जेथें स्फुरण[2] न साहे[3] ।
केशव म्हणे ही अद्वैत संपदा भोगि सर्वदा सुखीं सुख न माये॥येरित० ॥३॥

## पद ४२९ वें.

त्यांच्या बोलें संसारदैन्य गेलें रे! ।
ज्यांच्या संगें जिवशिवासि ब्रह्म केलें रे! ॥ ध्रुवपद. ॥
ज्यांच्या पायीं त्रैलोक्य मूक झालें रे! ।
त्याचें आतां वाचेसि नाम आलें रे! ॥ त्यांच्या० ॥ १ ॥
झालों सुखी मी कवणालागीं रे! ।
अनाथ बंधू भेटला ब्रह्मयोगी रे! ॥ त्यांच्या० ॥ २ ॥
ज्याचे कृपे देवाधिदेव दावी रे! ।
ज्याची सेवा स्वरुपीं[4] प्रीति लावी रे! ॥ त्यांच्या० ॥ ३ ॥
ज्याची करणी कर्णासि नाहीं ठावी रे! ।
स्वयंभ[5] तो म्यां कवळिला भावाभावीं रे! ॥ त्यांच्या० ॥ ४ ॥
विजयश्रीचा केवळ निजर्भर्ता[6] रे! ।
अनन्य भक्ति हृदयकमळीं धर्ता रे! ॥ त्यांच्या० ॥ ५ ॥
केशवस्वामी केवळ कर्ता रे! ।
ध्यातां नुमटे द्वैतांची[7] कोठें वार्ता रे! ॥ त्यांच्या० ॥ ६ ॥

---

१. उतराई. २. स्फोट, अनुभव, विचार. ३. 'सही बोल न' असा अन्य पाठ. ४. परमेश्वरस्वरूपीं. ५. स्वयंभू. ६. पति. ७. भेदबुद्धीची.

## पद ४३० वें.

निराभिमानें सफळ जन्म केलें रे! ।
रे निरावलंबीं चित्तास रक्षियेलें रे! ॥ ध्रुवपद. ॥
निरावकाशीं ब्रह्मांड लया नेलें रे! ।
रे त्याचा महिमा बोलावा कैशा बोलें रे! ॥ निरा० ॥ १ ॥
ऐसा स्वामी देखिला आजि आह्मी रे! ।
पादांबुजीं राहिलों मोक्षधामीं रे! ॥ निरा० ॥ २ ॥
अशेष शस्त्रें कल्पनाजाळ छेदी रे! ।
करणें सरलें कर्णासि पट्टबोधें रे! ॥ निरा० ॥ ३ ॥
स्वरुपापरुतें कांहींच उरों नेदी रे! ।
भाग्यें आला निःकाम पयोनिधी रे! ॥ निरा० ॥ ४ ॥
गुणातीत सच्चिदानंद कल्प रे! ।
सर्वकाळ सेवूनि पूर्ण धालो रे! ॥ निरा० ॥ ५ ॥
आत्मलाभें निवालों सुखी झालों रे! ।
केशव म्हणे तो माझे हृदयीं आला रे! ॥ निरा० ॥ ६ ॥

## पद ४३१ वें.

'नारायण हरि' जय जय नारायण हरी ॥ ध्रुवपद ॥
नाममात्रचि जपतां चुकविशी नाना यातना ।
नानाविधि अवतार घेउनी तारिशी भक्तजना ।
नारद प्रल्हाद वर्णिति अखंड तव गुना (णा) ।
नाहिं नामिं विश्वास तयाचा कधिं न चुके भ्रमना (णा) ॥
तो तूं वस मम जिव्हाग्रीं. ॥ नारायण हरि० ॥ १ ॥
रातोत्पल........भव पंचानन याचा प्रियकरा ।
राजीवाक्ष हे रमाजीवना ये पतितोद्धारा ।

१. सार्थक. २. चरणकमळीं. ३. सकल. ४. सागर. ५. तृप्त झाला. ६. या पदाच्या पहिल्या कडव्यांत आदीं व अंतीं 'ना' हें अक्षर, दुसऱ्यांत 'रा' तिसऱ्यांत 'य' चौथ्यांत 'ण' पांचव्यांत 'ह' सहाव्यांत 'री'–अशीं अक्षरें साधून 'नारायण हरि' हा मंत्र, या पदांत साधला आहे. ७. पृष्ठ ३४ टीप १ पहा. ८. जन्मांतररूप भ्रमण (फेरा). ९. तांबडें कमळ. १०. कमलाक्ष.

रात्रंदिन तुजविण दयाळा! ध्यास नसे दुसरा ।
राहें सदय होउनि दे हृद्भुवनीं थारा ॥
तुजविण गति नाहीं दुसरी. ॥ नारायण हरि० ॥ २ ॥
यदुवंशाभरणा! करिं करुणा सत्वर धांउनियां य (ये) ।
य (ये) भवपुरीं वहावलों स्वामी! पावनीं पैल थडिय (ये) ।
य (ये) क वेळ भेटुनि करि पुनरपि जन्माशी नय (ये) ।
य (ये) तुजवांचुनि गति कैंची आमुचि तूं विठ्ठल माय ॥
जळाविण जैशी कीं शँफरी. ॥ नारायण हरि० ॥ ३ ॥
ण (न) करिं मन निष्ठुर, श्रीहरी! मी तुझें दीण(न) ।
ण (न) येतां गोविंदा! माझा जाइल कीं प्राण ।
ण (न) लगे तुझी मुक्ती, दाखविं मजला समचरण ।
ण (न) को नको विलंब, कंठीं उरला प्राण ।
अगा! ठाकला विटेवरी. ॥ नारायण हरि० ॥ ४ ॥
हॅरहृदय आरामा रामा! आम्ही निस्पृह ।
हुजूरची चाकरी इच्छूं हाचि आग्रह ।
हस्त जोडुनि विनंति, करि तूं आमचा निर्वाह ।
हरामखोर न हो विठोबा! तुजला हा देह ॥
त्रिकला, जाणशी तेंच करी. ॥ नारायण हरि० ॥ ५ ॥
रीसवानरां परिस आहे नरतनु सांजिरी! ।
रिती नये कामासी तव कनवेविण कंसारी! ।
रिद्धिसिद्धि दासी नलगे, दे स्थळ पदकल्हारी ।
रिठासुरारे! हेंचि मागणें पुनरपि भवविवरीं ॥
न घालुनि मजला पार करीं. ॥ नारायण हरि० ॥ ६ ॥
'नारायणहरि' मंत्र षडाक्षरि बहु उत्तम जाणा ।
नाना विघ्नें निवारी नामस्मरणेंची माना ।
नाशिवंत अविनाश पूर्वस्थिति उरना ।
नामीं तरला केशव........हा सोडुनि अभिमाना ॥
नाहीं सार्थक संसारीं. ॥ नारायण हरि० ॥ ७ ॥

---

१. हृदयरूप जगतांत. २. यदुकुलोत्तंसा. [आभरण=भूषण.] ३. पृ० ४ टीप १ पहा. ४. मत्स्यी. ५. शंकराच्या मनाला आनंद देणाऱ्या रामा. ६. पृष्ठ ४ टीप १ पहा. ७. सुंदर, उत्तम. ८. पदपद्मीं.

## पद ४३२ वें.

.........................वैकुंठीं लावा ध्वजा ॥ ध्रुवपद ॥
देहादिक प्रपंच सारा । ............ कां पसारा ॥
जरि असता आपुला खरा । तरि येता............ ॥
म्हणवुनि विलंब तेजा ॥ १ ॥
लटकें तें खरें भासे । खरी वस्तु डोळां न दिसे ॥
पहा गडे! हो! भ्रमले कसे । मी सांगतों ऐका तसें ॥
व्याघ्राची झाली अजा[1] ॥ २ ॥
विश्वमय जालें पिसें । मद्यपी मर्कट[2] तसें ॥
स्त्रीसंगें ठाके भलतिसें । ना उमजे शेवटीं होइल कसें ॥
सद्गुरुशीं शरण तुम्ही जा. ॥ ३ ॥
तुम्हि अहंपणें जरि उडाल । तरि समुळची भवजळीं बुडाल ॥
रौरवादि[3] नर्कांत सडाल[4] । निज कर्म आठवुन रडाल ॥
तेथें अन्याय काय माझा? ॥ ४ ॥
श्रीगुरुशिं शरण तुम्हि जाल । चौंदेहांपासुन[5] तराल ॥
जीव असतां जीवचि मराल । चिन्मात्र रुपिं उराल ॥
नाहिं उमज तरि उमजा. ॥ ५ ॥
म्हणे केशव माझे बोल । आधिं कडू मग रसाळ ॥
येथें चित्त कोणी द्याल । येचि देहिं मुक्ति पावाल ॥
येथें संशय नाहीं दुजा. ॥ ६ ॥

## पद ४३३ वें.

कां न येशी? तुज काय पडलें बोझें, ।
प्राण गेल्या मग काय पाहूं तुझें ॥ ध्रुवपद ॥
जन्म देतां तुज शीण नाहीं आला ।
भेटीसाठीं कंटाळा धरियेला ॥ कां न० ॥ १ ॥
तुझ्या माझ्या जन्मोजन्मींच्या गांठी ।
आतां कैशा होतिल तुटातुटी ॥ कां न० ॥ २ ॥

---

१. शेळी. २. वानर. ३. रौरव=नरकविशेष. ४. कुसाल. ५. स्थूलदेह, लिंगदेह, कारण आणि—महाकारणदेह.

केशव स्वामी दयाळ महाराज ।
तुजविण कोण राखिल माझी लाज ॥ कां न० ॥ ३ ॥

पद ४३४ वें.

माझे हृदयिं कोंदलें रूप तुझें ।
तुजविण नाठवे कांहिं दूजें ॥ ध्रुवपद ॥
माझ्या जीवींच्या जीवना! मेघश्यामा! ।
तुझें ध्यान लागलें नित्य आम्हा ॥ माझे० ॥ १ ॥
ध्यानिं मनिं नयनीं तूंचि एकी ।
सर्वा भूतीं तुजचि अवलोकीं ॥ माझें० ॥ २ ॥
म्हणे केशव सख्या कृष्णनाथा!
प्राण गेल्या न सोडिं पाय आतां. ॥ माझें० ॥ ३ ॥

पद ४३५ वें.

जय रामा! अव्यक्त पूर्णकामा! तुझीं पावलें न सोडिं मेघश्यामा! ॥ ध्रुव० ॥
नाम तुझें गाइन वेळोवेळां । रूप तुझें पाहिन निज डोळां ॥ जय० ॥ १ ॥
ध्यान तुझें धरिन अंतर्यामीं । तुझा विसर न पडो आतां स्वामी! जय० ॥ २ ॥
तुझ्या रूपिं गुंतला माझा हेतु । तुझि मूर्ति कोंदली हृदया आंतू ॥ जय० ॥ ३ ॥
तूंची जननी माझी पाहीं । तुजवीण सोइ रे! आणिक नाहीं. ॥ जय० ॥४॥
कृपासिंधु अनाथबंधु देवा! म्हणे केशव करीन चरणसेवा ॥ जय० ॥ ५ ॥

पद ४३६ वें.

आज दिवस सोनियाचा झाला ।
स्वामी माझ्या हृदयसेजे आला ॥ ध्रुवपद ॥
बाई! आमुचे पुरले मनोरथ । जनीं वनीं देखिला कृष्णनाथ ॥ आ० ॥ १ ॥
रूप पाहतां मानस माझें धालें । क्षेमें देतां सर्वांग सुखी केलें ॥ आ० ॥ २ ॥
गुरुकृपें केशवीं झाली भेटी । माझे हृदयिं पडली कैशी मिठी ॥ आ० ॥ ३ ॥

पद ४३७ वें.

सांब पाही रे! वामा चिदंबा । सांब पाहिं विश्वंभर पदवी । ग्रत भज धृत पीतांबर युनता ॥ ध्रुवपद. ॥

---

१. उदका. २. सर्व प्राण्यांमध्यें. ३. मनांत. ४. इच्छा, हेतू. ५. अंतःकरण. ६. आलिंगन.

अंबरिकेश त्र्यंबक सगूण, कदंब गोत्र निबुंबुज भाषशी । अंबुजलोचन बिंबफलाधर, कंबु सुकंठ चिदंबर विनुता ॥ १ ॥

संग परैक विहंग तुरंगन संग सुलिंग कुरंग धरामर । संगित प्रिय रंगिन्मणि मुकुटांगदे मदन मदंग विभंगा ॥ २ ॥

कुटिलासुरभट पटल विदारण, चटुल महोन्नत पटुतर भुजयुग । निटल विनयन किरिट चर्मांबर वटतरु मुल निट कटितर विलया ॥ ३ ॥

कुंदसमान इंदुवदनधर, मंदस्मित सुरचंदनलेपन मंदरनगर । पुरंदर सनकसनंदन नंदसुनंदन विनुता ॥ ४ ॥

चंडिकेश मार्कंडेयार्चित, चंडीशस्तुत चंडपराक्रम, कुंडली । मंडित गंड युगंडज धवल विभांडग विनुता ॥ ५ ॥

चित्र चरित्र सुगात्र त्रिनेत्र सुपुत्रय हरि मुनि पुत्रार्चित, शत । पत्र सुमित्रज मित्र सुमित्र सुपुत्र नताभव गोत्र सुगात्रा ॥ ६ ॥

करि तुरगासुरगारुढोरग हरी गिरिवर तरु सुर नर किन्नर । शरनिधि पूजित शरण जनाकर पुरहर पर शिव करुणाजलधे ॥ ७ ॥

अरुणारुणचरणारुण भवभयहरणैक गुणाभिरति वितरणा । शरणागतजनभरणधुरिण सुकरुणारसमय धर शरबाणा ॥ ८ ॥

अक्षरद क्षत्रिय क्षम हुक्षयु रक्षयुकाम विचक्षण चारुकटाक्ष निरीक्षण रक्षय दक्षण तक्षापेज विपक्ष दगाक्षा ॥ ९ ॥

ईश नदीश काशिनगर नीवेश महापशुपाशनिनाश हुताश दिवेश निशि सहृदा हरी केशवि सद्विश्वेश समीशा ॥ १० ॥

## पद ४३८ वें.

रामजिच्या नांवाची गस्त फिरे ।
कामक्रोधवैरी तेथें काशा....... ॥ ध्रुवपद ॥

---

१. सलिलजनयन, कमलाक्ष. २. पक्षी. ३. हरिण. ४. विप्र. ५. स्मित=दांत न दिसतां व स्वर स्पष्ट न होतां गालांतल्या गालांत जें मधुर हंसणें तें. [**स्मित**लक्षण]-'ईषद्विकसितैर्गण्डैः कटाक्षैः सौष्ठवान्वितैः । अलक्षितं द्विजद्वारे सूत्तमानां **स्मितं** भवेत् ॥ इति नाट्यलोचनः । ईषत्प्रफुल्लितैर्गण्डैः कटाक्षैः सौष्ठतान्वितैः । अदृष्टदन्तकुसुमैरुत्तमानां **स्मितं** मतम् ॥' इति भरतः-मालतीमाधव-जगद्धरकृतटीकानुरोधतः पाठान्तराणि-अंक १ ला, पृष्ठ २२ निर्णयसागर छापखान्यांतील आवृत्ति.]

मिरवितो निशाण **राम**नाम गर्जना ।
तेणें भयें कांपताहे **काळ** हा जाणा ॥ **राम०** ॥ १ ॥
विवेक हा कोतवाल सकळां करितो सावध ।
अज्ञानाचा अंधःकार झालासे दग्ध ॥ **राम०** ॥ २ ॥
**के**शव मार्गी ना.... सखया! जागवी जना ।
काया वाचा मनोभावें '**रामजी**' म्हणा ॥ **राम०** ॥ ३ ॥

## पद ४३९ वें.

आत्मा तैसा असोनि न दिसे बापा! ॥ ध्रुवपद ॥
चंद्र अमावास्ये असोनि जैसा न दिसे ॥
काष्ठामाजी वन्ही[1] असोनी जैसा न दिसे ॥ आत्मा० ॥ १ ॥
पुष्पाचा परिमळ[2] पाहीं, असोनी न दिसे कांहीं ।
तैसा आत्मा सर्वांग ठायीं न दिसे बापा! ॥ आत्मा० ॥ २ ॥
जगीं बाळक असोनि जैसें न दिसे ।
**के**शवि निजरूप तैसें जाणुनि राहीं बापा! ॥ आत्मा० ॥ ३ ॥

## पद ४४० वें.

मायबापा! तूं **म**ल्हारीराया! तुझ्या चरणीं अर्पिली काया[3] ॥ ध्रुवपद ॥
शुद्धभावाचा निज भंडार । तुझ्या रंगणीं उधळे अपार ॥ माय० ॥ १ ॥
निजप्राप्तीचें सुमन[4] शुद्ध । पूजा बांधेन परमानंद ॥ माय० ॥ २ ॥
अहंबुद्धीचा धूप दीप केला । 'सोहं[5]' नैवेद्य तुज दाविला ॥ माय० ॥ ३ ॥
ज्ञानभक्तीची उजळिली दिवटी । तेजें लोपले शशि सूर्य कोटी ॥ माय० ॥ ४ ॥
तुझ्या नामाची मागेन वारी[6] । म्हणे **के**शव झालों भिकारी ॥ माय० ॥ ५ ॥

## पद ४४१ वें.

आजि देखियला देखियला वो! । आनंदपुतळा **पां**डुरंग वो! ॥ ध्रुवपद ॥
भक्ति**भी**मातीरीं शांति**पं**ढरपुरीं । प्रेमविटेवरी[8] **विं**ठ्ठल उभा ॥ आजि० ॥ १ ॥
ब्रह्मनामरूपातीत नित्य सदोदित । जेथवरि चित्त योगीयांचें ॥ आजि० ॥ २ ॥
दूरी ना जवळी त्रिपुटी वेगळा । **के**शवीं भेटला साधूसंगें ॥ आजि० ॥ ३ ॥

---

१. अग्नी. २. वास. ३. देह. ४. पुष्प. ५. सोऽहम्=तो मीं. ६. भिक्षा. ७. पृष्ठ २१ टीप १ पहा. ८. पृष्ठ ४ टीप १ पहा.

## पद ४४२ वें.

चालतसे स्थिर ।[१] स्थिर सांवळा विठ्ठल गंभीर ॥ ध्रुवपद ॥
समाधिच्या पायवडिया सुंदरा । राम रमावरा घातलिया ॥ चाल० ॥ १ ॥
भोगेंविण भोगी त्यागेंविण त्यागी । महाराज योगी विश्वंभर ॥ चाल० ॥२॥
केशवराजप्रभु मंदिरासी आला । शांतिरुक्मिणीसि आनंद झाला ॥चाल० ॥ ३

## पद ४४३ वें.

म्हणे भाग्य निकें बहु भाग्य निकें । मंदिरा कौतुकें देव आले ॥ ध्रुवपद ।
विज्ञानमंचकिं बैसले गोपाळ । शांतिभी[१]मकबाळ चरण चुरी ॥ म्हणे ॥ १ ॥
ब्रह्मादिकां ज्याचा नेणवेचि पार । तो मज सा[२]चार जोडलासे ॥म्हणे० ॥ २ ।
केशवराजप्रभु सबाह्य दा[३]टला । त्या सुखें आ[४]टला देहभाव ॥ म्हणे० ॥ ३ ।

## पद ४४४ वें.

दीनबंधु दीननाथ मदनतात रामा ! ।
आदिपुरुष आदिगुरु सकळ कामा ॥ ध्रुवपद ॥
चिदानंद गोपीनाथ देखियला बाई ! ।
हारपली मनोवृत्ती अखंड त्याचे पायीं ॥ दीन० ॥ १ ॥
विश्वंभर विश्वरूपी माया नटधारी ।
मायातीत पूर्णब्रह्म पूर्ण अविकारी ॥ दीन० ॥ २ ॥
वैकुंठपुरनाथ मार मन देवराजा ।
भक्तवत्[५]सल केशवस्वामी ज[६]ननीजनक माझा ॥ दीन० ॥ ३ ॥

## पद ४४५ वें.

तैसें चि[७]दाकाश जाणिजे हो ! ध्रुवपद ॥
उपजतां घट मठ उपजे आकाश ॥ तैसें० ॥ १ ॥
वाढतां घट मठ न वाढे आकाश ॥ तैसें० ॥ २ ॥
भंगतां घट मठ न भंगे आकाश ॥ तैसें० ॥ ३ ॥
गुरुकृपे केशवीं आकाशीं आकाश ॥ तैसें० ॥ ४ ॥

## पद ४४६ वें.

निराकारीं बांधिलें आम्ही घर । निरंजनीं राहिलों निरंतर ॥ ध्रुवपद ।

---

१. रुक्मिणी. २. खरोखर. ३. 'कोंदला' असाही अन्य पाठ आहे. ४. 'दाटला' असाहि पाठभेद आढळतो. ५. भक्तांवर दया करणारा. ६. मायबाप. ७. चैतन्याकाश.

नाम आमुचें परब्रह्मवासी । आम्हां वस्ती सर्वदा चिदाकाशीं ॥ निरा० ॥ १ ॥
निजानंदीं आमुचा निज भोग स्वयंभसी । आम्हासी नित्य संग ॥ निरा० ॥ २ ॥
अधिष्ठानीं मिरास केली आह्मी । म्हणे केशव राहिलों निजधामीं ॥ नि०॥३॥

## पद ४४७ वें.

तैसा प्रपंच सोडुनि द्यावा । मग परमार्थ सांडावा ॥ ध्रुवपद ॥
गूळ सांडुनी गोडी घ्यावी । मीठ सांडुनी चव खावी ॥ तैसा० ॥ १ ॥
कनक सांडुनी घ्यावी कांती । दीप सोडुनी घ्यावी दीप्ती ॥ तैसा० ॥ २ ॥
रवा कापुराचा सांडाना । केशव म्हणे परिमळ घ्यावा ॥ तैसा० ॥ ३ ॥

## पद ४४८ वें.

कैंचें पुण्य पाप आम्हा कैंचें भवजाळ ।
सर्व काळीं झाला पूर्ण सुखें सुकाळ ॥ ध्रुवपद ॥
सद्गुरुच्या बोलें सर्व क्रिया शांत केल्या ।
निजानंदधामा मती नांदाया गेल्या ॥ कैंचें० ॥ १ ॥
जाणिवेचें बंड शतखंड वेगीं जाहालें ।
नामरुपातीत निजरुप हाता आलें ॥ कैंचें० ॥ २ ॥
गुणी गुणातीत योग सकळां जाहाला आजी ।
ब्रह्मांडेंशिं विरोनी गेलों केशवस्वामीमाजी ॥ कैंचें० ॥ ३ ॥

## पद ४४९ वें.

हरिभजनाविणें काळ घालवूं नको रे ! ॥ ध्रुवपद ॥
साधुचिया संगतिनें समज मनीं उमज बरा ।
अनुभवाविण मान हालवूं नको रे ! ॥ हरि० ॥ १ ॥
दोरीच्या सापा भिउनि भवा भेद नाहिं जिवाशिवा ।
अंतरिंचा ज्ञानदिवा मालवूं नको रे ! ॥ हरि० ॥ २ ॥
चिद्रुपासि समज मनीं पुरतेपणीं आणुनि ध्यानीं ।
आपुले मतिनें विषयचिखल कालवूं नको रे ! ॥ हरि० ॥ ३ ॥
केशव म्हणे स्वयं ज्योती तेथें नाहिं दिवस राती ।
तयाविण नेत्रपातीं हालवूं नको रे ! ॥ हरि० ॥ ४ ॥

---

१. 'सोहंभावें' अन्य पाठ. २. वतन. ३. सोनें. ४. ज्योत. ५. कण, तुकडा. ६. वास.

## पद ४५० वें.

इतुकें दे मजला दे मजला । मागतसें मी हरि ! तुजला ॥ ध्रुवपद
येती संत घरासी । भक्तीभावें पूजीन त्यांसी ॥ इतु० ॥ १ ॥
भगवद्भजनीं लागो । तुझिये स्वरूपीं मन हें वागो ॥ इतु० ॥ २ ॥
अक्षय वैभव देईं । अखंड केशवसद्गुरुपायीं ॥ इतु० ॥ ३ ॥

## पद ४५१ वें.

निजतेजें सांवळी । साजे नंदाची बाळी[1] ।
स्वानंदाची पुतळी । कान्हाई माझी ॥ १ ॥
बळिरामाची धाकुटी । रूपें दिसे बरवंटी ।
पाहतांनां निवे दृष्टी । कान्हाई माझी ॥ २ ॥
श्यामसुंदर ती बाळा । रूपें दिसे सोनवळा ।
चैतन्याची जीवनकळा । कान्हाई माझी ॥ ३ ॥
निजरुपाची तरणी[2] । कैवल्याची सुखदानी ।
केशवाची स्वामिणी । कान्हाई माझी ॥ ४ ॥

## पद ४५२ वें.

वरि कातडें अंतरिं हाडें । त्याचें भूषण मानिति गाढें ॥ ध्रुवपद ॥
काय जनां लागलें वेडें । गाढवाचें केलें घोडें ॥ वरि० ॥ १ ॥
गोड कल्पतरुच्या पाडें । बाभळीचीं सेविति[3] झाडें ॥ वरि० ॥ २ ॥
केशव म्हणे निज निवाडें । ऊंस सांडोनी[4] खाती वाडें ॥ वरि० ॥ ३

## पद ४५३ वें.

दिवसाची करुनी रातीं । कैसे व्यर्थचि नरका जाती ॥ ध्रुवपद ॥
मन गोदान कामासी देती । लक्ष[5] चौऱ्यायशीं सोंगें घेती ॥ दि० ॥ १ ॥
सुखसागर कमळापती । हातीं असोनी नेणती ॥ दि० ॥ २ ॥
केशव म्हणे सांगों मी किती । मूढें मीपणें दुःखी होती ॥ दि० ॥ ३ ॥

---

१ बालक कृष्ण. 'कानाई' शब्द स्त्रीलिंगी आहे. आराध्यदेवतेला 'माउली, आई' स्त्रीवाचक शब्दांनीं संबोधन करून प्रार्थना करावी असें वर्णन जुन्या भक्तिप्रतिपादक ग्रंथांत आढळतें. २. सूर्य 'भरणी' असा अन्य पाठ आहे. ३. 'कवळिती' पाठांतर. ४. 'टाकोनी' पाठ. ५. लक्ष चौऱ्यायशीं योनी पृष्ठ ८ टीप १ पहा.

### पद ४५४ वें.

तरि तें ज्ञान काय बा! क्षीण हा नव जाय बा! ॥ ध्रुवपद ॥
शोकसिंधू आटेना। आनंद हृदयीं दाटेना ॥ तरी० ॥ १ ॥
गलीत होउनि बोलेना। समाधिसुखें डोलेना ॥ तरी० ॥ २ ॥
केशवस्वामी भेटेना। सबाह्य अंतरीं दाटेना ॥ तरी० ॥ ३ ॥

### पद ४५५ वें.

सांगतों तुज बा! रे! माझे जिविंच्या खुणा।
स्वरूप सुख घेईं नरदेह पाहुणा ॥ ध्रुवपद ॥
नाशिवंत जाण काया। हिची कायशी माया।
मृगांबुलहरी[1] हे चित्रतरुची[2] छाया।
निर्णय करितां ही नये एकही आया।
यालागीं सांडीं वेगीं[3] देहबुद्धीचा धाया ॥ सांग० ॥ १ ॥
स्वप्नींचा लोक जैसा नये जागृतीं भेटी।
तैसाची संसार निजस्वरूपीं दृष्टी।
मीपण वाढवूनि व्यर्थ होतोशी कष्टी।
इंद्रियें जाळ सर्व याची कायशी गोष्टी ॥ सांग० ॥ २ ॥
गगनसुमनांचा[4] जेणें गुंफिला तुरा।
त्याहूनि त्रिभुवनीं मूर्ख नाहीं दूसरा।
तैसाचि द्वैतभाव[5] मनीं कल्पुनी खरा।
भोगिशी दुःख बा! रे! तूं काय निद्रिसुरा[6] ॥ सांग० ॥ ३ ॥
वांझेचा कुमर तो अतिबळवंत झाला।
गंधर्वनगरीं[7] हो तेणें वास पैं केला।

---

१. मृगजलाची लाट. २. चित्रांतील झाडाची. ३. 'आतां' पाठांतर. ४. खपुष्पांचा. [खपुष्प अथवा गगनसुमन हें अभावरूप आहे. याप्रमाणेंच अन्य पदार्थ आहेत.—जसें शशविषाण, वंध्यापुत्र.] ५. परमेश्वर आणि देह हीं दोन आहेत असें मानणें. ६. नीज लागलेला. ७. पुढील ओंव्या व हें पद हीं लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत पुढील ओंव्यांत संसार मायिक आहे असें सांगितलें आहे. "संसार म्हणिजे गंधर्वनगर। विचारितां जैसें मृगजळ। जैसें कां हें वंध्येचें बाळ। काय कोठें भेटेल ॥ १ ॥ यदर्थीं ऐक एक कथा। सांगतों या संसार दृष्टांता। बागुला गृहीं गर्भिणी योषिता। वंध्या नामें पै होती ॥ २ ॥ तियेचे उदरीं जन्मला पुत्र। अति सुलक्षणिक गुणवंत। पितयासारिखा पराक्रमी बहुत। दिवसेंदिवस वाढला ॥ ३ ॥ शुक्तिच्या

पर्णुनि[1] भीष्मकन्या[2] नित्य भोगूं लागला ।
त्रिवर्ग याची परी मिथ्या भ्रम घडला ॥ सांग० ॥ ४ ॥
जेव्हांची देह आहे सत्य तेव्हांची नाहीं ।
आहे नाहीं क्षणमात्र हेंही टाकुनी देईं ।
स्वज्ञान घेई-शीघ्र-ब्रह्म होऊनी राहीं ।
सद्गुरुवाक्यबोधें मग्न[3] केशवीं राहीं ॥ सांग० ॥ ५ ॥

### पद ४५६ वें.

तुम्ही निशिदिनीं मज ध्या गे! ।
वाणी ते उणी सकळ सदना जा गे! ॥ ध्रुवपद. ॥
पहिलें तैसें रूप तुझें गे! तैसे मनांत आणुनी तुम्ही ध्या गे! ॥ तुम्ही० ॥१
सोयरे आप्त सखे! गे! । पतीसुतादिक भरतिल रागें ॥ तुम्ही ० ॥ २ ॥
केशव मध्वप्रसादें । स्तवितो पुजितो अनुरागें[4]. ॥ तुम्ही० ॥ ३ ॥

### पद ४५७ वें.

माझे देहीं जितुकें कर्म होतें । त्याशीं कांहीं संबंध नाहीं मातें ॥ ध्रु० ।
कर्म कर्ता करविता भगवंत । जो कां नांदे सर्वदा आम्हा आंत ॥ मा०॥१
कर्म सूत्र चाळिता जनार्दन[5] । आम्ही बाहुलीं नाचतों तयाधीन ॥ मा० ॥२
कर्माकर्मीं आम्हासि शक्ती कैंची । म्हणे केशव अवघी सत्ता त्याची ॥ मा०॥३

---

रजताची भूषणें । गगनींची कमळमाळा तेणें । गळां घालोनी अति सत्राणें । जननीतें भमवि ॥ ४ ॥ घेऊनि मातेचे आज्ञेतें । पारधी निघाला वनातें । तंव सशाचें शिंग तयातें । प्राप्त झा श्रीरामा ॥ ५ ॥ तेंचि शस्त्र घेऊनी करीं । पुढें येतां ते अवसरीं । मृगजळाचे सरोवरीं । पारधं लागीं गुंतला ॥ ६ ॥ ऊर्णतंतूचें जाळ घेऊनि करीं । रिघाला तये सरोवरी । मीन धरोनी ना परी । बाहेरी येत पैं होता ॥ ७ ॥ तंव तेथें झालें विपरित । सुसरीनें गिळिला वांझेचा सुत तयाचे जे पुत्र पौत्र । शुद्धिलागीं निघाले ॥ ८ ॥ आले तया सरोवरासी । पुढें देखिलें दिगंब आश्रमासी । शुद्धि पुसते झाले त्यासी । ऐकुनी मुनी कोपला ॥ ९ ॥ परस्परें झाला संग्राम भिडते झाले क्रोधें परम । घायीं पडले पावोनी श्रम । गतप्राण पैं झाले ॥ १० ॥ तयाचें वांझेर झालें दुःख । रुदना करी, दीर्घ शोक । तैसा हा संसार मायिक । काय सत्य मानिजे" ॥ ११

१. परिणय (विवाह) करून. २. भीष्मकन्या ही अभावरूप होय. ३. 'मुक्त'पाठांतर. ४. प्रेमानें. ५. 'जो दंडी दुष्टांला, किंवा जन याचिती कुशल ज्याला । यास्तव जनार्दन असें साधूं नाम ठेविलें त्याला." ॥ २६ ॥ [नामार्थदीपिका—पृ० १४.]

## पद ४५८ वें.

तें म्यां पंढरपुर देखियलें ॥ ध्रुवपद. ॥
दर्शनमात्रें करी भवदुःखाचा चूर ॥ तें० ॥ १ ॥
स्मरणमात्रें करी भवदुःखाचा चूर ॥ तें० ॥ २ ॥
त्रिकाळ भेटीलागीं येती सुरवर ॥ तें० ॥ ३ ॥
प्रत्यक्षचि देखें नांदे विठ्ठल धूर ॥ तें० ॥ ४ ॥
केशव म्हणे जेथें वाहती प्रेमाचे पूर ॥ तें० ॥ ५ ॥

## पद ४५९ वें.

झालों सुखी सांगों मी कवणालागीं । अनाथबंधु भेटला ब्रह्मयोगी ॥ ध्रु० ॥
ज्याच्या बोलें संसारदैन्य गेलें । ज्याच्या संगें जिताची सुखी केलें ।
ज्याच्या पायीं त्रैलोक्य मुक्त झालें । ज्याचें नाम वाचेसी आतां आलें ॥ १ ॥
ज्याची कृपा देवाधिदेव दावी । ज्याची सेवा स्वरूपीं प्रीति लावी ।
ज्याची करणी कर्णासी नाहीं ठावी । स्वयंभ तो लावी लीलाभाव भावी ॥
विजयश्रीचा केवळ निजभर्ता । आनंद भक्त हृदयकमळीं धर्ता ।
केशवस्वामी बाह्य सुखकर्ता । आतां न उठे द्वैताची कोठें वार्ता. ॥ ३ ॥

## पद ४६० वें.

चिदानंद विठ्ठलरूप पाहीं । पाहतां माझ्या मीपणा ठाव नाहीं ॥ ध्रुवपद ॥
काया पंढरपुर हें रचियेलें । शांती देउळ त्यामाजी उभवीलें ।
प्रेम सिंहासन अढळ केलें । भक्ती विटेवरी बैसविलें ॥ चिदा० ॥ १ ॥
गुणातीत निष्काम अविनाशी । सर्वसाक्षी गोपाळ प्रेमराशी ।
आत्मा माझा घननीळ निश्चयेंसी । चित्तवृत्ती भाळली पूर्ण त्याशी. ॥ चिदा०
कटीं कर ठेवोनी निरंतरीं । समचरण सांवळा श्रीहरी ।
सहज उभा विज्ञान भीमातीरीं । दिव्य प्रभा न समाय धरांबरीं. ॥ चिदा० ॥ ३ ॥
दयासिंधू अनाथबंधू सखा । महिमा वर्णितां न कळे ब्रह्मादिकां ।
भेटों आला भावार्थ पुंडलीका । त्याच्या सवें केशवीं प्राप्ती देखा ॥ चिदा० ॥ ४ ॥

## पद ४६१ वें.

तो मज सीताकांत भेटवावा ॥ ध्रुवपद. ॥
रवीकुळजाच्या ज्ञाती शोभिवंत ॥ तो मज० ॥ १ ॥

---

१. देवश्रेष्ठ. २. कृत्य. ३. स्वयंभू. ४. आसक्त झाली. ५. न मावे. ६. धरा+अंबरीं=पृथ्वी+आकाशीं.

त्रिकाळीं मानस ज्याचें चिंतन करीत ॥ तो मज० ॥ २ ॥
ज्या नामें पाविजे भवसिंधूचा प्रांत ॥ तो मज० ॥ ३ ॥
शिणले ब्रह्मादिक नकळे ज्याचा अंत ॥ तो मज० ॥ ४ ॥
केशवस्वामी अनाथबंधू कृपावंत[1] ॥ तो मज० ॥ ५ ॥

### पद ४६२ वें.

ऐसें जाणें पूर्ण तोची योगी ॥ ध्रुवपद ॥
जन्मतें शरीर न जन्मों आपण ॥ ऐसें० ॥ १ ॥
मरतां हें शरीर न मरो आपण ॥ ऐसें० ॥ २ ॥
देशकालेंविण आपुला मी आपण ॥ ऐसें० ॥ ३ ॥
केशव म्हणे मी सहजचि आपण ॥ ऐसें० ॥ ४ ॥
नवल देखा दोघांची प्रीती कैशी हो ! ।

### पद ४६३ वें.

एकमेकां भाळलीं अहर्निशी[3] हो ! ॥ ध्रुवपद ॥
आत्माराम सद्गुरुदेव राजा वो ! निवृत्ती वो ! तसाचि निज भाजा वो ! ।
सर्वभावें संपूर्ण आत्मा काजा वो ! निशंकपणें रतले त्यासी वोजा वो ! ॥ १ ॥
एका योगें निष्काम कांपे दृष्टी वो ! सहज भोग भोगिती प्रेमपुष्टी वो ! ।
बोध पुत्र जन्मला त्याचे पोटीं वो ! त्याचे कासे लागली सर्व सृष्टी वो ! ॥ २ ॥
घराचार मांडला ऐसा पाहीं वो ! । परी तें कांहीं नेणती आपुल्या ठायीं वो ! ।
आपण सुखरूप हाही हेतू नाहीं वो ! केशव म्हणे निवालों त्याचे पायीं वो ! ॥ ३ ॥

### पद ४६४ वें.

पूर्वपुण्य फळासी आलें वो ! जगदीशाचें दर्शन पूर्ण झालें वो ! ॥ ध्रु० ॥
सद्गुरुकृपे लक्षितां चक्रपाणी[3] हो !
चित्त माझें वेधलें तया चरणीं हो ! ।
द्वैतभाव विरला तत्क्षणीं वो ! ।
भवदुःखाची निःशेष झाली धुणी वो ! ॥ पूर्व ० ॥ १ ॥

---

१. दयाळू. २. रात्रंदिवस. ३. कृष्ण. ‘चक्रपाणि’ हें तद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि समासाचें उदाहरण आहे. ज्या वर्णिलेल्या गुणांचें संविज्ञान, (चिन्ह खूण) ज्याच्या विशेष्यांत नित्य सांपडतें तो ‘तद्गुणसंविज्ञान’ बहुव्रीहि समास होय. येथें हातांत चक्र असणें हा जो गुण सांगितला तो कृष्ण या विशेष्यांत नित्य आढळतो. बहुव्रीहि समासाच्या दुसऱ्या प्रकारास ‘अतद्गुणसंविज्ञान’ असें म्हणतात.

विवेक दीप लाविला मंदिरांत हो! ।
अष्टभाव[1] पर्यंक[2] शोभिवंत हो! ।
सुमनसेज[3] रचिली प्रेमयुक्त हो! ।
तंव हा तेथें पातला भगवंत हो! ॥ पूर्व० ॥ २ ॥
भक्तवत्सल सद्गुरु महाराज हो! ।
हृदयकमळीं तेणें धरिलें मज हो! ।
मीपण माझें निमालें, गेली लाज वो! ।
केशवराजीं तन्मय झालें सहज हो! ॥ पूर्व० ॥ ३ ॥

### पद ४६५ वें.

बाई! ये लागली तयाची गोडी । बुद्धी[4] तयाकारणें झाली वेडी ॥ ध्रुवपद ॥
जो गोकुळीं गोधनें राखे स्वानंदें गोरस चाखे ।
ज्याचे प्रकाशें त्रैलोक्य झांके । तो हृदयीं येउनी ठाके ॥ बाई० ॥ १ ॥

---

१. आठ सात्विकभाव (शरीरज). सात्विकभाव—हे शरीरविकार आहेत. यांचे चार भेद मानतात. ते असे:—"१ **कायिक** २ **मानसिक** ३ **आहार्य** आणि ४ **सात्विक**. (१) **कायिक**—शरीराचे जे चलनवलनादि व्यापार, आणि मनोविकार उत्पन्न झाल्यावर मुखावर होणारीं त्या त्या मनोविकारास योग्य अशीं चिन्हें. हे सर्व कायिकअनुभाव होत. (२) **मानसिक**—जसा मनोविकार उत्पन्न झाला असेल किंवा नाटकांत पात्रास त्या त्या प्रसंगीं जो मनोविकार उत्पन्न झाल्याचें अभिनयानें दाखवावें लागतें, तशी मनाची स्थिति असल्याचें दाखविणें किंवा प्रमोद ब्रह्मानंद समाधि इत्यादिक. (३) **आहार्य**—वेष धरून अभिनयद्वारा जें भाव दाखविणें तें. जसें:—विष्णूचें सोंग घेऊन चतुर्भुज होणें, सोंड लावून गणपति होणें, इत्यादिक. ह्याचा नाटकांत मात्र उपयोग आहे. (४) **सात्विक**—सत्वगुणापासून उत्पन्न होणारे जे शारीरिक विकार ते आठ आहेत. त्यांचीं नांवें व लक्षणें. (१) स्तंभ.—शारीरिक सर्व धर्म कायम असतां कांहीं कारणांनीं अकस्मात् गतिनिरोध होतो तो. (२) स्वेद.—घाम श्रमापासून उत्पन्न झालेला असला तर तो सात्विकभावांत गणला जाणार नाहीं; कारण तो मनोविकाराचें कार्य नव्हे. (३) रोमांच.—क्रोध, भय, हर्ष, राग, इत्यादिकांपासून अंगावर कांटे उभे राहतात. ते. (४) स्वरभंग.—आवाज बदलणें. सर्दी झाली असतां जो आवाज बदलतो तो मनोविकारजनित नसल्यामुळें स्वरभंग समजूं नये. (५) वेपथु.—अंगास कंप सुटणें, हर्ष, भीति इत्यादिकांपासून हा होतो. साधारण एखाद्या वेळीं अंग कांपूं लागतें त्यास वेपथु म्हणत नाहींत; कारण तो कंप मनोविकारापासून उत्पन्न झालेला नसतो. (६) वैवर्ण्य—शरीराचा रंग पालटणें. (७) अश्रु.—स्पष्टच आहे. (८) प्रलय.—चेष्टानिरोध. स्तंभांत गतिनिरोध असतो, व ह्यांत चेष्टानिरोध असतो. निद्रेंतही चेष्टानिरोध आणि गतिनिरोध असतो; पण तो मनोविकारजनित नसल्यानें तेथें स्तंभ किंवा प्रलय मानीत नाहींत; येणेंप्रमाणें हे आठ सात्विकभाव आहेत." [रसबोध—पृष्ठ ६-८ पहा.] २. मंचक. ३. पुष्पांची शय्या. ४. 'वृत्ति' असा

जो नंदाचे घरचा बाळ । जो काळाचाही महाकाळ ।
जो दीनबंधु त्रैलोक्यपाळ । ज्याचें नाम प्रसिद्ध गोपाळ ॥ बाई० ॥ २ ॥
जो साधूंचें निजमाहेर । जो विश्रांतीचें निज[1]घर ।
जो विश्वंभर परात्पर । तारी नामेंची भवें[2] दुस्तर[3] ॥ बाई० ॥ ३ ॥
जो सायुज्य[4]पददाता । ज्याचे मस्तकीं पाय वंदी धाता[5] ।
ज्याचे पाय वंदी शिव माथां । त्याचें स्वरूप दावीं मज आतां ॥ बाई० ॥४
जो साराचें निज सार पाहीं । थोर[6] जयाविण कांहींच नाहीं ।
[7]जयाचा पार नकळे कांहीं । दास केशव शरण तयाचे पायीं ॥ बाई० ॥ ५

## पद ४६६ वें.

[8]आतां हरी तुझी लागली मला गोडी ॥ ध्रुवपद ॥
सुंदररूप पाहुनी डोळां झाली मी वेडी वेडी ॥ हरि० ॥ १ ॥
भावबळें [9]केशवस्वामी धुतो [10]नरंघोडीं घोडीं ॥ हरी० ॥ २ ॥

## पद ४६७ वें.

आम्ही रंगा रे! रंगा रे! रामरंगीं रंगलों बा! रे! ॥ ध्रुवपद ॥
आम्ही रंगा रे! पैं झालों । रामरंगीं रंगा आलों ॥ आम्ही० ॥ १ ॥
रामरंगा हृदयीं राहूं । रंग जडमूढासीं लावूं ॥ आम्ही० ॥ २ ॥
म्हणे केशवस्वामी रंगारा । राम रंगवी जन सारा ॥ आम्ही० ॥ ३ ॥

## पद ४६८ वें.

[11]कमलावल्लभ हरी तो माझे नयनीं दावा हो! ।
त्याविण न गमे क्षणभरि लौकरी आणुनी दावा हो! ॥ ध्रुवपद ॥

---

१. 'मूळघर' पाठांतर. २. संसार. ३. कठीण, त्रासदायक. ४. मुक्ति देणारा. ५. ब्रह्मदे
६. 'थारा' अन्य पाठ. ७. 'ज्यांचें रूप न कळे कांहीं' असा अन्य पाठ आहे. ८. कोणी व्रजकामिनी कृष्णास म्हणते. ९. केशवाचा स्वामी. (कृष्ण). १०. अर्जुनाचीं घोडीं. विष्णूनें कृष्णावतार स्वभक्त जो अर्जुन त्याचें सारथ्य केलें ही कथा पुराणांत सुप्रसिद्ध आहे. पंतांनीं ही कृष्णाची मोतद्दारी अनेक स्थळीं वर्णिली आहे:—'असा प्रभुहि सेवकां भजसि खासदारापरी' (केकावलि ७ 'अर्जुनतुरंगमातें जो स्वकरानें करी खरारा जी! । श्रीकृष्ण काय बहुधा निजपददासांसि जो खर राजी. ।।' याच प्रकारचें वर्णन इतर कवींच्या ग्रंथांतही आढळतें. ११. रासक्रीडा समाप्त झाल्यावर गोपींस स्वसौंदर्याविषयीं गर्व झाला, असें पाहून कृष्ण अदृश्य झाला. [भागवत–स्कंध १० अध्याय ३१] तेव्हां कोणी विरहव्याकुळ गोपी आपल्या सख्यांजवळ म्हणते.

त्रिभुवनचालक मुनिजनपालक बालक नंदाचा ।
अनंतगुणनिधी दीनदयाकर[1] तारक विश्वाचा. ॥ कमला० ॥ १ ॥
वियोगबाणें शरीर माझें जर्जर झालें हो! ।
मदनजनक तो न भेटतां मज मरण आलें हो! ॥ कमला० ॥ २ ॥
भवभयमोचन देव सनातन राजिवलोचन[2] हो! ।
केशव म्हणे हें दृढ धरी चित्तीं अनुत पदास हो! ॥ कमला० ॥ ३ ॥

## पद ४६९ वें.

गौळियांचे घरीं । क्रीडतो अंतर्बाह्य[3] हरी हो! ॥ ध्रुवपद. ॥
सत्य जें सूत्र निजमनाचें । ध्येय जें नित्य संतजनाचें ।
क्षेत्र जें सर्व भुवनाचें । मूळ जें निखिल गगनाचें ॥ गौळि० ॥ १ ॥
आद्य जें सर्व आद्याचें पाहीं । वेद जें सर्वदा सर्वदेहीं ।
वंद्य जें सर्वलोक निश्चयीं । सिद्ध जें संचलें सर्वा ठायीं ॥ गौळि० ॥ २ ॥
कळे जें गुरुवाक्य विचारें । साधे जें आत्मज्ञान विचारें ।
भेटतो निज साक्षात्कारें । केशवीं मग्न तदाकारें ॥ गौळि० ॥ ३ ॥

## पद ४७० वें.

म्हणवुनी सुख झालें । सुख झालें ॥ ध्रुवपद. ॥
विवेक जागा केला । म्हणवुनी सुख झालें ॥ १ ॥
संशय अवघा गेला । म्हणवुनी सुख झालें ॥ २ ॥
भेद भयंकर मेला । म्हणवुनी सुख झालें ॥ ३ ॥
आत्मा होउनि ठेला । म्हणवुनी सुख झालें ॥ ४ ॥
परतें केलें कामा । म्हणवुनी सुख झालें ॥ ५ ॥
हृदयीं धरिलें रामा । म्हणवुनी सुख झालें ॥ ६ ॥
मीपण नकळे आम्हा । म्हणवुनी सुख झालें ॥ ७ ॥
आलों मंगळधामा । म्हणवुनी सुख झालें ॥ ८ ॥
आनंदडोहीं पडलों । म्हणवुनी सुख झालें ॥ ९ ॥
स्वयंप्रकाश घडलों । म्हणवुनी सुख झालें ॥ १० ॥
अनुभव तरुवरी चढलों । म्हणवुनी सुख झालें ॥ ११ ॥
उपाधी[4] उरली नाहीं । म्हणवुनी सुख झालें ॥ १२ ॥
केशवीं कांहींच नाहीं । म्हणवुनी सुख झालें ॥ १३ ॥

---

१. दीनांवर दया करणारा. २. कमलाक्ष. ३. आंत बाहेर, जिकडे तिकडे. ४. संसार, माया; पदार्थांच्या स्वरूपांत भेद करणारा किंवा भासविणारा अन्य पदार्थ अथवा संबंध.

### पद ४७१ वें.

गे ! भाइये ! भेटवा सज्जन वेगीं । ज्ञान वज्रांगीं लेइलें आंगीं ॥ ध्रुवपद
भक्ति ज्याचे हृदयीं खेळे । शांती ज्याचिये सर्वांगीं लोळे ॥ भेटवा० ॥ १
जे अलिप्त सर्वांसंगीं । जो योगीविण निजयोगी ॥ भेटवा० ॥ २ ॥
बोध राहिला ज्याचिये खोळे । पाहाया त्यासी भुकेले डोळे ॥ भेटवा० ॥ ३
ज्यासी सर्वत्रीं समान भावी । ज्याचे मतीं हा संसार वांवो ॥ भेटवा० ॥ ४
जो स्वयंभ देवादिदेवो । त्याचे पाय वंदी केशवो ॥ भेटवा० ॥ ५ ॥

### पद ४७२ वें.

काम करा मक (?) जाळीं रे ! । निर्मळ भजनें जाळीं रे ! ॥ ध्रुवपद. ।
भजतों सज्जनरंजन रे ! । तारक शोकप्रभंजन रे ! ॥ काम० ॥ १ ॥
सारुनियां भवभर्गा रे ! । निर्भय वैभव भोगी रे ! ॥ काम० ॥ २ ॥
सुखघन सागर नायक रे ! । केशव म्हणे निजदायक रे ! ॥ काम० ॥ ३

### पद ४७३ वें.

पूजा अर्चन संताचें । हेंचि दास्य भगवंताचें ॥ ध्रुवपद. ॥
तेथ दुसरेपण कैंचें । अवघें स्वरूप देवाचें ॥ पूजा० ॥ १ ॥
गुरुकृपे केशवीं साचें । झालें दर्शन गोपाळाचें ॥ पूजा० ॥ २ ॥

### पद ४७४ वें.

सफळ जन्म झाला । नामें वाचेसि आला ।
स्वरुप लक्षितांची भवदुःख हें गेलें ॥ ध्रुवपद. ॥
सद्गुरुनाथ देवा ! । तुझी घडली सेवा ।
माझाचि मजमाजी लाधला ठेवा ॥ सफळ० ॥ १ ॥
देहीच देहभावो । झाला निश्चयें वावो ।
स्वसुख लक्षितांची नाहीं मीपणा ठावो ॥ सफळ० ॥ २ ॥
मी तूं हें द्वैत नाहीं । ऐसें बिंबलें पाहीं ।
केशवप्राप्ती झाली पूर्ण तुझिये पायीं ॥ सफळ० ॥ ३ ॥

### पद ४७५ वें.

सर परता नाटका हृषीकेशी । जीव घेतला तरी कां न सोडिसी ? ॥ध्रु

---

१. व्यर्थ. २. देवादिकांचा देव. ३. द्वैत. ४. संसारदुःख. ५. सांपडला. ६. ...
७. हृषिक+ईश=इंद्रिय+स्वामी=जितेंद्रिय (कृष्ण). जो ईश इंद्रियांचा, किंवा वश इंद्रियें ...
असती । यास्तव त्या क्षेत्रज्ञा नाम हृषीकेश [जाणते] म्हणती ॥ ४७ ॥ [नामार्थदीपिका–पृ०

जातीकुळावेगळें आम्हां केलें । थिता माणुसपण तेंही नेलें ।
क्रिया कर्म हें शून्य होऊनि ठेलें । तुझ्यासंगें गोवळ्या! ऐसें झालें ॥सर०॥१॥
आम्ही नारी सुंदरा सकुलीना । कैसा निढळा पडलासी कुळहीना ।
नेणों कैंचा होतासी पुरातना । कैसें सबाह्य वेधिलें वृत्ति शून्य॥ सर० ॥ २ ॥
कर्म पाहतां केवळ परद्वारीं । [1]शेखीं आपण म्हणविसि ब्रह्मचारी ।
गुरुकृपे केशवीं निजनिर्धारीं । तुझ्यासंगें उरली नाहीं [2]उरी ॥ सर० ॥ ३ ॥

**पद ४७६ वें.**

सहज मी आंधळा गा! कांहीं न देखें डोळां ।
आपेंआप संचलेंसें निजस्वानंदलीळा ॥ ध्रुवपद. ॥
मुळिंचा मी आंधळा गा! दृष्टी न देखों कांहीं ।
द्रष्टपण कैंचें मज दर्शनासी ठाव नाहीं ।
एकाएकीं एकला मीं सुख स्वरुप पाहीं ।
याती कुळ वर्ण धर्म न स्पर्शे माझ्या ठायीं ॥ सहज० ॥ १ ॥
दृश्य द्रष्टा दर्शनेवीण उरलें केवळ द्रष्टपण ।
तेंचि निजरूप माझें चिन्मयानंदघन ।
एवंविध बोलताहे श्रुति लाजल्या जाण ।
अनुभवी ते जाणती गा! ज्यासी [3]बाणलीं खूण ॥ सहज० ॥ २ ॥
शुद्ध बुद्ध नित्य मुक्त अद्वैत अविनाश ।
निज नित्य निर्मळ परब्रह्म केवळ ।
नामरूपावेगळा मी सर्व शून्याचें मूळ ।
गुरुकृपे केशवराजीं [4]ज्ञप्ती मात्र निश्चळ ॥ सहज० ॥ ३ ॥

**पद ४७७ वें.**

तो आजि स्वयंभ देखियला देखियला ॥ ध्रुवपद. ॥
अनादीचें रूप देव निरालंब ॥ तो० ॥ १ ॥
जीव शिव हे दोन्ही ज्याचे प्रतीती ॥ तो० ॥ २ ॥
बिंबा निर्बिंबारहित ज्याचें प्रतिबिंब ॥ तो० ॥ ३ ॥
सर्व बिंबांमाजी बिंबोनी बिंबतो ॥ तो० ॥ ४ ॥
केशव म्हणे सर्व सुखाचा कंद ॥ तो० ॥ ५ ॥

---

१. शेवटीं. २. बाकी, शिल्लक. ३. 'ज्यासी बाणली खूण' असा अन्य पाठ आहे. ४. ज्ञान.

विजयश्रीचा केवळ निजभर्ता हो! ।
ध्यातां नुमटे द्वैतांची[1] पैं वार्ता हो! ॥ ज्याची० ॥ २ ॥
अनंत भक्त हृदयकमळीं धर्ता हो! ।
केशवस्वामी सबाह्य सुखकर्ता हो! ॥ ज्याची० ॥ ३ ॥

### पद ४८४ वें.

तें माये! सांगों कैसें हो! । तें माये! बोलों कैसें हो! ॥ ध्रुवपद. ॥
गुह्याचें निजगुह्य वेदां अगोचर[2] देखिलें आजि म्यां नयनीं ।
तेजाविणें तेज प्रकाशे, बळ[3] कोंदाटलें त्रिभुवनीं ।
तयामाजी मन समरस होतां मीपण गेलें विरुनी ।
........................................................ ॥ तें० ॥ १ ॥
अखंडा अखंड उदंडा उदंड अनादीचें निज मूळ ।
अनंत कोटी ब्रह्मांडें पोटीं, ज्यासी नाहीं याती[4] कूळ ।
अनाम अरुप निःकळंक स्वरूप विमळा अतिविमळ ।
अनुभव अवचिता धबकरीं(?) देखिलें इंद्रियें झालीं पांगूळ ॥ तें० ॥ २ ॥
नित्य निरामय अव्यय अव्यक्त निष्कपट सनातन ।
परमाया परमित परिणामाविरहित अविनाश सुखघन ।
अलक्ष निरालंब स्वयें सदोदित निर्गुण निरंजन ।
गुरुकृपे केशवीं सबाह्य लक्षितां हारपलें दृश्यभान[5] ॥ तें० ॥ ३ ॥

### पद ४८५ वें.

मंगळधाम सद्गुरु **राम** पाहीं रे! ।
अनन्यभावें लागावें त्याचे पायीं रे! ॥ ध्रुवपद. ॥
समता देउनी ममतेचा नाश केला । रमतां चरणीं अलभ्य लाभ झाला ।
त्याचे संगें त्रिताप[6] माझा गेला । मीपण जावोनी आत्मा हाता आला ॥१॥
देहबुद्धीत्यागें कल्पनासंगभंगें । त्यागभोगें समाधी लाग वेगें ।
साधुसंगें निष्काम भोगसंगें । त्याच्या रंगें रंगला स्वात्मा रंगें ॥ २ ॥
अनंत कोटी ब्रह्मांडें ज्याचे पोटीं । सबाह्य करुनी त्याचे दृश्य भेटी ।
द्वैत स्वप्न नाशिलें उठाउठी । केशव म्हणे कृपेची महिमा मोठी ॥ ३ ॥

---

१. भेदबुद्धीची. २. अज्ञेय. ३. बळ=तेज, रूप. ['बलं गंधरसे रूपे स्थामनि स्थौल्यसैन्ययोः । पुमान् हलायुधे दैत्यप्रभेदे वायसेऽपि च ॥'. ४. जाति. ५. देहभान. ६. पृष्ठ ३८ टीप ८ पहा.

### पद ४८६ वें.

केला राम धणी राम धणी । अगणित ज्याची करणी ॥ ध्रुवपद. ॥
रामीं रतली वाणी । आतां सुखासी नाहीं हानी ॥ केला० ॥ १ ॥
रामापरतें कांहीं । दुसरें कदापि उरलें नाहीं ॥ केला० ॥ २ ॥
केशवप्रभुसी ध्यातां । सहजचि निजपद आलें हाता ॥ केला० ॥ ३॥

### पद ४८७ वें.

संतसंगें[1] मी शिकलों जेवूं । अहं सहित नाठवे सोऽहम् ॥ ध्रुवपद. ॥
विवेक वरण, निवृत्ती रोटी, । स्वानुभव घृत[2] वाढिलें ताटीं ॥ संत० ॥ १ ॥
सद्भाव भात, नवलक्ष कढी । जंव जंव जेवीं तंव तंव गोडी ॥ संत ॥ २ ॥
वैराग्य पापड भजन भाजी । निष्काम लोणचीं वाढलीं आजी ॥ संत० ॥ ३ ॥
प्राप्ती दध्योदन[3] वाढियेला ठायीं । सबाह्य तृप्ती जेवितां पाहीं ॥ संत० ॥ ४ ॥
गुरुकृपे केशवीं जेवुनी धालों[4] । जेवितां जेवितां ईश्वर झालों ॥ संत० ॥ ५ ॥

### पद ४८८ वें.

दोघे सारिखे सारिखे । परस्पर जिवलग सखे ॥ ध्रुवपद. ॥
राम सेवी दंडकारण्य । साधू सेवी ब्रह्मारण्य ॥ दोघे० ॥ १ ॥
राम तारीं जडपाषाण[5] । साधु जडजीवां[6] उद्धरण ॥ दोघे० ॥ २ ॥
रामें सीता आलिंगिली । साधुनी सोहिरिक शांती केली ॥ दोघे० ॥ ३ ॥
रामें रावण निवटिला[7] । साधूनीं अहंकार बुडवीला ॥ दोघे० ॥ ४ ॥
रामें बिभीषण स्थापिला । संतीं बोध विजय केला ॥ दोघे० ॥ ५ ॥
रामें नगरी[8] वैकुंठीं नेली । संतीं सृष्टी पावन केली ॥ दोघे० ॥ ६ ॥
केशव म्हणे दोघांमाजी । मिठी पडली अभिनव आजी ॥ दोघे० ॥ ७ ॥

### पद ४८९ वें.

वियोग साहवेना । मजला हरिविणें राहवेना ॥ ध्रुवपद. ॥

---

१. या पदांत 'रूपका'लंकार आहे. २. तूप. ३. दहींभात. ४. तृप्त झालों. ५. भारी वजनाचा दगड (अहल्या); (पक्षीं) दगडाप्रमाणें मूर्खांना; (पक्षीं) पाण्याला आणि दगडाला अर्थात् निर्जीव पदार्थांना सुद्धां. ६. मूढ प्राण्याला; (पक्षीं) पाण्याला आणि प्राण्यांना. [पवित्र तीर्थांत अपवित्र लोक स्नान केल्यानें तें अपवित्र होतें व त्या तीर्थांत कोणी साधूनें स्नान केलें असतां तें पवित्र होतें, असा समज आहे.] ७. मारिला. ८. अयोध्या.

झडकरी आणा हो! । सुंदर यादवराणा! ।
[1]पंचप्राण व्याकुळ झाले हरिवीण जाणा हो! ॥ वियोग० ॥ १ ॥
चंदन माळी तो । मजला शशांक पोळितो ।
हृदयकमळाजवळी देखेन जेव्हां जीवन तो [2]वनमाळी हो! ॥ वियोग० ॥२॥
केशवस्वामी हो! । नादे [3]अंतर्यामीं हो!
तत्पदीं तन्मय होउनी राहिन मंगळधामीं हो! ॥ वियोग० ॥ ३ ॥

**पद ४९० वें.**

सोहिरा श्रीराम याचा हस्त धरुनियां जावें ।
हांसतील लोक त्यांला सुखी हंसूं द्यावें. ॥ ध्रुवपद. ॥
जाणिवेचें [4]बंड जगीं वाढलें [5]उदंड ।
संतसंगें ज्ञानयोगें करी शत खंड ॥ सोहिरा० ॥ १ ॥
[6]काळी कराळीं भाली कल्पनेची जाळी ।
जाळोनियां ध्यावा वेगीं चिन्मय [7]वनमाळी ॥ सोहिरा० ॥ २ ॥
तळमळेची गांठ सुटे खळखळा सुटे जेणें ।
केशव म्हणे निजलाभ हाचि आतां घेणें. ॥ सोहिरा० ॥ ३ ॥

---

१. "वायूचे प्राण, उदान, व्यान, समान व अपान असे पांच भेद आहेत. त्यांपैकीं प्राणवायु डोक्यांत वास करून ऊर व कंठ ह्या स्थानांत संचार करितो. तो बुद्धि, हृदय, इंद्रियें व चित्त यांना धारण करितो व थुंकणें, शिंकणें, ढेंकर देणें, श्वास घेणें व अन्न गिळणें इत्यादि क्रिया चालवितो. उदान वायूचें स्थान ऊर असून तो नाभि, गळा व नासिका ह्या स्थानांतून संचार करितो; व वाचा, ऐच्छिक क्रिया, उत्साह, बल, वर्ण, स्मृति इत्यादि गोष्टी उत्पन्न करितो. व्यान वायु हृदयांत राहून सर्व शरीरांत संचार करितो. त्याचा वेग फार तीव्र असून चासणें, हस्तादिकांचें आकुंचन व प्रसारण, पापण्या उघडणें व मिटणें इत्यादि सर्व शारीर क्रिया प्राय: त्याजवर अवलंबून आहेत. समान वायु पाचकाग्नि जवळ राहून सर्व कोठ्यांत संचार करितो. अन्नाचें ग्रहण व पचन करितो व त्याचा सत्वांश मलापासून पृथक् करून मलाचें विसर्जन करितो. अपानवायु गुदस्थानीं राहत असून कुक्षे, बस्ति, शिस्न व मांड्या ह्या स्थानांत संचार करितो. व शुक्र, आर्तव, मल, व गर्भ यांना बाहेर काढितो." (गर्देकृत वाग्भट–अष्टांगहृदय, सूत्रस्थान, अध्याय १२ श्लोक ४-९–पृष्ठ १४८-१४९.)
२. पृष्ठ ३२ टीप १ पहा. ३. मनांत, हृदयांत. ४. 'दंभ' असा अन्य पाठ आढळतो. ५. पुष्कळ.
६. अग्नीला सात जिव्हा आहेत असें समजतात. त्या सात जिव्हांचीं नांवें:—'काली कराली धूमा च लोहिता च मनोजवा । स्फुलिंगिनी विश्वरूपा सप्त जिव्हा: प्रकीर्तिता: ॥' इति गर्ग: । यद्वा । भवति हिरण्या कनका रक्ता कृष्णा च सुप्रभा चान्या । अतिरक्ता बहुरूपेति सप्त सप्तार्चिषो जिव्हा ॥ इति हलायुध: [रघुवंश–सर्ग १० श्लो० २१ हेमाद्रिकृत टीका], 'काली मनोजवा धूम्रा कराली लोहिता तथा । स्फुलिंगिनी विश्वरुचि: सप्त जिव्हा विभावसो: ॥' [अ० २ श्लो० ५ टीका.]
७. पृ० ३२ टी० १ पहा.

## पद ४९१ वें.

भेदासी[1] निरसिलें । दुःख हिरोनी नेलें ।
स्वरुप दाखविलें । सुखी सर्वदा केलें ॥ ध्रुवपद. ॥
माय बाप तूं माझा देवा! सद्गुरुराया! ।
वंदितों पाय तुझे आलों मूळिंच्या ठाया ।
ऐकतां वाक्य तूझें गेली [2]मीपण माया ।
पावलों निजखुण झाली [3]खपुष्प काया ॥ भेदा० ॥ १ ॥
वाच्यांश निरसोनी शुद्ध लक्ष्यांश केलें ।
जीवशिव ऐक्यबोधें '[4]असि'पद दाविलें ।
त्रिपदातीत सुख मातें परिपूर्ण दीधलें ।
केशवराजस्वामी सहजीं सहज ठेलें ॥ भेदा० ॥ २ ॥

## पद ४९२ वें.

संसार क्षयरोग तुज झोंबला आंगीं ।
काय बा! करितोसी? धांवा धांव करी [5]वेगीं ॥ ध्रुवपद. ॥
लागलें काळ माप नित्य आयुष्यालागीं ।
म्हणोनी निजहिता राहीं संतांचे संगीं ॥ संसार० ॥ १ ॥
यालागीं राहीं बापा! संत[6]संग धरुनी ।
विश्वास दृढ ठेवीं नित्य त्याच्या वचनीं ॥ संसार० ॥ २ ॥
सबाह्य विनविती तेंची तुजलागोनी ।
अक्षय करितील ब्रह्मरस देवोनी ॥ संसार० ॥ ३ ॥
दारुण भोग भारी नित्य यातना करी ।
तेणें बा! श्रमलासी सुख नाहीं शरीरीं ॥ संसार० ॥ ४ ॥
कुपथ्य विषयाचें नित्य होतसे शरीरीं ।
सद्गुरु धन्वंतरी तोचि आरोग्य करी ॥ संसार० ॥ ५ ॥
त्याविणें आणिकासी रोग नव्हे बा! दुरी ।
........................................ ॥ संसार० ॥ ६ ॥
मोडोनी [7]क्षर भाग सहज [8]अक्षर भारी ।
म्हणोनियां पाय त्याचे केशव मस्तकीं धरी ॥ संसार० ॥ ७ ॥

---

१. द्वैतासी. २. 'अहंता माया' असा अन्य पाठ आहे. ३. अभावरूप. ४. तूं आहेस—हें पद. सत्वर. ६. साधुसमागम. ७, नाशवंत, नश्वर. ८. अविनाशी.

**पद ४९३ वें.**

भक्तिवेगळें कोरडें ज्ञान काय रे ! ।
झालें परि तें चढोनियां लाहे रे ! ।
भक्ती विरक्ति जेथें पूर्ण आहे रे ! ।
ब्रह्मानंद बोलतां तें तें पाहे ॥ ध्रुवपद. ॥
शास्त्र वि[1]त्पती केवळ जाणा फांटा रे ! ।
पुढें तेणें सर्वांगीं भरे ताठा रे ! ।
[2]अहं ज्ञाता ही मिरविती प्रतिष्ठा रे ! ।
नरदेवां कैंची आत्मनिष्ठा रे ! ॥ भक्ती० ॥ १ ॥
भजनावांचोनी ब्रह्मप्राप्ती जोडे रे ! ।
तरि कां वंदावे संत अघोडे रे ! ।
गिरिकपाट सेवनें व्यर्थ कडे रे ! ।
बैसे मानिती ते ज्ञानगर्वी चढे रे ! ॥ भक्ती० ॥ २ ॥
मुख्य ज्ञानासी भक्ती [3]आधार रे ! ।
.............................. रे ! ।
गुरुकृपे केशवीं भजन [4]सार रे ! ।
तेथ मूळें [5]आतुडे साक्षात्कार रे ॥ भक्ती० ॥ ३ ॥

**पद ४९४ वें.**

सावधान सावधान । ऐका उघडोनी कान ।
धरोनी अभिमान । व्यर्थ भरूं नका रान ॥ ध्रुवपद. ॥
विषय सेवितां बा ! [6]अंतीं हिं[7]पुटा होसी ।
चौ[8]ऱ्यायशीं लक्ष योनी आवश्यक तूं घेसी ।
यालागीं जरि विषयासी सोडोनी देसी ।
पावसी मोक्षपदा ऐसी [9]भाक घे माझी ॥ सावधान० ॥ १ ॥
काळ हा सर्प बा ! रे ! तुजला झोंबला पाहीं ।
होई तूं [10]परिक्षित वेळ न लावीं कांहीं ।

१. व्युत्पत्ति. २. मीच शाहणा अशी बढाई. ३. 'अधिकार' असा पाठ कोठें कोठें आढतो ४. उत्तम. ५. होई, घडे. ६. प्रांतीं, शेवटीं. ७. दुःखी, कष्टी. ८. पृष्ठ ८ टीप १ पहा. ९. वचन १०. सर्व संग परित्याग केलेला, परिक्रिया केलेला.

आयुष्य चालिलें बा! यासी संदेह नाहीं ।
जाणोनी निजरूप देहीं होईं विदेही ॥ सावधान० ॥ २ ॥
गर्भींच सेटवलें त्याचें बारसें नाहीं ।
देह तैसाच जाण भास मात्र पैं आहे ।
आहे तों हित करीं कैाकताल या न्यायें ।
केशवीं गुरुकृपे ऐक्य करुनी राहें ॥ सावधान० ॥ ३ ॥

## पद ४९५ वें.

या या गुरुला म्यां काय द्यावें? । याला कासयानें उतराई व्हावें? ॥ध्रुवपद.॥
नबोधाची दिवटी दावी । देव प्रत्यक्ष नयनीं दावी ॥ या० ॥ १ ॥
य स्वरूप लोपलें होतें । तेंही पाहिलें म्यां गुरुचेनि हातें ॥ या० ॥ २ ॥
शवस्वामी दयाळू माझा खरा । तेणें दावियेलें विश्वंभरा ॥ या० ॥ ३ ॥

## पद ४९६ वें.

मच्छ जावे कोणी कडे । पाणी जिकडे तिकडे ॥ ध्रुवपद. ॥
आंत पाणी बाहेर पाणी । पाणियाची नाहीं वाणी ॥ मच्छ० ॥ १ ॥
जिकडे पाहे तिकडे पाणी । वाम सव्य अवघें पाणी ॥ मच्छ० ॥ २ ॥
जाणें येणें जरी पडे । तरी पाणियामाजी घडे ॥ मच्छ० ॥ ३ ॥
केशव म्हणे बरें पाहें । मच्छ म्हणतां पाणी आहे ॥ मच्छ० ॥ ४ ॥

## पद ४९७ वें.

•झडकरी दावा हो! मजलागीं । प्राणविसांवा योगी ॥ ध्रुवपद. ॥
आवडी लावुनियां मज निज नामीं । नांदवी मंगळधामीं ॥ झड० ॥ १ ॥
नासुनी माया ही ममताक्षी । निजसुख देउनि रक्षी ॥ झड० ॥ २ ॥
अंतरीं आम्ही तों निर्नामीं । केवळ केशवस्वामी ॥ झड० ॥ ३ ॥

## पद ४९८ वें.

सावध मोठी । मी सद्गुरुची बेटी ॥ ध्रुवपद. ॥
ार सहा अठराजणी । आणी बारा सोळा जणी ।
ाहीं भरल्या माझ्या मनीं । उदंड हिंडती रानोरानीं ॥ गिरीकपाटीं ॥ १ ॥

---

१. संशय. २. पतन पावलें. ३. 'कांहीं' असा अन्य पाठ. ४. सहजपणानें. ५. मासे.
• कमतरता.

[1]उदंड केला माझा लाग । परी मज घडला नाहीं संग ।
शेवटीं झाला मनीं संग । तशाच गेल्या त्या परतोनी ॥ पाहोनी बाई हटी ॥२॥
मी होती कर्णकुमारी । माझा बाप ब्रह्मचारी ।
मायबापाची मी बहु [2]प्यारी । नांव सत्रावी सुंदरी ॥ त्रिभुवनपदीं ॥ ३ ॥
बाई मजसह नये कांत । निर्गुण पुरुष माझा कांत ।
कोणा नकळे माझा अंत । केशव म्हणे श्रीगुरुचरणीं सांत ॥ ४ ॥

**पद ४९९ वें.**

झाली [3]मैंतवाली । श्रीगुरुची चेली ॥ ध्रुवपद. ॥
गुरुनें धरला माझा हात । नेलें मजला निजघरांत ।
दाविली सुंदर अलक्ष्य ज्योत । नयनीं प्रकाश पडतां दिसली गुरुची किल्ली॥१॥
प्रकाश पडलासे [4]निर्घोट । अवघा दिसे लखलखाट ।
कदाकाळीं न पडे तूट । खटपट सोडुनी रतली तेथें पाहुली धाली ॥ २ ॥
नाना रंग, नाना [5]भांत । झाला चौं देहांचा अंत ।
मनीं भरला विठ्ठलनाथ । मीतूंपण हें सर्वची गेलें अमोल बोली ॥ ३ ॥
जंव शून्याच्या शेजेवरीं । सच्चिदानंद निद्रा करी ।
उन्मनी लागली खेचरी । आतां उरली नाहीं उरी । केशव बोली ॥ ४ ॥

**पद ५०० वें.**

तुझ्या चरणीं आम्ही केला [6]थारा रे! ।
तेणें आमुच्या चुकल्या [7]येरझारा रे! ॥ ध्रुवपद. ॥
माझ्या जिविंच्या जिवलगा! गुरुराया! रे! ।
[8]पायां लागतां ते निरसली माया रे! ॥ तुझ्या० ॥ १ ॥
तुझें रूप पाहतां आजी स्वामी! रे! ।
तुझी पदवी पावलों आजी आम्ही रे! ॥ तुझ्या० ॥ २ ॥
म्हणे केशव सद्गुरु मायबापा रे! ।
[9]कृपामात्रें दाविलें आत्मरूपा रे! ॥ तुझ्या० ॥ ३ ॥

१. पुष्कळ. २. लाडकी. ३. माजलेली. ४. 'घनदाट' असाही पाठ आहे. ५. प्रकार. [हा शब्द हिंदी भाषेंत फार येतो; जसें:—मैनें यह काम भले भांत से पूरा किया.] ६. आश्रय. ७. चौऱ्यायशी लक्ष योनिरूपी येरझारा (खेपा). ८. पायां लागणें=शरण जाणें. ९. 'कृपाकटाक्षें' असा अन्य पाठ आहे.

### पद ५०१ लें.

म्हणवुनी शिण गेला शिण गेला । राम सोहिरा॰केला ॥ ध्रुवपद. ॥
जाळोनी मच्छर जाळी । आम्ही जोडियले [1]वनमाळी ॥ म्हण० ॥ १ ॥
मंगळधामीं रामीं । केली अखंड निद्रा आम्ही ॥ म्हण० ॥ २ ॥
अपार वैभव आलें । केशवस्वामीचें दर्शन झालें ॥ म्हण० ॥ ३ ॥

### पद ५०२ रें.

आला रे! आला । गुरुराज महाराज माझा आला ॥ ध्रुवपद. ॥
हातीं बोधाचा भाला । प्रेमाची झिली त्याला ।
आनंद सज्जोनी पूर्ण झाला ॥ आला० ॥ १ ॥
[2]भक्तीची कटार बरी । प्रे[3]माची फिरंग धरी ।
[4]वैरुपे तो ज्ञान शरधारी ॥ आला० ॥ २ ॥
[5]सायुज्यतरंगीं चढे । सत्वाचा रुमाल उडे ।
अष्टभाव [6]त्यापुढें [7]राहिले सिद्ध ॥ आला० ३ ॥
[8]नामाचा दमामा वाजे । [9]स्वानंद ब्रह्मांड गाजे ।
मनोरथ [10]पुरवी निजसेजे ॥ आला० ॥ ४ ॥
काळाचा जबडा फोडी । [11]संसाराचें मूळ तोडी ।
स्मरणें भवबंधबेडी तोडी ॥ आला० ॥ ५ ॥
दीनांचा पाठीराखा । भक्तांचा कैवारी देखा ।
केशव म्हणे आला माझा निजसखा ॥ आला० ॥ ६ ॥

### पद ५०३ रें.

अजी सगुण होताती वेळोवेळां ।
नेणो स्वामीचें रूप देखों डोळां. ॥ ध्रुवपद. ॥
डोळा लवतो, स्फुरती माझे बाहू ।
शुभ चिन्हें होताती अजी माय! ॥ अजी० ॥ १ ॥
प्रेम कंचुकी सर्वांगीं तटतटी ।
बाहू कंकण दाट मनगटी. ॥ अजी० ॥ २ ॥

---

१. पृष्ठ ३२ टीप १ पहा. २. 'धीर याचा तुरा वरी' असा अन्य पाठ. ३. 'नामाची' अन्य पाठ. ४. 'शांतीचा मंदिल शिरीं' असा अन्य पाठ आहे. ५. 'सायुज्य तुरंगीं' असा अन्य पाठ. ६. 'सेवक पुढे' असा अन्य पाठ. ७. 'चिन्मय छत्र उडे' असा अन्य पाठ. ८. 'कीर्तिचा नगारा' अन्य पाठ. ९. 'अनंत' असा पाठभेद. १०. 'पुरती माझे' असें पाठांतर. ११. 'विषयाचें' असा अन्य पाठ आहे.

अजी वाटे सुदीन उगवला ।
केशवस्वामी भेट होईल मला ॥ अजी० ॥ ३ ॥

### पद ५०४ थें.

निरंजनीं अखंड निद्रा केली ।
तेणें माझी सर्वेहि चिंता गेली. ॥ ध्रुवपद. ॥
सुख शिण सर्वदा निरालंबी ।
माझें मीपण बुडालें आत्मबिंबीं. ॥ निरंजनीं० ॥ १ ॥
[1]जागृती स्वप्न सुषुप्ती नाहीं जेथें ।
योग निद्रा वानली आम्हां तेथें. ॥ निरंजनीं० ॥ २ ॥
सद्गुरुकृपें केशवीं अवडोळा ।
सहज समाधी लागला पूर्ण डोळा. ॥ निरंजनीं० ॥ ३ ॥

### पद ५०५ वें.

तुझें नाम गाइन वेळो वेळां रे ! । तुझें रूप पाहिन निज डोळां रे ! ॥ ध्रुवपद. ॥
तुझे चरणीं गुंतला माझा हेत । तुझी मूर्ती कोंदली हृदयांत रे ! ॥ तुझें० ॥ १ ॥
ध्यान तुझें लागलें अंतर्यामीं । तुझा विसर न पडो आम्हा स्वामी रे ! ॥ तुझें० ॥ २ ॥
अनाथबंधु करुणासिंधु देवा ! । म्हणे केशव करिन चरणसेवा रे ! ॥ तुझें० ॥ ३ ॥

### पद ५०६ वें.

कैकाय कैकाय दादा वरिल माझा देश ।
अलक्षपुर नगर तेथ आम्हां रहिवास ॥
सहज आम्हीं बिजें केलें शकुन सांगायास ।
सांगिजेल तेथ दादा धरीं पायीं विश्वास ॥ ध्रुवपद. ॥
प्रथमचि तव [2]दारा कैकाडी झाल्यें ।
स्वानंद कुरफुला सिरीं शकुन सांगों आल्यें ॥
जेथचे तेथेंचि येथें अवघे संचरलें ।
होतां घडमोडि नाहीं स्वरूप कालवलें ॥ कैकाय० ॥ १ ॥
काळाई गोरिआई नव्हे सावळाई ।
[3]मच्छाई कूर्माई नव्हे [4]वैराई [5]नरसाई ॥
वामनाई फरसाई नव्हे रामाई कृष्णाई ।
बौधाई कलकाई नव्हे शकुन सांगों काई ॥ कैकाय० ॥ २ ॥

---

१. अवस्थात्रय. २. बायको. ३. हीं अवतारांचीं नांवें. ४. वराह. ५. नरसिंह.

दिसतें तें भुर दादा सांगों काय अंतीं ।
चंद्रसूर्य क्षणामाजी भुर होउनि जाती ॥
चौदा[1] मनमंतरें दादा तिहीं भुर होती ।
पाहतां अवघे दादा भुर अनुभव प्रचीती ॥ कैकाय० ॥ ३ ॥
कैकाय कैकाय ऐसें बोलति घरोघरीं ।
कैकाये कैकाये ऐसें कोणी न विचारी ॥
धनधान्य पुत्रपौत्रीं हाचि सोस भारीं ।
विषय लोभासाठीं दादा ठकल्या नरनारी ॥ कैकाय० ॥ ४ ॥
सहज परिस दादा सांगेन हित गोष्टी ।
सांडुनि मायाजाळ राहे निजदृष्टी ॥
सद्गुरुकृपे केशवराजी कैकयेसि भेटी ।
येकांतीं लोकांतीं पडली वस्तुसि मिठी ॥ कैकाय० ॥ ५ ॥

पद ५०७ वें.

चिदानंद भवानि[2]! तुझा वेध लागला ।
जन्म मरण सकळ दुःख संग भंगला ॥ ध्रुवपद. ॥
संतचरण विमल वंदितां सदा ।
पावलों क्षराक्षरातीत तुझिया पदा ॥ चिदा० ॥ १ ॥
सर्वातीत सर्वरूपें दैत्यविनाश ।
भगवंतीं निजतेज तुझें पूर्ण प्रकाश ॥ चिदा० ॥ २ ॥
देशकाळरहित सदोदित समान ।
केशव म्हणे तुजविण मज अनुमान ॥ चिदा० ॥ ३ ॥

पद ५०८ वें.

सत्य मानसीं होरे ऐकसी । आम्ही आलों रायाचे जोशी ॥ ध्रुवपद. ॥
कल्पना ही बायको सुस्वर । इसी नका राहूं लागुन ।
इचे पायीं पडेल नागवण । घर बुडविसी ॥ सत्य मानसीं० ॥ १ ॥
मैनाजी[3] पाटल या गांविचा । विश्वास धरूं नका हो याचा ।
हा ठकविल हो नेमाचा ॥ सत्य मानसीं० ॥ २ ॥

---

१. चौदा मनूंचे काळ. २. पार्वती. ३. मन.

येथुन पुढें बरें होईल । सुखी नामीं दोंद वाढेल ।
बेडी कर्माची खांडेल । धनी मोकासी ॥ सत्य मानसीं० ॥ ३ ॥
येथुन पुढें [1]काळ आला । जतन करा हरिनामाला ।
केशव सांगे शिष्याला । सावध राहासी ॥ सत्य मानसीं० ॥ ४ ॥

### पद ५०९ वें.

गुरु गोडी घेतली आम्ही । नित्य बैसोनि मंगळधामीं ॥ ध्रुवपद. ॥
स्वात्मसुखाच्या नारळासी । धीर मेरु जोडिला त्यासी ॥ गुरु० ॥ १ ॥
भक्तिप्रेमाचें जीवन[2] भरी । आंत वैराग्य भडभड करी ॥ गुरु० ॥ २ ॥
अकर्माचें चिलिम भरी । ज्ञान अग्नि ठेविला वरी ॥ गुरु० ॥ ३ ॥
स्वानुभवाची नळी जोडी । कल्पनेचा धूर सोडी ॥ गुरु० ॥ ४ ॥
द्वैत जाळुनी केली राख । केशवें गुरुगोडी घेतली देख ॥ गुरु० ॥ ५ ॥

### पद ५१० वें.

विठ्ठलाची झडपणी । झाली मजला साजणी ! ।
प्रपंचाची कहाणी । स्वप्नींही नावडे ॥ ध्रुवपद. ॥
अद्भुत भूत गे ! मोठें । स्वानंदीं झोंबलें नेटें ।
स्वरूपावेगळें कोठें । हालोंची नेदी ॥ विठ्ठ० ॥ १ ॥
आतां मी वो ! करुं काय । विठ्ठल लागला माय ।
सर्वदा विठ्ठलमय । होउनि असे ॥ विठ्ठ० ॥ २ ॥
केशवस्वामीनें आजी । वस्ति केली मजमाजी ।
स्वपदीं ठेवुनि माझी । हरिली क्रिया ॥ विठ्ठ० ॥ ३ ॥

### पद ५११ वें.

[3]स्वानंदसागरामाजी । उडी म्यां घातली आजी ।
म्हणोनि लोपली माझी । मीपण मुद्रा ॥ ध्रुवपद. ॥
स्वानंदावांचोनि कांहीं । सखिये ! उरलें नाहीं ।
सर्वही स्वानंदडोहीं । विरोनि गेलों ॥ स्वानंद० ॥ १ ॥
स्वानंदें स्वानंद जोडी । स्वानंदें स्वानंद मोडी ।
स्वानंदें स्वानंद गोडी । घेइजे सदा ॥ स्वानंद० ॥ २ ॥
स्वानंदें स्वानंद दाटे । स्वानंदें स्वानंद आटे ।
स्वानंदें स्वानंद भेटे । केशव म्हणे ॥ स्वानंद० ॥ ३ ॥

---

१. यम. २. उदक. हें रूपकाचें उदाहरण आहे. ३. आत्मानंदरूप समुद्रांत.

## पद ५१२ वें.

बाइ ! मी न जाईं गे ! कुंजवना । रेळि[1] हरिची सोसवेना. ॥ ध्रुवपद. ॥
धरोनी हा कांचोळी[2] । माझे अवयव कां चोळी ? ॥ बाइ० ॥ १ ॥
अधरमधूच्या[3] पानें । केल्या विकळ कुसुमचापानें[4]. ॥ बाइ० ॥ २ ॥
पररामावसनातें[5] । फेडी लावुनि बहुवस[6] नातें. ॥ बाइ० ॥ ३ ॥
केशव चरणा लागे । गोपी बोलती त्या अनुरागें[7]. ॥ बाइ० ॥ ४ ॥

## पद ५१३ वें.

जानकीजीवन[8] मनीं आला गे ! । अहो बाई ! ॥ ध्रुवपद. ॥
रामकृष्ण दोनी शोभती नामें । अवघाचि पांडुरंग झाला गे ! ॥ अहो० ॥ १ ॥
दुःख भवाब्धिचें सर्वही हरिलें । निरखितां कैसा जीव झाला गे ! ॥ अहो० ॥ २ ॥
सुंदर नागरमोहन मूरत । शिरिं शोभे तुळशिचा पाला गे ! ॥ अहो० ॥ ३ ॥
अनुदिनिं केशव ध्यान धरोनी । चरणपंकजीं[9] लीन झाला गे ! ॥ अहो० ॥ ४ ॥

## पद ५१४ वें.

सांवळा नंदाचा मूल खोटा गे ! । अहो बाई ! ॥ ध्रुवपद. ॥
दहिंदुधलोणी चोरुनि खातो । काय याचे नगरीं आला तोटा गे ! ॥अहो०॥१॥
मिळोनियां गौळणी पाणियासीं जातां । अडवूनि धरितो बाई! वाटा गे! अहो० ॥२॥
दिनरजनीं[10] याला हाचि हो ! धंदा । आम्हांलागीं याचा जाच मोठा गे ! ॥अहो०॥३॥
करद्वय जोडुनी केशव मागे । नामामृतामाजीं मज लोटा गे ! ॥ अहो० ॥ ४ ॥

## पद ५१५ वें.

संतसमागम कराचि ना । शांति दया मनिं धराचि ना ।
चिन्मय राघव वराचि ना । झडकरि कां हो ! तराचि ना ? ॥ १ ॥
संतसमागम काशी रे ! । क्षणभरि वस्तिसि जाशी रे ! ।
नाशति पातकराशी रे ! । पावसि परमपदासी[11] रे ! ॥ २ ॥
कामतरूवर[12] तोडावा । संशय अवघा मोडावा ।
सर्वसमागम सोडावा । केशवस्वामी[13] जोडावा. ॥ ३ ॥

---

१. थट्टा. २. कंचुकी. ३. अधरामृताच्या. ४. मदनानें. ५. परक्या स्त्रियांच्या लुगड्यांतें. ६. अनेक प्रकारचें. ७. प्रीतीनें. ८. राम. ९. पदकमलीं. १०. दिवसरात्र. ११. सायुज्यपदासी. १२. कामरूप उत्तम वृक्ष. १३. केशवाचा प्रभु (देव).

### पद ५१६ वें.

स्वयं ब्रह्म जो आपणचि झाला । देव मस्तकीं वंदिती त्याला. ॥ ध्रुवपद. ॥
ज्याच्या दृष्टीसि सृष्टी नाहीं । देही असोनि पूर्ण विदेही[1]. ॥ स्वयं० ॥ १ ॥
जेथें जाणीव[2] नेणीव[3] नाहीं । तेथें कांहींच उरलें नाहीं. ॥ स्वयं० ॥ २ ॥
ब्रह्म होऊनि ब्रह्मीं जो खेळे । त्याचे चरणीं केशव लोळे. ॥ स्वयं० ॥ ३ ॥

### पद ५१७ वें.

म्हणउनि तरलों[4] मी तरलों मी । निश्चळ झालों ब्रह्मीं. ॥ ध्रुवपद. ॥
हृदयसरोजीं[5] या हरि भरला । कर्मसमूदय[6] सरला. ॥ म्हण० ॥ १ ॥
ममता सांडुनियां मज गेली । माया मैंदिण[7] मेली. ॥ म्हण० ॥ २ ॥
केशव स्वामीसी सम योगें । समरस[8] झालों वेगें ॥ म्हण० ॥ ३ ॥

### पद ५१८ वें.

घ्या त्याच्या चरणाची गोडी । तोडी भवभय बेडी. ॥ ध्रुवपद. ॥
सत्वर येऊनियां शिवसदना । जर्जर केलें मदना. ॥ घ्या० ॥ १ ॥
चित्सुखसागरीं तल्लीन होसी । ब्रह्मरसाप्रति घेसी. ॥ घ्या० ॥ २ ॥
समाधिगिरिशिखरीं स्थिरावले । स्वच्छंदें उठावले. ॥ घ्या० ॥ ३ ॥
केशवस्वामी आकळिती । 'त्वंपद' 'तत्पद' गिळिती. ॥ घ्या० ॥ ४ ॥

### पद ५१९ वें.

आत्मा राघव तो मज दावा । लग्न तयासीं लावा. ॥ ध्रुवपद. ॥
हृदयकमळींचा निजराव । उपाधि[9] तीये नांव. ॥ आत्मा० ॥ १ ॥
समग्र फेडूनि भवखोडा । तोचि करा मज जोडा. ॥ आत्मा० ॥ २ ॥
गावा जावा होन करावा । ठाव निरंजनीं द्यावा. ॥ आत्मा० ॥ ३ ॥
त्रिभुवनभर्ता जो श्रमहर्ता[10] । केशव म्हणे सुखकर्ता[11]. ॥ आत्मा० ॥ ४ ॥

### पद ५२० वें.

देव जडला जाईना आंगा । आतां काय करूं? सांगा. ॥ ध्रुवपद. ॥
वैद्य ज्योतिषी पंचाक्षरी[12] । कांहीं केल्या नव्हे दुरी. ॥ देव० ॥ १ ॥
देव[13] काढाया शहाणे आले. । तेही मजसारिखे झाले. ॥ देव० ॥ २ ॥

---

१. विरक्त. २. ज्ञान. ३. अज्ञान. ४. 'रतलों मी रतलों मी' असा अन्य पाठ. ५. हृदयकमलीं. ६. कर्मांची रास. ७. ठग, नीच. ८. ब्रह्मानंदरूप. ९. माया. १०. कष्ट नाहींसे करणारा. ११. सुख देणारा. १२. मांत्रिक. १३. देव काढणें=आंगांत शिरलेलें देवाचें वारें काढणें.

आणिक देव येती जाती । हा देव जन्माचा सांगाती. ॥ देव० ॥ ३ ॥
इतर देवां एक ठाणें । यासी अणुरेणु रहाणें. ॥ देव० ॥ ४ ॥
नेणों पूर्वींचा कांहीं होता । केशव म्हणे सरता पुरता. ॥ देव० ॥ ५ ॥

### पद ५२१ वें.

जितां रामें पाठी माझी घेतली माये! ।
मेलेया न सोडी राम करूं मी काय? ॥ ध्रुवपद. ॥
स्वानुभवें राम माझा प्रत्यया आला ।
जिणें आणि मरणें अवघा रामची झाला. ॥ जितां० ॥ १ ॥
अहर्निशीं[1] राम माझ्या लागला मुळीं ।
बुडालों बुडालों रामरूपीं समूळीं. ॥ जितां० ॥ २ ॥
सद्गुरुकृपे केशवराजीं झाली रामाची भेटी ।
रामचि झालों आतां काय बोलों मी गोष्टी? ॥ जितां० ॥ ३ ॥

### पद ५२२ वें.

देखणा रे! तो देखणा । भुलला आपण आपणा. ॥ ध्रुवपद. ॥
जन्मेसी मरण निःशेष भक्षी । दृष्टीविण निजरूप लक्षी. ॥ देखणा० ॥ १ ॥
दृश्य नाहीं तेथें देखिजे काई? । यापरि जेणें देखिलें पाहीं. ॥ देखणा० ॥२॥
गुरुकृपे केशवीं देखणें सिद्धि । देखणेपणाची राहिली विधी. ॥ देखणा० ॥३॥

### पद ५२३ वें.

म्हणउनि भ्रम गेला भ्रम गेला । राघव सोयरा केला. ॥ ध्रुवपद. ॥
जाळूंनि मत्सरजाळी । आम्हीं जोडियला वनमाळी.[2] ॥ म्हण० ॥ १ ॥
मंगळधामीं रामीं । अखंड निद्रा केली आम्हीं. ॥ म्हण० ॥ २ ॥
अपार वैभव आलें । केशवस्वामीचें[3] दर्शन झालें. ॥ म्हण० ॥ ३ ॥

### पद ५२४ वें.

मजला हरि कळला हरि कळला । उपाधि अवघा गळला. ॥ ध्रुवपद. ॥
त्रिभुवनींचा राजा । आत्मा प्राणविसांवा माझा. ॥ मजला० ॥ १ ॥
संगें येउनि जातां । आवडी साधुसंग धरितां. ॥ मजला० ॥ २ ॥
अन्वयव्यतिरेकयोगें[4] । केशवींच म्हणतो वेगें. ॥ मजला० ॥ ३ ॥

---

१. रात्रंदिवस. २. पृ० ३२ टीप १ पहा. ३. केशवाच्या स्वामीचें (रामाचें). ४. संयोग आणि वियोग यांच्या योगानें, संबंध आणि संबंधाभाव यांच्या योगें.

## पद ५२५ वें.

उदकावीण[1] तळें अंत नाहीं जळा । तेथ केला मळा माळियानें. ॥ ध्रुवपद. ॥
माळी नाहीं मळा कैंचें हें तळुलें, । फूल एक फुले वेळोवेळां. ॥ १ ॥
सिद्ध मन झाडें भूमि नाका पडे, । दिठी[2] कैसी जडे ठायीं ठायीं. ॥ २ ॥
केशव म्हणे फूल सांगा हो! झडकरी, । गुरुपुत्र थोरी मिरैवितातो[3]. ॥ ३ ॥

## पद ५२६ वें.

तेणें निर्भय झालों आम्हीं । सुखें नांदों मंगळधामीं. ॥ ध्रुवपद. ॥
कुश दाविला बोधाचा । मार्ग मोडिला भेदाचा[4]. ॥ तेणें० ॥ १ ॥
देउनि कपाट प्रेमाचें । वरी कुलुप गुरुनामाचें. ॥ तेणें० ॥ २ ॥
आलिंगितां सूर्यजाया[5] । आलों विश्रांतीच्या ठाया. ॥ तेणें० ॥ ३ ॥
अंतीं निर्गुण निर्मळ रूप । सिद्ध लाविला अक्षय दीप. ॥ तेणें० ॥ ४ ॥
म्हणे केशव एकांतासीं । डोळा लागला निजसेजेसीं. ॥ तेणें० ॥ ५ ॥

## पद ५२७ वें.

वेडियांच्या गांवा गेलों । आम्ही वेडे होउनि आलों. ॥ ध्रुवपद. ॥
आतां बोलूं नका कांहीं । आम्हां माणुसपण नाहीं. ॥ वेडि० ॥ १ ॥
कर्मवसन[6] टाकुनि साचें । जगीं उघडें होउनि नाचे. ॥ वेडि० ॥ २ ॥
केशव म्हणे जवळी याल । तरि तुम्हींच वेडे व्हाल. ॥ वेडि० ॥ ३ ॥

## पद ५२८ वें.

गंगाजळ जैसें । मन निर्मळ करी तैसें ।
मग राम होसी माये! । आतां फार वदूं काये? ॥
सुखसागरीं पाहीं । तूं गार होउनि राहीं ।
केशव सांगे कानीं । हरी धरुनि बसा ध्यानीं ॥ १ ॥
निजात्मज्ञानडोहीं । विरोनि गेलें पाहीं ।
तनुत्याग होतां त्याची । मग सगुण भेट कैंची? ॥
जीवभाव वांटुनि प्यालों । परब्रह्म स्वयें झालों ।
निष्काम बोधसिंधू । केशव दीनबंधू ॥ २ ॥

---

१. पाण्याशिवाय. २. दृष्टी. ३. हें कूट पद आहे. ४. द्वैताचा. ५. छाया. ६. कर्म हेंच वसन (वस्त्र).

भवताप नाहीं जेथें । मज बोळविलें तेथें ।
आतां काय वानूं त्यासी । त्याचे पाय मजपासीं ॥
मज हरुनि याणें नेलें । मज आनंदघन केलें ।
हा ऋषिकुळिंचा राजा । म्हणे केशव धणि माझा ॥ ३ ॥
अभिमान तरु मोडे । सद्गुरु सखा जोडे ।
ऐसेंच करितां आतां । गुरुचरण धरीं माथां ॥
गुरुवचन सदां पाळूं । आतां लोकलाज वोळूं ।
मीपण समूळ आटे । केशवीं केशव भेटे ॥ ४ ॥

## पद ५२९ वें.

स्वदेहा विदेही आला । लोकही विदेही केला ।
म्हणोनि संदेह गेला । सर्वही माझा ॥ ध्रुवपद. ॥
आतां मी वो! कोठें राहूं? । वेगळें काय मी पाहूं? ।
सर्वही ग्रासुनी देहू । मीच मी झालों ॥ स्वदेहा० ॥ १ ॥
मीच मी एकला असें । मीपण कांहीं उरलें नसे ।
यापरि मज मी दिसे । केशव म्हणे ॥ स्वदेहा० ॥ २ ॥

## पद ५३० वें.

एके दिवशीं श्रीकृष्ण मथुरेंत । असतां उद्धव पातला अकस्मात ॥ ध्रुवपद. ॥
'मुख्य भक्ती राधिका कोठें आहे?' । उद्धव म्हणे, 'निजात्मभुवनीं राहे.' ॥१॥
'राधिका ते भक्षीत काय? सांगा.' । उद्धव म्हणे, 'तुजवीण तिज नांगा.' ॥२॥
'राधिकेचा वाली तो कोण? वानीं.' । उद्धव म्हणे, 'श्रीहरि चक्रपाणी.' ॥३॥
'राधिकेचे.........कोण घाली.' । उद्धव म्हणे, 'कोणाची माय व्याली?' ॥४॥
'राधिकेशीं तांबूल कोण देतो?' । उद्धव म्हणे, 'श्रीकृष्ण प्रगटतो.' ॥ ५ ॥
'राधिकेला कालिंदी नदी कैशी?' । उद्धव म्हणे, 'ती काळरूप जैसी.' ॥६॥
'राधिकेला गोकुळ कैसें वाटे?' । उद्धव म्हणे, 'गोकुळांत दाटे कोठें?' ॥७॥
'राधिकेला दिव्य वस्तु कैसी?' । उद्धव म्हणे, 'वल्कल वस्त्र जैसी.' ॥ ८ ॥
'राधिकेला वसंत ऋतु कैसा?' । उद्धव म्हणे, 'तो अग्निकला जैसा.' ॥ ९ ॥
'राधिकेला सुगंध पुष्पहार.' । उद्धव म्हणे, 'तुजवीण तिजला भार.' ॥ १० ॥
'राधिकेला आज्ञा म्हणे होय कोण!' । केशव म्हणे, 'देवीला तुमचा चरण.' ॥ ११ ॥

---

१. वर्णे. २. त्यजूं. ३. उपोषण. ४. विडा.

## पद ५३१ वें.

ऐशिया एकल्या स्वामी । नमन केलें अंतर्यामीं[1] ।
बाह्यात्कारें सर्व तुम्हीं । मीपण त्यागें. ॥ ध्रुवपद. ॥
एक विनायक । एकेविण तोचि एक ।
एक म्हणाया देख । दुजेंचि नाहीं ॥ ऐशिया० ॥ १ ॥
केशवकृपेनें पाहें । सहजीं केशव आहे ।
सुखरूप होउनि राहें । स्वरूपानंदी ॥ ऐशिया० ॥ २ ॥

## पद ५३२ वें.

जेवितां तृप्ति झाली । समाधी लागली ।
चुकली जन्म वेळ काया हरपोनि गेली. ॥ ध्रुवपद. ॥
सप्रेम ताट मोठें । आंत वाढिलें नेटें ।
प्रीति हे शाक[2] गोड सुख जेवितां वाटे. ॥ जेवितां० ॥ १ ॥
वैराग्य भात फार । ज्ञान पोळी घातली ।
विज्ञान क्षीर[3] पाहा हो! दया शर्करा भली. ॥ जेवितां० ॥ २ ॥
भक्ति हें तेल वरी । निष्टा शोभे गूळ वरी ।
सोज्वळ मुक्ति चारी कोशंबिरी निर्धारीं. ॥ जेवितां० ॥ ३ ॥
संतोष आंबवडा । भाव साजिरा मांडा ।
निवृत्ति कढी शुद्ध बोध घृतेशीं वाढा. ॥ जेवितां० ॥ ४ ॥
आनंद थोर पाहीं । स्वस्वरुपीं लाधला ।
गुरुकृपें केशव राजी संसारा अंचवला[5] ॥ जेवितां० ॥ ५ ॥

## पद ५३३ वें.

तो भक्तराज पाहीं । संसार त्यासि नाहीं. ॥ ध्रुवपद. ॥
नाम मुखें बोले । निज प्रेम सुखें डोले ॥ तो० ॥ १ ॥
गुरुवाक्य सदां पाळी । अभिमान समूळ जाळी ॥ तो० ॥ २ ॥
निष्काम बोधसिंधु । म्हणे केशव दीनबंधु ॥ तो० ॥ ३ ॥

## पद ५३४ वें.

तनुत्याग होतां त्यांची । हे सगुण भेटी कैंची. ॥ ध्रुवपद. ॥
निजात्मज्ञान डोहीं । विरोनि गेले पाहीं ॥ तनु० ॥ १ ॥

---

१. अंतर्याम=मन. २. भाजी. ३. खीर. ४. भाकर. ५. सुटला.

जीव भाव वांटुनि प्याले । परब्रह्म स्वयें झाले ॥ तनु० ॥ २ ॥
म्हणे केशव दिसती डोळां । ते पाहा वेळोवेळां. ॥ तनु० ॥ ३ ॥

### पद ५३५ वें.

जैसें आहे मुळीं तैसेंचि आहे । आहे नाहीं तेथें हें ही न साहे. ॥ ध्रुवपद. ॥
बद्धेविण कैंचा मोक्षासी ठाव । भक्त नाहीं तेथें कैंचा देव? ॥ जैसें० ॥ १ ॥
आहे नाहीं जेथें कांहींच नाहीं । कांहीं नाहीं तेथें जाणणें कायी? ॥ जैसें० ॥ २ ॥
गुरुकृपें केशवीं बाणलें ऐसें । ज्यासि बाणे तेणें सांगिजे कैसें? ॥ जैसें० ॥ ३ ॥

### पद ५३६ वें.

मज भेटला गे! माय! । तो लाभ सांगों काय? ॥ ध्रुवपद. ॥
योगियांचा राजा । श्रीराम गडी माझा. ॥ मज० ॥ १ ॥
सर्व जगामाजी । मज सूख झालें आजी. ॥ मज० ॥ २ ॥
केशवराजस्वामी । सबाह्य अंतर्यामीं. ॥ मज० ॥ ३ ॥

### पद ५३७ वें.

माय बाप तूं माझा । स्वामी सद्गुरुराया! ॥ ध्रुवपद. ॥
भेदासी निरसिलें दुःख हिरोनि नेलें ।
स्वरूप दावुनी सुखि सर्वदा केलें. ॥ माय० ॥ १ ॥
ऐकतां वाक्य तूझें गेली नाहींपणें माया ।
पावल्या खूण नीकी झाली खपुष्पकाया. ॥ माय० ॥ २ ॥
त्रिपदातीत सुख परिपूर्ण दीधलें ।
केशवराजस्वामी नाम सहजीं सहज ठेविलें. ॥ माय० ॥ ३ ॥

### पद ५३८ वें.

आठवला हरि आठवला । हृदयसरोजीं सांठवला. ॥ ध्रुवपद. ॥
शोकविनाशक निजदाता । त्रिभुवननायक मज आतां. ॥ आठ० ॥ १ ॥
सुरमुनिजनमनरंजन जो । चिद्घन भेदप्रभंजन जो. ॥ आठ० ॥ २ ॥
बलि बंध बंधविमोचन जो । केशव मंगललोचन जो. ॥ आठ० ॥ ३ ॥

---

१. डोळ्यांनीं. २. मित्र. ३. केशवराजाचा स्वामी. (राम.) ४. द्वैतासी. ५. आकाशपुष्प. (हें अभावरूप आहे.) ६. अंतःकरणरूपी कमलांत. ७. द्वैतनाशक.

### पद ५३९ वें.

काय सांगों तूज गा! । अंतरींचें गूज गा! ॥ ध्रुवपद. ॥
मोलें हाता येई ना । बोलें प्राप्त होई ना. ॥ काय० ॥ १ ॥
भेदबुद्धी गळेना । तंववरि कांहीं कळेना. ॥ काय० ॥ २ ॥
द्वैत संग सांडुनी । राहें तूंची मांडुनी. ॥ काय० ॥ ३ ॥
केशव सांगे भावें रे! । तेंचि आंगें व्हावें रे! ॥ काय० ॥ ४ ॥

### पद ५४० वें.

काय द्यावें तुज लागुनी । उदाराच्या शिरोमणी! ॥ ध्रुवपद. ॥
श्रुतिशास्त्रापरतें जें कीं । हातीं आणुनि दिधलें तें कीं. ॥ काय० ॥ १ ॥
बुद्धी बोधुनियां निकी । केलें परमानंदें सुखी. ॥ काय० ॥ २ ॥
केशव म्हणे सद्गुरुनाथा! । पायीं धणिवरि ठेविन माथा. ॥ काय० ॥ ३ ॥

### पद ५४१ वें.

क्षणभरि नव जाय आन कोठें । मुनिचें कौतुक मोठें. ॥ ध्रुवपद. ॥
स्तवितां वैखरी[१] स्थिर झाली । तेथेंची मुरकुंडी घाली. ॥ क्षण० ॥ १ ॥
सुखघन होउनि तो सुख भोगी । त्रिभुवनतारक योगी. ॥ क्षण० ॥ २ ॥
केशव स्वामी हा समरसला[२] । मंगळनिधि घन भरला. ॥ क्षण० ॥ ३ ॥

### पद ५४२ वें.

तो म्यां देखिला गुरु दाता । सोडिन कां मी आतां? ॥ ध्रुवपद. ॥
विचारलेणें[३] हें लेववुनी । नांदवि चिन्मय भुवनीं. ॥ तो० ॥ १ ॥
अपार भवहर्ता सुखकर्ता । समता वनिता[४] भर्ता[५]. ॥ तो० ॥ २ ॥
अखंड शोभतसे समधामी । तारक केशवस्वामी. ॥ तो० ॥ ३ ॥

### पद ५४३ वें.

काय सांगों सखे! साजणी[६] माय बहिणी माझे सांगातिणी! ।
सांगतां तेथिंचें सुख नये हो! सांगों काय हो नव्हे सांगिजेसि कहाणी[७]॥ ध्रुवपद. ॥
प्रथम नमन माझें निर्गुणा गुरुचरणा आदिपुरुषा रायासी ।
ज्याचें नाम सुखदायक दुःखहारक निज आनंदराशी ।
प्रसादें त्याच्या माया निरसत तत्व प्रकाशत निजात्म समरसीं ।
अशनीं[८] शयनीं शयनाभेदीं अखंड नाहीं उघड ऐसें झालें आम्हासी. ॥ काय० ॥ १ ॥

---

१. वाणी. २. ब्रह्मानंदरूप झाला. ३. दागिना. ४. स्त्री. ५. नवरा. ६. मैत्रिणी. ७. गोष्ट. ८. भक्षणीं.

परेही परतें पर हो नाहीं पार हो आदि अंत जयासी ।
पाहातां जयाचा अंत हो नुरे हेत हो परा मुरडे चौघीसीं ।
अवस्था गळीत झाल्या सकला वृत्ती विकला पावल्या सुख स्वरूपासीं ।
स्वरूपानंद नये बोलतां खूण दाखवितां लाज वाटे मनासी. ॥ काय० ॥ २ ॥
नवल नवल सये! नवल हो! अति खोल हो! बहु सखोल माय! ।
सखोल म्हणों तरि जवळी हो मना मुळीं हो तें तूं परतोनि पाहें ।
पाहातें पाहाणें जेणें विवळे हो! सर्व कळे हो! ते कां नकळे सोय ।
यालागीं धरीं तूं [1]उपरती हो निज प्राप्ति हो सेवीं सद्गुरुपाय. ॥ काय० ॥ ३ ॥
सद्गुरुचरणीं माथा, वंदितां जाण तत्वता फिटे संसारचिंता ।
अगमा अगोचर अलक्ष्य ब्रह्म प्रत्यक्ष चढे मुमुक्ष हाता ।
यालागीं श्रीचरण मानसीं ध्याय अहर्निशीं तूं हो निज स्वहिता ।
आनंद पूर्ण जेणें कोंदाटे रूप प्रकटे निजरूपीं मग्नता. ॥ काय० ॥ ४ ॥
निजरूपीं मन निमग्न, झालें उन्मन, गिळूनि ठेलें गगन, ।
दृश्यादृश्य भाव राहिला, वाद खुंटला, मौना पडिलेंसे मौन ।
अहं सोऽहं दोन्हीं गलित स्थिति, तटस्थ पाहतां चैतन्यघन ।
सहज विश्राम केशवीं गुरु अनुभवीं, [2]देहत्रया निरसन. ॥ काय० ॥ ५ ॥

## पद ५४४ वें.

सच्चिदानंद एक रे! सच्चिदानंद एक रे! ॥ ध्रुवपद. ॥
सत् तें शाश्वत चित् तें आनंद घन नित्य रे! ।
आनंद तें सुख केवळ प्रकट इत्थंभूत रे! ॥ सच्चि० ॥ १ ॥
माया मिथ्यत्वें सदत्व ब्रह्मीं जड प्रकाशयोगें चित् रे! ।
सुखाचा साक्षी निर्मळ म्हणोनि आनंद रे! ॥ सच्चि० ॥ २ ॥
त्रिपदीं भिन्न भासलें स्वरुपीं नाहीं भेद रे! ।
तिहींच्या अभावीं तिन्हीं निमालीं केशवीं निखिल बोध रे! ॥ सच्चि० ॥ ३ ॥

## पद ५४५ वें.

बव्हीं ती ही देहाची दिधली । निज वस्तु आपुली ॥ ध्रुवपद. ॥
[3]पायाळें वो! साधिलें निजधन । गुरुकृपा घालुनि अंजन. ॥ बव्हीं० ॥ १ ॥

१. पश्चात्ताप. २. स्थूलदेह, लिंगदेह, महाकारणदेह. ३. पायाळू मनुष्याला पृथ्वीच्या पोटांतील धन सांपडतें—अशी समजूत आहे. [मुक्तेश्वर—आदिपर्व.]

जुनाट ठेवा पूर्वजीं ठेविला । महा यत्नें करुनि साधिला. ॥ बऱ्ही० ॥ २ ॥
गुरुकृपें केशवीं साधिलें । निजधन अवघेंचि लाधलें. ॥ बऱ्ही० ॥ ३ ॥

पद ५४६ वें.

कां रे! नेव जाय तये वाटे । जेणें मार्गें विठ्ठल भेटे. ॥ ध्रुवपद. ॥
काशी नयेचि इची सेरी । दुजी वैकुंठ पंढरी. ॥ कां० ॥ १ ॥
दिंडी पताकांचे भार । संत करिती जयजयकार. ॥ कां० ॥ २ ॥
म्हणे केशव नामासाठीं । मोक्षलुटी वाळुवंटीं. ॥ कां० ॥ ३ ॥

पद ५४७ वें.

जळो त्याचें झालेपण । नाहीं देखिले विठ्ठलचरण. ॥ ध्रुवपद. ॥
योग याग अनंत केले । नाहीं समचरण देखिले. ॥ जळो० ॥ १ ॥
तीर्थें केलीं कोटी वरी । नाहीं देखिली पंढरी. ॥ जळो० ॥ २ ॥
म्हणे केशव विठ्ठलपायीं । सर्व तीर्थें घडती पाहीं. ॥ जळो० ॥ ३ ॥

पद ५४८ वें.

उपकार थोर त्याचा केंवि बोलों मी वाचा ।
पांगुळां पाय दिधले हा महिमा संतांचा. ॥ ध्रुवपद. ॥
सहज मी पांगुळ । गा! आलों संतांजवळ ।
कृपा करूनि मज पावविलें केवळ. ॥ उपकार० ॥ १ ॥
अखंड मी दुबळा । गा! अंध पांगुळ खुळा ।
आपणां ऐसें मज केलें त्याची अगाध पैं लीला. ॥ उपकार० ॥ २ ॥
सद्गुरू कळवळला । दिल्हा बोध ढवळा ।
बैसवुनियां केशवराजीं । क्रीडे आनंद सोहाळा. ॥ उपकार० ॥ ३ ॥

पद ५४९ वें.

काय करूं गे! माय आतां कवणा ओंवाळूं? ।
जिकडे पाहें तिकडे राजा राम कृपाळू. ॥ ध्रुवपद. ॥
ओंवाळूं गे! माय! निजमूर्ति रामा ।
रामरूपीं दुजेपण न दिसे आम्हां. ॥ काय० ॥ १ ॥
सुरवर नर वानर अवघा राम सकळ ।
दैत्य निशाचर तेही राम केवळ. ॥ काय० ॥ २ ॥

---

१. जात नाहींस. २. बरोबरी. ३. राक्षस.

त्रैलोक्य स्वरुपें राम संचला एक ।
सद्गुरुरूपें केशवराजीं आनंद देख. ॥ काय० ॥ ३ ॥

**पद ५५० वें.**

कां रे! हरि अंतरीं आठवा ना? ॥ ध्रुवपद. ॥
संसारदायक साधक बाधक सर्व चिंता दिगंता पाठवा ना ॥ कां० ॥ १ ॥
राम रमावर चिंतुनि सादर मद मत्सर सागर आठवा ना ॥ कां० ॥ २ ॥
केशवपंडित स्वामि अखंडित मनेंविण मनीं लोचनीं सांठवा ना ॥ कां० ॥ ३ ॥

**पद ५५१ वें.**

भज रे! तया भज निज योगिराया ।
ज्याचिया भजनें नाहीं जन्मली माया. ॥ ध्रुवपद. ॥
गगनसुमन[1] जैसे जन तैसे जाणें ।
ब्रह्म सनातन[2] परिपूर्ण बाणे. ॥ भज० ॥ १ ॥
अचलपदीं केली अचल मिरासी[3] ।
झाला गुणातीत आनंदरासी. ॥ भज० ॥ २ ॥
स्वरूप होउनि नित्य स्वरुपीं विराजे[4] ।
केशवस्वामीं हें ही नांव न साजे. ॥ भज० ॥ ३ ॥

**पद ५५२ वें.**

स्वानुभवें सर्वदां दृश्य होतो । अंगेंविण सर्वदां क्षेम देतो. ॥ ध्रुवपद. ॥
दृष्टीवीण दिसतो एक कान्हा । रूपेंविण भेटतो नित्य जाणा. ॥ स्वानु० ॥ १ ॥
आंगें अंगीं भरला पूर्ण आहे । सिद्ध प्रतीति पुसणें तेथें काय. ॥ स्वानु० ॥ २ ॥
सद्गुरुरूपें केशवीं देवराणा । पाहातां उरी नुरे मीतूंपणा. ॥ स्वानु० ॥ ३ ॥

**पद ५५३ वें.**

ध्यान त्यांचें लागो चित्त संगीं जागो ।
एकांतीचें सार त्यांची गोष्टी कोणी सांगो. ॥ ध्रुवपद. ॥
दृश्य जाळ सर्व काळ नेणति जे कांहीं ।
गोपतीच्या पायांपरतें ज्यांसि होणें नाहीं. ॥ ध्यान० ॥ १ ॥

---

१. आकाशपुष्प. ['एष वंध्यासुतो याति खपुष्पकृतशेखरः । मृगतृष्णांभसि स्नातः शशशृंगधनुर्धरः ॥' या श्लोकांत या अनेक अभावरूप पदार्थांचें वर्णन आहे.] २. शाश्वत, नित्य. ३. वतन. ४. शोभे.

मारुतीची जाया तैसी जाणती जे काया ।
निरसुनियां माया आले आपुलिया ठाया. ॥ ध्यान० ॥ २ ॥
निष्कामाचें धाम त्यांचें नाम वाचे बोलों ।
केशव म्हणे संतबोधें ब्रह्मानंदें डोलों. ॥ ध्यान० ॥ ३ ॥

### पद ५५४ वें.

त्यासि काय मी आतां देऊं? । त्यासि उतराई कैसेनि होऊं? ॥ ध्रुवपद. ॥
[१]मायाबंदिशाळा फोडिली । माझी संसारसांखळी तोडिली. ॥ त्यासि० ॥ १ ॥
ज्ञानगंगेसी स्नान घालुनी । मज आणिलें आनंदभुवनीं. ॥ त्यासि० ॥ २ ॥
कल्पनेचे मळ फेडिले । कैसें शुद्ध बोधांबर[२] वेढिलें. ॥ त्यासि० ॥ ३ ॥
म्हणे केशव स्वराज्य देउनी । नित्य बैसविलें सिद्ध आसनीं. ॥ त्यासि० ॥ ४ ॥

### पद ५५५ वें.

आद्य रोंप अपवाद नेणें । कांहीं न जाणें तें निजरूप जाणें. ॥ ध्रुवपद. ॥
गुरुभजनाचें फळ मज आलें । परमपदा चित्[३] सहजचि आलें. ॥ आद्य० ॥ १ ॥
शमदमसाधनीं शिणविलें नाहीं । चित्सागरामाजी बुडविलें पाहीं. ॥ आद्य० ॥ २ ॥
केशवस्वामिची निज भेटी झाली । आत्मपदीं सर्व क्रिया निमाली. ॥ आद्य० ॥ ३ ॥

### पद ५५६ वें.

ऐसें नवल आजि झालें । सर्व रामराज्य झालें. ॥ ध्रुवपद. ॥
कान्हा वाटे देव भेटे । हातीं पायीं तोचि दाटे. ॥ ऐसें० ॥ १ ॥
ओळखिला देवराजा । सर्व शोक गेला माझा. ॥ ऐसें० ॥ २ ॥
रामसंगें संग गेला । रंगेवीण रंग केला. ॥ ऐसें० ॥ ३ ॥
केशवस्वामीवीण पाहीं । त्रिभुवनीं आन[४] नाहीं. ॥ ऐसें० ॥ ४ ॥

### पद ५५७ वें.

ज्याचा तो जाणे ज्याचा तो जाणे । जाणीव[५] निमाली त्यासीच बाणे ॥ ध्रुवपद. ॥
जनीं [६]जनार्दन जाणोनि वागे । पदोपदीं त्यासी समाधी लागे. ॥ ज्याचा० ॥ १ ॥
स्वस्वसुख सागरीं हारपे चित्त । ठायींच्या ठायीं पूर्ण निवांत. ॥ ज्याचा० ॥ २ ॥
सद्गुरुकृपें केशवीं देखा । देखणेपणाचा राहिला लेखा. ॥ ज्याचा० ॥ ३ ॥

---

१. माया हीच बंदिशाळा. २. बोधरूप अंबर (वस्त्र). ३. चैतन्य, ज्ञान. ४. अन्य. ५. ज्ञान. ६. पृष्ठ १८ टीप ५ पहा.

## पद ५५८ वें.

तो हरि मजला लौकरि दावा । वाटतो आजी नयनीं पाहावा. ॥ ध्रुवपद. ॥
गोकुळीं भक्तगोधनें राखे । घेतली शांतिकांबळी कांखे ।
शेष हें दीन गौळ्यांचे चाखे । गुंतला भक्ति द्रौपदिचे भाके. ॥ तो० ॥ १ ॥
स्मरणें ज्याच्या कळिकाळ कांपे । वंदितां भवदुःखचि लोपे ।
चिंतितां येउनि हृदयीं ठाके । झांकितां सूर्यतेजें न झांके. ॥ तो० ॥ २ ॥
पाहतां मन मनपणा मुके । देखतां गर्भवासचि चुके ।
योगी ये ज्याच्या निजात्म सुखें । केशव गुरुकृपेनें देखें. ॥ तो० ॥ ३ ॥

## पद ५५९ वें.

देवासि सांडुनी मी जाय दुरी ।
तंव देव रिघाला[2] मजभीतरी. ॥ ध्रुवपद. ॥
जेथें जावें तेथें देव सांगातें । ऐसें केलें येणें सद्गुरुनाथें ॥ देवा० ॥ १ ॥
देवाच्या [3]भेणें बैसें कपाटीं । तंव देव भरला पाठीं आणि पोटीं ॥ देवा० ॥ २ ॥
देवेविण ठाँव[4] न दिसे रिता । सबाह्य जाहला देव तत्वता ॥ देवा० ॥ ३ ॥
गुरुकृपें केशवीं घेतली पाठी । करुनि ठेला आपुली संसाटी ॥ देवा० ॥ ४ ॥

## पद ५६० वें.

देव त्याविण आणिक नाहीं । माझे जिविंचा अनुभव पाहीं. ॥ ध्रुवपद. ॥
देव दावुनि हरिला देह । केलें मजला पूर्ण देव. ॥ देव० ॥ १ ॥
देव सर्वहि केला तेणें । आतां नाथिलेपणाहि नेणें. ॥ देव० ॥ २ ॥
देवाविण आणिक नाहीं । देवराव केशवस्वामी. ॥ देव० ॥ ३ ॥

## पद ५६१ वें.

माझा घात अवघा केला । महाशून्यासि ग्रासुनि ठेला. ॥ ध्रुवपद. ॥
[5]भवभंजन सद्गुरूनाथ । तेणें मस्तकिं ठेवुनि हात. ॥ माझा० ॥ १ ॥
[6]स्थूल [6]सूक्ष्म [6]कारण नाशी । मीतूंपणा लागुनी ग्रासीं. ॥ माझा० ॥ २ ॥
म्हणे केशव आनंदराशी । आम्हीं काय म्हणावें त्यासी. ॥ माझा० ॥ ३ ॥

## पद ५६२ वें.

जिवा शिवावेगळा शिव अहो । त्यासि भजे तो स्वयें शिव हो! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. उभा राहतो. २. शिरला. ३. भयानें. ४. स्थान. ५. संसारनाशक. ६. हें देहाचें नांव आहे.

सदाशिवा तूं स्मर निज भावें । मग पुढती न लगे यावें जावें ॥ जिवा० ॥१॥
शिवस्मरणें सदां सुखि होती । शिवसंगें सबाह्य पालटती ॥ जिवा० ॥ २ ॥
गुरुकृपें केशवीं शरण गेला । तो सहजेंचि शिवें होउनि ठेला ॥ जिवा० ॥ ३ ॥

### पद ५६३ वें.

मज सद्गुरू तोचि आठवतो । त्यासी आठवितां कंठ दाटतो. ॥ ध्रुवपद. ॥
गुरुभक्तिचें घेतलें धरणें । सर्व सांडिलें सद्गुरु कारणें. ॥ मज० ॥ १ ॥
गुरुभक्तिस सावध नेटका । गुरुभक्तिचा वांच्छितों कुटका. ॥ मज० ॥ २ ॥
म्हणे केशव सद्गुरुभजनीं । बुडी यालागीं दिजे हो! सज्जनीं. ॥ मज० ॥ ३ ॥

### पद ५६४ वें.

दोरी भासे अजगर[1] तैसा ब्रह्मीं संसार ।
दिसे परि साचार[2] अणुमात्र नाहीं बा ! ॥ ध्रुवपद. ॥
दर्पणींचें[3] धन तैसे जाण जन रे ! ।
अनुभव लोचन तूं उघडुनि पाहें बा ! ॥ दोरी० ॥ १ ॥
विश्वरूप सकळ मृगजळ केवळ ।
जाणुनियां निश्चळ निज तत्वीं राहें बा ! ॥ दोरी० ॥ २ ॥
सांडी मांडी न करीं कांहीं हेत न धरीं ।
केशवीं गुरुवाक्य करीं आहे तेंचि होई बा ! ॥ दोरी० ॥ ३ ॥

### पद ५६५ वें.

कृपावंता ! पावें तूं त्वरें करुनी । अनुभव भावें आलासि अंतःकरणीं ।
द्वैतभाव निरसुनी तत्क्षणीं । जन्म मरण निरशिलें आजिचे दिनीं. ॥ध्रुवपद.॥
आत्मारामा करुनि तुझी आश । निढळीं हात ठेवुनी सावकाश ।
हृदयकमळीं करूनि अवकाश । भेटीलागीं वाटतो मनोल्हास ॥ कृपा० ॥ १ ॥
अनाथ मी तव अतिदीन असतां । गुरुमिषें ठेविला हात माथां[4] ।
अनाथपण दवडिलें दीनानाथा । सनाथ करुनी ठेविलें मज आतां. ॥ कृपा० ॥२॥
अनाथाचा नाथ हें नाम साजे । दीनबंधु देवा ! तूं सहजीं सहजें ।
काय वर्णूं बोलतां वेद लाजे । केशवराजीं तन्मय झालों सहजें. ॥ कृपा० ॥३॥

---

१. साप, सर्प. २. खरोखर. ३. आरशांतील. ४. मस्तकावर.

## पद ५६६ वें.

आणा श्रीराम श्रीराम गेला भवभ्रम ।
बाई ! काय मीं तुज सांगों त्याविण सकळ श्रम. ॥ ध्रुवपद. ॥
दिनकरवंशींचा[1] जीवन त्रैलोक्याचा ।
मंडण[2] विश्वाचा कुळभूषण दासांचा. ॥ आणा० ॥ १ ॥
तनु मन धन जाया हरली दुस्तर माया ।
एका रघुरायाविण व्याकुळ हे काया. ॥ आणा० ॥ २ ॥
निर्मळ निश्चळ तो मुनि मानस रमवीतो ।
स्मररिपु शिव नमितो दशरथनृपबाळक तो. ॥ आणा० ॥ ३ ॥
राजिवलोचन[3] हा लोचन हा निगमागम[4] नेणती ।
केशवस्वामी हा जगजीवन सांगाती. ॥ आणा० ॥ ४ ॥

## पद ५६७ वें.

ऐसे जे झाले प्रेमें निवाले । ते नाहीं आले परतुनियां. ॥ ध्रुवपद. ॥
सांडुनि कामा[5] स्मरती रामा । अखंड प्रेमा धरूनियां. ॥ ऐसे० ॥ १ ॥
श्रीहरि स्मरत स्वानंदें गर्जत । कंठ सद्गदीत होउनियां. ॥ ऐसे० ॥ २ ॥
तयां नाठवे गेह न दिसे संदेह । राहिले विदेही होउनियां. ॥ ऐसे० ॥ ३ ॥
ऐसे विटोनि कामीं राहिले श्रीरामीं । केशव म्हणे आम्हीं वंदिलें तया॥ऐसे०॥४॥

## पद ५६८ वें.

सच्चिदानंद मूर्ति जयालागीं म्हणती ।
यशोदे कडिये श्रीपती शोभत कैसा. ॥ ध्रुवपद. ॥
जयाचें घेतां नाम पुरती सकल काम ।
तो वत्सें मेघश्याम चारितो कैसा. ॥ सच्चि० ॥ १ ॥
स्तुतीं आणि स्तवनीं स्तविती वेद ध्वनी ।
वेष्टित गोपांगनीं[6] शोभत कैसा. ॥ सच्चि० ॥ २ ॥
ब्रह्मादिकां सकलां न कळे जयाची लीला ।
तो गोपाळीं[7] गोवळा मिरवे कैसा. ॥ सच्चि० ॥ ३ ॥
यातीहीन[8] केवळ प्रत्यक्ष गोवळें ।
केशवीं भावबळें सरती झिलीं[9]. ॥ सच्चि० ॥ ४ ॥

---

१. सूर्यवंशींचा. २. अलंकार, भूषण. ३. कमलनेत्र. ४. वेद आणि शास्त्र. ५. मनोरथ, इच्छा. ६. गोपींनीं. ७. गवळी. ८. जातिहीन. ९. हलू.

### पद ५६९ वें.

यांसि काय हो! करावें । ज्याचें त्यासी न पडे ठावें. ॥ ध्रुवपद. ॥
स्वयें भगवंत आपण । असोनि नव्हेचि म्हणती जाण. ॥ यांसि० ॥ १ ॥
देव सांडुनि देहांतरीं । वायां धांवती बाहेरी. ॥ यांसि० ॥ २ ॥
स्वयें आपणां नेणती । म्हणुनि देही म्हणविती. ॥ यांसि० ॥ ३ ॥
देही असोनि देहातीत । हें कां नकळे निभ्रांत. ॥ यांसि० ॥ ४ ॥
गुरुकृपें केशवीं पाहे । पाहातें पाहणें होउनि राहे. ॥ यांसि० ॥ ५ ॥

### पद ५७० वें.

नरदेहा तरिच जन्मा यावें । गुरुमुखें आपणा वोळखावें ।
हरिभक्तिचें सुख वाढवावें । स्वयें तरोनि आणिकां तारावें. ॥ ध्रुवपद. ॥
भक्ति समरसें वोरसें प्रेम रसें । सुखस्वानंदें आनंदें परमावेशें ।
टाळी वाजत गर्जत नाम घोषें । हरिरंगीं नाचावें उल्हासें. ॥ तरि० ॥ १ ॥
राम नामाची गुढी उभारावी । शांति क्षमा दया वाढवावी ।
भक्ति विरक्ति जगीं रूढवावी । स्वानुभवाची पोथी घालावी. ॥ तरि० ॥ २ ॥
संतचरणीं अनन्य लीन व्हावें । सर्व भूतीं सद्भावें भजावें ।
गुरुकृपे केशवीं निजभावें । जन्ममरणा मारुनि सुखी व्हावें. ॥ तरि० ॥ ३ ॥

### पद ५७१ वें.

भजन करा हरिभजन करा । सर्वांभूतीं भगवद्भाव धरा. ॥ ध्रुवपद. ॥
हरिच्या भजनें उठती जन्ममरण धरणें । येणें अर्थें गर्जती वेद पुराणें ।
ऐसें जाणोनि चित्तीं करा अनन्य भक्ती । तेणें ब्रह्मप्राप्ती शीघ्र होय. ॥ १ ॥
मागें संत वाखाणले तेही भजनें उद्धरले । आतां पुढें तरले नेणों किती ।
यालागीं साचार नाहीं भजनापरतें सार । भजनेंचि उद्धार तिहीं लोकां. ॥ २ ॥
हरिभजनासाठीं पडे नित्य वस्तुसी गांठी । परी विन्मुख करंटी झाली तेथें ।
गुरुकृपें केशवीं निजभावें सुखरूप । तो स्वयेंचि तद्रूप होउनि ठेला. ॥ ३ ॥

### पद ५७२ वें.

सोडिं आतां सोडिं आतां पदर माझा सोडीं ।
संगतिची कळली गोडी, फळली तुझी खोडी. ॥ ध्रुवपद. ॥

---

१. पान्हा. २. ध्वज. ३. सत्वर. ४. खरोखर. ५. राहिला. ६. कोणी गोपी कृष्णाला उद्देशून म्हणते.

बळेंचि आम्हां झोंबसी कैसा झालें तुज कायी? ।
गोकुळ चौढाळिलें तैसी न चले येथें घाई ॥ सोडिं० ॥ १ ॥
दाटुनि गळां पडसी कैसा लाज तूज नाहीं? ।
संग तुझा धरितां मग ठाव कैचा पाहीं ॥ सोडिं० ॥ २ ॥
सद्गुरुकृपें केशवीं निज प्राप्तिकाळीं भेटी ।
झालिया उरी नुरेचि कांहीं संसारेसीं साटी ॥ सोडिं० ॥ ३ ॥

**पद ५७३ वें.**

नाटकि हरि बाई! कैसा नाटकी हरि बाई! ।
पाँलवें मातें धरूनि येणें ठकविलें कैसें पाहीं ॥ ध्रुवपद. ॥
मोकाँट मोठा नावरे याला लाज कैसी नाहीं ।
ऐकांत जगीं उघडपणें येणें मांडिला करूं कायी? ॥ नाटकि० ॥ १ ॥
भेणें आतां जाऊं कोठें घेतलि याणें पाठी ।
जिकडे पाहें तिकडे उभा कान्हया जगजेठी ॥ नाटकि० ॥ २ ॥
सद्गुरुकृपें निज भेटी दिधली केशवराजीं ।
मी माझें गिळुनी येणें भोगियलें आजी ॥ नाटकि० ॥ ३ ॥

**पद ५७४ वें.**

अवघें त्याचेनि चालतें बा! । करुनि अकर्ता भोगुनि अभोक्ता ।
लक्षितां लक्षण हारपे तत्वता ॥ ध्रुवपद. ॥
नऊ खिडकियांचा औटँ हात गांव । तयामाजी सदैव दाही प्रजा ।
चौघेही पाटील पांचवा देसाई । साहावा मोकाशी गुणातीत ॥ अवघें० ॥ १ ॥
प्राणाचा प्राण सोयरा सखा । तोचि पोसणा, तयाचा गांव देखा ।
असोनियां गांवीं वेगळा पाहीं । गांव हा तयासी ठाऊक नाहीं ॥अवघें० ॥२॥
सत्संगें त्याचे भेटीस गेलों । चरणकमळीं स्थीर होउनि ठेलों ।
केशवस्वामीनें आलिंगन देतां । चिदानंद घन हो! तोचि मीं झालों ॥अवघें०॥३॥

**पद ५७५ वें.**

भज रे! तूं भज रे! मना! भज रे! निरंजना ।
गुणी गुणातीत सदोदित कृपाघना ॥ ध्रुवपद. ॥

---

१. चौढाळणें=जातभेद मोडून व्यभिचारातिरेक करणें. (बहुत माजला गवळ । गोकूळ चवढाळिलें सकळ.) २. संगती. ३. पदरानें, पदर धरून. ४. अतिशयित, निर्बंधपणें, द्वाड, दांडगा. ५. एकांतांतील गुप्त व्यवहार. ६. नव द्वारांचा. ७. साडे तीन. ८. देह. ९. मायारहिता देवाला.

पातकवनखंडण निजमंडण सकळांसीं ।
संशयजळशोषक अतिपोषक अमळासी ॥ भज० ॥ १ ॥
मुनिजनश्रममोचन जनलोचन जनवासी ।
जननमरणभंजन जनरंजन अविनाशी ॥ भज० ॥ २ ॥
सकल मंगलधाम पूर्णकाम अविनाशी ।
केशव म्हणे मग्न होउनी लग्न करा त्यासी ॥ भज० ॥ ३ ॥

**पद ५७६ वें.**

ऐसें सुतक पाडिलें पाहीं । कर्म कांहिं उरलें नाहीं ॥ ध्रुवपद. ॥
मोह मायेचा अंत झाला । बोध पुत्र पोटा[1] आला ॥ ऐसें० ॥ १ ॥
उभय सुतक झालें लाटें । आम्हीं अक्षय सुतकी मोठे ॥ ऐसें० ॥ २ ॥
आमुचें सुतकें सुतक नाशी । म्हणे केशव सूतकरासी ॥ ऐसें० ॥ ३ ॥

**पद ५७७ वें.**

पायीं बोधाची अखंड बेडी । कोण वेळे जडला गाढीं ॥ ध्रुवपद. ॥
गुरुरायाचे पडलों बंदीं । तेथें सुटका नव्हे कधीं ॥ पायीं० ॥ १ ॥
ऐसें दुर्घट बंदीस्थान । तेथें सुटका नव्हे जाण ॥ पायीं० ॥ २ ॥
एक केशव बंदीं पडला । तोचि हृदयामाजी जडला ॥ पायीं० ॥ ३ ॥

**पद ५७८ वें.**

पती दारुण[2] मोठा पाहीं । माझें चालों नेदी कांहीं ॥ ध्रुवपद. ॥
कांहीं बोलों जातां बोला । हाणी स्वानुभवाचा टोला ॥ पती० ॥ १ ॥
जीव जाय तों सेवा घेतो । एकांतिची भेटी देतो ॥ पती० ॥ २ ॥
म्हणे केशव त्याचे घरीं । कांहीं उरली नाहीं उरी[3] ॥ पती० ॥ ३ ॥

**पद ५७९ वें.**

दृश्य डोळां नेदी पाहूं । पाय सोडुनि येदी राहूं ॥ ध्रुवपद. ॥
पती दारुण मोठा माझा । करूं नेदी गाजावाजा[4] ॥ दृश्य० ॥ १ ॥
म्हणे केशव त्याचे पायीं । आम्हीं आम्हिपण नेणों कांहीं ॥ दृश्य० ॥ २ ॥

**पद ५८० वें.**

माग मागील बुडाला । संतमेळा प्रकट झाला ॥ ध्रुवपद. ॥

---

१. पोटा येणें=जन्मास येणें, उदरीं उत्पन्न होणें. २. भयंकर. ३. बाकी, अवशिष्ट. ४. ग
डबड.

देहबुद्धी विलया गेली । आत्मस्थिती प्रकट झाली ॥ माग० ॥ १ ॥
क्रिया कर्म झालें शून्य । हारपलें पाप पुण्य ॥ माग० ॥ २ ॥
शून्य अवघाचि संकल्प । केशवीं पाहातां चिद्रूप[1] ॥ माग० ॥ ३ ॥

### पद ५८१ वें.

परि हें न कळे कवणासी । काय करूं मी ऐशीयांसी ॥ ध्रुवपद. ॥
अवलोकितां चराचर[2] । भासे आत्माचि साचार[3] ॥ परि० ॥ १ ॥
जितुकें भासे तितुकें ब्रह्म । हेंचि परमार्थाचें वर्म ॥ परि० ॥ २ ॥
केशव म्हणे प्रपंच पूर्ण । भासे आत्माची संपूर्ण ॥ परि० ॥ ३ ॥

### पद ५८२ वें.

तो बोध[4]सुभानु प्रकाशला. ॥ ध्रुवपद. ॥
अज्ञान[5]निशी करी अस्तमान ॥ तो बोध० ॥ १ ॥
सर्व भूतिं ज्याचा प्रकाश समान ॥ तो बोध० ॥ २ ॥
आपुले निज तेजें आपणा दावी जाण ॥ तो बोध० ॥ ३ ॥
उदयअस्तुचें नाहीं जया भान ॥ तो बोध० ॥ ४ ॥
केशव म्हणे पाहातां डोळ्यां समाधान ॥ तो बोध० ॥ ५ ॥

### पद ५८३ वें.

ते गोंसावी संत मुळिंचे । आम्ही पाइक[6] त्यांचे कुळिंचे ॥ ध्रुवपद. ॥
स्वानुभवाचा निर्धार । ज्याचे हृदयीं बिंबला साचार ॥ ते० ॥ १ ॥
आप पर ज्यांसि असेना । ज्यांसि स्वप्नीं हा संसार दिसेना ॥ ते० ॥ २ ॥
जो सर्व सुखाचा दायक । स्वामि केशवाचा निज नायक ॥ ते० ॥ ३ ॥

### पद ५८४ वें.

त्याचें चरण[8]कमळ वंदितां माथा वो ! । ब्रह्मानंदें निमग्न झालें आतां वो ! ॥ध्रु०
समदृष्टी देखणें ज्याचें माय वो ! । तोचि देखणा[9] बहुत सांगों काय वो ! ॥१॥
समपदीं राहिला मुक्त झाला वो ! । सम प्राप्ति पाहुनि प्रेमें धाला[10] वो ! ॥ २ ॥
सम सुखें लागली समटाळी वो ! । सम समाधी केशवीं सर्व काळीं वो !॥३॥

---

१. चैतन्यस्वरूप. २. स्थावरजंगम जगत्. ३. खरोखर, सत्य. ४. बोधरूप उत्तम सूर्य. ५. अज्ञानरूप रात्र. ६. निरोप्या, जासूद, खेड्यावरील अधिकारी, शिपाई, सेवक, चाकर. ७. पृष्ठ १६१ टीप २ पहा. ८. पदपद्म. ९. सुंदर. १०. तृप्त झाला.

## पद ५८५ वें.

त्याचे संगतिचा मज लागो वारा वो! ।
तेणें सखिये! पावेन पैल पारा वो! ॥ ध्रुवपद. ॥
गुरु[1]मज्जनीं [2]जीवनबिंदु उडे वो! । पूर्वपुण्यें तो ज्यावरी पडे वो! ॥ १ ॥
गुरुचरणींचें र[3]ज हें निर्मळ वो! । तेणें मंडित जयाचें नि[4]ढळ वो! ॥ २ ॥
गुरुमुखिचें शेष हें चांगलें वो! । त्यानें हृदयकमल ज्याचें रंगलें वो! ॥ ३ ॥
गुरुकृपा घालुनि अंजन वो! । झालें सर्वी सर्वदां निमग्न वो! ॥ ४ ॥
गुरुवांचुनि नेणति कांहीं वो! । म्हणे केशव शरण त्याचे पायीं वो! ॥ ५ ॥

## पद ५८६ वें.

कैसें नवल वि[5]तलें आजी पाहीं हो! ।
[6]शुद्धी सांगाया उरलें कोणी नाहीं हो! ॥ ध्रुवपद. ॥
ज्ञानगंगेचा विशाळ डोहो । तेथें विराले [7]चारी देहो ॥ १ ॥
माजी जळाची अक्षोभ्य खोली मोठी हो! । तेथें बुडालीं ब्रह्मांडें कोटी हो!॥२
गुरुकृपें केशवीं मग्न झाला हो! । तो जिवासकट निमाला हो! ॥ ३ ॥

## पद ५८७ वें.

तुझी वस्तु तुजचि पाशीं आहे रे! ।
सांडीं कल्पना उघड डोळां पाहें रे! ॥ ध्रुवपद. ॥
कां बा! इकडे तिकडे पाहातोसी रे! ।
कां बा! [9]मीपणें गुंतोनी श्रमतोसी रे! ॥ तुझी० ॥ १ ॥
सिद्ध जवळी वेगळी नाहीं कांहीं रे! ।
निरंतर नांदते निजदेहीं रे! ॥ तुझी० ॥ २ ॥
गुरुकृपें केशव पाहों गेला रे! ।
पाहातां पाहातां [10]तद्रूप होउनि ठेला रे! ॥ तुझी० ॥ ३ ॥

## पद ५८८ वें.

मज लागलें तयाचें ध्यान रे! । त्याचे चरणीं गुंतलें माझें मन रे!॥ध्रुवपद.॥
जो सकळांजवळींच वसतो रे! । परी पाहूं [11]जाणे त्यासिच दिसतो रे! ॥ १ ॥

---

१. स्नान. २. पाण्याचा थेंब. ३. धूळ. ४. दैव, कपाळ. [गुरूच्या पायांवर डोकें ठेविलें म्हणजे कपाळाला त्याचे पदरज लागणार.] ५. वर्तलें, घडलें. ६. वार्ता. ७. स्थूलदेह, सूक्ष्मदेह, कारणदेह आणि महाकारणदेह. ८. शांत झाला. ९. अहंकारें, गर्वें. १०. तदाकार. ११. जाणतो.

मुख्य गगनाचाही मायबाप रे! । [1]हरी दर्शनें समूळ पुण्य पाप रे! ॥ २ ॥
जो ध्येयध्यानाहुनि वेगळा रे! । त्यासीं केशवीं पाहातां निजसोहळा रे! ॥३॥

## पद ५८९ वें.

मज अखंड राघव कळला रे! । कल्पतरुगुरु [2]फळला रे! ॥ ध्रुवपद. ॥
रामाच्या विसरें रचिलें रे! । [3]संसारभिंताड खचलें रे! ॥ मज० ॥ १ ॥
प्रीति निरंतर लागलि रे! । तेणें अनादि माया भंगलि रे! ॥ मज० ॥२॥
संग संगातीताचा घडला रे! । तेथें निवांत केशव जडला रे! ॥मज०॥३॥

## पद ५९० वें.

दूरि ठेला देव दूरि ठेला देव दूरि ठेला तयांलागीं ॥ ध्रुवपद. ॥
टिळे माळा टोपी वैष्णव दिक्षावेष भजनाचा उत्कर्ष वाढवीती ।
परी श्रद्धा न घडे भजन सर्व भूतीं । देव तयांप्रती । दूरि ठेला ॥ १ ॥
देवपूजार्चन [4]आगमोक्त संपूर्ण नामसंकीर्तन महाद्वारीं ।
गीत नृत्य हास्य करिती नानापरी । भक्तिवीण हरी । दूरि ठेला ॥ २ ॥
हाव भाव कटाक्ष कीर्तनिं आवेश जयजयकारें घोष करिती ।
सदां सप्रेमाचा लेश स्वप्निंही नेणती । यालागीं श्रीपती । दूरि ठेला ॥३॥
बाह्यसंकीर्तन मनीं द्वेषाद्वेष पाहती गुणदोष सज्जनाचे ।
गुणदोषीं दृष्टी नाहीं शुद्ध भाव । म्हणुनियां देव । दूरि ठेला ॥ ४ ॥
दूरि म्हणों तरी सर्वत्र व्यापक मनबुद्धि चालक आत्माराम ।
हृदयींचा हृदयस्थ सर्व हृदयवासी । परी केशव म्हणे त्यासी । दूरि ठेला ॥५॥

## पद ५९१ वें.

तैसा आत्मा [5]जाणा स्वतःसिद्ध ॥ ध्रुवपद. ॥
हातिंच्या [6]कांकणा । आरसा नलगे कोणा ॥ तैसा० ॥ १ ॥
जिव्हा असे नसे । पुसणें नलगे जैसें ॥ तैसा० ॥ २ ॥
स्वदेह आहे नाहीं । पुसणें नलगे कांहीं ॥ तैसा० ॥ ३ ॥
ज्याचें त्यासि गुज । पुसणें नलगे सहज ॥ तैसा० ॥ ४ ॥
आपुलि आपण खूण पुसणें नलगे जाण । केशवीं आत्मा पूर्ण ॥ तैसा० ॥ ५ ॥

---

१. हरण करी. २. फळ देता झाला. ३. संसाररूप लहान व उघडी भिंत. ४. शास्त्रोक्त. ५. ह्या पदाचें दुसरें कडवें म्हणते वेळेस येथें 'असे', तिसरें म्हणतांना 'पाहीं', चौथें म्हणतांना 'बुझ'—असें म्हणण्याची चाल आढळते. ६. हा शब्द कोशकारांनीं टिपून ठेवण्यालायक आहे.

### पद ५९२ वें.

आली रे! आली आली गुरुमाउली ॥ ध्रुवपद. ॥
अतिवेगें धांवत आली । मजलागीं उडी घातली ॥ आली० ॥ १ ॥
कृपेची करीत छाया । निववित माझी काया[१] ॥ आली० ॥ २ ॥
पुरवित जिविंची थाया । सद्गुरुमहंमाया ॥ आली० ॥ ३ ॥
अमृताची वृष्टी केली । सुखाची धणी[२]च दिधली ॥ आली० ॥ ४ ॥
प्रसन्न केशवीं झाली । आंगिंच जडोनि ठेली ॥ आली० ॥ ५ ॥

### पद ५९३ वें.

देखिला गे! माय! देखिला हरी ।
सांवळी प्रभा बरवी अंतर्बाहेरीं. ॥ ध्रुवपद. ॥
सहज मी गेलें या वृंदावना ।
गोपी गोपाळांमाजी देखियला कान्हा ॥ देखिला० ॥ १ ॥
सर्वांगीं सुंदर कांती अंगीं नसमाय[३] ।
उजळलिया दिशा जाहलें सतेजमय ॥ देखिला० ॥ २ ॥
देखियला तेणें मन तन्मय जाहलें ।
पुंजाळली दृष्टी चकीत होउनी ठेलें ॥ देखिला० ॥ ३ ॥
निजदृष्टीं न्याहाळी तव न दिसे बिंब ।
जनीं वनीं अवघा तो प्रकाश स्वयंभ ॥ देखिला० ॥ ४ ॥
गुरुकृपें केशवीं पाहतां श्रीकृष्णरूप ।
गोपी गोवळ गाई अवघे जाहले तद्रूप[४] ॥ देखिला० ॥ ५ ॥

### पद ५९४ वें.

भ्रांतीपडदा फेडा माझा राम मजला दावा वो! ।
त्रिविधतापें श्रमलें जिविंचा विसांवा मेळवा वो! ॥ ध्रुवपद. ॥
चंदन[५] पोळी, शशि[६] बहु जाळी, दारुण विरहानळ[७] वो! ।
हरिविण दिशा दिसती उदास भेटवा गोपाळ वो! ॥ भ्रांती० ॥ १ ॥
सुमनहार[८] जेंवि विखार[९] वेगीं परते काढा वो! ।
हरिविण रस तो सकल विरस तो शोभा कैंची जडा वो! ॥ भ्रांती० ॥२॥

---

१. देह. २. विपुलता. ३. न मावे. ४. तदाकार. ५. भाजतो. ६. चंद्र. ७. वियोगाग्नि. ८. कुसुमदाम. ९. सर्प.

करमुद्रिकावसनें देखा भूषण करुं मी काय वो!।
काढा पैंजण वाजति रुणझुण त्याविण मज न साहे वो! ॥ भ्रांती० ॥ ३ ॥
अशन[1] शयन भोजन पान झालें विषप्राय वो!।
न घाला वारा होत उबारा हरिविण प्राण जाय वो! ॥ भ्रांती० ॥ ४ ॥
हरिविण कळा सकळा विकळा विरस हा शेजार वो!।
गुरुसी शरण रिघतां केशवीं झाला साक्षात्कार वो! ॥ भ्रांती० ॥ ५ ॥

## पद ५९५ वें.

आतां सांडा मागिल चाळा। मामी! देहबुद्धी[2] गाळा ॥
जळो तुमची खोडी आतां किती केदार वाळा ॥ ध्रुवपद. ॥
परति करा सोय घरधणी घरा आला। मामी! काजळ डोळां घाला ॥
भावोजीचा हात धरुनी आपुले शेजे चाला ॥ सांडा० ॥ १ ॥
नका करूं गमजा। मामी! आपुले मनीं समजा ॥
भ्रांतीपडदा फेडुनि आतां आपुले मनीं उमजा[3] ॥ सांडा० ॥ २ ॥
सांडा टॉकमटिका। मामी! ठकूं नका फुका।
निजात्मनिजीं राहा आतां निजीं निजसुखा ॥ सांडा० ॥ ३ ॥
ऐसा बोध करितां बाळी। निजशेजे आली ॥
सद्गुरुकृपें केशवराजीं तन्मय होउनि ठेली ॥ सांडा० ॥ ४ ॥

## पद ५९६ वें.

सहज डौरे[5] वाजे। प्रेमगोंधळ गाजे. ॥ ध्रुवपद. ॥
संत सौरी[6] यांच्या मेळें सातें पंढरिये गेलें। सुखरुप झालें ॥
नाचतां चिदानंदीं सदां निमग्न होउनि ठेलें ॥ सहज० ॥ १ ॥
कीर्तनाचे दाट थाट कथा वाळुवंटीं। मोक्ष नामासाठीं ॥
मुक्तक्षेत्रीं वास होतां बद्ध मोक्षा आटी ॥ सहज० ॥ २ ॥
त्यागणें नाहीं, भोगणें नाहीं, तेथें कांहीं नाहीं। सद्गुरुचे पायीं ॥
सद्गुरुकृपें केशव राजीं तनुमन वेधलें पाहीं ॥ सहज० ॥ ३ ॥

## पद ५९७ वें.

उदो[7] गे! उदो। मुळिंचा अवघा उदो ॥ ध्रुवपद. ॥

---

१. भक्षण. २. अहंकार. ३. समजा. ४. छानछोकी. ५. डमरु. (मृदंग). ६. निर्लज्ज, अविनय, बेफाम स्त्री. ७. उदय पावो, होवो.

गगन डोळां घालुनि बाळा निःसंग सौरी झाली । [1]रंगीं गोंधळ घाली ।
मागें पुढें सपाट करुनी मुळिंच्या घरा आली ॥ उदो० ॥ १ ॥
उदो बोला आनंद झाला डौर आला हाता । सहज उघडा माथा ।
[2]प्रकृति नव्हे पुरुष नव्हे कोणा लाजों आतां ॥ उदो० ॥ २ ॥
नव्हे नारी नव्हे पुरुष नव्हे नपुंसक । नव्हे कांहीं देख ।
कांहीं न होवोनीयां कैसी एकाएकीं एक ॥ उदो० ॥ ३ ॥
एकाएकीं एक झालें बोलतां नये बोलें । स्वरूप कोंदाटलें ।
मुळिंचें मुळीं नाहीं होतां वासना वास गेलें ॥ उदो० ॥ ४ ॥
सौरीयाचा संग बरा सारा दोरा नाहीं । मोकळें अवघे ठायीं
हेत गिळूनि हिंडतां जगीं भय नसे कांहीं ॥ उदो० ॥ ५ ॥
नाम नाहीं रूप नाहीं नाहीं यातीधर्म । कैचें क्रियाकर्म ।
सद्गुरुकृपें केशवराजीं शून्य वृत्तीवर्म ॥ उदो० ॥ ६ ॥

## पद ५९८ वें.

तो हा [3]परमहंस आजी देखिला गे! माय ।
अतैं करूनि भावें शिरीं वंदियेले पाय. ॥ ध्रुवपद. ॥
वासना वास फेडी । द्वैतजानवें तोडी ।
मुंडुनियां कर्मकेश भेद सर्व मोडी ॥ तो हा० ॥ १ ॥
करूनि सर्व रक्षा । गिळी सर्वापेक्षा ।
मंत्र यंत्र नेणें शुद्ध [4]अवधूतदिक्षा ॥ तो हा० ॥ २ ॥
नित्य मुक्तरूप तेथें । नाहीं बद्ध मोक्ष ।
[5]प्रणवातीत आत्मा केशवस्वामीच प्रत्यक्ष ॥ तो हा० ॥ ३ ॥

---

१. सभेंत, नृत्यांत. २. प्रकृति व पुरुष यांच्या संयोगापासून हें विश्व उत्पन्न झालें आहे असें सांख्यशास्त्राचें मत आहे. ३. परमहंस=तपाकरितां ज्यानें इंद्रियदमन केलें असा संन्यासी; कुटीचक, बहूदक, हंस आणि परमहंस असे भिक्षुजनाचे चार प्रकार आहेत. एकापेक्षां दुसरा, दुसऱ्यापेक्षां तिसरा श्रेष्ठ, असा यांच्या माहात्म्याचा अनुक्रम आहे. ['चतुर्विधा भिक्षवस्ते कुटीचकबहूदकौ । हंसः परमहंसश्च यो यः पश्चात् स उत्तमः ॥.'] ४. अवधूत=विरक्त, विरागी, संन्यासी, योगी. ['यो विलंघ्याश्रमान्वर्णानात्मन्येव स्थितः पुमान् । अतिवर्णाश्रमी योगी **अवधूतः** स उच्यते ॥' किंवा 'अक्षरत्वात् वरेण्यत्वात् धूतसंसारबंधनात् । तत्त्वमस्यर्थसिद्धत्वा**दवधूतोऽ**भिधीयते ॥']. ५. प्रणव=ओंकार.

## पद ५९९ वें.

मी पिंगळा भाकतों होईक । चित्त देउनी ऐक ॥ध्रुवपद. ॥
आलेल्यानो नरदेहासी । एकवस्तु लाभेल सायासीं ।
कायावाचा मानसीं । सच्चित्सुखरूप तूं होसी ॥ मी० ॥ १ ॥
परि एक धुरेचेनि हातें । एक निधान लागेल तूतें ।
अनन्य शरण तयातें । यावें चित्तें वित्तें ॥ मी० ॥ २ ॥
केशवस्वामी जोसी । शकून पुसतां त्यासी ।
स्वयेंचि ब्रह्म होसी निर्गुणग्रामा जासी ॥ मी० ॥ ३ ॥

## पद ६०० वें.

राम जागत जगजोगी । आत्माराम निजयोगी ॥ ध्रुवपद. ॥
राम अयोध्येचा राजा । नाथ जीवप्राण माझा ।
भेद सांडुनियां दुजा । आजि पुजा करिन वोजा रे! ॥ राम० ॥ १ ॥
देव सर्वी सर्वातीत । गुणीं गूण विवर्जित ।
क्षेत्रपाळ सदोदित । केले दास जीवन्मुक्त रे! ॥ राम० ॥ २ ॥
दीननाथ दीनबंधु । महाराज दयासिंधु ।
केशवस्वामी पूर्ण बोधू । आम्हा अखंड त्याचा वेधू रे! ॥ राम० ॥ ३ ॥

## पद ६०१ लें.

प्राणसखा हरि जाणा रे! ।
भज्य भजक माया ग्रासुनि निश्चिति प्रतीति गाजे त्या हृदयीं आणा रे! ॥ध्रुवपद.॥
विषय विरतिनें अक्षय गति धरीं प्रिति रतिनें हरि पाहा रे! ।
सबाह्यांतरीं पूर्णपणें तरि कवळुनि निश्चळ राहा रे! ॥ प्राण० ॥ १ ॥
देव सनातन परमानंदघन मनेंविण निजमनीं ठेवा रे! ।
दृढ उँपरतिनें अभेदरितिनें केशवप्रभुप्रति सेवा रे! ॥ प्राण० ॥ २ ॥

## पद ६०२ रें.

मारुनि उपजों नेदी आम्हा । कवणें सोडावें या रामा ॥ ध्रुवपद. ॥
आम्ही भक्तिसिता आणिली । म्हणुनि रामें चाली केली ॥मारुनि० ॥ १ ॥
सुटले रामाचे निजबाण । थोर मांडलें निर्वाण ॥ मारुनि० ॥ २ ॥

---

१. पिंगळा जोशी=शुभ शकुन सांगणारा. २. होणारें. ३. कष्टानें. ४. ठेवा. ५. द्वैतभाव. ६. प्रत्यय, अनुभव. ७. पश्चात्तापानें. ८. अद्वैतबुद्धि. ९. सेवा करा. १०. युद्ध.

अवघें एकाग्र होउनि जाऊं । प्रताप राघवाचा पाहूं ॥ मारुनि० ॥ ३ ॥
गुरुकृपें केशविं जाण । देई रावणपण बळिदान ॥ मारुनि० ॥ ४ ॥

**पद ६०३ रें.**

बिभीषण हा चुकला । माझ्या रामा विसर झाला ॥ ध्रुवपद. ॥
रावण म्हणे बिभीषण वेडा । हीत न जाणें बापुडा ॥ बिभी० ॥ १ ॥
रामासन्मुख जीवें जातां । तो आपण रामचि होता ॥ बिभी० ॥ २ ॥
भक्ती विषयलोभें केली । काया लंकापुरि इच्छिली ॥ बिभी० ॥ ३ ॥
प्राप्तीसीता रघुनाथाची । तेथें उदास वृत्ति त्याची ॥ बिभी० ॥ ४ ॥
गुरुकृपें केशविं पाहीं । समुळीं विरोनि[1] गेला नाहीं ॥ बिभी० ॥ ५ ॥

**पद ६०४ थें.**

त्यांसी कैचें भवबंधन । जे अनुभवीं निमग्न ॥ ध्रुवपद. ॥
देहीं असोनि झाले विदेही । कर्म करूनि निष्कर्म पाहीं ॥ त्यांसी० ॥१॥
जे प्रारब्धें वर्तती देहीं । तरी अहंकर्तृत्व नाहीं ॥ त्यांसी० ॥ २ ॥
केशव म्हणे पदोपदीं । ते निर्विकल्प समाधी ॥ त्यांसी० ॥ ३ ॥

**पद ६०५ वें.**

त्यासि सांगा वेगें । ठकलासी तूं. ॥ ध्रुवपद. ॥
जन्मुनी पावनदेहीं विषयांपाठिं लागे ॥ त्यासि० ॥ १ ॥
केलें दानपुण्य लोकांप्रती सांगे ॥ त्यासि० ॥ २ ॥
शास्त्रव्युत्पत्ति करूनि धन मागे ॥ त्यासि० ॥ ३ ॥
ईश्वरीं बुद्धि संतचरणीं न लागे ॥ त्यासि० ॥ ४ ॥
केशव म्हणे हरिभजन करितां भागे ॥ त्यासि० ॥ ५ ॥

**पद ६०६ वें.**

वेदपरायण आम्ही रे! । सहज डुलतों निजधामीं रे! ॥ ध्रुवपद. ॥
आमुचे देव आम्ही । आमुचे भक्त आम्हीं ॥
आमुच्या भजनें नित्य तृप्त आम्हीं ॥ वेदपरायण० ॥ १ ॥
देव आणि देऊळ । आम्हीं झालों सकळ ॥
अश्वगंध धूप दीप आम्हींच सुमंगळ ॥ वेदपरायण० ॥ २ ॥

---

१. लीन होऊन.

सहजींसहज एक । सह संचलों आम्हीं देख ॥
केशवीं आमुचें सूख आम्हासि अलोलिक ॥ वेदपरायण० ॥ ३ ॥

### पद ६०७ वें.

तो गोकुळीं गोविंद गोवळ झाला. ॥ ध्रुवपद. ॥
वैष्णवाचे कुळीं निःसीम ज्याचा छंद ॥ तो गोकुळीं० ॥ १ ॥
ज्याच्या स्वरुपीं झाला तन्मय साधुवृंद[1] ॥ तो गोकुळीं० ॥ २ ॥
स्तवितां गुण ज्याचे विधिची[2] वैखरी[3] मंद ॥ तो गोकुळीं० ॥ ३ ॥
विश्वाचा विश्राम चिद्रुपाचा कंद ॥ तो गोकुळीं० ॥ ४ ॥
केशव म्हणे ज्याच्या स्मरणें ब्रह्मानंद ॥ तो गोकुळीं० ॥ ५ ॥

### पद ६०८ वें.

तो ठाव येथें हरपला ॥ ध्रुवपद. ॥
पापपुण्य हीं पिकलीं जेथें ॥ तो ठाव० ॥ १ ॥
भेदाभेद दोन्ही नांदताती जेथें ॥ तो ठाव० ॥ २ ॥
बद्धमुक्त हा विवाद जेथें ॥ तो ठाव० ॥ ३ ॥
जीवशिवाची उत्पत्ति जेथें ॥ तो ठाव ॥ ४ ॥
एकदेशी आत्मा बोलणें जेथें ॥ तो ठाव० ॥ ५ ॥
केशव म्हणे उत्पत्ती विलय जेथें ॥ तो ठाव० ॥ ६ ॥

### पद ६०९ वें.

मग सांडी मांडी लागेचि ना. ॥ ध्रुवपद. ॥
स्थूलाचें[4] नेसणें फेडुनि सांडी ॥ मग० ॥ १ ॥
लिंगदेहाची गांठी तोडुनि सांडीं ॥ मग० ॥ २ ॥
कारणाचें मूळ खाणोनि सांडीं ॥ मग० ॥ ३ ॥
महाकारणही निःशेष सांडीं ॥ मग० ॥ ४ ॥
केशव म्हणे सहजीं सहजत्व सांडीं ॥ मग० ॥ ५ ॥

### पद ६१० वें.

त्याचें नाम घ्यावें रे! त्याचें नाम घ्यावें रे! ।
द्वैतभावेवीण सदां शरण जावें रे! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. साधूंचा समुदाय. २. ब्रह्मदेवाची. ३. वाणी. ४. स्थूलदेह, लिंगदेह, कारणदेह, महाकारण देह—असे देहाचे चार प्रकार आहेत.

दाखवूनि राम । जेणें भस्म केला काम ॥ त्याचें० ॥ १ ॥
प्राणाचा प्राण । जेणें भेटविला जाण ॥ त्याचें० ॥ २ ॥
अनाथाचा बंधु । केशवस्वामी दयासिंधु ॥ त्याचें० ॥ ३ ॥

### पद ६११ वें.

काय उणें रे! आतां काय उणें रे! ।
सद्गुरुनें तृप्त केलें पूर्णपणें रे! ॥ ध्रुवपद. ॥
देखियलें पूर्व । तेणें जाहलें अपूर्व ॥ काय० ॥ १ ॥
सांपडलें सार[1] । तेथें केली नित्य थार[2] ॥ काय० ॥ २ ॥
केशव म्हणे आजी । नांदों ब्रह्मानंदा माजी ॥ काय० ॥ ३ ॥

### पद ६१२ वें.

हरिचें नाम घेईं रे! मना! हरिचें नाम घेईं ।
विषयजाळ जंजाळ सकळ सोडुनि देईं ॥ ध्रुवपद. ॥
संतसंगें प्रेमरंगें भजनवना येईं ।
सबाह्यअंतरीं एक निरंतरीं राम रमावर लेईं ॥ हरिचें० ॥ १ ॥
सर्वां सर्वातीत योग सर्व लया नेईं ।
केशव म्हणे केशव होउनि केशव मात्र होईं ॥ हरिचें० ॥ २ ॥

### पद ६१३ वें.

जागा रे! तुम्हीं जागा रे! । निजात्मभुवनीं वागा रे! ॥ ध्रुवपद.॥
साधुसि हृद्गत सांगा रे! । निर्मळ चिद्घन मागा रे! ॥ जागा० ॥ १ ॥
कामक्रोध हे त्यागा रे! । हरिगुरुभजनीं लागा रे! ॥ जागा० ॥ २ ॥
साधुनि शम दम योगा रे! । केशवि केशव भोगा रे! ॥जागा०॥३॥

### पद ६१४ वें.

सांगितलें शिव दातारें । अंतरिंचें गुज निधारें ॥ ध्रुवपद. ॥
काळ पळे बहु नेटानें । ऐसें नाम म्हणा अति मोठ्यानें ॥ सांगि० ॥ १ ॥
ममता हरि हरि सेवुनियां । राहें गुणातीत होउनियां ॥ सांगि० ॥ २ ॥
म्हणे केशव सच्चित्पदवासी । सर्वेहि केशवरूप त्यासी ॥ सांगि० ॥ ३ ॥

---

१. उत्तम. २. थारा, आश्रय.

### पद ६१५ वें.

तो वंदिन राजा शंकर रे! । होउनियां पदकिंकर[1] रे! ॥ ध्रुवपद. ॥
आठवितां करि दूरि पापा । दर्शनें निरसी भवतापा ॥ तो० ॥ १ ॥
समाधी पार्वति सुख भोगी । दीन दयाकर[3] निजयोगी ॥ तो० ॥ २ ॥
भवभय हरितो त्रिपुरारी । अविकारी अतिसुखकारी ॥ तो० ॥ ३ ॥
चित्सुखराशी अविनाशी । केशव म्हणे जनवनवासी ॥ तो० ॥ ४ ॥

### पद ६१६ वें.

म्हणउनि झालों स्थिर पाहीं । जन्मक्षयादिक मज नाहीं ॥ ध्रुवपद. ॥
हरिपदचिंतन करितां रे! । आटली मायासरिता[4] रे! ॥ म्हण० ॥ १ ॥
सज्जनसंगीं भवभंगीं । गर्जत नाचों हरिरंगीं ॥ म्हण० ॥ २ ॥
त्रिभुवनवासी अविनाशी । आंदण दिधलें मज त्यासी ॥ म्हण० ॥ ३ ॥
हृदयवासी हरि केला । वडवानल मच्छ्रम गेला ॥ म्हण० ॥ ४ ॥
हरिरसपानें बहु धालों[5] । केशव म्हणे आनंदरुप झालों ॥ म्हण० ॥ ५ ॥

### पद ६१७ वें.

क्षणक्षणा तूं पाहें रे! । निजपदिं निश्चळ राहें रे! ॥ ध्रुवपद. ॥
ग्रासुनि विविधा भवसंगा । अनंगजनका[6]! श्रीरंगा ॥ क्षण० ॥ १ ॥
जाय अमोलिक वय वायां । लागें श्रीहरिच्या पायां ॥ क्षण० ॥ २ ॥
सद्रूपा निजचिद्रूपा । केशव म्हणे रे! निजदीपा ॥ क्षण० ॥ ३ ॥

### पद ६१८ वें.

तारा हो! मज तारा हो! । आनंदघनीं द्या थारा हो! ॥ ध्रुवपद. ॥
सांगुनि मोक्षविचाराहो! । मारा मारविकारा हो! ॥ तारा० ॥ १ ॥
सारुनि विषयपसारा हो! । सार मनीं विस्तारा हो! ॥ तारा० ॥ २ ॥
पाउनि परम अपारा हो! । केशवें भेद[7] निवारा हो! ॥ तारा० ॥ ३ ॥

### पद ६१९ वें.

अवघा झाला आनंदू । अवलोकितां गोविंदू ॥ ध्रुवपद. ॥
गुरुनें कृपा केली गा! । चिंताममता गेली गा! ॥ अवघा० ॥ १ ॥
देहबुद्धि[8] गेली विलया । मीलन होतां चिन्मया ॥ अवघा० ॥ २ ॥
केशव म्हणे गुरुकृपा । ऐक्य केलें स्वरुपा ॥ अवघा० ॥ ३ ॥

---

१. पदसेवक. २. नाशी. ३. दयेची खाण (आकर). ४. नदी. ५. तृप्त झालो. ६. मदनताता. ७. द्वैत. ८. अहंकार.

## पद ६२० वें.

हें बरवें मजला कळलें गा! । पूर्वपुण्य फळलें गा! ॥ ध्रुवपद. ॥
नाशिवंत सकळीक । शाश्वत माझा बा! एक ॥ हें० ॥ १ ॥
प्रपंच अवघा सुखरूप । सुखरूप आत्मस्वरूप ॥ हें० ॥ २ ॥
स्वरुपीं रमतां भव नाहीं । केशवि अनुभव हा पाहीं ॥ हें० ॥ ३ ॥

## पद ६२१ वें.

आकळे ना निज आकळे ना । आकळल्याविण कळे ना ॥ ध्रुवपद. ॥
मीपण देहिं मावळे ना । तोंवरि निजसुख विवळे ना ॥ आकळे० ॥ १ ॥
वाचाळपणें घोंटवे ना । अनुभव झाल्या सांठवे ना ॥ आकळे० ॥ २ ॥
गुरुकृपें केशव समजे ना । समजल्या कांहीं उमजे ना ॥ आकळे० ॥ ३ ॥

## पद ६२२ वें.

फाटकें तुटकें नेसतों रे! । मन मानेल तेथें बसतों रे! ॥
वेडें वेडें दिसतों रे! । परि ब्रह्मांड गिळुनी असतों रे! ॥ ध्रुवपद. ॥
चित्त चिदानंदीं रंगलें । मीपण माझें भंगलें ॥
भवसागर दुस्तर आटला । देव सनातन भेटला ॥ फाटकें० ॥ १ ॥
सद्गुरुवांचुनि आन[1] नेणें[2] । मजला येथुन काय उणें ॥
निजसुख कोंदे लक्षगुणें । जनिं वनिं मी एक हेंचि म्हणे ॥ फाटकें० ॥ २ ॥
संतसमागम ज्यासि फळे । देव सनातन त्यासि कळे ॥
तोचि मिळे निज रामपदीं । मग [3]मीपण नाहीं त्यासि कधीं ॥ फाटकें० ॥३॥
एक निरंतर देव दिसे । देव कोठें म्हणुनि लोक पुसे ॥
लागलें काय वेड नेणें । देवासि वेडें केंवि म्हणे ॥ फाटकें० ॥ ४ ॥
पाउलापाउलीं देव दिसे । जपतप यात्रि कोण पुसे ॥
अद्वयबोधें मन धालें । म्हणे केशव सुख मोठें झालें ॥ फाटकें० ॥ ५ ॥

## पद ६२३ वें.

बडबड आतां कोठवरी । गडबड वाटे काय बरी ॥
बडबडपुरी सांडि मना! । पावें रे! निजानंदघना ॥ ध्रुवपद. ॥
ब्रह्म सनातन वेद म्हणें । तोहि तयाचा पार नेणें ॥
तें बरवें डोळां देखियलें । बोलणें चालणें पारुषलें ॥ बडबड० ॥ १ ॥

---

१. अन्य. २. न जाणें. ३. अहंकार.

बोलगडा हा वेद पाहीं । परि कळला तुझा भेद नाहीं ॥
तेथें बडबड माझी कोण सवा । तूं निर्गुण केवळ गुरुदेवा ! ॥बडबड०॥२॥
देवराया ! चिदानंदघना ! । तुज पावलिया नाहीं ठाव मना ॥
कळलें मजला आजि बरें । देखियलें हरि तूज खरें ॥ बडबड० ॥ ३ ॥
घेउं जातां दुरि धांवतो रे ! । निश्चळ होतां पावतो रे ! ॥
आत्मविचारीं फावतो रे ! । केशवि केशव भावतो रे ! ॥ बडबड० ॥ ४ ॥

## पद ६२४ वें.

आम्हां कोणीच नाहीं रे ! । आम्हीं एकले पाहीं रे ! ॥ ध्रुवपद. ॥
आम्हा कामदेव रूसेना । आम्हा भोजदेव पूसेना ॥ आम्हां० ॥ १ ॥
आम्हां वडील असेना । आम्हा धाकुटें दिसेना ॥ आम्हां० ॥ २ ॥
आम्हा आम्हिच सांगाती । म्हणे केशव सिद्धांती ॥ आम्हां० ॥ ३ ॥

## पद ६२५ वें.

प्राणसखा तो शिव पाहीं । त्याविण कोठें सुख नाहीं ॥ ध्रुवपद. ॥
कडिये घेउनि सुखि केलें । निजात्मसदनाप्रति नेलें ॥ प्राण० ॥ १ ॥
नित्य निरामय[1] सुख भोगी । मोक्षप्रदाता निजयोगी ॥ प्राण० ॥ २ ॥
अद्वयपदिचा निजराजा । केशव म्हणे धणी माझा ॥ प्राण० ॥ ३ ॥

## पद ६२६ वें.

बोलणें सांडीं बोलणें सांडीं । मौन्यावरि तूं आसन मांडीं ॥ ध्रुवपद. ॥
बोलाचें उंडे बोलाचे मांडे । बोलासाठीं केंवि तरसिल भांडे ॥ बोलणें० ॥ १ ॥
बोलणें अबोलणें सारुनि दोन्हीं । बोलसी तरि बोल शब्दातें गिळुनी ॥ बो० ॥ २ ॥
सद्गुरुकृपें केशवि पाहीं । बोलणें अबोलणें नुरेचि कांहीं ॥ बोलणें० ॥ ३ ॥

## पद ६२७ वें.

स्वानंदराशी । आणा गे ! निजमंदिरासी ॥ ध्रुवपद. ॥
नामें भवभय[2] नाशी । संगें सुखप्रकाशी । वर्णितां परतल्या श्रुति[3] ज्यासी ॥ १ ॥
आत्मा त्रैलोक्यवासी । भक्तांचा विलासी । उपमाचि नाहीं निजरूपासी ॥ २ ॥
मुक्ति जयाची दासी । जो वंद्य सर्वांसी । म्हणे केशव भेटवा त्यासी ॥ ३ ॥

---

१. रोगरहित. २. संसारभीती. ३. वेद.

### पद ६२८ वें.

आनंद झाला । आत्मा घननीळ घरा आला ॥ ध्रुवपद. ॥
योगियांचा विश्राम । सांवळा सुंदर **राम** ।
स्मरतां पुरले सर्व काम ॥ आनंद० ॥ १ ॥
बुद्धिचें अधिष्ठान । सर्वां भूतीं समान ।
ध्यातां विरालें ध्येय ध्यान ॥ आनंद० ॥ २ ॥
**के**शवाचा निज स्वामी । अलिप्त सर्वनामीं ।
लक्षितां सबाह्यअंतर्यामीं ॥ आनंद० ॥ ३ ॥

### पद ६२९ वें.

हा **राम**चंद्र । कृपाळसखा ज्ञानइंद्र ॥ ध्रुवपद. ॥
अविद्येचें सैन्य आलें । तेणें मज वेढियेलें ।
तेव्हां धांवणें येणें केलें ॥ हा **राम**० ॥ १ ॥
कामक्रोध आले बळी । द्वेषानें मांडिली फळी ।
तत्काल याची केली होळी ॥ हा **राम**० ॥ २ ॥
अभिमान पेटला मारा । बोधाचा मोडिला थारा ।
ते वेळे पातला कैवारा ॥ हा **राम**० ॥ ३ ॥
रागद्वेषें पिडियेलें । संसारशत्रूनें छळिलें ।
तयातें निर्मुळ येणें केलें ॥ हा **राम**० ॥ ४ ॥
मोहानें भुलविलें पाहीं । शोकथडका हाणी हृदयीं ।
मारिलें तयांसी एका घायीं ॥ हा **राम**० ॥ ५ ॥
रक्षीलें पाठीं घालुनि मातें । कृपाळें अनाथनाथें ।
**के**शव ओंवाळी जिवें त्यातें ॥ हा **राम**० ॥ ६ ॥

### पद ६३० वें.

देखिलें **दे**वकिनंदना ।
संसारवेदना माझी सहजेंचि सरली आलें या सायुज्यसदना ॥ ध्रुवपद. ॥
लाभालाभीं अतिनिश्चळ जाहालें गे । वेधियलें वेधना ॥ देखिलें० ॥ १ ॥
तेणें सुखें मी बहुत निवालें गे! । विसरलें गे! मदना ॥ देखिलें० ॥ २ ॥
प्रकाशीं प्रकाश मिळे जीवनि[1] जीवन लोळे । भेटलें गगन गगना ॥ देखिलें० ॥ ३ ॥
यापरी दर्शन माये **के**शवीं मिळालें पाहें । राहिली जीवशीव भावना ॥ देखिलें० ॥ ४ ॥

---

१. जीवन=उदक.

## पद ६३१ वें.

आनंदवा[1]रिधि राम भजा ।
संतपदीं स्थिर होउनि निरंतर । सर्वभुतीं भगवंत पुजा ॥ ध्रुवपद. ॥
प्राणसखा न[2]रकेसरि चिंतुनि । दूरि करा अभिमानगजा ॥ आनंद० ॥ १ ॥
मोक्षभुवनिं निजराज्य करा तुम्हि । लावुनि अंतरिं ज्ञानध्वजा ॥ आनंद० ॥ २ ॥
सर्वगताप्रति देउनियां मति । सर्व क्रिया अति शीघ्र त्यजा ॥ आनंद० ॥ ३ ॥
केशवस्वामी भवजालनिवारण । त्रिपु[3]टि विलक्षण होउनि बु[4]झा ॥ आनंद० ॥४॥

## पद ६३२ वें.

रामरसामृत घेइं सदा ।
रामपदीं जरि नित्य वि[5]राजसि । पावसि ना गर्भवास कदा ॥ ध्रुवपद. ॥
रामरसाप्रति सांडुनि निश्चिति अन्यरसीं जरि प्रीति धरी ।
जन्म जरा दुःखघाय निरंतर आदळती तरि जाण शिरीं ॥ राम० ॥ १ ॥
रामरसाविण क्षणभरि वांचणें त्याहुनि जाण हें मरण बरें ।
केशवराजस्वामि पूर्ण सदोदित सेविं अखंडित प्रेमभरें ॥ राम० ॥ २ ॥

## पद ६३३ वें.

अमृताचा मेघ रघुविर वो[6]ळला गे ! माय ! ।
अंतरिं सुख झालें तें मी सांगों आतां काय ? ॥ ध्रुवपद. ॥
रा[7]घवपदजीवनिं म[8]ज्जन गुरुवाक्य केलें ।
तन्मय मन झालें मीपण विरोनियां गेलें ॥ अमृ० ॥ १ ॥
सुखघन सुकुमार राम निजपददातार ।
भजतां सा[9]चार सहजचि सरला संसार ॥ अमृ० ॥ २ ॥
अनंतगुणराशी आत्मा निर्गुण अविनाशी ।
केशव म्हणे ध्यातां झालों अद्वयपदवासी ॥ अमृ० ॥ ३ ॥

## पद ६३४ वें.

हेंचि करीं आधीं । गे ! भजनयोगसिद्धी ।
भक्तिविधी प्रेमसिद्धि सहजें समाधी ॥ ध्रुवपद. ॥

---

१. समुद्र. २. नृसिंह. ३. ज्ञान, ज्ञाता आणि ज्ञेय ही त्रिपुटी. ध्यान, ध्याता आणि ध्येय. ४. समजा. ५. शोभसि. ६. वळला. ७. रामाचे चरण हेंच जीवन (उदक) त्यांत. ८. स्नान. ९. खरोखर.

कर्म सांडीं धर्म सांडीं भजन मांडीं हरिचें ।
गूज संतांघरिंचें[1] ।
साराचें सार नाम तारक भवपुरिचें[2] ॥ हेंचि० ॥ १ ॥
द्वैतभाव करुनि वाव भजनसुखें राहें ।
अविनाश राम पाहें ।
चौऱ्यांऐशीं[3] लक्ष सोंगें चुकति येणें माया ॥ हेंचि० ॥ २ ॥
ज्ञानाचें मूळ भक्ति मोक्षाचें फळ ।
आनंदाचें जळ ।
सद्गुरुकृपें केशवीं जन्म भजनें सुफळ ॥ हेंचि० ॥ ३ ॥

## पद ६३५ वें.

भाग्य माझें मोठें । मज जाणें नाहीं कोठें ॥ ध्रुवपद. ॥
सर्व सखा राम पूर्णकाम अविनाशी ।
सद्गुरुच्या बोलें केलें लग्न आम्ही त्याशीं ॥ भाग्य० ॥ १ ॥
बोलणें गेलें चालणें गेलें डोलणें तेंही गेलें ।
अंगेवीण संग देउनि बहुत सुखी केलें ॥ भाग्य० ॥ २ ॥
प्राणाचा प्राण निर्वाणपदराजा ।
थोर पुण्यें आजी केशवस्वामी झाला माझा ॥ भाग्य० ॥ ३ ॥

## पद ६३६ वें.

येईं वो! तूं येईं निजानंदघने! येईं ।
सनातने! निरंजने! भेटि आम्हां देईं ॥ ध्रुवपद. ॥
गुणातीत सहज तूं वो! सदोदीत माता ।
तुझिया दर्शनें ब्रह्म होय प्रमाता ॥ येईं० ॥ १ ॥
परमसुंदरे त्रिपुरांतके! देवी! ।
मोक्षपदायोग्य तोचि पाय तुझे सेवी ॥ येईं० ॥ २ ॥
नामरुपातीत निजरूप तुझें साचें ।
केशवस्वामिणी! तूं वो! छत्र योगियांचें ॥ येईं० ॥ ३ ॥

## पद ६३७ वें.

चोरिलें नवनीत[4] आतां करुं मी काय? ।
सारांश अवघाचि कैसा निपटुनि जाय ॥ ध्रुवपद. ॥

---

१. उत्तम. २. संसारांतील. ३. पृष्ठ ८ टीप १ पहा. ४. लोणी.

त्रिगुणाचें शिंकें गगनीं लोंबविलें हातें ।
निघाला चोरिये कैसा कान्हया तेथें ॥ आतां० ॥ १ ॥
अगम्य ठाव तेथें स्वयें रिघाला ।
वांव[1] निजठाव कैसा आपणचि झाला ॥ आतां० ॥ २ ॥
सद्गुरुकृपें केशवराजीं धरियेला चोरी ।
कोंडिला अंतरीं परी दिसे बाहेरी ॥ आतां० ॥ ३ ॥

## पद ६३८ वें.

म्हणा[2] श्रीराम जयजय राम । भवसिंधुतारक नाम ॥ ध्रुवपद. ॥
राम[3]नामाची महिमा मोठी । नामें तरले कोटिन कोटी ॥ म्हणा० ॥ १ ॥
नामें प्रल्हाद[4] रक्षिला । नामें गजेंद्र[5] सोडविला ॥ म्हणा० ॥ २ ॥
नाममात्रेंचि केवळ । उद्धरिला अजामिळ[6] ॥ म्हणा० ॥ ३ ॥
व्यभिचारिण दुराचारी । तरली नामें गणिका[7]नारी ॥ म्हणा० ॥ ४ ॥
व्यास वाल्मिक अंबरीषासी[8] । झाला नामेंचि उद्धार त्यांसी ॥ म्हणा० ॥ ५ ॥
नामापरतें नाहीं सार । तरले नामेंची अपार ॥ म्हणा० ॥ ६ ॥
गुरुकृपें केशवीं नाम । म्हणतां स्वयेंचि झाला राम ॥ म्हणा० ॥ ७ ॥

## पद ६३९ वें.

तयासवें चोराच्या मागें । आम्हीं आलों लागवेगें[9] ॥ ध्रुवपद. ॥
चारी घरें जाळुनि गेला । परी आंगिंच जडोनि ठेला ॥ तया० ॥ १ ॥
पाय्रांमागें टेवुनि पाये । पायांपाशिं पावलों पाहें ॥ तया० ॥ २ ॥
चोर नव्हे तो चोरांचा राव । सर्व ग्रासुनि म्हणवी साव ॥ तया० ॥ ३ ॥
केशव म्हणे मी दुमदुम आलों । पाय धरितां तद्रूप[10] झालों ॥ तया० ॥ ४ ॥

## पद ६४० वें.

अधिष्ठानिं बैसणें माझें । निशिदिनिं तेथें विराजे ॥ ध्रुवपद. ॥
गांव माझें निरंजन । घर माझें ब्रह्मभुवन ॥ अधि० ॥ १ ॥

---

१. व्यर्थ. २. रामदासकृत कविता–(काव्येतिहाससंग्रहांत छापलेली) पृष्ठ १४६-१४८, अभंग १२-१८, आनंदतनयकृत काव्यें (काव्यसंग्रह) पृष्ठ ८१ पद ३६ पहा, म्हणजे रामनामाचा महिमा केवढा मोठा आहे तें कळेल. ३. पृष्ठ १६१ टीप ६ पहा. ४. पृष्ठ ३४ टीप १ पहा. ५. पृष्ठ ३३ टीप ५ पहा. ६. पृष्ठ ८१ टीप ३ पहा. ७. वेश्या पिंगळा. (पृ० ८१ टीप ३ पहा.) ८. पृष्ठ ८२ टीप ५ पहा. ९. लवकर, सत्वर. १०. तदाकार.

धन माझें स्वरूप शुद्ध । माझा नैवेद्य स्वानंद ॥ अधि० ॥ २ ॥
अनंगासी माझा संग । आत्मबिंबीं माझा भोग ॥ अधि० ॥ ३ ॥
माझें सद्रुप घेणें देणें । माझें चिद्रुप निर्जलेणें[1] ॥ अधि० ॥ ४ ॥
माझी विश्रांति आगमन । केशवि निरालंबीं शयन ॥ अधि० ॥ ५ ॥

**पद ६४१ वें.**

आतां मी काय करूं? । धीर कैसा हो! धरूं? ।
धरियेलें पदरीं न सोडी कान्हा ॥ ध्रुवपद. ॥
प्रेमयमुनाजळ । भरुं गेलें निर्मळ ।
देखिला गोपाळ । तेणें धरिलें मज ॥ आतां० ॥ १ ॥
झाडितां न सोडी हरि । बळकट धरी उरीं[2] ।
लोकाचारीं उरी । उरोंचि नेदी ॥ आतां० ॥ २ ॥
सद्गुरुकृपादृष्टी । केशवि देउनि भेटी ।
एकांतीं लोकांतीं मिठी । घातली येणें ॥ आतां० ॥ ३ ॥

**पद ६४२ वें.**

तो म्यां देखिला निजदाता । सद्गुरुजनिता[3] आतां ॥ ध्रुवपद. ॥
विचारलेणें[4] हें लेववुनी । नांदवि चिन्मयभुवनीं ॥ तो० ॥ १ ॥
अपार भयहर्ता सुखकर्ता । समता वनिता भर्ता ॥ तो० ॥ २ ॥
अखंड शोभतसे समधामीं । तारक केशवस्वामी ॥ तो० ॥ ३ ॥

**पद ६४३ वें.**

त्याचा महिमा वानूं काय? । तोचि बाप तोचि माय ॥ ध्रुवपद. ॥
कानीं रिघतां ज्याचें वचन । झालों त्रैलोक्याचा कान ॥ त्याचा ०॥ १ ॥
जेणें अवलोकितां डोळा । झालों रविचंद्राचा डोळा ॥ त्याचा० ॥ २ ॥
ज्याचे हृदयीं धरितां पाय । झालों वेदाचें हृदय ॥ त्याचा० ॥ ३ ॥
ज्याचा मस्तकिं पडतां हात । सकळ मजमाजी मी सकळांत ॥ त्याचा० ॥४॥
म्हणे केशव ज्याचे भेटी । जीव ईश्वर दोन्ही घोंटीं ॥ त्याचा० ॥ ५ ॥

**पद ६४४ वें.**

तैसा आत्मा सर्वांठायीं । असे परि तो लिप्त नाहीं ॥ ध्रुवपद. ॥
जळीं समरस[7] दिसे आकाश । परि न भिजे अंशाअंश ॥ तैसा० ॥ १ ॥

---

१. अलंकार. २. 'करीं' असा अन्य पाठ आहे. ३. जनक, बाप. ४. विचाररूप अलंकार ५. नग, दागिना. ६. दिसणारा, दृश्य. ७. एकरस, ब्रह्मानंदरूप.

वंन्ही काष्टामाजी असे । परी काष्टातें न स्पर्शे ॥ तैसा० ॥ २ ॥
म्हणे केशव जेंवि सुवास । लिप्त नव्हे त्या पुष्पास॥ तैसा० ॥ ३ ॥

### पद ६४५ वें.

तो साधुचा मुकुटमणी रे ! । आम्ही लागलों तयाचे चरणीं रे ! ॥ध्रुवपद.॥
जो कोणाचे गुण दोष पाहेच ना । जो हृदयीं विकार वाहेच ना ॥तो०॥१ ॥
जो क्रोधाचा संग करीच ना । जो भेदासि हातीं धरीच ना ॥ तो० ॥ २ ॥
जो स्वसुखावेगळा राहेच ना । म्हणे केशव त्यासि कांहीं साहेच ना॥तो०॥३॥

### पद ६४६ वें.

तूं माझी माउली विश्रांतीची छाया । होई दळावया साह्य मज ॥ध्रुवपद. ॥
येई वो ! कान्हाई ! हात लावीं बाई ! । दळण दळितां पाहीं शिणलें ये ॥ तूं०॥१॥
कृपायोगें हात लावीं कृष्णमाय ! । तेणें द्वैतें पाहें दळूं आम्हीं ॥ तूं० ॥ २ ॥
ज्ञाता ज्ञानतळीं ज्ञेय खुंटावळी । अधिष्ठान मुळीं कृष्ण माझा ॥ तूं० ॥ ३ ॥
संसाराचें बीज दळिलें सहज । साह्य झाली मज कृष्णमाय ॥ तूं० ॥ ४ ॥
कृष्णसंगें आम्हीं सर्व दळियेलें । अखंड उरलें कृष्णरूप ॥ तूं० ॥ ५ ॥
कृष्णीं कृष्णार्पण तेंहि दळियेलें । तरो तें संचलें कृष्णरूप ॥ तूं० ॥ ६ ॥
गुरुकृपें केशवि दळण पूर्ण झालें । पूर्णापूर्ण उरलें कृष्णरूप ॥ तूं० ॥ ७ ॥

### पद ६४७ वें.

त्रैलोक्याचें बीज । कृष्णमहाराज ।
वेळोवेळां गूज । हेंचि बोलों ॥ ध्रुवपद. ॥
सखिये ! साजणी । ये ! बैसों कांडणी ।
कृष्ण चक्रपाणी । गाऊं गीतीं ॥ त्रैलो० ॥ १ ॥
देह हें उखळ । मन हें मुसळ ।
जीवभाव तांदूळ । सडूं आतां ॥ त्रैलो० ॥ २ ॥
ज्ञानाज्ञान कोंडा । सडूनियां काढूं ।
अखंड निवडूं । कृष्णरूप ॥ त्रैलो० ॥ ३ ॥
कृष्णसंगें कांडूं । संसार सकळ ।
कृष्णचि निखिल । गीतीं गाऊं ॥ त्रैलो० ॥ ४ ॥

---

१. अग्नि अरणीमध्यें असतो व घर्षणानें उत्पन्न होतो हें सुप्रसिद्ध आहे. २. साधुश्रेष्ठ. ३. पृष्ट १७८ टीप १ व पृष्ट १३२ टीप ३ पहा. ४. भेदभाव. ५. पृ० १८२ टीप ३ पहा. ६. सकल.

अच्युत केशव । अनंत यादव ।
हृदयस्थ माधक । गीतीं गाऊं ॥ त्रैलो० ॥ ५ ॥
गीतीं गीत मुरे । आंगीं कृष्ण भरे ।
कांडण पडिभरें । केशवराजी ॥ त्रैलो० ॥ ६ ॥

### पद ६४८ वें.

राघवा रे ! तुझें नाम वैखरी[1] गोड वाटे ।
नेणों अमृताचे भरले सांठे ॥ ध्रुवपद. ॥
शमवीं त्रिविधतापा । चुकवीं संसारखेपा ।
समुळीं निरसीं पुण्यपापा ॥ राघवा० ॥ १ ॥
स्वरूपीं वेधली वृत्ति । नयनीं कोंदली दीप्ति ।
सहजीं प्रकटली पूर्णशांति ॥ राघवा० ॥ २ ॥
न दिसे आणिक दृष्टी । श्रीरामें भरली सृष्टी ।
केशवस्वामीची जाहली भेटी ॥ राघवा० ॥ ३ ॥

### पद ६४९ वें.

मारिलें कुटिलें परि मी कबूल होई ना ।
चोरिलें गुरुवाक्य तें मी परतोनि देईना ॥ ध्रुवपद. ॥
गुणेंवीण गुण जें कां खुणेविण निजखूण ।
ते खुणगांठी सोडुनि म्यां वो ! नेलें चिद्रत्न ॥ मारिलें० ॥ १ ॥
अमळाहुनि अमळ जे कां प्रकाश बहळ[2] ।
केशवराजीं हृदयपदकीं जडिलें अढळ ॥ मारिलें० ॥ २ ॥

### पद ६५० वें.

घनश्याम मजकडे कां हो ! पाहतो ।
अंतरिंच्या खुणा दावुनि जवळि बाहतो[3] ॥ ध्रुवपद. ॥
कृष्णाची करणी नवल सांगों मी काय ? ।
जेव्हां तेव्हां डोळा मज घालितो माय ! ॥
नानापरी रचीतसे डाय[4] उपाय ।
मजचि भोंवता नेणों अवतरला माय ! ॥ घनश्याम० ॥ १ ॥

---

१. वाणी. २. पुष्कळ. ३. बोलावतो. ४. डाव.

स्वभावें जेथें जेथें जाय मी जेव्हां ।
आपणही मजसवें येतसे तेव्हां ॥
एकही गुण नाहीं पाहतां या हो! सुदेवा ।
बरव्यापरी सये! आला स्वानुभवा ॥ घनश्याम० ॥ २ ॥
नाम रूप माझें याच्यासंगें वो! गेलें ।
यातिकुळ तेंही कैसें अकूळ केलें ॥
केशवप्रभुनें कैसें मन मोहिलें ।
मीपण माझें तेंही हिरोनी नेलें ॥ घनश्याम० ॥ ३ ॥

## पद ६५१ वें.

पा[1]ळवीं धरोनी माझें मोहिलें मन ।
वदनीं वदन घालुनी दिलें चुंबन ॥ ध्रुवपद. ॥
या कान्हयाची करणी सांगों मी काय? ।
लिहितां धरणी हे हो! न पुरे माय ॥ पाळवीं० ॥ १ ॥
विधी[2]रहित व्यवहार मजसीं करी ।
सांगतां गाऱ्हाणें याचें कुंठित वैखरी[3] ॥ पाळवीं० ॥ २ ॥
एकलें देखोनि माझ्या शेजारा आला ।
केशवस्वामी सर्वांगीं जडोनी ठेला ॥ पाळवीं० ॥ ३ ॥

## पद ६५२ वें.

तो म्यां पंढरीनाथ देखियला. ॥ ध्रुवपद. ॥
काळाचाही काळ त्रैलोक्याचा नाथ ॥ तो० ॥ १ ॥
देवाचाही देव लक्ष्मीचा कांत ॥ तो० ॥ २ ॥
गगनाचा अवकाश साधूचा एकांत ॥ तो० ॥ ३ ॥
प्राणाचाही प्राण सर्वांचा सांगात ॥ तो० ॥ ४ ॥
केशव म्हणे पाहतां देहबुद्धीचा पात ॥ तो० ॥ ५ ॥

## पद ६५३ वें.

अहो! जी! गोपाळराया! सख्या! हरी! ।
ब्रह्मादिकां वंद्य तो तूं आमुच्या घरीं ॥

---

१. पदरीं. २. आचाररहित. ३. वाणी.

नकळे नकळे आमुच्या भाग्याची थोरी ।
आलंगिला धांवुनी सप्रेमें करीं ॥ ध्रुवपद. ॥
बाळकृष्ण खेळतां निजअंगणीं ।
यशोदे नंदासि तेणें आनंद मनीं ॥
गोपी गोपाळ पाहतां निवती लोचनीं[1] ।
परमानंद पिकला त्या त्रिभुवनीं ॥ अहो० ॥ १ ॥
मुनिजन ध्यानीं बहू बैसले वनीं ।
आभासही त्यांतें हा हो नाहींच स्वप्नीं ॥
तो तूं नित्य भेटसी आम्हां लागुनी ।
खेळे मेळें नांदों तुझ्या सुखें करोनी ॥ अहो० ॥ २ ॥
परब्रह्म अवतरलें गोकुळीं देखा ।
इंद्र चंद्र वांछिती जेथिंच्या सुखा ॥
तो तूं आम्हां जोडलासी जिवलग सखा ।
योगियांचें ध्येय आम्हां सांपडलें फुका ॥ अहो० ॥ ३ ॥
सर्व भावें प्रिय कृष्ण तूंचि आम्हांसी ।
तनु मनही गुंतलें तुझिया पायांसी ॥
अनुवादों किती अंतरसाक्षी तूं होसी ।
तुझियासंगें कृतकृत्य झालों हृषीकेशी! ॥ अहो० ॥ ४ ॥
चिदानंद डोळस रूप सांवळें ।
मनोहर वेष त्वां धरिला गोपाळें ॥
सद्गुरुकृपें केशवराजीं ऐक्य समेळें ।
नित्यानंद फावलासि सप्रेम मेळें ॥ अहो० ॥ ५ ॥

## पद ६५४ वें.

कृपाळु म्हणवितसे हा आपणालागीं ।
ठकुनि गिळिले येणें किती हो! योगी ॥
डांगोरा करणें याचा कासया जगीं ।
............................................ ॥ ध्रुवपद. ॥

---

१. नेत्रीं.

नवल सांगतां नये सांगों मी कवणा ।
निजीं निज दाउनियां नेलें मीपणा ॥
मुरळें घालुनि आम्हा मोहिलें जाणा ।
जाणीव[1] नेणीव[2] गेली याचिया खुणा ॥ कृपाळु० ॥ १ ॥
.................................. ।
.................................. ॥
नवल थोर हो केलें सद्गुरुराजें ।
भेटी वो! देउनि नेलें मीपण माझें ॥ कृपाळु० ॥ २ ॥
शिव शिव गुरुराया! पुरे संग याचा आतां ।
लगट न सोडी किं हो परतें जातां ॥
गुरुकृपे केशवीं हस्तक माथां ।
जालिया सूटका नाहीं शरणागतां ॥ कृपाळु० ॥ ३ ॥

## पद ६५५ वें.

कांहींच नाहीं भेद ।
कांहींच नाहीं जेथें तेथें निश्चळ राहीं रे! ॥ ध्रुवपद. ॥
गगन पवन पाहीं दहन जीवन कांहीं ।
धरणीसहित नाहीं समूळ तुझ्या ठायीं ॥ कांहीं० ॥ १ ॥
शिवजिव दोन्ही भाव निजपदिं झाले वाव ।
मीपणा वेगळा देव सहज निःसंदेह ॥ कांहीं० ॥ २ ॥
जाणणें नसे नेणणें नसे असणें नसणें नसे ।
केशव म्हणे पूर्ण एक जाणणें मात्र असे ॥ कांहीं० ॥ ३ ॥

## पद ६५६ वें.

आणिकांसीं बोलों नको । हित गुज पुसों नको ।
वेडेपणें डोलों नको । सुखरूप न होतां ॥ ध्रुवपद. ॥
सुखावेगळी मात । नाहीं संत पदीं निवांत ।
तयाचा सांगात । करिं तूं वो! बाईये! ॥ आणि० ॥ १ ॥
संत ते सुखाची मूर्ति । नाशिती दुःखाची स्फूर्ति ।
यथार्थ तयांची कीर्ति । आहे मज ठाउकी ॥ आणि० ॥ २ ।

---

१. ज्ञान. २. अज्ञान.

सुखाची लाविती गोडी । करावी तयाची जोडी ।
जन्ममरणाची बेडी । तेथ तुटे बाईये ! ॥ आणि० ॥ ३ ॥
सुखाचे सिंधू ते माय । वेळोवेळां सांगूं काय ।
सुखाकारणें पाय । धरीं त्याचे मस्तकीं ॥ आणि० ॥ ४ ॥
केशवाचे स्वामी ते वो ! । सर्वस्व तयासी देवो ।
सुखची होसी देवो । भाक माझी साजणी ! ॥ आणि० ॥ ५ ॥

## पद ६५७ वें.

ऐसें कळलें ज्यालागीं तोचि मुक्त निजयोगी ॥ ध्रुवपद. ॥
साक्षात्काराहुनी भिन्न । सहज स्थिती परिपूर्ण ।
सहज स्थितिचा परिपाक[1] साक्षात्कार संपूर्ण ॥ ऐसें० ॥ १ ॥
सत्यहि भूमिका[2] मायिक[3] । याहुनी परतें निजसुख ।
अनुभवरहित अनुभवणें अनुभव भूमिका हे मुख्य ॥ ऐसें० ॥ २ ॥
मुख्य स्थितीचा मुख्यार्थ । गुह्यपणेंविण गुह्यार्थ ।
निर्वाणप्राप्ति[4] केशवीं अहळें[5] बहळें परमार्थ ॥ ऐसें० ॥ ३ ॥

## पद ६५८ वें.

मरुनी आम्हीं कोठें वो ! जावें? । जन्म नाहीं तेथें काय वो! मरावें?॥ध्रुवपद.॥
याति[6] ना कुळ, क्रिया ना कर्म । येणें ना जाणें, अवघा भ्रम ॥ मरु० ॥ १ ॥
बद्ध ना मुक्त, वर्ण ना आश्रम । शिखा[7] ना सूत्र, धर्म ना नेम ॥ मरु० ॥ २ ॥
शब्द ना निःशब्द पाप ना पुण्य । नाद ना बिंदु सहज शून्य ॥ मरु० ॥ ३ ॥
श्वेत[8] ना पीत[9] गौर ना श्याम । व्यक्त ना अव्यक्त रूप ना नाम ॥ मरु० ॥४॥
केशव सद्गुरुकृपें केशवीं विश्राम । तेथें कोणासी म्हणों आत्माराम ॥मरु०॥५॥

## पद ६५९ वें.

सहज सोंवळा तूं अखंडित राहें ।
हरिहर मग तुझे वंदिती पाय ॥ ध्रुवपद. ॥
क्षण एक सोंवळा क्षण एक वोंवळा ।
नाथिलेचि[10] चाळे करिसी कां [11]गोवळा ? ॥ सहज० ॥ १ ॥

---

१. परिणाम, परिपक्वपणा. २. सोंग. ३. खोटी, मिथ्या. ४. मोक्षप्राप्ति. ५. पुष्कळ, अतिशय. ६. जाति. ७. शेंडी. ८. पांढरा. ९. पिंवळा. १०. चांगले नव्हेत ते. ११. गांवढ्या, वेड्या.

सोंवळें ओंवळें ज्याचें हरवलें पाहीं ।
तोचि सोंवळा येथें [1]संदेह नाहीं ॥ सहज० ॥ २ ॥
गुरुकृपें केशव सोंवळा पैं झाला ।
जें आंगीं लागे तैसें सोंवळें त्याला ॥ सहज० ॥ ३ ॥

## पद ६६० वें.

म्हणउनि सुख झालें बहु मोठें । सांठवितां नये कोठें ॥ ध्रुवपद. ॥
मरण आलें हो! ज्यासी । आम्हीं शिवलों नाहीं त्यासीं ॥ म्हण० ॥ १ ॥
[2]भेद गळाला ज्याचा । मीं तव बाळक झालों त्याचा ॥ म्हण० ॥ २ ॥
परम सुखें बहु [3]धालों । केशव म्हणे मी केशव झालों ॥ म्हण० ॥ ३ ॥

## पद ६६१ वें.

आनंदाचा सुकाळ आतां पाहीं । देव भेटला भाग्यासी उणें नाहीं ॥ध्रुवपद.॥
माया [4]रजनीचा अंतक हा आला । हृदयभुवनीं प्रकाश मोठा झाला॥आनं० ॥१॥
सर्वांभावीं अक्रिय लेणें ल्यालों । अनंतासी भेटतां प्रेमें धालों ॥आनं० ॥ २ ॥
दया फळली विश्रांति झाली आजी। वस्ति घडली केशवस्वामीमाजी॥आनं०॥३॥

## पद ६६२ वें.

दयासिंधु ते स्वामी माझे पाहीं ।
त्यांसि पाहतां दुःखासि ठाव नाहीं ॥ ध्रुवपद. ॥
क्षोभवितां न क्षोभे ज्याचें मन । प्राणसंकटीं संपूर्ण समाधान ।
कर्माकर्मी अखंड आत्मज्ञान। त्यांच्या दासांचा मी दास झालों जाण॥दया०॥१॥
सर्वभावें राहिले [5]चिदाकाशीं । माया नाशी निर्मुक्त निश्चयेसीं ।
ब्रह्मानंदीं निमग्न अहर्निशीं । ऐक्यभावें म्यां सेविलें तयासी ॥ दया० ॥ २ ॥
निर्विकल्पीं ब्रह्मांड लया नेलें । आत्मछंदें त्रैलोक्य सुखी केलें ।
म्हणे केशव त्या दातयाच्या बळें । मीतूंपण समूळ माझें गेलें ॥ दया०॥ ३ ॥

## पद ६६३ वें.

कटीं कर ठेवूनी निरंतरीं । समचरणीं [6]सांवळा श्रीहरी ।
सहज ऊभा विज्ञान भीमातीरीं । दिव्यप्रभा न [7]समाये धरांवरीं ॥ ध्रुवपद. ॥
गुणातीत निष्काम अविनाशी । सर्वसाक्षी गोपाळ प्रेमराशी ।
आत्मा माझा घननीळ निश्चयेंसी । चित्तवृत्ति वेधली पूर्ण त्यासी ॥कटीं०॥१॥

---

१. संशय. २. द्वैतबुद्धि, द्वैतभाव. ३. तृप्त झालों. ४. रात्र. ५. चैतन्यरूप आकाशांत.
६. श्यामल. ७. राहात नाहीं.

दयासिंधु अनाथबंधु सखा । महिमा न कळे ब्रह्मादिकां ।
आला भेटी भावार्थ पुंडरीका । त्याच्यासंगें केशवीं प्राप्ति देखा ॥ कटीं०॥३॥

### पद ६६४ वें.

तोचि आदिगुरु भगवंत रे ! । नित्य अंतरीं पाहती संत रे ! ॥ ध्रुवपद. ॥
श्रुतीशास्त्रांसी न कळे अंत रे ! । जो सर्वातीत सर्वांगत रे ! ॥ तोचि०॥ १ ॥
जो दुजेपणेंविण संचला । स्वयें एकपणेंविण एकला ॥ तोचि० ॥ २ ॥
शुद्ध स्वबोधें केशवें पाहिला । मग त्याचा तोचि होउनी राहिला ॥ तोचि०३॥

### पद ६६५ वें.

अखंड गगन असे प्रवेश म्हणीजे कैसें ।
स्वरूप म्हणिजे तैसें जाणिजे रे ! ॥ ध्रुवपद. ॥
घटमठाचेनि त्यागें गगनीं गगन रिघे ।
स्वरुपीं प्रवेश वेगें जाणिजे तैसा ॥ अखंड० ॥ १ ॥
प्रतीति बळें पाहें दुसरें उरलें काय ।
सांगिजेसें नव्हे माय कवणा सांगों ॥ अखंड० ॥ २ ॥
सांगणें पुसणें कांहीं समुळीं उरलें नाहीं ।
स्वरूप ठायींच्या ठायीं केशव म्हणे ॥ अखंड० ॥ ३ ॥

### पद ६६६ वें.

येईं दयानिधे ! येईं रे ! हरी ! ॥ ध्रुवपद. ॥
केवळ बाळ तुझा लडिवाळ मी । उचलुनि कडिये घेईं रे ! ॥ येईं० ॥ १ ॥
तारक कर शिरीं ठेवुनिया वरी । परमपदाप्रति नेईं रे ! ॥ येईं० ॥ २ ॥
हृदयकमलदलीं कवळुनियां मज । निर्विशेषपदें देईं रे ! ॥ येईं० ॥ ३ ॥
स्वयंप्रकाशीं अज अविनाशीं । रमवुनि शमवीं क्रिया रे ! ॥ येईं० ॥ ४ ॥
आनंदवीर्या ! निजचित्सूर्या । म्हणे केशव गुरुवर्या रे ! ॥ येईं० ॥ ५ ॥

### पद ६६७ वें.

पैल गोकुळीं क्रीडतो शेषशायी रे ! ।
गोपी गोपाळ मेळ मेळउनि सकळसमागमें बळिराम भाई रे ! ॥ ध्रुवपद. ॥
त्रिभुवनीं ज्याचें चरित्र गाती । तो गौळियांच्या राखितो गाई रे ! ॥ पैल०॥१॥
अनंतकोटी ब्रह्मांडें पोटीं । तो यशोदेसी म्हणे माझी आई रे ! ॥ पैल०॥२॥
अनादीचें मूळ ज्यासि नाहीं । यातिकूळ लोळति ब्रह्मादिक पायीं रे ! ॥ पैल०॥३

---

१. पृष्ठ ८ टीप १ पहा. २. पार. ३. आकाश. ४. अत्यंत श्रेष्ठ असें पद.

मुनिवर ज्यासी ध्याति अहर्निशि । कांपति कळिकाळ ठायीं रे ! ॥ पैल० ॥ ४ ॥
केशवप्रभु स्वयमेव देवाचाहि देव । मिटलिया येणें जाणें नाहीं रे ! ॥ पैल० ॥ ५ ॥

## पद ६६८ वें.

कान्होबा बहु गांठा रे ! ।
सेलैका वांटा म्हणुनि नेतो आम्हासि लाविला घाटा रे ! ॥ ध्रुवपद. ॥
देहबुद्धि आम्हीं रोडके झालों आपण स्वानंदें लाटा रे ! ।
कणव अमुचि नयेचि कैसी कपटी निष्ठुर मोठा रे ! ॥ कान्होबा० ॥ १ ॥
भजनेंवीण कांहींच आपुलें नेदित केवढा खोटा रे ! ।
सद्गुरुकृपें केशवीं बळेंचि घेतलें देउनि दाटा रे ! ॥ कान्होबा० ॥ २ ॥

## पद ६६९ वें.

काय मी सांगों तुज रे ! । नवल वाटे मज रे ! ।
क्षणक्षणा मन उन्मन होतें अभिनव केवढें चोज रे ! ॥ ध्रुवपद. ॥
संतांचें मोटें एक कौतुक पाहीं । त्यांसी असोनियां देह नाहीं रे ! ।
देहावीण जगीं उघडे नांदती नवल कांहींना बाहि रे ! ॥ काय० ॥ १ ॥
सर्वही भोग भोगुनि चांग । भोगींच ह्यासी त्याग रे ! ।
त्याग भोगासि अलिप्त आपण । ऐसा तयांचा योग रे ! ॥ काय० ॥ २ ॥
देहकर्मे करिती परि न लिंपती । अतर्क्य तयाची स्थिती रे ! ।
गुरुकृपे केशवीं कांहींच न होती । सहजीं सहज विचरती रे ! ॥ काय० ॥ ३

## पद ६७० वें.

ज्ञानाज्ञान तैसें एक रूप बाधक जाणोनि राहीं पां खेळिया ! रे ! ।
या दोहीं वेगळें तूं आपणासी जाणोनि तरिच मुटशिल भाई रे ! ॥ ध्रुवपद. ॥
काळी म्हणोनी बेडी लोहाची तोडिली सोनियाची जोडिली पायीं रे ! ।
यथापूर्वक तें बंधन घडलें विशेष साधिलें त्वां कायी रे ! ॥ ज्ञाना० ॥ १ ॥
निंब हीन म्हणुनि परता केला चंदनाच्या शुळीं घातला रे ! ।
लाभ तेथें अधिक काय रे ! झाला प्राण तो शेवटीं गेला रे ! ॥ ज्ञाना० ॥ २ ॥
अंत्यजाचे सुंणें म्हणवुनी भोंवडुनी घातलें द्विजाचे घरींचें पुजियेलें रे ।
वंद्य निंद्य तेथें श्रमचि उरला पाप तों सारिखेंचि झालें रे ! ॥ ज्ञाना० ॥ ३ ॥

---

१. ऋषिवर. २. रात्रंदिवस. ३. जन्ममरण नाहीं. ४. उनम. ५. दया. ६. कौतुक. ७. चांगले. ८. निराळा. ९. 'न मां कर्माणि लिंपंति' (गीता–अ० ४ श्लो० १४). १०. कुत्रें. (श्वन्)

वांजे शेळीचे कांसे दूध नाहीं म्हणवुनी गलस्तनीं दोहन केलें रे ! ।
दोहींस प्राप्ति तितुकीच झाली उघड सांगतों बोलें रे ! ॥ ज्ञाना० ॥ ४ ॥
ओंवळा अंत्यज करुनी वेगळा सोंवळ्यासी आलिंगन दिलें रे ! ।
तेणेंही विटाळ तैसाचि झाला प्रायश्चित्त घेणें लागलें रे ! ॥ ज्ञाना० ॥ ५ ॥
वोस नगरीचें नभ शून्य म्हणउनि पट्टणीचें खोळें भरूं गेला रे ! ।
खटपट केली ती गटपट झाली लाजोनि उगलाची ठेला रे ! ॥ ज्ञाना० ॥६॥
ज्ञानाज्ञान भेद निरसुनि निःशेष निजरूपीं पावला ऐक्य रे ! ।
केशव म्हणे जगीं तेचि मुख्य योगी त्यांचे पदीं सर्व सौख्य रे ! ॥ ज्ञाना०॥७॥

### पद ६७१ वें.

हें वासुदेव सांगतो पाहीं । मन ठेवी तूं त्याचे पायीं गा ! ॥ ध्रुवपद. ॥
चहूं देहांचें झालें चूर्ण । मग सहजेंची उरलें पूर्ण ।
तें पूर्ण ना नव्हे अपूर्ण । पूर्ण पूर्णातीत संपूर्ण गा ! ॥ हें० ॥ १ ॥
नामरूपातीत अखंड । जें गुह्याचें गुह्य उदंड[१] ।
जेथें हारपलें पिंड ब्रह्मांड । कांहीं नुरेचि मायेचें बंड गा ! ॥ हें० ॥ २ ॥
जन न होनी संचलें जनीं । ज्याचे स्वरुपीं रंतले[२] मुनी ।
जेथें मावळले जीवशिव दोन्ही । म्हणे केशव तत्वदर्शनीं गा ! ॥ हें०॥३॥

### पद ६७२ वें.

सद्गुरूचा धर्म जागो, त्याचे पायीं चित्त जागो ।
वचनमात्रें आभर केलें नेदी आणिका मागों ॥ ध्रुवपद. ॥
ॐकार[३] हा निज वृक्ष त्रिगुणातीत आलक्ष ।
विस्तारला निजबोधें स्वतःसिद्ध प्रत्यक्ष ॥
त्यावरि बैसुनी संता दान मागे अपरोक्ष ।
तिहीं इच्छा पूर्ण केली दाखविलें निजलक्ष ॥ सद्गुरु० ॥ १ ॥
कृपावंत संत बा रे ! ज्याचें देणें अमूप[४] ।
वेंचितांही न सरेचि धन अक्षय स्वरूप ॥
सनाथ तिहीं मज केलें देउनी आत्मपडप ।
ज्ञानदीप उजळुनी प्रकाशिलें आपेंआप ॥ सद्गुरु० ॥ २ ॥

---

१. पुष्कळ. २. रममाण झाले. ३. प्रणवाकार. ४. पुष्कळ.

मायबाप माझे थोर त्यांचा त्रैलोकीं प्रताप ।
ज्याचें भावें नाम घेतां हरे त्रिविध[1] ताप ॥
कैवल्यातें[2] देउनी दान, निरसिलें[3] पुण्यपाप ।
गुरुकृपें केशवराजीं केलें सब्राह्य स्वरुप ॥ सद्गुरु० ॥ ३ ॥

पद ६७३ वें.

चाल माझ्या रामा ! जीवींच्या विश्रामा ।
तुजविणें शेजे एकलें न गमे आम्हां ॥ ध्रुवपद. ॥
शेज करा भांग भरा धण्या घरा येतो गे ! शकुन आजि होतो ।
संतसेवेसाठीं आत्माराम भेटी देतो ॥ चाल० ॥ १ ॥
चाल माझ्या हालो वृत्तिसि घालीं पालो ।
एकांतींचें गूज आतां तुम्ही आम्ही बोलों ॥ चाल० ॥ २ ॥
अंतर पोकळ बाहिर मुद्रावेष वरपंग ।
जिविच्या जिवीं भेटी होतां मिठी अंतरंग ॥ चाल० ॥ ३ ॥
डोळा लावी माळा ओंवी सोंग दावी जगीं ।
तैसी सौरी[4] नव्हे रामा ! चाल घरा वेगीं[5] ॥ चाल० ॥ ४ ॥
[6]अंतरंगीं निज भेटी आत्मारामीं मिठी ।
सद्गुरुकृपें केशवराजी भेटिसी नाहीं तुटी[7] ॥ चाल० ॥ ५ ॥

पद ६७४ वें.

भावा शरण गेली गे ! । सुखरूप जाली गे ! ॥ ध्रुवपद. ॥
लई लई लकुटा । माझा भाव धाकुटा ॥ भावा० ॥ १ ॥
भाव माझा वडील गे ! । ब्रह्ममोतीं घडील गे ! ॥ भावा० ॥ २ ॥
प्रेम तान्हें भावाचें । पढियें[8] माझ्या जिवाचें ॥ भावा० ॥ ३ ॥
कडिये घेऊं खांदां घेऊं । सुखसिंधुतीरा नेऊं ॥ भावा० ॥ ४ ॥
ऐसा भाव भावीला[9] । तो सुखसिंधु देखिला ॥ भावा० ॥ ५ ॥
तेथें ज्ञान शिंपला । मुक्त मोतीं भरला ॥ भावा० ॥ ६ ॥
भावें दिल्हा मज गे ! । काय सांगूं तूज गे ! भावा०॥ ॥ ७ ॥
लाग भावा चरणीं । तो तुज देईल सांजणी[10] ॥ भावा० ॥ ८ ॥
महावाक्य गुज गे ! । केशव सांगे तूज गे ! ॥ भावा० ॥ ९ ॥

---

१. अधि, भौतिक आणि दैवी. २. मोक्षातें. ३. नाहींसें केलें. ४. निर्लज्ज स्त्री. ५. लवकर ६. मनांत. ७. वाण, कमतरता. ८. आवडतें. ९. मानिला. १०. मैत्रिणी.

### पद ६७५ वें.

आजी हृदयमंदिरा माझ्या येईं । आत्मबोधें अखंड भेटी देईं ॥ध्रुवपद.॥
गुणातीता सच्चिदानंद रामा ! । विश्वरूपा ! व्यापका ! पूर्णकामा ! ॥आ०॥१॥
सदोदिता अच्युता[1]! पुरातना[2]! । परात्परा ! माधवा ! भेदशून्या[3]! ॥आ०॥२॥
श्रुतिसारा ! वेदांतगुह्यरूपा ! । केशवप्रभू! अविनाश पदभूपा[4] ॥ आजी०॥ ३ ॥

### पद ६७६ वें.

याचे पाय विसरावे कैसे आतां । ज्याच्या नामें पळाली भवव्यथा[5] ।
ज्याच्यासंगें जगदीश आला हाता । नाहीं सौख्य तयासी विसरतां ॥ध्रुवपद.॥
मोक्षदाता सद्गुरुनाथ पाहीं । कामक्रोध जयासी तंव नाहीं ।
कपट नेणें साधूचा राव कांहीं । मन माझें वेधलें त्याचे पायीं ॥ याचे० ॥१॥
प्राणसखा सद्गुरु देव राजा । ब्रह्म डोळां दाविलें तेणें ओजा ।
अंगीकार संपूर्ण केला माझा । कृपावंत पावला आत्मकाजा ॥ याचे० ॥ २ ॥
ब्रह्मानंद स्वरुप मूर्ती ज्याची । [illegible] कमळा[6] भाळली त्यासी साची ।
त्याच्यासंगें द्वैतासी उरी[7] कैंची । केशवस्वामी माउली अनाथाची ॥याचे०॥३॥

### पद ६७७ वें.

मुळीं शोधितां न दिसे देहभाव । तेथें विदेही म्हणणें हेंही वाव[9] ।
कर्माकर्मा नुरेची कांहीं ठाव । भ्रांति फिटली कैसा संदेह[10] ॥ ध्रुवपद. ॥
वृत्ति[11] निमाली न करणें आतां काय । मन हारपलें बोलणें न साहे ।
जन वन विजन ब्रह्म पाहे । पाहतें पाहणें हेंही न साहे ॥ मुळीं०॥ १ ॥
जन पाहतां अवघे नव्हे देही । तेथें आपणा कां म्हणवीं कां विदेही ।
देही विदेही भावना ऐसी कांहीं । तें स्वरूपीं पाहतां अणु[12,13] नाहीं ॥मुळीं०॥२॥
निज स्थितिचा निज निर्वाह । तेथें ब्रह्मीं ब्रह्मत्वा अभाव ।
गुरुकृपे केशवीं पूर्ण भाव । होय तेव्हां आकळे अभिप्राव[14] ॥ मुळीं० ॥३॥

---

१. 'च्यवनोत्पत्तियुक्तेषु ब्रह्मेंद्रवरुणादिषु ॥ २३९ ॥ यस्मान्न च्यवते स्थानात्तस्मात्संकीर्त्यतेऽच्युतः । साधर्म्येणावतारेऽपि ब्रह्मेंद्रवरुणादिभिः ॥२४०॥ न स्वैश्वर्यात्प्रच्युतो यः सोऽच्युतः परिकीर्तितः' ॥ [विभूत्ति-मंत्रसहस्र-सहितं श्रीविष्णोर्नामसहस्रम् । पृ० २१.] 'ज्याची निजस्वरूपापासूनियां च्युति कदापि होत नसे । त्या शाश्वत देवाला अच्युत हें नाम फार योग्य असे. ॥ १०६ ॥ [पृ०११] नाहीं च्युति स्वरूपा, कीं ज्याला षड्विकार ते नसती । यास्तव अच्युत ऐशी आख्या झाली असें तया म्हणती.' ॥ १८४ ॥ [पृ० ३५] [नामार्थदीपिका.] २. सनातना. ३. द्वैतरहिता. ४. मोक्षपदाचा राजा. ५. संसारदुःख. ६. लक्ष्मी. ७. बाकी, शेष. ८. विरक्त. ९. व्यर्थ. १०. संशय. ११. मनोवृत्ति. १२. मुळींच. १३. कमतरता. १४. अभिप्राय. 'पूर्णभाव' असा अन्य पाठ आहे.

## पद ६७८ वें.

तिचें वदनकमळ पहा डोळां । निंबलोण उतरा वेळोवेळां ॥ ध्रुवपद. ॥
शुद्ध भाव [1]फेरा ल्याली वेगीं । स्नेहफूल लाविलें पूर्णभांगीं ॥ तिचें० ॥ १ ॥
निजप्राप्तीची राखडी नित्य घाली । निर्विकार जडीत मूद ल्याली ॥तिचें०॥२॥
श्रवणीं तानवडें ल्याइली त्रिकाळीं । ज्ञानबिजवरा झळके कपाळीं ॥ तिचें०॥३॥
नयनीं विज्ञान [2]अंजन शोभताहे । [3]पाहे त्याचा त्रिविध ताप जाये ॥ तिचें० ॥४॥
मुक्तमोतीं अखंड ल्याली असे । वदनचंद्र [4]प्रसन्न त्यानें भासे ॥ तिचें० ॥ ५ ॥
निजरंगें सुरंग पूर्ण भासे । तोची मुखीं [5]तांबूल रंगलासे ॥ तिचें० ॥ ६ ॥
कंठीं सद्भक्ति मोहनमाळ [6]साजे । हृदयीं आनंदपदक विराजे ॥ तिचें० ॥ ७ ॥
सहज क्षमा [7]सांजीरी सरी ल्याली । गळां चिन्मय मंगळसूत्र घाली ॥ तिचें०॥८॥
निष्ठा कंकणें [8]बांधलीं दोहीं हातीं । दया पाटल्या ल्याइली दीनराती ॥ तिचें०॥९॥
भक्ति चोळी त्यावरी मुक्त जाळी । लेउनीयां शोभे निवृत्ति बाळी ॥ तिचें०॥१०॥
शांति पीतांबराची सावकाश । अखंडीत घातली निजकास ॥ तिचें० ॥ ११ ॥
केशवाची स्वामीण मूळमाता । सूख न समाये ब्रह्मांडीं रूप ध्यातां ॥तिचें०॥१२॥

## पद ६७९ वें.

श्रीरामाचें रूप मनीं चिंतावें । [9]पाउलापाऊल वेगीं जितावें ॥ ध्रुवपद. ॥
या देहाचा नाहीं [10]भरंवसा । भजनीं आळस किजे कैसा ? रे ! ॥श्रीरा०॥१॥
कामक्रोधासंग सर्व सोडावा । [11]राजाधिराज राम जोडावा ॥ श्रीरा० ॥ २ ॥
केशवस्वामीस जाउनि भेटावें । स्वानंद [12]भांडार आजि लुटावें ॥ श्रीरा०॥३॥

## पद ६८० वें.

[13]अमृताची वृष्टि कैसी झाली मजवरी ।
चिन्मय सागर राम ल्यालों अंगभरी ॥ ध्रुवपद. ॥

---

१. पिंपळवण. २. काजळ. ३. पाहणाऱ्याचा. ४. मुदित, मोदयुक्त. ५. विडा. ६. शोभे. ७. सुंदर. ८. 'बाणलीं' असा अन्य पाठ. ९. आनंदतनयानेंही असेंच म्हटलें आहे:—'पाउलापाउलीं निजमनीं आळवा सांवळा हो ! । बाळा त्या गोपाळा हृदयीं कवळा वेळोवेळां हो!' ॥ [पृष्ठें ७९-८०.] १०. भरंवसा=भरवश, भरोसा. [भरवशो महान् प्रत्ययः । 'भरोसा' इति भाषया । 'स्तुतिकुसुमांजलि'—स्तोत्र ११ श्लो० ३२ टीका पृ० १७० पहा.] ११. राजराजेश्वर. १२. खजिना. १३. 'अमृत' शब्दाचे अनेक अर्थ आहेत ते:—'अमृतं यज्ञशेषे स्यात् पीयूषे सलिले घृते । अयाचिते च मोक्षे च ना धन्वंतरिदेवयोः ॥' इति मेदिनी.

सोनियाचा दिवस आजि उगवला माय ! ।
निजभाग्यें देखियले कान्हयाचे पाय ॥ अमृ० ॥ १ ॥
स्वर्गसुख प्राप्त झालें चित्त बहु धालें[1] ।
भेटला भगवंत साम्राज्य हाता आलें ॥ अमृ० ॥ २ ॥
सर्वकाळ क्रीडा करी नित्य पदावरी ।
केशव म्हणे तळीं[2] वरी एक झाला हरी[3] ॥ अमृ० ॥ ३ ॥

## पद ६८१ वें.

जाग रे ! जाग सदां राम मनीं जाग ।
संतसंग धरुनि करीं परता[4] भवनाग[5] ॥ ध्रुवपद. ॥
काम क्रोध लोभ यांचा तोडुनि टाकीं लाग[6] ।
परम शितळ होउनी मनीं भजनवनीं[7] वाग ॥ जाग० ॥ १ ॥
विसराचा नाश करुनि विसर विसर भाग ।
केशवराजस्वामी यासी पूर्ण दशा माग ॥ जाग० ॥ २ ॥

## पद ६८२ वें.

पाहें रे ! पाहें चिदानंद राम पाहें रे ! ।
कामधाम त्यजुनी निष्काम वनीं[8] राहें रे ! ॥ ध्रुवपद. ॥
पापताप हरण संतचरणकमळ सेवीं रे ! ।
श्रवण मनन करुनि रामीं मनेंवीण मन ठेवीं रे ! ॥ पाहें० ॥ १ ॥
नामरूपातीत सदोदीत केशवस्वामी रे ! ।
विविध परिच्छेद शून्य सबाह्य अंतर्यामीं रे ! ॥ पाहें० ॥ २ ॥

## पद ६८३ वें.

तेचि योगिराव तेचि महानुभव[9] ।
नमस्कारासाठीं देती रामपदीं ठाव ॥ ध्रुवपद. ॥
कांसवीचें तूप तैसें संसाराचें रूप ।
ऐसें जाणती ते जाणती चिद्रूप अमूप ॥ तेचि० ॥ १ ॥

---

१. तृप्त झालें. २. खालीं वर. ३. मूढजनाचीं दुःखें जो हरण करितो तो 'हरि.' ['हरि' या शब्दाची वामनपंडितांनीं अशी व्याख्या दिली आहे:—'हरि जडदुःख म्हणूनि कां 'हरि' तो.' जटायुस्तुति–३६] 'हरि' या शब्दाचे अनेक अर्थ आहेत ते:—'हरिश्चंद्रार्कवाताश्वशुकभेकयमाहिषु । कपौ सिंहे हरेऽजेंऽशौ शक्रे लोकांतरे पुमान् ॥' इति मेदिनी. ४. दूर. ५. संसाररूपी हत्ती किंवा सर्प. ६. संबंध. ७. भजनरूपी अरण्यांत. ['क्लीबं स्यात्कानने नीरे निवासे निलये वनम्' इति रभसः.] ८. मागील पदावरील टीपा पहा. ९. महापराक्रमी, महाशय.

कर्मजाळ जंजाळ सर्व तोडियेलें ।
पूर्णबोध साम्राज्य पूर्ण जोडियेलें ॥ तेचि० ॥ २ ॥
मोक्षाचें द्वार सार सर्व त्याचे पाय ।
केशवराजस्वामी आम्हीं देखियला माय! ॥ तेचि० ॥ ३ ॥

### पद ६८४ वें.

सांग गुरुबहिणी सांग मायबहिणी ।
शब्दज्ञानीं काज नाहीं सार येथें रहणी ॥ ध्रुवपद. ॥
अडक तेथें दडक बाई! मुरुम तेथें पाणी ।
निर्नामाचें देऊळ त्याचें तोंड कोण वानी? ॥ सांग० ॥ १ ॥
आकाशींची नारी खेळे पाताळींचे रानीं ।
बहिर्मुखां नाचविते धरूनियां कानीं ॥ सांग० ॥ २ ॥
दृश्यजाळ सर्वकाळ नेणती जे कांहीं ।
केशव म्हणे समूळ कोडें उगवे ह्याचे पायीं ॥ सांग० ॥ ३ ॥

### पद ६८५ वें.

राती गेली राती गेली । सद्गुरुनें दया केली ॥ ध्रुवपद. ॥
निजभाग्याचा उजेड झाला । बोधदिवाकर[२] भेटों आला ॥ राती० ॥ १ ॥
अद्वयप्रेमा कोंदली पाहीं । अंधार चांदणें दोन्ही नाहीं ॥ राती० ॥ २ ॥
केशवस्वामी भेटला आजी । राहिलों स्वयंप्रकाशामाजी ॥ राती० ॥ ३ ॥

### पद ६८६ वें.

संतसभेमाजी येतां लाभ वाटतो । स्वयंप्रकाश राजा राम भेटतो ॥ ध्रुवपद. ॥
प्रेमाचा पूर मोठा नयनीं लोटतो । सबाह्याभ्यंतरीं ब्रह्मानंद दाटतो ॥संत०॥१॥
स्वरूपप्राप्ती होतां भेदाभेद[३] आटतो । केशव म्हणे पूर्णबोधीं बोल खुंटतो॥संत०॥२

### पद ६८७ वें.

राम जपा रे! राजा राम जपा रे! ।
सर्वकाल अमलचरणकमलदलिं लपा रे! ॥ ध्रुवपद. ॥
काम हराया संसार पसराया ।
संसार मराया साम्राज्य कराया ॥ राम० ॥ १ ॥
निवांत होउनि भजनवना[४] येउनी ।
कर्मजाळ जंजाळ सोडुन देउनी ॥ राम० ॥ २ ॥

---

१. उकले. २. सूर्य, दिनकर. ३. द्वैताद्वैत. ४. पद ६८१ वरील टीप पहा.

सारासार विचारें निज निर्धारें ।
केशव म्हणे निजराज्यरहित निर्विकारें ॥ **राम०** ॥ ३ ॥

**पद ६८८ वें.**

उदो[1] **रेणाबाई** गे ! मूळपीठे ! आई ! ।
उदयास्तुविण तुझा नित्य उदय पाहीं ॥ ध्रुवपद. ॥
नर ना नारी केवळ सौरी[2] आलें **महाद्वारा** ।
गे ! निजाचिये धरा ।
संतसमागमें आम्हां मूळ पीठीं[3] धारा ॥ उदो० ॥ १ ॥
महाभूतीं गोंधळ गाजे डोर[4] वाजे नेटें ।
धण्याचेनि नेटपाटें ।
घरिंचे घरीं ओळखी झाली जाणें नलगे कोठें ॥ उदो० ॥ २ ॥
जाणें नाहीं येणें नाहीं करणें नाहीं कांहीं ।
जेथिचें तेथें पाहीं ।
पाहतें पाहणें सारुनि पाहतां भेटी ठायिंचे ठायीं ॥ उदो० ॥ ३ ॥
प्रकृती[5] पुरुषाभेटी होतां बोलणें झालें वाव ।
फिटला देहभाव[6] ।
मुळिंची गोडी घेतां मीतूंपणा कैंचा ठाव ? ॥ उदो० ॥ ४ ॥
मीतूंपणा ठाव नाहीं ऐसें झालें आम्हा ।
अरे ! तुझ्यासंगें **रामा** ! ।
कामना[7] कामीं निष्काम झालों आलों निजधामा ॥ उदो० ॥ ५ ॥
निजधामीं सुखशेजे सहजीं सहज ।
काय सांगों तुज ।
भोग्य भोक्ता नसोनियां एकांतींचें गुज ॥ उदो० ॥ ६ ॥

---

१. उदय असो. २. निर्लज्ज, अविनय. ३. पद १३१ वें पहा. ४. डमरु. ५. सांख्यशास्त्रांत प्रकृति आणि पुरुष हे शब्द प्रधान आहेत. प्रकृति आणि पुरुष यांच्या संयोगापासून सकल जड सृष्टीची उत्पत्ति आहे. या शास्त्रांत पदार्थांचे दोन वर्ग केले आहेत. एकांत चेतन पदार्थांचा समावेश केला आहे व दुसऱ्यांत अचेतनांचा. चेतन पदार्थ कायतो पुरुष. प्रकृति इत्यादिकांचा समावेश अचेतनांत होतो. याविषयीं सविस्तर वर्णन **'सरलार्थबोधिनी गीता'** पृ० ३१७-३४४ यांत पहावें. [सरलार्थबोधिनी गीता–पुस्तक २ अंक २-३-४]. ६. अहंकार. ७. इच्छा.

एकांतींची मात गे! सांगतां नुरे हेत ।
.................... ।
सद्गुरुकृपे केशवराजीं दृष्टांतीं दृष्टांत ॥ उदो० ॥ ७ ॥

### पद ६८९ वें.

सहजाचा डौर हातीं आतुडला बाई! ।
निःशंक सौरी झालें आतां वाणी सुखा कायी? ॥ ध्रुवपद. ॥
भक्तिवेणीफणी ज्ञान काजळकुंकु केलें ।
गे! सद्गुरुच्या बोलें ।
पालटलें पूर्व माझें मीतूंपण गेलें ॥ सहजा० ॥ १ ॥
निःसंग संगें आत्मरंगें खेळ खेळों भावें ।
या निर्नामाच्या नांवें ।
नामरूपा हारी आली मूळ पडिलें ठावें ॥ सहजा० ॥ २ ॥
मागिल मार्गें सरलें आतां पुढिल आलें नाहीं ।
ऐसें झालें पाहीं ।
ब्रह्मानंदें मग्न केशव सद्गुरुचे पायीं ॥ सहजा० ॥ ३ ॥

### पद ६९० वें.

स्वानंदबोधें स्वरूपीं स्थिर होउनियां राहीं ।
सांगणें पुसणें मग तुज नलगे वो! कांहीं ॥ ध्रुवपद. ॥
कैकाय कैकाय फुकट पुससिल कायी ।
मी काय तूं काय हेंची विचारूनि पाहीं ॥
निजनिर्मळ नित्य निखिल असतांचि ठायीं ।
तेंचि तुजमाजी गुरुमुखें वस्तु पाहीं ॥ स्वानंद० ॥ १ ॥
लांब गोष्टी सांडा चावटि पाहा सोलींव दृष्टि ।
सबरांभरित वस्तु भरली पाठीं आणि पोटीं ॥
अखंडदंडायमान अतुट भेटिसि नाहीं तुटी ।
दर्शन जालिया पडे परमानंदीं मिठी ॥ स्वानंद० ॥ २ ॥
मुळीं अंगीं जळें वरी शाखा शिंपिताहे ।
बाह्यवृत्ति धुतां केंवि अंतरशुद्धि लाहे ॥

१. हकीगत. २. प्राप्त झाला. ३. कमतरता. ४. कमतरता. ५. मनःशुद्धि.

व्रतें तपें नानातीर्थें कष्टविला देह ।
स्वरूपप्राप्ति[1] नाहीं तंववरि न फिटे संदेह[2] ॥ स्वानंद० ॥ ३ ॥
मृगजळपुरीं[3] पुरें वाहवलीं पाहें ।
वांजे पुत्र झाला त्याचा अंतक तो होय ॥
तैसा प्रपंच मिथ्या भूत भासत मज आहे ।
वोडंबरी विद्या अवघी भूर तैसी माय ॥ स्वानंद० ॥ ४ ॥
नाम नाहीं रूप नाहीं शकुन[4] सांगों काय? ।
अनिर्वाच्य ब्रह्म तेथें बोलणें न साहे ॥
सद्गुरुकृपे केशवराजीं परतोनी पाहे ।
सांगणें पुसणें समूळ दोन्ही गिळूनियां राहे ॥ स्वानंद० ॥ ५ ॥

## पद ६९१ वें.

ऐसे काय करावे लोक? ॥ ध्रुवपद. ॥
ज्याचेनि संगती राम दुरावे। अधिक वाढे शोक ॥ ऐसे०॥ १ ॥
संसारबंधन ज्याचेनि पतन । लोक नव्हे ते वोक ॥ ऐसे० ॥ २ ॥
केशवस्वामिसि सबाह्य दाविती । भजनतारक चोख ॥ ऐसे० ॥ ३ ॥

## पद ६९२ वें.

बहु बहु बहु गोड तुझें नाम गुरुराया! ।
हृदयकमळीं चिंतितां शितळ झाली काया ॥ ध्रुवपद. ॥
आठवीं आठव अठला तेथें लागला तुझा छंद ।
सबाह्य संतोष दाटला जोडि जोडिला परमानंद ॥ बहु० ॥ १ ॥
अखंड वृत्ति[5] कोंदली सुखें दाटलीं नयनपातीं ।
सहज कळा लाधली[6] तेथें हारपली दिनराती ॥ बहु० ॥ २ ॥
नामीं अनाम सांचले तेथें लाधलें परम गूज ।
सद्गुरुकृपे केशवीं डोळां उघड देखिलें निज ॥ बहु० ॥ ३ ॥

## पद ६९३ वें.

बोल रे! तूं बोल मना! रामनाम बोला ।
कामधाम[7] त्यजुनी निष्काम होउनि डोला ॥ ध्रुवपद. ॥

---

१. तदाकारप्राप्ति. २. संशय. ३. मृगजळाच्या पुरानें. ४. पुढें होणारी गोष्ट. ५. मनोवृत्ति.
६. मिळाली. ७. घरधंदा.

संतसंगें धरुनी भावविषय [1]वांग्र जाण ।
आत्मसुखें विसर[2] विसर तूज तुझी [3]आण ॥ बोल० ॥ १ ॥
अमनीं सुमन होउनि वेगीं निरसीं क्रियाजाळ ।
केशव म्हणे निजराज्य[4] करीं सर्वकाळ ॥ बोल० ॥ २ ॥

पद ६९४ वें.

पोरी फुगडी फू गे! एक तुझी तूं गे! ।
हा गुण भरला धू तुझ्या तोंडावरि थू गे! ॥ ध्रुवपद. ॥
उघडी होउनि फुगडी घाली लक्ष निर्धारा ।
भावो साचा हात धरुनि जाई मुळिंच्या घरा ॥ पोरी० ॥ १ ॥
इतक्या भोग्या सारी देह सुपली वारी ।
आत्मयोगें साधुसंगें बैस निराकारीं ॥ पोरी० ॥ २ ॥
तुजमज बार तेथें खुंटला विचार ।
अंतरकळा हाता आल्या कैंचा संसार ॥ पोरी० ॥ ३ ॥
मी मी ऐसें म्हणसी काय तेंचि मुळीं पाहें ।
मीपणाचा शोध घेतां तूंपण गळोनि जाय ॥ पोरी० ॥ ४ ॥
फुकट विषय खोडी गे! सांडी जग झोडी ।
सद्गुरुकृपे केशवराजीं घेई नित्याची गोडी ॥ पोरी० ॥ ५ ॥

पद ६९५ वें.

याचे उपकार कैसे विसरावे? । नाम घेतांचि दीनबंधु पावे. ॥ ध्रुवपद. ॥
काळें [5]ग्रासिली सगळी माझी काया । ऐशा संकटीं पावला सोडवया॥या०॥१॥
काळापासुनि तत्काळ सोडविलें । शेखीं काळाचा निजकाळ केलें॥या०॥२॥
केशवासी रक्षिलें नानापरी । चरणीं ठाव दिधला निरंतरीं ॥ या० ॥ ३ ॥

पद ६९६ वें.

हाचि चाळा वेळोवेळां लागला वो! मातें ।
आत्मसखे बोलवा मज आपुलेनि हातें ॥ ध्रुवपद. ॥
करुनि निर्विकार वाडा चित्तमळ झाडा ।
निर्विकल्प शेजे मज निजावया धाडा ॥ हाचि० ॥ १ ॥

---

१. अर्थ. २. येथें स्वाभिप्रायदार्ढ्यास्तव द्विरुक्ति केली आहे. ३. शपथ. ४. 'साम्राज्य' असा अन्य पाठ आहे. ५. शेवटीं.

सन्मयाची चुनडी वेढुनि चोळी चिन्मयाची ।
तन्मयाची माळ घालुनि भेटि करा त्याची ॥ हाचि० ॥ २ ॥
प्राप्तिचुडा निज चोखडा घालुनि दोहीं हातीं ।
स्वामीपुढें रिघुनि सुखी होइ दिनराती ॥ हाचि० ॥ ३ ॥
ज्ञान बिजवरा[1] बरा शोभतो हे बरा ।
सर्वकाळीं भूषण भाळीं तेंचि आतां करा ॥ हाचि० ॥ ४ ॥
भूषणाचें भूषण सये! सद्गुरुचे पाय ।
बहुत बोलों काय **राम** भेटवा वो! माय ॥ हाचि० ॥ ५ ॥
साराचें सार[2] अलंकारा अलंकार ।
**के**शवराज म्हणे भावें करित तेथें थार ॥ हाचि० ॥ ६ ॥

## पद ६९७ वें.

भावें भज त्यासी भज त्यासी ॥ ध्रुवपद. ॥
दाखवि सर्व निवासी । चिन्मय भाग्यविलासी ।
केवळ निजसुखराशी । भजनें भवभय नाशी ॥ भावें० ॥ १ ॥
**म**न्मथ[3] तस्कर[4] त्रासक । भेदभयंकर नाशक ।
निर्गुण ब्रह्म प्रकाशक । विद्वज्जनमनतोषक ॥ भावें० ॥ २ ॥
निश्चळ कर्मप्रवाही । सावध निज सर्वांहीं ।
निर्मन योगी पाहीं । जाणिव[5] नेणें कांहीं ॥ भावें० ॥ ३ ॥
अक्षयपदिंचा राजा । अवतरला निजकाजा ।
नेणें काम समाजा । **के**शव म्हणे धनी माझा ॥ भावें० ॥ ४ ॥

## पद ६९८ वें.

तें स्वरूप **वा**सुदेवाचें । माझे हृदयीं बिंबलें साचें गा! ॥ ध्रुवपद. ॥
रविपरिस अति सोज्वळ । जें चंद्राहुनी अतिशीतळ ।
जें अनादिसिद्ध निर्मळ । जेथें हारपे मन समूळ गा! ॥ तें० ॥ १ ॥
जें मंगळ निजमंगळ । जें गुह्याचें गुह्य केवळ ।
जें निष्कामधाम निष्कळ । जें आनंदतरुचें फळ गा! ॥ तें० ॥ २ ॥
जें अगम्य अगोचर[6] । जें ब्रह्मादिकांसि पर ।
जें निजात्मसिद्धीचें घर । म्हणे **के**शव निजनिरंतर गा! ॥ तें० ॥ ३ ॥

१. डोकींत घालण्याचा दागिना. २. उत्तमांतील उत्तम. ३. मदन. ४. चोर. ५. ज्ञान. ६. न दिसणारें.

## पद ६९९ वें.

मुळीं प्रपंच झाला नाहीं । पुढें होइल लटिका[1]पाहीं ।
ऐसें जाणुनियां स्थिर राहीं । मग करणें नलगे तुज कांहीं ॥ध्रुवपद.॥
एक प्रपंच झाला होता । हे स्वरूपीं नाहीं वार्ता ।
पुढें होइल हा मागुता । हेंही न घडे गा! तत्वता ॥ मुळीं० ॥ १ ॥
हें मिथ्याची प्रपंचाचें भान । हें ज्ञानाचें मुख्य निजज्ञान ।
येणें ज्ञानें जें समाधान । त्यासी कैंचें भवबंधन गा! ॥ मुळीं० ॥ २ ॥
जो स्वप्निं मरुनि जाळिला । तो जागृतीसि राख नाहीं झाला ।
ऐसा प्रपंच जेणें देखिला । तोचि जीवन्मुक्त भला गा! ॥मुळीं० ॥ ३ ॥
रज्जू[2] सर्पाचें जें भासणें । भासताही लटिकेपणें ।
ऐसा प्रपंच देखिला जेणें । त्यासी कैंचें येणें जाणें? ॥ मुळीं० ॥ ४ ॥
गुरुकृपे केशवीं भाव । जेथें देह[3]भावा नाहीं ठाव ।
जन्ममरण झालें वाव[4] । आतां कैचा हा संदेह[5] गा! ॥ मुळीं० ॥ ५ ॥

## पद ७०० वें.

काय तें गुज? सांगों नये सांगतां कोणा ।
वृत्तीसीं ठाव नाहीं कैंची दाखवूं खुणा? ॥ ध्रुवपद. ॥
वाचेसी नाम बोलों । बोल ग्रासुनी डोलों ।
डोलासि निरसुनि तृप्त होउनी ठेलों ॥ काय० ॥ १ ॥
अपार सुख दाटे । तेथें संसार आटे ।
देहींच देह नाहीं थोर कौतुक वाटे ॥ काय० ॥ २ ॥
यापरी संतपायीं । बोध फावला पाहीं ।
बोधासी ठाव कैंचा भेद केशवीं नाहीं ॥ काय० ॥ ३ ॥

## पद ७०१ वें.

बळ रे! नाहीं सज्जनापरतें । ज्यांचें बळ सकळांवरतें ।
परतें जिहीं केलें रे! अरतें । हृदयींच ठेविलें निरुतें[6] ॥ ध्रुवपद. ॥
ब्रह्मादिकां नकळे अंत रे! । श्रुतिशास्त्रें परतलीं जेथ रे! ।
सिद्धांताचा नपवे हात रे! । बळिये तेथें रिघाले संत रे! ॥ बळ० ॥ १ ॥

---

१. खोटा. २. दोरी. ३. अहंकारा. ४. व्यर्थ. ५. संशय. ६. सत्य, केवळ, खरें.

जेथें हेतु लक्षण नचले । तेथें स्वयें सर्वदा रिघाले ।
निजपदीं तद्रूप झाले ।.ब्रह्मानंदें सर्वदा निवाले ॥ बळ० ॥ २ ॥
तेथिंचें सुख सांगतां साजणी ! । मौन पडिलें चौघींच्या वदनीं ।
सद्गुरुकृपें केशवीं दर्शनीं । समाधि तेथें राहिली ग्रासुनी ॥ बळ० ॥ ३ ॥

### पद ७०२ वें.

बाई ! ये ऐसें [1]वीतलें चोजें[2] वो ! ।
नये गुज सांगतां मज वो ! ॥ ध्रुवपद. ॥
जेथें वाचा कुंठित सकळा । जेथें मती झालिया पांगुळा ।
जेथें क्रिया सर्वही निश्चळा । तेथें ठाव कैंचा वो ! गोकुळा ॥ बाई० ॥ १ ॥
जेथें शून्य दर्शनें होती वो ! । 'नेति'[3] शब्दें परतल्या श्रुती वो ! ।
संत बुडी जे पदीं देती वो ! । आम्हाला झाली प्राप्ती वो ! ॥बाई०॥ २ ॥
गुणातीत अद्वय पाटणी । नाहीं देशकाळाची वांटणी ।
स्वानंदाची स्वानंदीं दाटणी । केशवराजीं सर्वही आटणी ॥ बाई० ॥ ३ ॥

### पद ७०३ वें.

सकळ भाग्य साधुच्या चरणीं । पूर्वपुण्य फळलें साजणी[4] ! ॥ ध्रुवपद. ॥
संतचरणीं ठेवितां मन वो ! । स्वानंदाचें लाधलें धन वो ! ।
आत्मलाभें कोंदलें जन वो ! । आतां मज न दिसे न्यून[5] वो ! ॥ सकळ० ॥ १ ॥
नारद तुंबर गाती जे कीर्तनीं । निगम नाहीं पावल्या जेथुनी ।
तेंचि मन दिधलें साजणी ! । ब्रह्मादीक वेधले चिंतनीं ॥ सकळ० ॥ २ ॥
संतसंग करितां अल्प वो ! । दग्ध झाला कल्पनाकल्प वो ! ।
विसर्जिला सर्वही जल्प वो ! । केशव म्हणे प्राप्तिचें रूप वो ! ॥ सकळ० ॥ ३ ॥

### पद ७०४ वें.

आतां काय सांगों मी सखीये ! ।
सांगतां मज नये वो ! बाईये ! ॥ ध्रुवपद. ॥
पाहूं जंव गेलियें आपणा । तंव मी वो ! मुकलें मीपणा ।
अनुभव भोगितां निजखुणा । सहज तेथें राहिली धारणा ॥ आतां० ॥ १ ॥
मनाचें ही मोडिलें मनपण । स्मरणेंसी निमालें विस्मरण ।
सुखाचेंही राहिलें स्फुरण । तेथें सांगे अनुभव कवण ॥ आतां० ॥ २ ॥
विस्मयेंसी निमाला विस्मय । स्थिती तेही पावली अविलय ।
गुरुकृपें केशवी विलय । तेथें कोण सांगे वो ! प्रत्यय ॥ आतां० ॥ ३ ॥

---

१. घडलें. २. नवल. ३. तें ब्रह्म नाहीं अशीं उपनिषद्वचनें. ४. मैत्रिणी. ५. उणेपणा.

### पद ७०५ वें.

एकाएकीं एकला एकट । निरंजनीं राहिलों निकट ।
त्यजूनियां प्रपंच फ़ळकट । ब्रह्मवन सेविलें बळकट ॥ ध्रुवपद. ॥
ब्रह्मारण्यीं आमुचें असणें । सहजाचीं वल्कलें नेसणें ।
अधिष्ठानीं आम्हांसी बैसणें । सौख्यतरुछायेसी राहणें ॥ एका० ॥ १ ॥
दृश्य वार्ता नायकों श्रवणीं । भेदें कांहीं न देखों नयनीं ।
मुक्त झालों संसारापासुनी । सहजीं सहज क्रीडत एकपणीं ॥ एका०॥२॥
संग आम्ही सर्वही सांडिला । निराश्रयीं आश्रम बांधिला ।
गुरुकृपे केशवीं एकला । एकपणीं एक तो संचला ॥ एका० ॥ ३ ॥

### पद ७०६ वें.

श्रवणाचें चाडें हें धरिलें । गुरुमुखें निजबीज पेरिलें ॥ ध्रुवपद. ॥
निजधैर्ये नागर धरुनी । भेद खुंट काढिले खाणुनी ।
भक्ति ज्ञान वैराग्य ती फणी । अति शुद्ध केली हे मेदिनी[3] ॥ श्रव० ॥ १ ॥
स्वानंदाचा वर्षला निजघन । परिपूर्ण पिकलें चैतन्य ।
तेथें सत्व सोंकारा राखण । कर्मपक्षी हांकितो आपण ॥ श्रव० ॥ २ ॥
निजबोधें पिकलें शेत वो! । स्वानंदाच्या हुमन्या येत वो! ।
कैवल्याची रासि हे होत हो! । गुरुकृपें केशव घेत हो! ॥ श्रव० ॥ ३ ॥

### पद ७०७ वें.

मन अमनी उन्मन कैसें जालें । चित्त चिदानंदीं मुरालें ।
ज्ञानाज्ञानेसीं विज्ञान हारपलें । गुरुकृपेचें हातासी फळ आलें॥ध्रुवपद.॥
निजरुपीं निश्चळ वृत्ति झाली । देहीं देहभावना निमाली ।
बुद्धि ब्रह्मानंदें पूर्ण झाली । आपेंआप कल्पना गळाली ॥ मन० ॥ १ ॥
निजध्यासें अभ्यास निरंजनीं । शब्दासहित आटलें मौन मौनीं ।
दृश्य मुरडुनी ठेवितां अधिष्ठानीं । 'अहं' 'सोऽहं' गळाले भाव दोन्ही॥मन०॥२॥
निजनिष्ठेचा वाणना निर्धार । तत्व दर्शनें बुडाला दृश्याकार ।
स्थिती तटस्थ चकित चमत्कार । साक्षात्कारीं खुंटला विचार ॥ मन०॥ ३ ॥

---

१. व्यर्थ, निष्फळ. २. द्वैतभाव. ३. पृथ्वी. ४. भरपूर. ५. प्राणी गर्भांत असतो तोंपर्यंत 'सोऽहं' म्हणजे मी ईश्वर आहें असें म्हणतो, जन्मास आला म्हणजे 'कोऽहं' म्हणजे मी कोण आहें असें म्हणतो आणि पुढें मोठा होऊन त्यास समजूं लागलें म्हणजे 'मीच काय तो आहें' असें म्हणतो, म्हणजे ईश्वरास विसरतो. (नवनीत, पृष्ठ ३७४.)

निज वस्तु संप्राप्त निजसिद्धी । सबाह्य स्वानंदें कोंदलासे त्रिशुद्धि ।
गुणा गुणेसीं गिळुनी कर्म विधी । समाधी व्युत्थान संपली समाधी ॥ मन० ॥ ४ ॥
निजसुखीं सुखासी झाला बोध । बोधें अखंड परमानंद ।
सद्गुरुकृपे केशवीं निजवेध । तेथें समूळ विराले भेदाभेद ॥ मन० ॥ ५ ॥

## पद ७०८ वें.

आणीक मज नाठवे यादवा! । ध्यान तुझें लागलें माधवा ! ॥ध्रुवपद.॥
अशनीं भोजनीं शयनीं गमनीं । सर्वदा मज वेधिला साजणी! ॥ आ० ॥ १ ॥
कर्म धर्म राहिले सकळ । निजरूप दाटलें निखिल ॥ आणीक० ॥ २ ॥
केशवप्रभू मानसमोहना । निजसौख्य स्वानंदसदना ॥ आणीक० ॥ ३ ॥

## पद ७०९ वें.

योगीयाची खूण योगी जाणती आपण ।
इतरांस नकळे जरी झाले विचक्षण ॥ ध्रुवपद. ॥
वेदशास्त्रीं निपूण झाली पुराणीं संपन्न ।
सद्गुरुकृपेवीण हाता न चढे निजखूण ॥ योगियाची० ॥ १ ॥
शब्दज्ञानें ज्ञाते झाले जाणती छंद बंद ।
ब्रह्मांडीचें ज्ञान परितो नकळे ब्रह्मानंद ॥ योगियाची० ॥ २ ॥
आगमीं नाटकीं कुशल संगितीं अपार ।

---

१. द्वैताद्वैत. २. योगाचें एक अंग. योगाचीं अंगें आठ. तीं येणेंप्रमाणें:—यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि. ध्यान याचें लक्षण असें आहे:—"ध्यान—सर्व विषय वर्ज्य करून परमात्म्याकडेच एकाग्रतेनें मन लावून चिंतन करणें याला ध्यान म्हणतात. पातंजलयोगसूत्रांत ध्यानाचें लक्षण असें केलें आहे:—'तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम्' [पाद ३, सूत्र] याचा अर्थ इतकाच कीं नाभिचक्र, हृदयपुंडरीक, नासिकाग्र इत्यादि स्थळीं चित्तवृत्तीची जी एकाग्रता होते त्या स्थितीला ध्यान असें म्हणायाचें. प्रस्तुत सूत्रांत 'एकतानता' असा जो शब्द आहे, त्याचा अर्थ एकाग्रता आहे. ध्यान हें एक प्रस्तुत विषयाचें महत्वाचें अंग आहे. ध्यानापासून ज्या शक्ति प्राप्त होतात त्यांचें वर्णन गोरक्षनाथाचे ग्रंथांत फार केलें आहे." [सरलार्थबोधिनी गीता—पृष्ठ ३५७.] ३. अशन=खाणें. ४. मैत्रिणी. ५. सर्व. ६. विद्वान्. ७. छंदःशास्त्र. ८. अनेक प्रकारचे काव्यांतील बंध. ९. वेदांत. १०. 'काव्येषु नाटकं रम्यम्' काव्यापेक्षां नाटकाच्या योगानें जास्ती मनरंजन होतें. ११. तालसुरावर गाणें. ['अपि ब्रह्मपरानंदादिदमभ्यदिकं ध्रुवम् । जहार नारदादीनां चित्तानि कथमन्यथा'—भावार्थ:—'खरोखर ब्रह्मानंदापेक्षां गायनानंद हा अधिक आहे; कारण असें नसतें तर नारदासारख्या परम वैराग्यशाली पुरुषांचेही मन गायनाच्या योगानें कसें आकर्षण केलें जातें?' [संसारसुख पृ० २६९.]

जाणती सर्वकला परि तो वेगळा विचार ॥ योगियाची० ॥ ३ ॥
जप तप अनुष्ठानें सर्व साधनें निर्धारा ।
निजठायीं न पडे तैं हा व्यर्थचि पसारा ॥ योगियाची० ॥ ४ ॥
सर्व कर्मी ब्रह्म स्थिती बाणली जयासी ।
तोची निजयोगी चारी मुक्ति त्याच्या दासी ॥ योगियाची० ॥ ५ ॥
स्वरुपीं मग्न झाले योगी सुखरुप पाहीं ।
सांडी मांडी नलगे निज देखती अंतर्बाही ॥ योगियाची० ॥ ६ ॥
सद्गुरुकृपें केशवराजां निजबोध पूर्ण ।
त्यासी भोगी समाधी योगी अखंड परिपूर्ण ॥ योगियाची० ॥ ७ ॥

## पद ७१० वें.

मुक्त होईजे संसारापासुनी । सुख भोगीजे अहंभाव[१] ग्रासुनी ॥ ध्रुवपद. ॥
संतचरणकमळतीर्थ सेविजे । रामभजनीं सुजनीं[२] चित्त टेविजे ॥ मुक्त० ॥ १ ॥
ज्ञान शस्त्रें विविधपाश तोडिजे । आत्मप्राप्ती पावुनी द्वैत सांडिजे ॥ मुक्त० ॥ २ ॥
गुरुकृपें केशवीं बोधीं बुडिजे । म्हणे केशव ब्रह्मानंद जोडिजे[४] ॥ मुक्त० ॥ ३ ॥

## पद ७११ वें.

कोणा भीत नाहीं भीत नाहीं । भेदचि[५] गिळिला पाहीं ॥ ध्रुवपद. ॥
उघड समाधी भोगी । कैसा निर्भय मोठा योगी ॥ कोणा० ॥ १ ॥
चित्सुख पर्वत झाला । कांहीं उपाधी[६] न कळे त्याला ॥ कोणा० ॥ २ ॥
चिन्मय पदिंचा राजा । केशव म्हणे तो जनिता[७] माझा ॥ कोणा० ॥ ३ ॥

## पद ७१२ वें.

नाहीं नाहीं रे! सुजाणा । सांगे सद्गुरुराणा ॥ ध्रुवपद. ॥
पाहतां मृगांबु[८] हें तत्र नाहीं । तैसा भवपूर पाहीं ॥ नाहीं० ॥ १ ॥
वंध्याकुमराचा विस्तार । तद्वत हा संसार ॥ नाहीं० ॥ २ ॥
गगनसुमनाचा[९] सुगंध । तैसा केशवीं भेद ॥ नाहीं० ॥ ३ ॥

## पद ७१३ वें.

आणिक न करावा उपाय । हाचि तरणोपाय ॥ ध्रुवपद. ॥
प्रपंच वैरी हा त्यागावा । अंतरीं श्रीहरि ध्यावा ॥ आणिक० ॥ १ ॥

१. गर्व, २. नाहींसा करून. ३. सज्जनांनीं. ४. मिळवा. ५. द्वैत. ६. माया. ७. बाप.
८. मृगजळ. ९. खपुष्पाचा.

मीपण निरसुनियां स्थिर व्हावें । रामरसायन ध्यावें ॥ आणिक०॥२॥
केशवस्वामीसी समभावें । सबाह्य आलिंगावें ॥ आणिक० ॥ ३ ॥

### पद ७१४ वें.

म्हणउनि निश्चळ तो अंतरीं । निजपदीं राज्य करी ॥ ध्रुवपद. ॥
मीपण सांडुनियां घन उरला । अपार [1]भवनिधि तरला ॥म्हण०॥ १ ॥
समाधिव्युत्थानीं समवर्ते । न पडे संशयगर्ते ॥ म्हण० ॥ २ ॥
केशवस्वामीचें रूप झाला । चिद्रस सेवुनि [2]धाला ॥ म्हण० ॥ ३ ॥

### पद ७१५ वें.

म्हणउनि श्रम गेला श्रम गेला । आत्म समागम केला ॥ ध्रुवपद. ॥
श्रवणीं लेउनियां निजमुद्रा । आलों चिन्मयभद्रा ॥ म्हण० ॥ १ ॥
चिन्मय प्रयागीं स्थिर झालों । आनंद अवभृत न्हालों ॥ म्हण० ॥ २ ॥
गगन विरालें हें जे ठायीं । झालों तें लवलाहीं ॥ म्हण० ॥ ३ ॥
केशवस्वामी हा भ्रम सरला । केशव मात्रचि उरला ॥ म्हण ० ॥ ४ ॥

### पद ७१६ वें.

म्हणउनि झालों मी शिव पाहीं । द्वैतकथा मज नाहीं ॥ ध्रुवपद. ॥
सज्जनसदनासी मी आलों । चिन्मय भूषण ल्यालों ॥ म्हण० ॥ १ ॥
समसुख भजतां या शिवराया । हरवी ममता माया ॥ म्हण० ॥ २ ॥
'शिव मी' 'शिव मी' हें किति बोलों । मीपण ग्रासुनि डोलों ॥म्हण०॥३॥
यापरि सांपडला शिव आजी । केशव म्हणे मजमाजी ॥ म्हण० ॥ ४ ॥

### पद ७१७ वें.

म्हणउनि स्थिर झालों हरिपायीं । न पडें या [1]भवडोहीं ॥ ध्रुवपद. ॥
बोधें जर्जर म्यां स्मर केला । [4]कश्मल मत्सर गेला ॥ म्हण० ॥ १ ॥
रमलों संसारीं समयोगें । [5]उपाधि गेली वेगें ॥ म्हण० ॥ २ ॥
केशवस्वामीच्या निज भजनीं । सरली माया [6]रजनी ॥ म्हण० ॥ ३ ॥

### पद ७१८ वें.

आतां काय [7]वाण आम्हां । पाहतां गुरु रामा ॥ ध्रुवपद. ॥
सकळ सिद्धि[8] झाली । गुरुमूर्ति घरा आली ॥ आतां० ॥ १ ॥

---

१. 'भवनदी' असा अन्य पाठ. २. तृप्त झाला. ३. हा समास चिंतनीय आहे. ४. मूर्च्छा, मोह. ५. माया. ६. रात्र. ७. कमतरता. ८. तयारी.

निजसंघट्टन[1] गुरुशीं । आम्हां घडलें अहर्निशीं[2] ॥ आतां० ॥ २ ॥
अखंड भेटी गुरुची । हे केशवीं प्राप्ति मुळिंची ॥ आतां० ॥ ३ ॥

### पद ७१९ वें.

कारण वारण योगें रे! । मज उद्धरिलें अतिवेगें रे! ॥ ध्रुवपद. ॥
विचार भुवनीं ठेवुनियां । प्रेमरसायन[3] देउनियां ॥ कारण ०॥ १ ॥
विवर्त परता सारुनियां । सर्वैहि शोक निवारुनियां ॥कारण० ॥ २ ॥
केशव म्हणे निज दातारा । निजपदिं दिधला त्वां थारा ॥ कारण० ॥३॥

### पद ७२० वें.

शीघ्र भजा तुम्ही शीघ्र भजा । जाणपणाचा स्फुंदत जा ॥ध्रुवपद.॥
पातकजाळ निवारण हा । मोक्षपदाप्रति कारण हा ॥ शीघ्र० ॥ १ ॥
मन्मथतक्षकभक्षक[5] हा । सुखघनसज्जनरक्षक हा ॥ शीघ्र० ॥ २ ॥
अक्षयवैभवदायक हा । केशव म्हणे निजनायक हा ॥ शीघ्र० ॥ ३ ॥

### पद ७२१ वें.

तो पहावाचि वाटे नयनातें । बाइ! चला तयाच्या अयनातें[6]॥ध्रुवपद.॥
रोधुनियां मन पवनातें । नेलें निजानंद भुवनातें ॥ तो० ॥ १ ॥
देउनियां पद अविनाशी[7] । अंतकमय हा भवनाशी ॥ तो० ॥ २ ॥
करवुनि केशवि शयनातें । केले पुढें देह येईना तें ॥ तो० ॥ ३ ॥

### पद ७२२ वें.

खटपट कां बा! करितोसी? । लटिकेंचि नासिक[8] धरितोसी ॥ ध्रुवपद. ॥
धणिवरि हरिला पाहसिना । तत्पदिं निश्चळ राहसिना ॥ खटपट० ॥ १ ॥
वरिवरि करिसी गुणगुण । अंतरीं नाहीं निज खूण ॥ खटपट० ॥ २ ॥
भस्में उधळिली निजकाया । निरसली[9] नाहीं निजमाया ॥खटपट० ॥ ३॥
वरि वरि जपसी हरिनाम । अंतरिं भरला दृढ काम ॥ खटपट० ॥ ४ ॥
केशव सांगे खूण निकी[10] । अंतरिं धरुनि राहीं सुखी ॥ खटपट० ॥ ५ ॥

### पद ७२३ वें.

कमलनयन रामा! । तूं भेटि देई आम्हां ॥ ध्रुवपद. ॥
ध्यान[11] करिन तुझें । तुजवीण नेणें दुजें ॥ कमल० ॥ १ ॥

---

१. सहवास. २. रात्रंदिवस. ३. 'नामरसायण' असा अन्य पाठ आढळतो. ४. भोंवरा. ५. मदनरूपी सर्पाला खाणारा. ६. मार्गीतें. ७. कैवल्य. ८. नाक. ९. नाहींशी केली. १०. खरी. ११. पद ७०८ वरील टीप पहा.

मायबाप तूंचि पाहीं । तुजवीण सखा[१] नाहीं ॥ कमल० ॥ २ ॥
केशव म्हणे देवा! । बहु गोड तुझी सेवा ॥ कमल० ॥ ३ ॥

### पद ७२४ वें.

हें सुख गोड मोठें रे! । भाइनो! सांगतांची बोल खुंटे रे! ॥ ध्रुवपद. ॥
स्वसूख घ्यावें रे! । भाइनो! तेथेंचि लीन व्हावें रे! ।
दीनाचें दीन व्हावें रे! । भाइनो! जाणिवेसी बोळवावें रे! ॥ हें सुख० ॥ १ ॥
गोपाळाचें नाम घ्यावें रे! । भाइनो! हरिरंगीं नाचावें रे! ।
संतासि क्षेमे[२] द्यावें रे! । भाइनो! सबाह्य निववावें रे! ॥ हें सुख० ॥ २ ॥
काय सांगों नवला रे! । भाइनो! सकळां मुख्य भाव[३] रे ।
भावेंची भेटे देव रे! । भाइनो! केशवीं अनुभव रे! ॥ हें सुख० ॥ ३ ॥

### पद ७२५ वें.

धन्य ते महानुभाव[४] । धन्य ते योगीराव ।
हरिनें स्वपदीं ठाव । दिधला जयां ॥ ध्रुवपद. ॥
हरिनामें गर्जती । हरिरंगें नाचती ।
हरिप्रेमें डुल्लती । पावती सुख ॥ धन्य० ॥ १ ॥
चिंतितां सच्चिदानंदा । नेणती हा भवधंदा ।
रामरुपीं मतीमंदा । जाहल्या त्याच्या ॥ धन्य० ॥ २ ॥
सर्वदा सेविती राम । त्यांसी कैंचा[५] क्रोधकाम ।
पावले विश्रामधाम[६] । केशव म्हणे ॥ धन्य० ॥ ३ ॥

### पद ७२६ वें.

यापरी जाणवे! माय! । पाहतां येकलें आहे ॥ ध्रुवपद. ॥
डोळीयाचे भूमीके । डोळाची आपण देखे ।
नव्हे म्हणतां मुखें । जीभ न तुटे काई ॥ यापरी० ॥ १ ॥
आपुलें आपणा मुख । नव्हे सन्मुख ना विमुख ।
तैसें हें पाहणें देख । ठायींच्या ठायीं ॥ यापरी० ॥ २ ॥
जैसें आहे तैसें आहे । कवणें पाहिलें काय ।
ऐसें पाहणें पाहें । केशव म्हणे ॥ यापरी० ॥ ३ ॥

---

१. मित्र. २. आलिंगन. ३. भक्ति. ४. महाशय, प्रशस्तमनस्क. ५. हा समास चिंतनीय आहे. ६. सुखालय.

## पद ७३२ वें.

रंगा येईं वो! रंगाबाई! । माझें मन रंगलें तुझे पायीं ॥ ध्रुवपद. ॥
गातीते! वो! रंगनाथे! वो! । सदोदिते! वो! भगवंते! ॥ रंगा० ॥ १ ॥
तुजविण वो! अर्धक्षण वो! । न गमे जाण वो! तुझि आण[1] ॥ रंगा० ॥ २ ॥
अविकारे! वो! तत्वसारे! वो! । पावें केशवीं संपूर्ण दीनोद्धारे! ॥ रंगा०॥३॥

## पद ७३३ वें.

योगी डुलती स्वानंदें । अखंड ब्रह्मानंदें ॥ ध्रुवपद. ॥
पूर्व संस्कारें कर्में करिती । कर्मीं बद्ध सहसा नव्हती ।
कर्माकर्मीं ब्रह्मस्थिति । निजात्म प्रतीति निजदेहीं ॥ योगी० ॥ १ ॥
देह प्रारब्धें वर्तती देहीं । देहीं असोनी ते विदेही ।
देह विदेह दोन्ही पाहीं । गिळिलीं तिहीं सुखरूप ॥ योगी० ॥ २ ॥
स्वानुभवें स्वरूप शांति । पावलें परम विश्रांति ।
निजानंदीं गळित वृत्ति । सद्गुरुप्राप्ति केशवीं ॥ योगी० ॥ ३ ॥

## पद ७३४ वें.

या मनुष्यजन्मा तरिच यावें रे! ।
आपण तरावें जग उद्धरावें । धन्य धन्य ऐसें म्हणवावें रे! ॥ ध्रुवपद. ॥
सर्वभूतीं भावें अनन्य भजावें । गोपाळाचे स्वरुपीं रमावें रे! ।
रामनाम अखंड वाचे जपावें । देहिंच विदेही सुख घ्यावें रे! ॥ १ ॥
कामासी गाळावें क्रोधा नातळावें[2] । संताचे चरणीं लोळावें रे! ।
आयुष्याचे तांतडी करावी काटाकाटी । हातोहातीं स्वरुपीं मिळावें रे!॥२॥
स्वहित साधावें सर्वही सोडुनी द्यावें । निजध्यासें हरिसी पहावें रे! ।
साक्षात्कारीं तेथें तन्मय व्हावें । आनंदें ब्रह्मांड भरावें रे! ॥ ३ ॥
जाणिवेसि वोळवावें व्यापकासी आळवावें । भवभय समूळ गिळावें रे! ।
नाना मतांतरीं भरीं न भरावें । निजाचें घर ओळखावें रे! ॥ ४ ॥
उपदेश ऐसा करितां या मानसा । उपरती[3] झाली निजदेवें रे! ।
केशव म्हणे आम्ही सद्गुरुसी शरण गेलों । तरलों तरलों त्याच्या नांवें रे!॥

## पद ७३५ वें.

विषयवासना । सांडि रे! मना! । त्यजुनि कामना । सेवीं सज्जना ।
नातळें धना । सोडि अंगना । सद्गुरु खुणा । वळख आपणा ॥ ध्रुवपद. ॥

---

१. शपथ. २. स्पर्शसुद्धां करूं नये. ३. पश्चात्ताप.

विषयसंगती । यातना किती । दु:खापत्ति । पुनरावृत्ति ।
भोगिल्या स्थिति [१] अझुनि निश्चिती । सद्गुरुमुखें वळख गोपती ॥ १ ॥
अंतरस्थिति । लावीं हे रती । ठेवुनी प्रीति । पाहें प्रतिती ।
उन्मति गति । सुखसंभूती । अवस्थास्थिति । मावळे वृत्ति ॥ २ ॥
दुर्मदा मदा । नातळें कदा । सद्गुरुपदा । सेवीं सर्वदा ।
चुकति आपदा । सुखसंपदा । त्यजुनि सर्वदा । पावती पदा ॥ ३ ॥
सद्गुरुमुखें । वस्तु ओळखें । आपुल्या सुखें । राहें कौतुकें ।
हरति पातकें । भंगती दु:खें । नाठवे तदा पारखें सखें ॥ ४ ॥
तेव्हां शोक मावळे । द्वेष तो पळे । कामना गळे । कल्पना जळे ।
ब्रह्म आकळे । अनुभवें कळे । मोक्ष तेधवां तुजला फळे ॥ ५ ॥
देखणें सरे । देखतें विरे । दर्शनें मुरे । शब्द ओसरे ।
स्फुरणही जिरे । वृत्तिही विरे । वृत्तिवीण तो मुक्त वावरे ॥ ६ ॥
ध्यान तें बुडे । ज्ञान तें उडे । भेद वोघडे । अभेद ना घडे ।
मोक्ष तो खुडे । सुख वो! झडे । केशवीं स्थिति माघिल्या कडे ॥ ७ ॥

## पद ७३६ वें.

सांग पां माझें उपाणें रे! ।
नकळे तरी तूं संतांसीं पुसें गुरुविणें खुण न बाणे रे! ॥ ध्रुवपद. ॥
एकवीस स्वर्गावरी उडे एक घारी पाताळा खालें तिची छाया रे! ।
चळेना ढळेना त्रिभुवनिं खेळे मन भुली आली ते ठाया रे! ॥ सांग० ॥ १ ॥
गंगातीरीं एक सोवळा ब्राह्मण [२] अनामिका घरीं राहे रे! ।
याति ना कूळ परी [३] शिखा [४] सूत्र वागवी एकही [५] वर्ण न साहे रे! ॥ सांग०॥२॥
वाघाच्या वाडां एक मिस्किन गाय ते दवळ्या बैलाची माय रे! ।
दांतेविणें तिनें वाघासि गिळिलें तिचा पाडा तिसीं खाय रे! ॥ सांग० ॥३॥
सूर्याचे गांवीं [६] गडद घुंग पडिलें अंधळ्यानें लाविली [७] वाती रे! ।
काजळें डोळा धुवुनी सांडितां नुरेचि दिन ना राती रे! ॥ सांग० ॥ ४ ॥
मायेचा [८] धो हो! गाभणा झाला तो बाइलेस आपण व्याला रे! ।
गुरुकृपे केशवीं [९] नवलार पाहतां चांदणीनें डोहो गिळियेलीं रे! ॥सांग०॥५॥

---

१. आपपर कांहींच आठवत नाही. २. अंत्यजाच्या घरां. ३. शेंडी. ४. यज्ञोपवीत. ५. चार वर्णांपैकीं कोणताही. ६. काळोख पडला. ७. 'ज्योति' असा अन्य पाठ. ८. नवरा. ९. नवल. १०. हें कूट पद आहे.

### पद ७४२ वें.

पाहतां **गो**पाळराया आनंदें घाली[1] ।
सहजीं सहज तन्मय[2] होउनी ठेली ॥ ध्रुवपद. ॥
झोंपेली कोमेली अवघी सावध झाली ।
त्रैलोक्याचा स्वामी तेथें विश्रांति आली ॥ पाहतां० ॥ १ ॥
प्रेमें निवाळी सुखस्वरुप जाली ।
स्वानंदें मग्न कैसी जीतें[3] ना मेली ॥ पाहतां० ॥ २ ॥
गुरुकृपे **के**शवराजीं पहातां पाहे ।
निवालें मानस तरी धणी[4] न धाई ॥ पाहतां० ॥ ३ ॥

### पद ७४३ वें.

गडबड गुंडा सद्गुरुचरणीं ।
मानस माझें जाहलेंसे लंडा ॥ ध्रुवपद. ॥
जप तप साधन हें तों आतां अवणिया कामा ।
सद्गुरूचे पाय हेंची वैकुंठ आम्हां ॥ गड० ॥ १ ॥
भावें लोळेन चरणीं माती लावीन कपाळीं ।
सद्गुरूचे पायीं आम्हां नित्य दिवाळी ॥ गड० ॥ २ ॥
वादक वाद याचा आतां उबग[5] आला ।
**के**शव सद्गुरुचरणीं निश्चळ झाला वो! झाला ॥ गड० ॥ ३ ॥

### पद ७४४ वें.

**ना**रायणा[6] स्मरतां नाहीं यातना[7] ।
अहर्निशि[8] आठवीं **म**धुसूदना[9] ।

१. तृप्त झाली. २. तदाकार. ३. जीवंत सजीव. ४. तृप्ती. ५. त्रास. ६. नारायण या नांवाच्या उत्पत्तीविषयीं पुढील श्लोक अवलोकनीय आहेत:—‘नराज्जातानि तत्त्वानि नराणीति विदुर्बुधाः । तस्य तान्ययनं पूर्वं तेन नारायणः स्मृतः ॥ १ ॥ आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः । अयनं तस्य ताः पूर्वं तेन नारायणः स्मृतः ॥ २ ॥’ अर्थः—पंडित लोक नारापासून उत्पन्न झालेल्या तत्वांना ‘नर’ असें समजतात. तीं नारें (तत्वें) पूर्वी परमेश्वराची अयनें (आश्रमस्थानें) झाली होतीं म्हणून त्याला ‘नारायण’ असें नांव पडलें. ॥ १ ॥ उदक नरापासून उत्पन्न झालें म्हणून त्याला नर’ असें म्हणतात. तें ‘नर’ (उदक) पूर्वी ईश्वराचें अयन (वसतिस्थान) होतें म्हणून परमेश्वराला ‘नारायण’ असें नांव पडलें. ॥ २ ॥ ७. त्रास. ८. रात्रदिवस. ९. ‘जेणें कर्णमलोद्भव मधुनामा दैत्य मारिला चक्रें । यास्तव ‘मधुसूदन’ हें नाम तया ठेविलें समुनि ‘शक्रें ॥ ७३ ॥’ [नामार्थदीपिका—पृष्ठ ९.]

[1]अच्युताचें चिंतन करीं रे! मना! ।
निजभावें बो[2]ळगें कमळनयना ॥ ध्रुवपद. ॥
**गो**विंदाचें ध्यान तूं अखंड करीं ।
**मा**धवासी मानसीं दृढ धरीं ।
**अ**नंताचें स्वरुप पाहें सबाह्यांतरीं ।
**वा**सुदेवीं राहें तूं निरंतरीं ॥ **ना**रायणा० ॥ १ ॥
**हृ**षीकेश हृदयीं तूं आकळीं सदां ।
**दा**मोदरीं आवडी ठेवुनी सर्वदां ।
**गो**पाळासी ध्यातां मग नाहीं आपदा ।
परमानंदीं लीन होतां पावसी [3]पदा ॥ **ना**रायणा० ॥ २ ॥
अनन्य भावें [4]**भ**गवंतीं शरण रि[5]घावें ।
सकळ [6]**ज**नार्दनीं दर्शन घ्यावें ।
गुरुकृपें **के**शवराजीं तन्मय व्हावें ।
निर्गुण स्वरुपीं मिळोनी जावें. ॥ **ना**रायणा० ॥ ३ ॥

## पद ७४५ वें.

आनंद मोठा हो ब्रह्मानंद मोठा वो! ।
त्रैलोक्यविश्रामधाम आला पोटा वो! ॥ ध्रुवपद. ॥
सर्वांगदे[7]खणा **रा**म देखिला जेव्हां ।
जन्म मरण दुःख कांहीं नाठवे तेव्हां ॥ आनंद० ॥ १ ॥
दृश्य भाग ज्यासी कांहीं ठाउका नाहीं ।
सर्वकाळ आम्हीं त्यासी आलिंगीलें पाहीं ॥ आनंद० ॥ २ ॥
गुणावगुणातीत सदोदित देवराणा ।
**के**शव म्हणे गुरुकृपे सांपडला जाणा ॥ आनंद० ॥ ३ ॥

---

१. पद ६७५ वरील टीप पहा. २. प्रीति कर. ३. मोक्षपदा. ४. 'भगवान्' शब्दाची व्याख्या आढळते ती:—'उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानामगतिं गतिम् । वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति ॥' (म्हणजे, सर्व स्थावरजंगमात्मक जगाचा उद्भव आणि नाश हे कसे होतात, जग आलें कोठून, जाणार कोठें, विद्या आणि अविद्या काय आहेत, हें सर्व जो जाणतो त्याला भगवान् म्हणावें) किंवा सकल ऐश्वर्य, धर्म अथवा वीर्य, कीर्ति, द्रव्य, ज्ञान, वैराग्य हीं सहा भगें ज्यास आहेत तो भगवान्. ५. जावें. ६. दुष्टाचें अर्दन (नाश) करितो तो जनार्दन. ७. सुंदर.

## पद ७२७ वें.

हरिरुपीं गोकुळ वेधलें कैसें रे! उद्धवा! ।
नयनीं देखुनी लुब्ध जाहल्या नरनारी नाचती प्रेमरसें ॥ ध्रुवपद. ॥
गोपाळ गोपिका । आनंदीं नाचती देखा ।
एकमेकांची शंका । एकासी नाहीं ॥ हरि० ॥ १ ॥
सप्रेमें सदोदित मूर्च्छित । जेथींच्या तेथ ।
हेतमातखरवात । कैंचा हो! तेथें ॥ हरि० ॥ २ ॥
तेथें कोणासी पुसे कोण । हारपलें मीतूंपण ।
देह नाचे परी मन । उन्मन झालें ॥ हरि० ॥ ३ ॥
जेथें कैंचा देवभक्त । कोण करी गीत नृत्य ।
अवघेची तटस्थ । समाधिस्थिती ॥ हरि० ॥ ४ ॥
जेथें मनची झालें शून्य । शब्दासी पडिलें मौन ।
आठव नाठव जाण । कैंचा हो तेथें ॥ हरि० ॥ ५ ॥
सद्गुरुकृपे पाहीं । केशवीं न दिसे कांहीं ।
कांहींच नाहीं ते ठायीं । बोलणें कैंचें ॥ हरि० ॥ ६ ॥

## पद ७२८ वें.

मज करणें कांहींच नाहींच उरलें ।
गुरुभक्तांचीं वंदिन पाउलें ॥ ध्रुवपद. ॥
गुरुरायाचे पद क्षेत्रवासी वो! ।
सर्वभावें होईन त्याची दासी वो! ॥ मज० ॥ १ ॥
गुरुभक्त नांदती जये देशीं वो ।
तो मी देश ध्याइन अहर्निश[1] वो! ॥ मज० ॥ २ ॥
गुरुभक्तांचें आश्रमीं राहीन ।
सर्व सुखाचें निजफळ लाहीन ॥ मज० ॥ ३ ॥
गुरुभक्तीचा कुळधर्म ज्या घरीं ।
त्याची मूर्ति मीं पूजीन अंतरीं ॥ मज० ॥ ४ ॥
गुरुवेगळें दैवत ज्यांसी नाहीं वो! ।
म्हणे केशव शरण त्याचे पायीं वो! ॥ मज० ॥ ५ ॥

---

१. रात्रंदिवस.

### पद ७२९ वें.

माझें नाकींचें बरवें मोतीं वो! । वरी फांकती निर्मळ ज्योती वो!॥ध्रुवपद.
शुद्धसुवर्ण गुंफुनी सलिला । मुखीं मुखाचा दावीत सोहळा ॥ माझें० ॥ १ ॥
परम सुंदर जें अति ढाळाचें । नित्यनूतन परी बहु काळाचें ॥ माझें० ॥ २ ॥
बोध माणीक त्यावरी शोभतें । उंची पावुनी खालतें लोंबतें ॥ माझें० ॥ ३ ॥
मुख्य लेणियांमाजी लेणें वो! । गुरुवल्लभ मोहिला जेणें वो! ॥ माझें० ॥ ४ ॥
प्राप्ती उदयीं केशव लेतसे । वरी सद्गुरु चुंबन देतसे ॥ माझें० ॥ ५ ॥

### पद ७३० वें.

आतां मी करूं वो! काय? । सर्वदा दिसतसे वो! माय! ।
पाहतां विरोनि जाय । [1]मीपण माझें ॥ ध्रुवपद. ॥
निजरंग चोखडें । रंगनाथ रूपडें ।
मागें आणि पुढें । दिसे उघडें आम्हां ॥ आतां० ॥ १ ॥
डोळे उघडितां भासे । डोळे झांकितांचीं दिसे ।
माझिया सर्वांगीं वसे । गिळुनी मज ॥ आतां० ॥ २ ॥
गुरुकृपे अवलिला । केशवीं पाहतां डोळां ।
रंगातीत सोहळा । निजरंगीं नाळा ॥ आतां० ॥ ३ ॥

### पद ७३१ वें.

माझा रंगमूर्ती मज तुम्ही दावा वो! ।
त्याविण उदास देह भावा वो! ॥ ध्रुवपद. ॥
सर्वरंगा मूळ रंग रंगेंविण सुरंग ।
तो रंग नयनीं पहावा वो! ॥ माझा० ॥ १ ॥
आसनीं शयनीं मज नाठवे तयाविण ।
ध्यान लागलें माझे मनीं वो! ॥ माझा० ॥ २ ॥
सकळ सुखाचें सार श्रुती गुह्य भांडार ।
त्रैलोक्याचा निज जिव्हार वो! ॥ माझा० ॥ ३ ॥
हृदयपंकजीं तो प्रत्यक्ष आणुनी दिजे ।
हेंचि मागणें वारंवार वो! ॥ माझा० ॥ ४ ॥
केशवप्रभुची भेटी सबाह्य होईल जेव्हां ।
सकळ जीविंचा श्रम जाय वो! ॥ माझा० ॥ ५ ॥

---

१. अहंकार.

## पद ७३७ वें.

तयाचें नांव तें काय रे! ।
चतुर होसी तरी सांगोनि देसी नाहीं तरी उगलाची राहें रे! ॥
घरांत घर तया आंत विवर तयांत एक मंदिर रे! ।
तयामध्यें एक पुरुष नांदे शरीरेंविणें सुंदर रे! ॥ तयाचें० ॥ १ ॥
ज्योतिमध्यें एक पडछाया पडिली तयांत एक बाहुली रे! ।
आपण तियेच्या उदरा आला पाहतां ते तेणेंचि केली रे! ॥ तयाचें० ॥ २ ॥
तेणें केली हेही वावुगिच बोली नाहीं ते तेणें देखिली रे! ।
तया दोघांमध्यें संबंध नसतां त्याचीच बाइल झाली रे! ॥ तयाचें० ॥ ३ ॥
नव्हे तो शिव नव्हे तो शक्ति नचले वाचा युक्ती रे! ।
गुरुकृपे केशवीं इतरांसी कोडें अनुभवी ह्मूण जाणती रे! ॥ तयाचें० ॥ ४ ॥

## पद ७३८ वें.

सांगतां दिसे बहु कोडें रे! । कळेना तें जाहलें वेडें रे! ।
अनुभवी ह्मूण जाणती तेथिची इतरांसि कां न कोडें रे! ॥ ध्रुवपद. ॥
मेरूचे शिखरीं उभि एक नारी पती तिचा ब्रह्मचारी रे! ।
त्याचिया संगें ते प्रजांसि व्याली परि ते कर्णकुमारी रे! ॥ सांगतां० ॥ १ ॥
शून्याचे शेंडा एक तरुवर देखिला तयासी मूळ ना डाहाळ रे! ।
शाखा पुष्प त्यासी नसोनि कांहीं सर्वांगें निज सफळ रे! ॥ सांगतां० ॥ २ ॥
चांदाचे दोंदावरी चांदणें पडिलें अंवसेची झाली पुनाव रे! ।
सतेज तेजें ढवळा उजळुनी अवघिच उखा केली रे! ॥ सांगतां० ॥ ३ ॥
वोस नगरीं राहणे दिवसा पडिलें चोरें चोरा नागविलें रे! ।
संन्याशाचा कर्मबंध तुटला माशानें तरळा नेलें रे! ॥ सांगतां० ॥ ४ ॥
तीं खणावरी देउळ रचिलें देवासि ठावचि नाहिंच रे! ।
गुरुकृपें केशवीं दर्शन घेतां देउळ उडालें पाहीं रे! ॥ सांगतां० ॥ ५ ॥

## पद ७३९ वें.

येवढें कोडें उगविसी तरि तुज देइन हें मन घोडें रे! ॥ ध्रुवपद. ॥
काय तें सांग मज पुढें रे! खेळ्या! सूर्याहुनि तेज गाढें रे! ।

---

१. हें पद कूट आहे.

अमृताहुनि गोड गगनाहुनि वाढ[1] कांहींच नसे त्याच्या पाड रे! ॥१॥
पूर्वीं तेंचि आतांही तेंची अंतीही तेंचि एक रे! ।
कांहींच संग न करितां तें नाचवितें तिन्ही[2] लोक रे! ॥ येवढें० ॥ २ ॥
प्रकृति नव्हे पुरुष नव्हे तें नपुंसक नव्हे पाहीं रे! ।
गांव ना शीवें[3], रूप ना नांव, परि तें सकळा ठायीं रे! ॥ येवढें० ॥ ३ ॥
गोरें हिरवें काळें पिवळें नसे तेथें एकहि रंग कांहीं रे! ।
सद्गुरुकृपेविण तें कदापि न दिसे एकपणेंविण पाहीं रे! ॥ येवढें० ॥ ४ ॥
आदी मध्य अंत ज्याचा ब्रह्मादिकांसि नाहीं जें अति गूढ रे! ।
गुरुकृपें केशवीं सबाह्य लक्षितां पदोपदीं पुरतसे कोडें[4] रे! ॥ येवढें० ॥५॥

## पद ७४० वें.

तयासि दिसे जें तव नाहीं । म्हणउनि उगला राहीं ॥ ध्रुवपद. ॥
समाधि व्युत्थानीं सम होणें । ऐसें ज्याचें देणें ॥ तयासि० ॥ १ ॥
अखंड ठेवुनियां सुख धामीं । सबाह्य निववी स्वामी ॥ तयासि० ॥ २ ॥
सर्वही हारपलें जे ठायीं । त्या पदीं नांदवी पाहीं ॥ तयासि० ॥ ३ ॥
पुष्कळ देउनियां निजबोधा । करणें केलीं मोघा[5] ॥ तयासि० ॥ ४ ॥
मींपण निर्द्वंद्व········ । केशव म्हणे मम ताता ॥ तयासि० ॥ ५ ॥

## पद ७४१ वें.

चिन्मय मोतीं गे! बाई! । माझें न दिसे करुं काई! ।
सहसा न पडेचि ठायीं लागो कवणाचे पायीं ॥ ध्रुवपद. ॥
नाना साधनें तो केर । सखिये! पाखडिला फार ।
सकळ मडकीं धुंडियलीं राजस तामस प्रकार ॥ चिन्मय० ॥ १ ॥
ग्रंथ गांठोडीं सकळीं । दिवसरजनीं शोधियलीं ।
बहु दैवत देव्हारे फिरतां काया हे श्रमली ॥ चिन्मय० ॥ २ ॥
सखिये नवलाव[6] झाला । सद्गुरुराज भेटला ।
निजात्मबोध दर्पण[7] तो तेणें मजला दाखविला ॥ चिन्मय० ॥ ३ ॥
संशय पदर काढितां कंठींचें मोतीं झळझळी ।
केशवस्वामी सद्गुरुकृपें आत्मप्राप्ति पैं झाली ॥ चिन्मय० ॥ ४ ॥

---

१. उंच. २. स्वर्ग, मृत्यु, आणि पाताळ हे तीन लोक. ३. सीमा, मर्यादा. ४. कौतुक. ५. व्यर्थ. ६. नवल, आश्चर्य. ७. आरसा.

### पद ७४६ वें.

भज . सख .:! **रघुराया**! ।

चरणकमलदल लक्षुनि अंतरीं भजन करीं हरि झडकरी काया ॥ध्रुवपद.॥

**प्रल्हाद उद्धव वा**ल्मिकादि सर्व अगर्व होउनीयां गुण गाती ।

**नारद तुंबर** सुरवर[1] किन्नर गाती निरंतर अंतरीं ध्याती ॥ भज० ॥ १ ॥

सहस्रवदन[2] करी स्तुति निरंतरी स्तवनपरायण निगमही झाला ।

**व्यास विश्वामित्र शुक सन**कादिक स्तवन करिती, जिवीं धरिती जयाला ॥

अंतीं[3] गतीदायक[4] निजपदनायक **रामर**मापती **गो**पती[5] राजा ।

**के**शव म्हणे चित्सागर नागर प्राणसखा **ह**रि केवळ माझा ॥ भज० ॥ ३ ॥

### पद ७४७ वें.

ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण मुख्य ध्यातां । चारी मुक्ति वंदिती पाय माथां ॥ध्रुवपद.॥

ब्रह्मनिष्ठ ते ब्राह्मण मुख्य पाहीं । यातीकूळ प्रमाण त्यांसी नाहीं ॥ ब्रह्म० ॥१॥

ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण तेंची ब्रह्म । ब्रह्मनिष्ठाभजन हाची धर्म ॥ ब्रह्म० ॥ २ ॥

ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण येती घरा । तैं उरी[6] नुरे या संसारा ॥ ब्रह्म० ॥ ३ ॥

ब्रह्मनिष्ठ भजतां निजभावें । ब्रह्म **के**शवीं पडिलें पूर्ण ठावें ॥ ब्रह्म० ॥ ४ ॥

### पद ७४८ वें.

आणिक मानेना मजला आणिक मानेना ।

**रामर**मापतिवीण मति माझी भैंवरति[7] जाणेना ॥ ध्रुवपद. ॥

त्रिभुवनजनकाचे मानसीं चिंतितां पद साचे ।

मीपण माझें विरुनी वेगीं भोगीन सुख साचें ॥ आणिक० ॥ १ ॥

सकळही शृंगार मजला वाटती बहु भार ।

प्राणसखा **ह**री झडकरी कैं तो भेटेल साचार ॥ आणिक० ॥ २ ॥

**के**शवस्वामी वो! सबाह्य अंतर्यामीं वो! ।

तत्पदीं तन्मय होउनी राहीन मंगळधामीं वो! ॥ आणिक० ॥ ३ ॥

---

१. देवश्रेष्ठ. २. शेष. ३. 'अर्ती' असा अन्य पाठ. ४. मोक्ष देणारा.. ५. 'गाईंम गोपवेषें पतिरूपें वा महीस पाळितसे । यास्तव कविजन म्हणती 'गोपति' हें नाम त्यास योग्य दिसे. ॥ ९५ ॥ [पृष्ठ ५६] गोशब्दें भूम्यादिक त्या सर्वांचाहि जो पती झाला । यास्तव कवि म्हणति जनीं 'गोपति' हें नाम जाइलें त्याला. ॥ ९२ ॥ (नामार्थदीपिका पृ० ६६.) ६. कमीपणा, वाण. ७. संसाराची गोडी.

### पद ७४९ वें.

किति तरीं शिकवावें तूजला आम्हीं रे! ।
[१]श्रमहरण [२]न्याहाळी डोळां स्वामी रे! ॥ ध्रुवपद. ॥
कां बा! व्यर्थंची भुलसी माया कामीं रे! ।
कां बा! गुंतुनी पडशी अवगुण ग्रामीं रे! ॥ किति० ॥ १ ॥
किती [३]नाथिला करिसी व्यर्थ धंदा रे! ।
किती विषयीं लोळसी बुद्धिमंदा रे! ॥ किति० ॥ २ ॥
[४]केशवप्रभु पाहें तूं आजी डोळां रे! ।
करि कायेची [५]कुरवंडी वेळोवेळां रे! ॥ किति० ॥ ३ ॥

### पद ७५० वें.

तें सिद्धचि नकळे कैसें पाहीं । तूंची परी न पडे तुज ठायीं ।
म्हणुनियां सद्गुरुशीं शरण जाईं । पडों नको तूं मायाप्रवाहीं ॥ ध्रुवपद. ॥
दृष्टी जेणें सकळ देखत आहे । शब्द श्रवणें ऐकसी जेणें पाहे ।
घ्राणें गंध रसनेसी स्वाद लाहे । जड देह हें जेणें चळताहे ॥ तें सिद्ध० ॥१॥
वायां आपणा म्हणविसी देह देह । पहातां तुज तो न दिसे देहिं देह ।
देहीं देह असूनी विदेह । तूंचि नाथिला कां कैंचा संदेह ॥ तें सिद्ध० ॥ २ ॥
वर्णाश्रम साधन धर्म नेम । सांडी लय [६]लक्षमुद्रा हा तो भ्रम ।
गुरुकृपें केशवीं पूर्ण गुरुगम्य । पाहतां सिद्धचि तूं परब्रह्म ॥ तें सिद्ध० ॥३॥

### पद ७५१ वें.

खटाटोप करणें कासया । [७]भावें वोळंगें श्रीगुरुसखया ॥ ध्रुवपद. ॥
संतसेवा हेंची पैं साधन । आसन [६]मुद्रा हेंचि पैं बंधन ॥ खटाटोप० ॥ १ ॥
त्यजुनी भ्रांती हे [८]वावुगी । स्थीर राहें सर्वदा सत्संगीं ॥ खटाटोप० ॥ २ ॥
केशव म्हणे सद्गुरुभजनीं । जनार्दन दिसतो या जनीं वनीं ॥ खटाटोप० ॥ ३ ॥

### पद ७५२ वें.

मायेनें कैसें भुरळें घातलें । कांहीं हित नेणती आपुलें ॥ ध्रुवपद. ॥

---

१. श्रम हरण करणारा. २. पहा. ३. चांगला नव्हे तो, वाईट. ४. केशव+प्रभु=केशवाचा स्वामी (देव). ५. कुरवंडी करणें–ओंवाळून टाकणें. ६. मौनव्रत, अबोला. [यच्छति वाचि मुद्राम्–वाचि मौनं ददाति–असा 'मुद्रा' शब्दाचा मौनार्थक प्रयोग संस्कृत काव्यांतही आढळतो. [स्तुतिकुसुमांजलि–स्तोत्र ११ श्लोक ७६.] ७. भक्तीनें. ८. व्यर्थ.

धनवंता पुढें पैं धांवती । पोटालागीं नीचांसि वंदिती ।
परी आत्मसुटका नेणती । वायांची भवसागरीं बुडती ॥ मायेनें० ॥ १ ॥
कोणें काय प्रपंची साधीलें । फुकट वय विषयीं वेंचिलें[1] ।
नाहीं आपआपणा ओळखीलें । देखत कैसें भ्रांतीनें ठेकिलें ॥मायेनें० ॥२॥
त्यजुनी माया ममत्व संबंधू । निजरुपीं वाहिलेत साधू ।
तेची वेगीं तरले भवसिंधु । गुरुकृपें केशवीं आनंदू ॥ मायेनें० ॥ ३ ॥

## पद ७५३ वें.

सद्गुरुकृपा ऐशी । प्रत्यक्ष फळली[3] कैसी ।
आम्हींपण आम्हांशीं उरलें ॥ ध्रुवपद. ॥
स्तवन करितां मुखें । वेद झाले मुके ।
ऐसीया भूमीके । आम्हीं आरूढ झालों ॥ सद्गुरु० ॥ १ ॥
आमुचें स्वरुप माय । सांगिजेसें आहे काय ।
कांहीं नाहीं तेंची स्वयें । होउनी असों ॥ सद्गुरु० ॥ २ ॥
निजबोधें अवलिळा । सर्वांग जाहला डोळा ।
केशवीं देखणी कळा । दुर्जेनिविण ॥ सद्गुरु० ॥ ३ ॥

## पद ७५४ वें.

सांगतां नवलपरी । मीपणा नाहीं उरी ।
तूंपणाची सरोबरी । आमुच्या गांवीं ॥ ध्रुवपद. ॥
आमुचें पाहतां मूळ । हरपलें यातीकूळ ।
सूक्ष्म ना स्थूल । असों ऐसें आम्हीं ॥ सांगतां नवल० ॥ १ ॥
पहाणेंवीण तें पाहों । अविलंबेविण राहों ।
जैसे आहों तैसे आहों । सहज आम्हीं ॥ सांगतां नवल० ॥ २ ॥
आम्हीं अम्हींपणें वसों । असतेपणेंची नसों ।
कांहीं न होउनियां असों । केशव म्हणे ॥ सांगतां नवल० ॥ ३ ॥

## पद ७५५ वें.

जोगवा वो! अंबे! जोगवा वो! ।
औटेंपिठ नायके परी । पूर्ण द्यावा वो! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. धाळविलें. २. फसविलें. ३. फळ देती झाली. ४. लीलेनें, सहज. ५. ह्या तीन पीठांचीं नांवें पद १३१ मध्यें पहा.

भक्ति परडी घेउनी हातीं रंगणासी आलें ।
निज जोगवा घालीं अंबे! दासी तूझी झालें ॥ जोगवा० ॥ १ ॥
शुद्ध सत्व दर्शनें त्यालें तुझे लागीं ।
केवळ भूतीं झालें लावुनी संसारासी आगी ॥ जोगवा० ॥ २ ॥
दीन वाणी ऐकुनी कानीं अंबा प्रसन्न झाली ।
निजभाव पूर्ण जोगवा केशवस्वामीस घाली ॥ जोगवा० ॥ ३ ॥

## पद ७५६ वें.

सखे! सोयरा वैकुंठराणा वो! ॥ ध्रुवपद. ॥
निजसुखदायी फणिवरशायी[1] । यादव भाई! आणा वो! ॥ सखे!० ॥ १ ॥
क्षीराब्धिवासी भक्तविलासी । आनंदराशी आणा वो! ॥ सखे!० ॥ २ ॥
गोपीमनोहर देव सर्वेश्वर । गोविंद यदुविर आणा वो ! ॥ सखे!० ॥ ३ ॥
केशवस्वामी रमणीय नामीं । अंतर्यामीं आणा वो! ॥ सखे !० ॥ ४ ॥

## पद ७५७ वें.

पाहाणें न पाहाणें । राहिलें पाहाणें ।
डोळियांसि देखणें डोळ्यांनीं केवीं ? ।
पाहाणें न पाहाणें । नुरे आत्मदर्शनें ।
यालागीं बोलणें 'नेती[2] नेती' ॥ ध्रुवपद. ॥
सद्गुरुकृपा झाली । निज वस्तु देखिली ।
कल्पनेची मोडली समूळ वाट ।
हारपला देहभाव । संकल्पा कैंचा ठाव ? ।
स्वरुपाचा अनुभव निजबोधें ॥ पाहाणें न० ॥ १ ॥
जें स्थूल ना सूक्ष्म नव्हे । जेथें सर्व सामावे ।
तें रूप जाणावें कैसेंनि आतां ।
परा पारुषली । प्रमाणें अप्रमाणें झालीं ।
दृष्टांतें वाहिली द्यावया आण ॥ पाहाणें न० ॥ २ ॥
सत् सद्‌वीं गेलें । चिदीं चित्पण ठेलें ।
आनंद सामावला आनंदामाजी ।
ऐसिया निज दृष्टीं । सहजीं सहज होतसे वृष्टी ।
केशवीं होय आनंद कोंदेला[3] पाठिं पोटीं ॥ पाहाणें न० ॥ ३ ॥

---

१. शेषशायी. २. 'न इति' 'न इति–हें नव्हे, असें उपनिषदांतील ब्रह्माचें वर्णन. ३. भरला.

## पद ७५८ वें.

माझा तात तो माय तो पाहीं स्वार्थ तो [1]संदेह नाहीं ।
नांदतों निःसंदेहीं आनंदें तृप्त ॥ ध्रुवपद. ॥
अंतरीं दाउनि हरी त्वंपद·········· ।
त्याचिया पायांचीं सेरी न पवती कोण्ही ॥ माझा० ॥ १ ॥
संपूर्ण देउनी बोध । संपूर्ण नाशिला बंध ।
संपूर्ण सच्चिदानंदें तृप्त केलें ॥ माझा० ॥ २ ॥
संपूर्ण सद्गुरु राजा । संपूर्ण तो स्वामि माझा ।
संपूर्ण अभेद पूजा । **के**शव करी ॥ माझा० ॥ ३ ॥

## पद ७५९ वें.

तो जगद्गुरु लक्षितां मनीं । दुजा लक्षितां नाडले जनीं ॥ ध्रुवपद. ॥
भेद चोरुनी रूप दावितो । रूप चोरुनी प्रेम लावितो ।
प्रीति चोरुनी चित्त गोंवितो । चित्त गोंवुनी सहज ठेवितो ॥ तो० ॥ १ ॥
बोध लावुनी प्रेम माजवी । प्रेम दावुनी बोध गाजवी ।
बोध देउनी रूप दाखवी । रूप देउनी सूख चाखवी ॥ तो० ॥ २ ॥
जीव मारुनी एकला असे । एकाला असे त्यासि तो दिसे ।
तयां देखतां दूसरा नसे । सहज **के**शवीं सहज तो दिसे ॥ तो० ॥ ३ ॥

## पद ७६० वें.

आतां बाई! काय वो! करावें? । मन माझें वेधियलें **मा**धवें ॥ ध्रुवपद. ॥
पाहूं गेलें **नं**दाच्या नंदना । तंव मूर्ति बैसली नयनां ।
तिचा छंद लागला या मना । कांहीं केल्या विसर पडेना ॥ आतां० ॥ १ ॥
सहज यासी पाहूं मी गेलियें । पाहातें पाहाणें गिळूनि ठेलियें ।
मागुतीं दृश्य घरा जों आलियें । सर्वदां तेंचि देखती जाहलियें ॥ आतां० ॥२
[3]अशनीं [4]शयनीं [5]गमनागमनीं । **श्री**रंगें मज वेधिलें [6]साजणी! ।
सद्गुरुकृपें **के**शवीं ऐक्यपणीं । समाधी तेथें राहिलें द्वैतभाव निरसुनी ॥ आतां०॥३॥

## पद ७६१ वें.

········ ही हेचि परिमाण निजानंदाचें जाण ।
जाणुनि खूण हे त्यागणें । त्यासि नाहीं जाणणेपण ॥ ध्रुवपद. ॥

---

१. संशय. २. बरोबरी ३. भोजनाच्या वेळीं. ४. निजते वेळेस. ५. जातांयेतां. ६. मैत्रिणी.

अनुत्पन्न संतान जे ठायीं । तये स्वरुपीं पाहीं ।
सर्वदां परिपूर्ण संचला । त्यासी मर्यादा नाहीं ॥ १ ॥
ब्रह्म सनातन सकल सिद्ध । संचलें ऐसें जाणिजे कवण ।
आपलें जाणणें न घडे आपणां । सर्व विलक्षणा कांहीं न घडेचि होणें ॥ २ ॥
प्रतिती झाली ऐसें बोलती अति । डोलती ते तव नेणती कांहीं ।
केशवस्वामी सदोदित हा सत्ता । मात्र हा सहज कांहीं ना बाहीं ॥ ३ ॥

## पद ७६२ वें.

एकी कीं बेकी पोरा! सांग झडकरी ।
बेकि निघाल्या पोरा डाव पडे हारी ॥ ध्रुवपद. ॥
पाराशराचें पोर येथें कष्टी झालें मोठें ।
गडी आमुचा नारद आला लाविलें तेणें वाटे ॥ एकी० ॥ १ ॥
केशव राज्यीं एकचि आहे नाहीं दुजें कांहीं ।
एकीं अनेक पाहें गुरुकृपा कांहीं ॥ एकी० ॥ २ ॥

## पद ७६३ वें.

करुणासागरा! रामा! येईं रे! । मज भेट देईं रे! ॥ ध्रुवपद. ॥
अहंकारें गांजिलें परोपरी । हे कायापुरी ।
संशयें घेतली पाठी भारी । त्यासी कवण वारी? ॥ रामा० ॥ १ ॥
पडली मायेची पायीं बेडी । तिसी कोण काढी? ।
तुझिया नामाची केली जोडी । भवबंधन तोडीं ॥ रामा० ॥ २ ॥
केशव दातारा राघववीरा । साराच्या सारा ।
आपुले चरणीं दे मज थारा । तूं दीनोद्धारा! ॥ रामा० ॥ ३ ॥

## पद ७६४ वें.

बोधें भुलविला मदनारी । ऐशा मंगळ नारी ॥ ध्रुवपद. ॥
आम्हीं देखियल्या चिच्छक्ति । ज्यांच्या पायीं रुळती मुक्ती ॥ बोधें० ॥ १ ॥
जयासि सादर हे आलिंगी, । ते तंव झाले हो योगी ॥ बोधें० ॥ २ ॥
त्रिभुवनतारक शिव गंगा । केशव इच्छितसे संगा ॥ बोधें० ॥ ३ ॥

## पद ७६५ वें.

तेथींचें सुख सांगतां साजणी! । मौन पडलें चौघांच्या वदनीं ॥ ध्रुवपद. ॥

---

१. पुरातन. २. उत्तमांतील उत्तमा. ३. आश्रय. ४. शंकर. ५. लोळती. ६. चारी वेदांच्या.

वंदुनि गुरुरायाचीं पाउलें, । समाधि शेजेवरि मी पहुडलें[1], ।
तेथें एक नवल म्यां देखिलें, । वाटे मजमाजी मी भेटलें ॥तेथींचें० ॥१॥
पाहतां कांहीं न दिसे तंव डोळां । हारपली दिप्तीसी दीपकळा ।
कळा कळातीत सोहळा । सहजीं सहज होतसे अवलिला[2] ॥ तेथींचें०॥२॥
मग मी हो! पाहतें आपणा । ह्याही जेथें नुरेचि स्फुरणा ।
सद्गुरुकृपें केशवीं परिपूर्ण । कवण तेथें भेटवूं कवणा? ॥ तेथींचें० ॥ ३ ॥

## पद ७६६ वें.

काय तूज वानावें? आम्हीं । चिदात्मा! माहेरा! स्वामी! ।
सर्वदा मंगळधामीं । ठेविलें आम्हां ॥ ध्रुवपद. ॥
निजनामें आळविलें । स्वरुपीं सावध केलें ।
नाहीं नाहीं चाळविलें । दीधलें सुख ॥ काय० ॥ १ ॥
निजानंदीं बोळवण । पूर्ण झाली पैं ठेवण ।
दृश्यादृश्य आठवण । सर्वही गेली ॥ काय० ॥ २ ॥
हस्तक ठेविला माथां । स्वपदीं नांदतों आतां ।
तात तूं स्वानंददाता । केशव म्हणे मी आतां ॥ काय० ॥ ३ ॥

## पद ७६७ वें.

**राम** माझा अखंड घाली डोळा ॥ ध्रुवपद. ॥
कर्मेंविण सौरी झालें आलें महाद्वारा ।
हिंडेन सैरावैरा तो जिवींचा सोयरा ।
त्यासि पाहातां डोळां खुंटल्या येरझारा ॥ **राम**० ॥ १ ॥
जेथें जावें तेथें न दिसे कोठें जाऊं आतां ।
मनीं पाहातां परी ठाव न दिसे रिता[3] ।
भ्रांति सोंवळें फिटतां अवसर[4] नलगे एकांता ॥ **राम**० ॥ २ ॥
एकांताची सोलिव गोडी सांगतां नये गोठीं ।
मीतूंपणा हिरोनियां मोहन पडली मिठी ।
सद्गुरुकृपें केशवराजीं अखंड होत भेटी ॥ **राम**० ॥ ३ ॥

## पद ७६८ वें.

सिद्ध जागता जगजोगी, आत्माराम निजयोगी[5] रे! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. निजलें. २. लीलेनें, सहज. ३. रिकामा. ४. वेळ, उशीर. ५. 'राजयोगी' असा अन्य पाठ.

शांती सुनारीचा राजा राजा रे! । आत्मा प्राणसखा माझा रे! ।
भाव सांडुनियां दुजा दुजा रे! । सहज करूं त्याची पूजा रे! ॥ सिद्ध० ॥ १ ॥
प्रेम घागरीयाचा घोळ रे! । पायीं गर्जे सर्वकाळ काळ रे! ।
नामें तोडी मायाजाळ जाळ रे! । घनानंद क्षेत्रपाळ रे! ॥ सिद्ध० ॥ २ ॥
ज्ञान डौंरे[1] साजे करीं करीं रे! । नैन पत्र शिरीं शिरीं रे ।
आत्मा पूर्ण चेराचरीं[2] रे! । शिंगी वाजे निरंतरीं रे! ॥ सिद्ध० ॥ ३ ॥
काम क्रोध दैत्य भारी रे! । बोध त्रिशूळेंचि मारी रे! ।
अंगीं विभूति निर्विकारी रे! । स्वामी अलक्ष वेषधारी रे! ॥ सिद्ध० ॥ ४ ॥
प्रकृति भाग श्रवण झांकी रे! । गाय स्वरूप तिहीं लोकीं रे! ।
नाचे उडे एकाएकीं रे! । किजे नमन ब्रह्मादिकीं रे! ॥ सिद्ध० ॥ ५ ॥
त्याला श्रवण मुद्रा योगी रे! । पुढें पाउल टाकी वेगीं[3] रे! ।
दावी फिरूनीं तीर्थें जगीं रे! । भगवें केलें दीनालागीं रे! ॥ सिद्ध० ॥ ६ ॥
देव सर्वी सर्वातीत रे! । गुणागुणीं विवर्जित रे! ।
आदिपुरुष सदोदित रे! । केले दास जीवन्मुक्त रे! ॥ सिद्ध० ॥ ७ ॥
दीननाथ दीनबंधु । महाराज दयासिंधु, ।
केशवस्वामी पूर्ण बोधू । त्याचे पायीं आम्हा बोधु बोधु रे! ॥ सिद्ध० ॥ ८ ॥

## पद ७६९ वें.

त्यासी अनन्य रिघतां शरण । मग पुढें कैचें जन्ममरण ॥ ध्रुवपद. ॥
सर्व सुखाचा दायक । गुरू[4] नभातीत पदनायक[5] ॥ त्यासी० ॥ १ ॥
जो निर्गुण स्वरुपें घडिला । निज भाग्यवंत जनीं जोडिला ॥ त्यासी० ॥ २ ॥
म्हणे केशव आमुचा स्वामी तो । नांदे सकळांच्या अंतर्यामीं[6] तो ॥ त्यासी० ॥

## पद ७७० वें.

ते म्यां देखिली विठाई[8] ऐशी ॥ ध्रुवपद. ॥
कटीं ठेवुनियां कर । उभी भिंवरेसमोर[7] ।
ब्रह्मादिकां अगोचर । न कळे पार वेदांसी ॥ ते म्यां० ॥ १ ॥

---

१. डमरू. २. स्थावर जंगमीं. ३. लवकर. ४. गुरु—अंधकारनिरोधक. 'गुशब्दस्त्वंधकारश्च रुशब्दस्तु निरोधकः । अंधकारनिरोधत्वाद्गुरुशब्दो निगद्यते ॥' [सौरपुराण—अध्याय ६८ श्लो० १०.] ५. नभांत (आकाशांत—स्वर्गांत) असलेल्या पदाचा (मोक्षाचा) स्वामी. ६. हृदयांत, मनांत. ७. भीमानदीसमोर. ८. पृष्ठ ४ टीप १ पहा.

तुम्ही धरा हो! मानसीं । अनंत भुवनें जिचे कुशीं ।
नामें जन्ममरण नाशी । पंढरपुरची विठाई ॥ ते म्यां० ॥ २ ॥
भाव देखोनियां दृढ । उद्धरिले जड मूढ ।
उगवी संसाराचें गूढ । ते धूर[1] पंढरिची ॥ ते म्यां० ॥ ३ ॥
जिच्या चरणींच्या[2] उदका । शिवें वाहिलें मस्तका ।
पार नकळे तिहीं[3] लोकां । ते देखा पंढरिये ॥ ते म्यां० ॥ ४ ॥
जिची भेट घ्यावयालागीं । शिणले सिद्ध साधक योगी ।
ते उभी चंद्रभागीं[4], । युगायुगीं पंढरिये ॥ ते म्यां० ॥ ५ ॥
तुळसीमाळ अथवा बेल, । घेउनि मुक्ती देतो शेलें[5]; ।
केशव म्हणे तिची गेल, । ध्यानें तुटे भवबंधन ॥ ते म्यां० ॥ ६ ॥

## पद ७७१ वें.

हृदया निर्गुण मूर्ति आली वो! बाई! ॥ ध्रुवपद. ॥
नामरूपातीत आनंद पिकला, ।
सहजीं सहज भेट झाली वो! बाई! ॥ हृदया० ॥ १ ॥
पूर्व पुण्यफळें संसाराच्या बळें, ।
संकल्पाचा केला त्याग गे! बाई! ॥ हृदया० ॥ २ ॥
त्याग भोगीं देव सांपडला पूर्ण, ।
सफल झाला ज्ञानयोग गे! बाई! ॥ हृदया० ॥ ३ ॥
बाहेर अंतरीं सर्व निरंतरीं, ।
देवचि दाटला पाहीं गे बाई! ॥ हृदया० ॥ ४ ॥
केशव म्हणे आतां मीपणालागीं[6], ।
निश्चयेंशीं ठाव नाहीं गे! बाई! ॥ हृदया० ॥ ५ ॥

---

१. श्रेष्ठ. २. गंगा. हिची उत्पत्ति विष्णूच्या पायांपासून आहे म्हणून हिला 'विष्णुपदी' असेंही म्हणतात. आणि विठ्ठलाचा सुद्धां 'पादारविंदीं जनित' म्हणण्याचा उद्देश हाच आहे. ह्याविषयीं मोरोपंतानें एके ठिकाणीं म्हटलें आहे:—'गंगेचा तेंवि जयश्रीचा प्रभुच्या पदांबुजीं उगम' [अष्टम स्तोत्ररामायण—गीति ५७ उत्तरार्ध]. अशा प्रकारचे उल्लेख पंतांच्या आणि इतर सर्वमान्य मराठी कवींच्या ग्रंथांतून फार आढळतात. ३. स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ या तीन लोकांत. ४. पृष्ठ ८ टीप ८ पहा. ५. शेलकी, उत्तम. ६. मीपणा=अहंकार, अहंभाव.

## पद[1] ७७२ वें.

दुनियाका[2] धंदा सारा छोड दिया भाई ! ।
ईख्त्यार[3] से नजर[4] बडे साहेब सों लाई ! ॥ ध्रुवपद. ॥
चटकिनी बाला देखो लटकती आवे ।
बोधका प्याला लेकर रहीम[5] बेशक[6] होकर गावे ॥ दुनि० ॥ १ ॥
निजानंद मदसुं भुली बिसर गयी काया ।
देहसें बिदेह भया अब कहां[7] की माया ? ॥ दुनि० ॥ २ ॥
मकर[8] बिना ख्याल करे हाल मस्त माई ।
शंकर गंज[9] आजि **के**शवराज प्रभूपायीं ॥ दुनि० ॥ ३ ॥

## पद ७७३ वें.

चटकी दांनी[10] और सुजानी[11] ल्यावे मेहेरबानी ।
चीर जरीना[12] पेहने[13] सुख साहेबकु पैछानी[14] ॥ ध्रुवपद. ॥
नाचती दरबार चटकी सांडि सब काम ।
बारबार[15] बोले **राम रहिम** येही नाम ॥ चटकी० ॥ १ ॥
साहेब मेहेर[16] धरे तब चटकी ख्याल करे ।
मुसलम[17] देह भाव बिसर उस[18] ख्याल में भरे ॥ चटकी० ॥ २ ॥
सद्गुरु पाया चटका ल्याया चटकी भई मस्त ।
कहत **के**शव उस म........................ ॥ चटकी० ॥ ३ ॥

## पद ७७४ वें.

काहांको पाप काहांको पूने[19] । हम तो भये है सुनमो सून[20] ॥ ध्रुवपद. ॥
काहांको काया काहांको माया । भावत नहीं निर्गुनमों गुन[21] ॥ काहां० ॥ १ ॥
आपही जगमों जगही आपमो । कोन लखे उन्मनमों मने[22] ॥ काहां० ॥ २ ॥
कहत **के**शव आपही आनंद । गगन मगनमों सबही सगन्[23] ॥ काहां० ॥ ३ ॥

---

१. येथपासून पुढील सर्व पदांत फारच अपपाठ आहेत, पण निरुपायास्तव तीं तशींच छापली आहेत. २. जगाचा. ३. सत्तेनें. ४. दृष्टी. ५. कृपाळू, दयाळू. ६. निःसंदेह. ७. देही होतें ती विदेही झालें. आतां माया कोठली? ८. कपटाशिवाय. ९. खजीना, सांठा. १०. दान करणारी. ११. शाहणी. १२. जुनें वस्त्र. १३. नेसून. १४. ओळखिलें. १५. वारंवार. १६. कृपा. १७. पूर्णपणें. १८. त्या. १९. पुण्य. २०. शून्यामध्यें शून्य. २१. निर्गुणामध्यें गुण असणें संभवत नाहीं. २२. उन्मनी अवस्थेंत मनाची भावना नष्ट होते. २३. शुभलग्न. आकाशवत निराकार स्थिति प्राप्त झाल्यावर शुभन शुभ होतें.

## पद ७७५ वें.

बच्चा! करले बिबेक । सबसें सबमों एक ॥ ध्रुवपद. ॥
अपने कल्पसे अपनी माया । [1]प्रपंच मृगजल देख ॥ बच्चा० ॥ १ ॥
देह वस्तीमें जीव शीव ये । नाना देव अनेक ॥ बच्चा० ॥ २ ॥
निर्गुणमो यह कछु नहीं भावे । कहत केशव [2]अलेख ॥ बच्चा० ॥ ३ ॥

## पद ७७६ वें.

बच्चा! [3]बाहेर मत देख । तूंही तूं अलेख ॥ ध्रुवपद. ॥
सबका लायीं सबमों तूंही । मायामों ये [4]भेके ॥ बच्चा० ॥ १ ॥
जीव शीव ये झूटमुट है । नाना देव अनेक ॥ बच्चा० ॥ २ ॥
कहत केशव सब [5]बेहकावे । [6]बेहजावे बिबेक ॥ बच्चा० ॥ ३ ॥

## पद ७७७ वें.

क्या करेगा मस्त । गुरु पगसें सब [7]दस्त ॥ ध्रुवपद. ॥
मन [8]थिरे पवनही हारे । गुन ये बिचारे [9]पस्त ॥ क्या० ॥ १ ॥
[10]चंचलसें सब चंचल होवे । [11]खोवे अपनी बस्त ॥ क्या० ॥ २ ॥
कहत केशव निष्ठा [12]जोंकी । तबही [13]जगतसें मस्त ॥ क्या० ॥ ३ ॥

## पद ७७८ वें.

झूटा तेरा तप रे! ब्रह्म न झूटा तेरा जप ।
भात रोटी गप, अतिथि सुर हैं [14]छॅप, तू क्या छूलवे [15]झँडप ॥ध्रुवपद.॥
[16]मुसें लेवे नाम अंदर भरो है काम ।
ऐसे बेफाम तुज कब मिलेगा राम? ॥ झूटा तेरा० ॥ १ ॥

---

१. 'इंद्रजालवत् प्रपंच सारा सुत वंध्येचा जैसा रे!' [त्र्यंबक–मागें पृष्ठ ६८ पहा.] २. 'अलेख' 'अलख' या नांवानें फकीर ईश्वरास हाक मारितात. ३. देहाबाहेर जगत. ४. भेष, भेक, भेख असें रूपांतर झालें. ५. वाट विसरविती. ६. वाहून जाईल. ७. गुरुचरणाशिवाय सर्व खालीं आहेत. ८. मन निश्चल राहत नाहीं व वारें जेथें शिरत नाहीं. ९. हार खातात. १०. चंचल वस्तूंपासून चंचलच वस्तू उत्पन्न होऊं शकतात; अचंचल वस्तु उत्पन्न होऊं शकत नाहींत. ११. खोना=घालविणें, खर्च करणें. १२. ज्याची. १३. जगाविषयीं बेपर्वा. १४. जप, तप इत्यादि करणें हे भातरोटी खाण्यासारखें सुलभ नाहीं. अतिथि (साधूसंत वगैरे) व सुर (देव) हे अदृष्ट आहेत. १५. तूं काय त्याला शिवशील–त्यांची बरोबरी करशील? १६. तोंडानें.

तनको लगावे खाक[1] मनमें है नापाक[2] ।
ऐसे कैलाख[3] हम देखे हेलाक[4] ॥ झूटा तेरा० ॥ २ ॥
बंदगी वक्त नहीं समजे बद बेख्त[5] ।
अंदर किया शक्त[6] अब क्यंव चढेगा वक्त[7] ॥ झूटा तेरा० ॥ ३ ॥
ईतबार नहीं दिल बहुत बंदगिमें ढील ।
ऐसा गाफिल हुवा साहेबसें बेदिल ॥ झूटा तेरा० ॥ ४ ॥
कहे केशवराज सुनो मेरा आवाज ।
सबको शिरताज[9] भजो गरीब नवाज[10] ॥ झूटा तेरा० ॥ ५ ॥

## पद ७७९ वें.

इसे पकड बे इसे पकड बे । नंगावता[11] जिसें तिसें ॥ ध्रुवपद. ॥
गांठी छोडा घरको आया । कर काम गेंज[12] पाया ॥ इसे० ॥ १ ॥
शुकको नंगा खुला किया । सुखमें[13] लढाय दिया ॥ इसे० ॥ २ ॥
अपने रंगो रंग जगावे । जगावेमें जग रंगावे ॥ इसे० ॥ ३ ॥
नारदको भी बाँजी[14] दिया । मन में गंडी[15] छीन करलिया ॥ इसे० ॥ ४ ॥
केशव [16]सांइ घरको आया । घरका खाविंद[17] [18]होके रहा ॥ इसे० ॥ ५ ॥

## पद ७८० वें.

आव बे मुंडे मीमरे[19] मुंडे मीले[20] मुंडे भाई ! ।
मनका मैले[21] धोकर मिले अस्सल[22] मुंडा वोही ॥ ध्रुवपद. ॥
शीर [23]मुंडे सुंब गुंडे हातमें कुतुक[24] ।
खोली[25] देशांतर फिरते मरते घरकी घरमें चूक ॥ आव० ॥ १ ॥

---

१. राख. २. अस्वच्छ. ३. कित्येक लक्ष. ४. मृत. ५. हतभागी, दुर्दैवी. ६. कठोर, ७. समय, वेळ. ८. भरंवसा. ९. मुख्य. १०. गरीबांचा कनवाळू. ११. नागवतो. [वाल्मीकिऋषीकडे कवीचा कटाक्ष असावा असें वाटतें.] १२. येथें 'गजेंद्रमोक्ष'कथेवर कवीचा कटाक्ष दिसतो. १३. शुकाला आजन्म ब्रह्मचारी ठेवून त्यास ब्रह्मानंदाचा लाभ दिला. १४. दगा. १५. नारदाच्या मनांत लग्न करून संसार करण्याची इच्छा झाली होती, ती श्रीकृष्णानें युक्तीनें नष्ट केली—अशी कथा आहे. [लघुकाव्यमाला—भाग १ आत्मारामकृत नारदीचरित्र—पृष्ठें ४८-५२ पहा.] १६. साधू. १७. स्वामी. १८. होऊन. १९. दुबळा, निर्बल. २०. भेट. २१. पाप. २२. खरा, श्रेष्ठ. २३. मुंडन केलेले, साधु सन्यासी. २४. कुबडी, काठी. २५. व्यर्थ, निरर्थक.

मूर मुंडे समाल मुंडे अपना नफा देख।
तेरा तुजकूं समज नहीं काहे को लेता भेक ॥ आव० ॥ २ ॥
या जिकीर बिना फकीर कहता गद्धे! तेरा काम।
सब गुन्हा[१] बकसीस किया बोल धनीका नाम ॥ आव० ॥ ३ ॥
खाली मुंडी चुप हलावे येतो मूने फेल।
कतरिके पांव धर हातसें मेन[२] मेल ॥ आव० ॥ ४ ॥
खबर धरो याद करो वैस्ताद[३]के पांव।
केशव कहत मिलावे उस शिर भो इंश्वर जाव. ॥ आव० ॥ ५ ॥

## पद ७८१ वें.

राम सुमरन[४] करना रे! बाबा!।
काम क्रोध मद मत्सर छांडो भवसागर तरना रे! बाबा! ॥ ध्रुवपद. ॥
खिनखिन[५] आयुख[६] पांवन[७] खसरत साधु समागम धरना रे! बाबा! ॥ १ ॥
गमनागमन निवारन हरिगुन गावत वैकुंठ चढना रे! बाबा! ॥ २ ॥
ग्यान ध्यान अघमलहरन मनमो दयानिधि भरना रे! बाबा! ॥ ३ ॥
कहत केशव अब आवेंगा मरन बिसरूं नको हरिचरना रे! बाबा! ॥ ४ ॥

## पद ७८२ वें.

लालन सुं मेरी प्रीत[८] जगी। जागत सोवत रामकि
मूरत देखति हूं ज्याहां ताहा खडी[९] हो! ॥ ध्रुवपद. ॥
साठ घडी मों श्यामकि बीसर। परंत[१०] नहीं मुकुं एक घरी हो!।
प्रेम नीर नयन बरखन लागे। लोकनमों सब लाज उरी ॥ १ ॥
कहा कहूं कछु कहत न आवे। शाम बदन नैन देख भुली हो।
केशवके प्रभु गिरि[११]धरनागर। चरन कमल वांके बिलग[१२] परी हो! ॥ २ ॥

## पद ७८३ वें.

अजि तो मै भूलि रह्योरी ॥ ध्रुवपद. ॥

---

१. सर्व अपराध माफ केला. २. हात व मन यांत मेळ असला पाहिजे, कृति व विचार यांत साम्य असलें पाहिजे, 'मनस्येकं वचस्येकं कृतिष्वेकम्' अशा रीतीनें वागलें पाहिजे. ३. गुरूचे. ४. स्मरण. ५. क्षणक्षण. ६. आयुष्य. ७. आयुष्य पायांखालून निसटत आहे. ८. प्रीति जडली. ९. उभी. १०. मला एक घटकाभर सुद्धां विसर पडत नाहीं. ११. हें पद मिराबाईकृत असावें असें वाटतें. १२. चिकटून.

अलख बनमें एक ज्योगी जो आया उन्हे मुजे बोधकि भांग दियोरी ॥१॥
शिरपर दोन्हों हात उतारे कान फुंक मोकुं गुंग कियोरी ॥ २ ॥
सुख दुःख भूक [1]प्यास न जानूं उन्मनीं मन मगन भयोरी ॥ ३ ॥
भेद अभेद बात बचन जो वृत्ती शून्य तहां कौन कह्योरी ॥ ४ ॥
केशवके प्रभु पूरन [2]कृपाकर आपन दोन्हों बिसर गयोरी ॥ ५ ॥

## पद ७८४ वें.

ज्याहां ज्याय तहां माधो है रे ! ।
सब सूरतमें सूरत वांकी सब घट भरिया सोही रे ! बाबा ! ॥ ध्रुवपद. ॥
धरनी आकाश सपत् [3]पाताल आपहि भरपूर रहे रे ! बाबा ! ॥ १ ॥
[4]खाली घर काहा कबहि न देखों देखूं सो सबही वोही रे ! बाबा ! ॥ २ ॥
कैसे करिये अब कहां ज्याइयें अंतर्बाह्य राजाराम भयो रे ! ॥ बाबा ! ॥ ३ ॥
केशव प्रभुबिन [5]पदारथ नहीं रे सबही [6]भेख आप धरियो रे ! बाबा ! ॥ ४ ॥

## पद ७८५ वें.

रघुपति ! दिनबंधु ! तुम कृपानिधी ! देवा ! ।
जननमरनहरन ! दिजे चरनकमलसेवा ॥ ध्रुवपद. ॥
अखिल निगम सार ज्योत सरुप निर्बिकारी ।
जड जिव जन तारनकूं सगुन [7]भेखधारी ॥ १ ॥
त्रिभुवनके नाथन मुनि जन के साईं ।
मंगल रूप ध्यान तेरा [8]करती हुं.................. ॥ २ ॥
भगत बत्सल जानकिपति केशवप्रभु.................. ।
कोटि चंदर [9]सुरज बदन उपरि .................. ॥ ३ ॥

## पद ७८६ वें.

नौबत बाजत है हरनामकी ।
अति मंद भई गति सकलहि कामकी ॥ ध्रुवपद. ॥
मनमें बैठी मूरत श्यामकी ।
फिरत दुहाई राजा रामकी ॥ नौबत० ॥ १ ॥

---

१. तहान. २. पूर्ण कृपाकर. ३. या सप्तपाताळांचीं नांवें:–अतळ, वितळ, सुतळ, रसातळ, महातळ, तळातळ आणि पाताळ. ४. रिकामें. ५. पदार्थ, वस्तू. ६. रूप. ७. रूपधारी. ८. हेंही मिराबाईकृत असावें किंवा निदान एखाद्या कवयित्रीनें केलेलें असावें. ९. सूर्य.

ध्यान भले हम किये अष्टजामकी[1] ।
मंगल चाकरी केशव गुलामकी ॥ नौबत०॥ २ ॥

## पद ७८७ वें.

ऐसी फकिरी नहींरे भाई येतो सालिम[2] बेशरमाई[3] ॥ ध्रुवपद.॥
चेलेके घर हात पसारे । दुनियांदारकुं[4] मानत प्यारे[5] ॥ ऐसी० ॥ १ ॥
में हरि लडके मनमें धरना । बाहेर निमाज रोज करना ॥ ऐसी० ॥ २ ॥
कान खोलकर केशव बोले । गाफिल अलबत खावे झोले[6] ॥ ऐसी० ॥३॥

## पद ७८८ वें.

तालि बजाऊं गाऊं हरिका नाम । और देव सूं नहिं रे! काम ॥ ध्रुवपद.॥
गलेमें तुलसी मन में राम । जित देखो तित रामहि राम ॥ तालि० ॥ १ ॥
अंदर राम बाहर राम । राम बिना खाली[7] नहिं रे ठाम[8] ॥ तालि० ॥ २ ॥
केशवप्रभु देखे पाये विश्राम । भगत बत्सल वोही रे! राजा राम ॥तालि०॥३॥

## पद ७८९ वें.

हार मुंडे हुपार मुंडे देख मुंडे भाई! ।
ढोंगी नजर देख बाबा! नजीक ईलाही ॥ ध्रुवपद. ॥
धमक[9] म्याने गमक मुंडे गमकमें चमक ।
चमक म्याने ज्योति मुंडे ज्योतीमे झमक ॥ हार० ॥ १ ॥
चंद्र सूरज[10] मंद जहां खीन[11] भये[12] तारे ।
सोहि आलख रूप बाबा! देख न्यारे[13] न्यारे ॥ हार० ॥ २ ॥
तेजबिना ज्योति मुंडे ज्योति बिन प्रकाश ।
रंग बिना रूप मुंडे रूप बिना बास ॥ हार० ॥ ३ ॥
आगे भरपूर मुंडे पाछे भरपूर ।
पूरा गुरु पाइया तो हारबरत्थदीदार ॥ हार० ॥ ४ ॥

---

१. आठ याम (प्रहर). २. अगदीं पूर्णपणें, खरोखर. ३. निर्लज्जपणा. ४. संसारी मनुष्याला. ५. प्रीय. ६. हिसके, झोंके, गटंगळ्या. ७. रिकामी. ८. जागा. ९. धमक—गमक—चमक ज्योति—झमक=आकाशांत मेघगर्जना झाल्यानें जी वीज चमकते तिचा लखलखाट. १०. संस्कृतशब्दांत 'य'कार असल्यास हिंदीभाषेंत त्याच्या जागीं 'ज'कार होतो. जसें:—जशोदा, (यशोदा) कारज, (कार्य) जमुना, (यमुना) इत्यादि. ११. क्षीण. १२. झाले. १३. निरनिराळे.

बहुत सौगंध[1] बाबा हम तो मुंडे हारे ।
कहत केशव गगन मगन सोही अल्लाके प्यारे ॥ हार० ॥ ९ ॥

### पद ७९० वें.

फकीर ऐसे मलंग फकीर ऐसे मलंग ॥ ध्रुवपद. ॥
संतनके संग । खावे चिद्बोधकी भंग । सदां आनंदमों दंग ॥ फकीर० ॥१ ॥
बोधके मैदान खडे । शम दम सो आन[2] लढे । आलखका तख्त चढे ॥ २ ॥
लिया संतनका दुमाल । उसें तुटे भवजाल । कहत केशव कंगाल[3] ॥फकी० ॥

### पद ७९१ वें.

कमलनयन निरख[4] नैयन[5] बिसर गयी धंदा ।
देहसें विदेह भयी देखति स्वानंदा ॥ ध्रुवपद. ॥
जमुनातीर भरन नीर श्यामसुंदर आयो ।
नाटक रूप देखत सखि! मन मेरा सुख पायो ॥ कमल० ॥ १ ॥
गोकुलमाह दिखत नहीं श्याम बिना कोयी ।
जीथतिथ नंदकुंवर[6] ज्याहां बिसर गयीं दोयी ॥ कमल० ॥ २ ॥
तन मन हर श्यामजिनें प्रीतिमें सोलायी[7] ।
केशवप्रभु मिलत रोमरोम[8] सुख पायी ॥ कमल० ॥ ३ ॥

### पद ७९२ वें.

तोही सखि मैं संतन की [9]चेरी ।
बहोत क्या बोलों बात [10]घनेरी ॥ ध्रुवपद. ॥
बोध बाहादर घरको लावूं । काम क्रोधको जेहर[11] पिलावूं ॥ १ ॥
त्रिभुवनमें आसन बाहूं । हृदयनिवासीका दरसन[12] पावूं ॥ २ ॥
चिंता वारूं ममता झाडूं । समता माईके पदरज[13] झाडूं ॥ ३ ॥
सहज समाधीकी शेज बिछावूं । केशव साईंसुं हिल मिल जावूं ॥ ४ ॥

### पद ७९३ वें.

पालेगा तो पाल दयाल! तुम ॥ ध्रुवपद. ॥

---

१. शेंकडों शपथा. २. येऊन. ३. गरीब, दीन. ४. पाहून. ५. डोळ्यांनीं. ६. नंदकुमार (कृष्ण). ७. निजविलें. ८. ज्याप्रमाणें आपल्या आंगावरील रोम (केश) मोजतां येत नाहींत त्याप्रमाणें अर्थात् अगणित, पुष्कळ. 'रोमरोम' या शब्दाचा उपयोग 'पुष्कळ' या शब्दाबद्दल हिंदीभाषेंत वारंवार करितात, जसें:—'मैं आपको रोमरोम धन्यवाद देता हूं.' ९. चेली. १०. पुष्कळ. ११. विष. १२. दर्शन. १३. पायधूळ.

तूंहि हमारा प्रान पियारा[1] । तुज बिगर नहिं ख्याल ॥ दयाल० ॥ १ ॥
दरसन लियै[2] मन मगन भयाजू । बिनस गया भवज्वाल ॥ दयाल० ॥ २ ॥
कहत केशवकवी तिहारे[3] भजनसें । जबतब रहूंगा खुशाल ॥ दयाल० ॥३॥

## पद ७९४ वें.

यौं अपेबीर वासुदेव बोले । जो आनंदमदसुं झुले ।
ज्यो ख्यालमें मिलकर खेले । वो जिवते मुंजसुं[4] मिले ॥ ध्रुवपद.॥
जिनें धनीकी बंदगी किया । जिनें भेदकूं गोपमाल[5] दिया ।
जिनें बोधका प्याला लिया । वो अपें बीर वासुदेव भया ॥यौं० ॥१॥
माबाप जोरु[6] बेटी लैरिके[7] । सब देखत लोग सरिखे ।
गुन गावत गुरु नरहरके । हम सेवक उस घरके ॥ यौं० ॥ २ ॥
ज्याकी ममता न्हाटक तराई । ज्याकी माया थी[8] सो मर गयी ।
जो अपकु समझा रही । दास केशवका साहेब[9] सोही ॥ यौं० ॥ ३ ॥

## पद ७९५ वें.

डर[10] चुकावे आब डर चुकावे ।
देवनका देव राजाराम दिखावे ॥ ध्रुवपद. ॥
संसार बैरी मेरा मार चलाया ।
गरीब नेवाज[11] रघुराज मैं पाया ॥ डर० ॥ १ ॥
कामक्रोध भेद लोभ काफर मुवा[12] ।
कहत केशवराज बडा आनंद हुवा[13] ॥ डर० ॥ २ ॥

## पद ७९६ वें.

हुशार दिवांने[14]! मेरा नांव रखाया ।
मेहेबूब[15] मेरा मुजे मुजमें दिखाया ॥ ध्रुवपद. ॥
अपने नजीक मुझे[16] आजी बुलाया[17] ।
दिलका उपर[18] मेरा मार चलाया ॥ हुशार० ॥ १ ॥
बंदगी सुं मन मेरा दुरी छुटाया ।
अब बेद की तूं याद कर भेद फटकाया ॥ हुशार० ॥ २ ॥

---

१. प्यारा, प्रिय. २. दर्शन घेतलें. ३. तुझ्या. ४. नमस्कार, प्रणाम. ५. गोपांत (एकांतवासांत) कोंडून ठेविलें, भेदभाव नष्ट केला. ६. बायको. ७. मुलगे. ८. होती. ९. धनी, स्वामी. १०. भय. ११. गरीबांचा कनवाळू. १२. मेला. १३. झाला. १४. वेड्या. १५. पुष्कळ. १६. मला. १७. बोलाविलें. १८. येथें 'कुफर' असा अन्य पाठ आहे. कुफर=पाखांड.

बोधका सरबत मुजे बहुत पिलाया ।
कहत केशवराज ब्रह्मानंद झुलाया ॥ हुशार० ॥ ३ ॥

### पद ७९७ वें.

हरिगुण गावत नाचूंगी ॥ ध्रुवपद. ॥
प्रममंदिरमें परमानंद सूं । श्यामकी कीरत बाचूंगी ॥ हरि० ॥ १ ॥
त्रिभुवननाथके संत उपासक । तनमन उनकूं बेचूंगी[1] ॥ हरि ॥ २ ॥
केशव सांइके चरन मिलकर । अद्वय सुखसें बोचूंगी ॥ हरि० ॥ ३ ॥

### पद ७९८ वें.

राजाराम बेचत साधुके दुकान[2] रे! ।
भरिया भंडार भरपूर निधान[3] रे! ॥ ध्रुवपद. ॥
संसार नामका बंधिया जोख । उघडपसारा सौदा रोख ॥ राजा० ॥ १ ॥
प्रेम मोल लेवे श्याम जोख देवे । उधारके बाट संत कबहू न जावे ॥ राजा० ॥ २ ॥
सब पोतेमां यहि भरिया सामान।केशव कहे तनु दियो लियो भगवान[4] रे!॥राजा०॥

### पद ७९९ वें.

हम तो निजानंद नगरीके बासी ।
काहां करे गंगा काहां करे कासी[5] ॥ ध्रुवपद. ॥
भजन पुजन किया निजपदवासी । जानत नहीं कछु बात लिभासी ॥ हम०॥१॥
कहत केशवकवी अंतर ध्यासी । नाम हमारा सहज संन्यासी ॥ हम०॥ २ ॥

### पद ८०० वें.

हरदम हरबखत मेरे राम कुंजमे । बाकी कुल बलादके ॥ ध्रुवपद. ॥
संतनके संग दंग प्रेमसों रह्या । फूकादर याच येहि बेदने कह्या ॥ हर० ॥१॥
भजनसों किया निजबसका नफा । बोधसें किया सब संसारका सफा ॥ हर०[6]॥२॥
महाजूजमें शामी जीवता मुवा । कहत केसोदास मेरा सिरताज[7] हुवा ॥हर०॥३॥

---

१. विकीन. २. हें पद मिराबाईकृत असावें असें आम्हांस वाटतें, पण हें पद श्रीरंगनाथस्वामी निगडीकर यांच्या संग्रहीं असलेल्या केशवस्वामीकृत पदांच्या वहींत मिळाल्यामुळें आम्हीही त्याचा संग्रह ह्याच कवीच्या नांवाखालीं केला आहे. ३. सांठा, भांडार. ४. 'भगवान्'शब्दाची व्याख्या आढळते तीः—'उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानामगतिं गतिम् । वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति ॥' म्हणजे,—सर्व स्थावरजंगमात्मक जगाचा उद्भव आणि नाश हे कसे होतात, जग आलें कोठून, जाणार कोठें, विद्या आणि अविद्या काय आहेत, हें सर्व जो जाणतो त्याला भगवान् म्हणावें. किंवा सकल ऐश्वर्य, धर्म अथवा वीर्य, कीर्ति, द्रव्य, ज्ञान, वैराग्य हीं सहा भगें ज्यास आहेत तो भगवान्. ५. काशी व गंगा यांची यात्रा मीं कोठें केली आहे? अर्थात् 'नाहीं' हें अपेक्षित उत्तर. ६. मेला. ७. श्रेष्ठ, शिरोमणि, अग्रणी.

# अनेककविकृत पदें, कटाव, लावण्या वगैरे.

## भाग पहिला.

## परिशिष्टें.

### १. पदांची सूची.


पदारंभ. पृष्ठांक.

**मुकुंदराजकृत पदें.**

उबगल्यें सासऱ्या आतां ... ... १
हे खुण अनुभवाची... ... ... २

**ज्ञानदेवकृत पदें.**

उन्मनी लागो नीज, ... ... ४
ऐसा गे! माय कैसा हा योगी? ... २
कसं रे! बोटानें दाखवूं तुला ... ७
कांव्याच्या अणिवर वसति तिन गांव ४
काय थांगुं तूतें बाई! ... ... ६
कृष्ण आळवा वय आळवा ... ११
गोड तुझें नाम विठोबा! ... ... १०
गोविंदु गे! माय गोपाळू गे! ... १३
चाल माझ्या विठो! तुम्ही आम्ही भेटों ५
दडदडदडदड दुडदुडदुडदुड ... १२
देखिला हो! हरि हा देखिला हो! १२
धर्म जागो देवाजीचा ... ... ७
फुगडी फु गे! बाई! ... ... ६
मज न गमे आणीक कांहीं ... १०
मन हें धालें मन हें धालें... ... ११
मोगरा फुलला मोगरा फुलला ... १०
विठाई कीटाई माझे कृष्णाई ... १०
विठोबा! मी कसा विसरूं ... ४
सावध होउनि बाई! ... ... ३
सोही कच्चा वे कच्चा वे ... ... ७
सोरी झालें जनीं ... ... ... ६
हमामा पोरा हमामा ... ... ११

**मुक्ताबाईकृत पदें.**

उलट उलट माघारा प्राण्या! ... १३
कां रे! अनाथबंधू! ... ... १५
निष्काम राम जपा रे! ... ... १४
भाव एक मी सद्गुरूची लेंक ... १५
व्यर्थ भुललासी काय राया! ... १४

**नामदेवकृत पदें.**

कुडी म्हणे आत्म्याला, ... ... १९
कृष्णा! राहें बा! उगला ... ... १७
गौळणी ठकविल्या ... ... १८
नव्हतंच कैसं झालं रे! ... ... १५
परब्रह्म निष्काम तो ... ... २१
मुक्ताफळी नथ नाकीं ... ... २०
राइएवढें पांखरूं दादा! ... ... २२
विठाई! सांवळे डोळसे! ... ... १७
विठोबा! चला मंदिरांत ... ... १७
सावध सावध रे, भजले रे! राजा २२

**जनाबाईकृत पदें.**

झडतो नामाचा चौघडा ... ... २५

| पदारंभ. | पृष्ठांक. |
|---|---|
| बाई गे! मीं लेणें ल्यालें ... ... | २३ |
| मज तारिं दयासागरा! ... ... | २५ |
| सुंदर माझें जातें ग! ... ... | २५ |

## एकनाथकृत पदें.

| पदारंभ. | पृष्ठांक. |
|---|---|
| अजकी एक झाले ... ... ... | ५८ |
| अरे कृष्णा! अरे कान्हा मनमोहना![1] | ४८ |
| अरे कृष्णा! अरे कान्हा! मनरंजन | ३६ |
| अरे! गाढवाच्या लेंका! ... ... | ५१ |
| अहो! रामाबाई ... ... ... | ४४ |
| आईचा जोगवा मागेन ... ... | ३५ |
| आई! मज म्हणशी अवगुणाचें ... | ५९ |
| आम्ही परात्पर जोशी ... ... | ४९ |
| आल्या पांच गौळणी ... ... | ३९ |
| आहा रे! दैवा काय हें करवीसी?... | ३७ |
| उठा जी! मायबाप ... ... | २९ |
| उठुनी प्रातःकाळीं ... ... ... | ४१ |
| एकना एक हजार वीरो ... ... | ६१ |
| ऐक ऐक तुं सखये! ... ... | ३६ |
| कर जोडुनि विनवितों तुम्हां ... | ५६ |
| कशी मी जाऊं वृंदावना ... ... | ३१ |
| कां रे! आमुची लां ... ... | ४० |
| कोलाटीण झाल्यें बाई! ... ... | ४५ |
| गाफल हुवा ... ... ... | ६१ |
| गुरुकृपांजन पायो मेरे भाई ... | ६० |
| गोधन चारावया जातो सारंगपाणी | ४२ |
| गोरस बेचन चल गोरी मथुरा ... | ६० |
| गोविंदु घ्या कोणी दामोदर घ्या गे! | ४० |
| गौळणी म्हणती यशोदेला ... | ३१ |
| छोडा तनधन गेहका काम ... | ६३ |
| जन कां निंदीना निंदीना ... ... | ३० |
| जय जगदंबे! ... ... ... | ४४ |
| जीवाचा काय भरंवसा? ... ... | ५८ |
| जाऊं दे रे! ... ... ... | ३२ |
| जोहार जी! मायबाप! ... ... | ४३ |
| जोहार मायबाप! जोहार मी मृत्यु | ४२ |
| जोहार मायबाप! जोहार मी विठ्ठल | ४२ |
| झालि संध्या, संदेह माझा गेला ... | २८ |
| डोई बोडुनि केली खोडी ... ... | ५८ |
| तें मन निष्ठुर कां केलें ... ... | ३३ |
| दत्तगुरु दत्तगुरु ... ... ... | ३० |
| दादा! या जनासी काय बा! झालें? | ५१ |
| देव कां हो! विटेवरि उभा उभा ... | ५७ |
| धन्य तोची जगीं ... ... ... | ५१ |
| धांव रे! धांव आतां ... ... | ३७ |
| धोंगडें माझें बोलणें ... ... | ४६ |
| नित्य नवा कीर्तनीं ... ... | ३५ |
| निंदक कामाचा कामाचा ... ... | २९ |
| परेस सद्गुरु राया रे ... ... | ३३ |
| पाण्या जातां तुम्ही ... ... | ४० |
| पंच तत्वका शोध करीयो... ... | ६१ |
| बा! रे! जन्मोनी केलेंस काय? ... | ३४ |
| बाळसंतोष बाबा! ... ... ... | ५६ |
| बंदे! हुशार रहना वे! ... ... | ६० |
| भजनविन धिग चतुराई ग्यान ... | ६२ |
| मजला वरिल सुभद्रा काय ... | २७ |
| मन रामीं रंगलें ... ... ... | २८ |
| मलंगु फकीर ऐसा ... ... ... | ६१ |
| मी आलों रायाचा जोशी ... ... | ५४ |
| येई पुंडलीकवरदायिनी ... ... | ३६ |
| येई हो छानाई ... ... ... | ५५ |
| येडका मदन तो केवळ पंचानन... | २७ |
| येथें कांहीं नाहीं लव गुरुचे पायीं. | ५३ |
| येथेंचि पंढरपुर ... ... ... | ५३ |

१. हें पद पुनः पृष्ठ ९४ यांत आलें आहे. हें एकनाथाचें किंवा तुकारामाचें असावें.

| पदारंभ. | पृष्ठांक. |
|---|---|
| राधे! राधे! राधे! राधे! घेई ... | ४० |
| राधे राधे राधे राधे मुकुंद मुरारी. | ५३ |
| राम मीठा लगा ... ... ... | ६० |
| रे कानोबा! सांग पां त्याचें नांव. | २९ |
| लंबोदर गिरिजानंदना ... ... | ५६ |
| वाऱ्यानें कुंडल हाले ... ... | ४० |
| वेधू लाविला गोविंदें ... ... | ३८ |
| श्रीपाद औदुंबरवासा ... ... | ३४ |
| सगुण चरित्रें परम पवित्रें ... | २७ |
| सम चरणींची शोभा ... ... | ५८ |
| संतांचा महिमा काय कोण ... | ३० |
| सरसर निर्गुणा तूं ... ... | ५० |
| सांगा बा! मारुती! ... ... | ३० |
| सांवळें सुंदर माझें लेंकरूं ... | ४८ |
| सौरी झालें सौरी सखे ... ... | ५४ |
| हिणवर बिजवर साजणी ... | ५२ |
| हुंडगी निघाली संसारा ... ... | ५७ |
| क्षुधित वनीं गोविंद वाइ गे! ... | २६ |

## त्र्यंबककृत पदें.

| | |
|---|---|
| उठीं उठीं उठीं उठीं चूडामणी ... | ६७ |
| कोण कुशीला प्रसवली ... ... | ६३ |
| जा वेगीं शरण गुरूशीं ... ... | ६४ |
| जिननें तुजकू पैदा कीया ... | ६८ |
| तारक तो जगदीश्वर ... ... | ६४ |
| तारि तारी हरि! दीन रे ... | ६३ |
| देवा! रे! माझी नको माया तोडूं | ६७ |
| दैत्यदानवकुलसंहारिके! ... | ६५ |
| नारायण हरी ... ... ... | ६६ |
| निर्भय अचल अभंग ... ... | ६४ |
| रामदर्शनासिं चला ... ... | ६४ |

| पदारंभ. | पृष्ठांक. |
|---|---|
| राम माझा धरिल कसा अभिमान. | ६५ |
| शुभांगे! तुला वराया ... ... | ६३ |
| षड्गुणतरुआराम ... ... | ६२ |
| सदया येईं उदारा रे! ... ... | ६४ |

## तुकारामकृत पदें.

| | |
|---|---|
| अति बरवंटा आली बाळा ... | ९१ |
| आज लद्रूं निरवान ... ... | ९६ |
| आतां तरी जाय जाय ... ... | ७५ |
| आनंदु रे! कि परमानंदु रे! ... | ७४ |
| आम्ही गोंधळी गोंधळी ... ... | ९० |
| उगला राहें न करीं चाळा ... | ९० |
| ऐक रे! विनंति ... ... ... | ९४ |
| ऐशा गोपिका त्या ... ... | ८४ |
| ऐसा कर घर आवे राम... ... | ९८ |
| कब मरूं पाऊं चरन तुम्हारे ... | ९७ |
| कलियुगीं विठ्ठल पद पहा ... | ७२ |
| कसि रे विट जोडली ... ... | ७२ |
| क्या कहुं नहि बुझत लोका ... | ९७ |
| क्या मेरे राम कवन सुख सारा ... | ९९ |
| क्या मेरे लाल कवन चुकी भई ... | १०० |
| कानया सामलो मारी वात ... | ९६ |
| कान्हारे! मनमोहना लाल ... | ९९ |
| काहे भुला धनसंपत्ती घोर ... | ९८ |
| काहे रोवे आगले मरना ... | ९८ |
| कां हो! तुम्हि निर्मल हरिगुण गाना? | ८१ |
| कोण कसी बनेल घटका ... ... | ७५ |
| खेळ खेलुनी निराळा राही ... | ७८ |
| खेळ ग! फुगडी फुगडी ... ... | ७८ |
| खेळत होतों सुरकवडी ... ... | ९३ |
| गजवदन सखा म्यां नमिला हो!... | ६९ |
| गस्त आली जागा लोकांनो! ... | ७७ |


१. हें पद बस्वलिंगकृत आहे. हें अपूर्ण आहे.

पाळणा असे टांगला । सांखळदंड नाहीं त्याला ।
त्यामध्यें सगुण बाळ घातला ॥ पद० ॥ २ ॥
आकाशामध्यें नार जन्मली । बापलेकांनीं भोगिली ।
पांचांनीं ती वर्णिली[1] ॥ पद० ॥ ३ ॥
ज्ञानदेव सांगे खूण । निवृत्तीच्या कृपें करून ।
ज्ञानेश्वराला ॥ पद० ॥ ४ ॥

## पद १३ वें.

अलक्ष अगोचर गोसांवी[2] । अलक्ष झाला सहजची ।
अलक्ष झालीसे दीप्ती निरंजनाची ॥ ध्रुवपद. ॥
अलक्ष निरंजनाचा प्रकाश । शिव तृतीयेचा अंश ।
शिवापासोनी चैतन्यु । चैतन्याचा ॥ अलक्ष०॥ १ ॥
त्या चैतन्याचे उदरीं । पुरुष जन्मला निर्धारी ॥
त्या पुरुषापासून सुंदरी । मूळमाया ॥ अलक्ष० ॥ २ ॥
त्या मूळमायेच्या पोटीं । ओंकार जन्मला शेवटीं ॥
ओंकारापासून जगजेठी । महारुद्र तो ॥ अलक्ष० ॥ ३ ॥
त्या महारुद्राच्या तेजीं । विष्णु जन्मला सहजीं ॥
त्या विष्णुकमळामाजी । जाण विधाता ॥ अलक्ष० ॥ ४ ॥
त्या विधात्यापासून । पिंड ब्रह्मांड जाण ॥
ज्ञानदेवा सांगितली खूण । निवृत्तिरायें ॥ अलक्ष० ॥ ५ ॥

## पद १४ वें.

धुतांच मोतीं जळीं हरपलें सखोल मोठें पाणी ।
चला पाहूं सहा चार अठरा जणी ॥ ध्रुवपद. ॥
प्रपंच धोंडा, मृगजळ पाणी, आपटीत होतें चोळी ।
विसरलें सूख घसरलें तळीं ॥
सखे! मायेनें मोतीं दडविलें भवसिंधूचे जळीं ।
होती गडे भ्रांति बहिण जवळी ॥
तिनेंच मजला गोष्टी विनविल्या चित्त गेलें भुलोनी ॥ चला० ॥ १ ॥
आठ जणींनीं मोतीं दडविलें, वर ठेविला धोंडा ।
अशाच पाहती अवघ्या रांडा ॥

१. 'पर्णिली' असा अन्य पाठ आहे. २. इंद्रियस्वामी.

बारा सोळा तळीं उतरल्या, त्यांनीं धरिला दांडा, ।
ठाऊक सत्रावीला झेंडा ॥
त्या गर्दीमध्यें गर्क मी झालें येकलीच बाई! वनीं ॥ चला० ॥ २ ॥
चवघी जणी सत्वर मिळुनी डोळीं अंजन घाला ।
माझ्या मोत्याला प्रेमें न्याहाळा ॥
ज्ञानबोधाची लावून दिवटी बरवी वात उजळा ।
माझे मोत्याला सर्व कळा ॥
प्रपंच पडदा फाडुन गुरुपदीं लागावें ठिकाणीं. ॥ चला० ॥ ३ ॥
चौघी जणी मोक्षनायिका मजला धरा हातीं ।
उतरा सागर पैल पथीं ॥
या मोत्याच्या साठीं मजला जाणें आहे सती ।
म्हणून मीं येतें काकूळती ॥
ज्ञानदेव म्हणे चिन्मय मोतीं न मिळे गुरुवांचोनीं ॥ चला० ॥ ४ ॥

**पद १५ वें.**

उठिं उठिं बा गोपाळा! । उघडीं स्वरूप लोचना ।
सरली अवघी रात्री । उदय झाला रविकिरणा. ॥ ध्रुवपद. ॥
प्रबोध पाहांट झाली सरलें तिमिरज ।
गुरुकृपेचे असणी पाहातां सुरंग समतेज. ॥ उठि० ॥ १ ॥
दृश्य भासणें चांदणियां दिसती लोपलिया ।
देहबुद्धिचे कुमुदें[1] मोमुनि गेलीसे विलया ॥ उठि० ॥ २ ॥
वैराग्याचे रश्मिचित्तें द्रविला रविकांत ।
प्रगटे ज्ञानाग्नि विपय वणवा जाळित ॥ उठि० ॥ ३ ॥
तृष्णेचीं श्वापदें पळत सुटलीं अद्भुत ।
लटकें हें मृगजळ परी मूढ भ्रमित ॥ उठि० ॥ ४ ॥
इंद्रिय गोधनें नेई निर्गुणा! वना ।
सुटलीं मन वासुरें तुजविण नाकळती कान्हा[2] ॥ उठि० ॥ ५ ॥
वागविधाचे उलुकें रिघती मौन्याचे ढोलीं ।
विकल्पाचा वाडा साही चोर सांडिले ॥ उठि० ॥ ६ ॥
सर्व वासना सोडुनि उदमी जाला पैं नर ।
वासना वेसनेचा येणें त्यजिला व्यापार ॥ उठि० ॥ ७ ॥

---

१. कमळें. २. 'कोणा' असाही पाठ आहे.

योगविद्येच्या पंथें साधक चालसि केली ।
उपनिषदाचे अर्थें शब्द करिती कोकिळा ॥ उठिं० ॥ ८ ॥
म्हणे **ज्ञा**नदेव योगी झालासे स्थीर ।
**नि**वृत्तीप्रसादें समाधि सवेग सार ॥ उठिं० ॥ ९ ॥

**पद १६ वें.**

सव घट देखो माणिक मौला । कैसे न कहू मै काला धवला[1] ।
पंचरंगसे न्यारा[2] होई । लेना एक और देना दो ॥ ध्रुवपद. ॥
निर्गुण ब्रह्म भुवनसे न्यारा । पोथी पुस्तक भये अपारा ।
कोरा कागद पढकर जाय । लेना एक और० ॥ १ ॥
अलख पुरुप मै देखा दृष्टि । कर भाउन समार मुष्टि ।
छाटामे कछु न होय । लेना एक और० ॥ २ ॥
खलखदिया त्रिनिका । तिरते तिरते **य**म न थका ।
इस पार पावे न कोयी । लेना एक और० ॥ ३ ॥
निर्गुन दाता कर्ता हर्ता । सब जुग वनमो आपहिता ।
सदा सर्वदां अचल होई । लेना एक और० ॥ ४ ॥
निर्गुन सागर आथक पसारा । वाको तरग सकल संसारा ।
उद्भिज प्रलय वातो होय । लेना एक और० ॥ ५ ॥
सप्तहि सागरशायी कर्ता । धरती जो कागद लिखो पंडिता ।
एक अक्षर पडेन कोय । लेना एक और० ॥ ६ ॥
कहे **ज्ञा**नदेव मनमो धरियो । सप्तहि सागर अगो धरियो ।
पिंडमे आवे जावे कोय । लेना एक और० ॥ ७ ॥

## ३. श्यामसुंदरकृत पदें.

**पद १७ वें.**

मन माझें **रा**मपदीं जडलें ॥ ध्रुवपद. ॥
माशी मधासिं लुब्धुनि राहे । या न्यायें गमलें ॥ मन० ॥ १ ॥
कमळिणीशीं भ्रमर जैसे । सुगंधा भुललें ॥ मन० ॥ २ ॥
**श्याम**सुंदर जिवलग म्हणे । **रा**मपदीं मन रमलें ॥ मन० ॥ ३ ॥

१. शुभ्र, पांढरा. २. निराळा, अलग.

### पद १८ वें.

प्राण्या! तूं ऐसा व्यापार करीं।
जेणें मुदला नये हारी[1] ॥ ध्रुवपद. ॥
पंढरीपेंठेशीं घातलें, विठ्ठल सौदागरी आले, संत।
शेटे पुंडलिक कउला दिला खेप आली नामवस्त ॥
ग्राहक भक्त तिथे जन येती तागडी घेऊनि सत्य।
मनाचा विसार देऊनि मग ते मापाशीं बैसले संत ॥ प्राण्या० ॥ १ ॥
भक्तिप्रेमभावें भरितां भरोनी वस्तूनें अभर झाला।
तव तेची वस्तूची तुरतुर झाली, नफा लक्षगुण आला, ॥
एकेचि खेपेनें दारिद्र फिटलें जन्मोजन्मीं भाग्य त्याला।
भांडवल ज्याचें पैसे वित्त होतें त्याचाची व्यापार झाला ॥प्राण्या०॥२॥
तयाचे देखो वेगीं अभक्त गेले नाहीं पदरीं संचित नाणें।
व्यापार करितां तोटाची आला, तस्करीं लुटिलें [2]केणें ॥
नफ्यासहित मुद्दल गेलें, अधीक झालें ऋण।
........................................ ॥ प्राण्या० ॥ ३ ॥
........................................ ।
धन्य धन्य संचीत पूर्व पुण्य म्हणवुनी हा जन्म झाला प्राप्ती ॥
खरें खोटें येथें निवडोनी घ्यावें, आली हरिभक्ती।
श्यामसुंदर जिवलग बोले असत्य नावडे चित्तीं ॥ प्राण्या० ॥ ४ ॥

### पद १९ वें.

रामचंद्र महाराज। जय जय रामचंद्र महाराज ॥ ध्रुवपद. ॥
[3]द्रुपदसुताकू चीरें[4] बढायो। कियो भक्तनके काज ॥
राजा बभीखन[5] लंका पाये। बडे गरीब नेवाज[6]. ॥ राम० ॥ १ ॥
दैत्यकुमरका[7] मान, राखियो। गजेंद्र पशुकी लाज ॥
गणिका[8] पतित उधारे। किये भक्तनके काज. ॥ राम० ॥ २ ॥
सुदामजीने चुडवे[9] दिये। वांकू[10] किये सिरताज[11] ॥
नाम तुम्हारे यहि एक जानो। तालबिना पखवाज. ॥ राम० ॥ ३ ।

---

१. तोटा, तूट. २. व्यापाराचा माल. ३. द्रौपदीला कृष्णानें वस्त्रें पुरविलीं ह्या कथेवर कवीचा कटाक्ष आहे. ४. वस्त्रें. ५. बिभीषण. ६. त्राता, स्वामी. ७. प्रऱ्हादाचा. ८. पिंगळा. ९. पोहे, चिवडा. १०. त्याला. ११. श्रेष्ठ.

श्यामसुंदरकू तुमबिन कोउ । [1]नहीं और न जी रघुराज ! ॥
दो कर जोरे बिनति करत हूं । राखो मेरी लाज. ॥ राम० ॥ ४ ॥

---

## ४. [2]कृष्णदासकृत पदें.

### पद २० वें.

सांवळिया राधारमणा ! । कां नये दीनाची करुणा ? ॥ ध्रुवपद. ॥
किती अंत पाहसी सदया ! । मनमोहन यादवराया ! ।
कशी निष्ठुर केलीस माया । मी शरण आलों तव पायां ॥
येई झडकर [3]पन्नगशयना ! । कां नये दीनाची करुणा ॥ सांव० ॥ १ ॥
देवा ! कृपासिंधु म्हणविसी । अजी क्रूर कां हरी ! मजविशीं ।
मां [4]पाहि हरी ! [5]हृषिकेशी ! । हा पतित दीन अघराशी ॥
धांव वेगीं [6]कंजलोचना ! । कां नये दीनाची करुणा ॥ सांव० ॥ २ ॥
बहु जन्म संसृति फेरा । चौऱ्यायशीं गणित येरझारा ।
मोहोजाळ, ममताभंवरा । मज ओढिती तृष्णा[7]विवरा ॥
कर दया ! मुरलीवादना ! । कां नये दीनाची करुणा ॥ सांव० ॥ ३ ॥
तारिले अजामिळ [8]गणिका । ध्रुव वाल्मिक गजेंद्र गुहका ।
त्यांहून मी पतीत हो कां । परि तारी आतां [9]विधिजनका ! ॥
किती आळवूं भक्तभूपणा ! । कां नये दीनाची करुणा ॥ सांव० ॥ ४ ॥
दीनबंधू हें नाम साचें । वर्णिती [10]आगम श्रुति वाचे ।
आजी सत्य करी ब्रीदाचें । माउलीपण कृपेचें ॥
कृष्णदास लोळे चरणा । कां नये दीनाची करुणा ॥ सांव० ॥ ५ ॥

### पद २१ वें.

कृष्णा ! धांव गड्या ! मनमोहना ! । कां नये माझी करुणा ॥ ध्रुवपद. ॥
दीन अनाथ मी कंसारी ! । तारीं आतां भवपुरीं ॥

---

१. येथें 'नहीं' व 'न जी' अशी द्विरुक्ति कवीनें स्वाभिप्रायदार्ढ्यास्तव केली आहे असें मानलें पाहिजे. २. हा कवि जयरामस्वामी वडगांवकर यांचा गुरु होता. याचें लग्न एका न्हाव्याच्या मुलीशीं गफलतीनें लागलें होतें. [भक्तलीलामृत–अध्याय ५०.] ३. शेषशयना ! ४. माझें रक्षण कर. ५. हृषिक+ईश=इंद्रियस्वामी. ६. कमलनयना. ७. विवर=बीळ. ८. वेश्या (पिंगळा). ९. हे विष्णु ! कृष्णा ! १०. वेद.

श्यामसुंदरा! श्रीहरी! । मर्दी षड्रिपु[1] वैरी ॥
तुजवांण कोण त्राता पुतनारी! । ये सत्वर झडकरी ॥
पाहसी अंत किती गिरिधारी[2]! । छळिती दुर्जन वैरी ॥
मां पाहि आतां कृपाघना! ॥ कृष्णा! धांव गड्या० ॥ १ ॥
पतीतपावन हें ब्रिद आतां । सोडी मदनताता[3]! ॥
वर्णिती श्रुतिस्मृति अनंता! । रुक्मिणीच्या कांता[3]! ॥
देवा! घालीं उडी भगवंता! । वत्सालागीं माता ॥
तुजविण कोण मला उद्धरिता । सांग कृपावंता! ॥
अंकीं घेई मला मधुसूदना! ॥ कृष्णा! धांव गड्या० ॥ २ ॥
करुणासागरा! हरी! दयाळा! । मनमोहन कृपाळा ॥
पापी तारियलें अजामिळा । गज गणिका अहिल्या शिळा ॥
स्मरतां द्रौपदी अबळा । पावलासि घननीळा! ॥
प्रल्हाद उपमन्यू ध्रुव बाळा । स्थापिशी पदीं अढळा ॥
चाल लौकरी रिपुदमना! ॥ कृष्णा! धांव गड्या० ॥ ३ ॥
केशवा! अनंता! श्रीरंगा! । मुनिजनमानसभृंगा[4]! ॥
अचळ अद्वय अभंगा । पावें पांडुरंगा! ॥
घेई झडकरि [5]ओसंगा । निरसीं संसृतिदंगा[6] ॥
देई निशिदिनीं[7] सत्संगा । कृष्णदास भणंगा[8] ॥
दे ठाव अक्षयी निजचरणा ॥ कृष्णा! धांव गड्या० ॥ ४ ॥

**पद २२ वें.**

धांव रे! दत्तराया! सह्याद्रिवासी अत्रितनया! ।
त्रिविध तापें तापलों मी करा कृपेची छाया ॥ ध्रुवपद. ॥
चौऱ्यायशीं लक्ष योनी फेरे फिरलों देवा! ।
भवसागर खळ भारी, अंत न लागे जिवा ।
यांतुनि काढीं आतां येऊं दे हृदयीं कणवा[9] ।
षड्रिपु जळचरी यांणीं मांडिला दावा, ।
आतां येई झडकर, नको करूं निष्ठुर माया ॥ धांव० ॥ १ ॥

---

१. काम, क्रोध इत्यादि षड्रिपु. २. गोवर्धनगिरिधारी. ३. कृष्णा. ४. भ्रमरा! ५. मांवर. ६. संसार. ७. रात्रंदिवस. ८. गरीबाला. ९. दया.

तुजविण मज कोणी नाहीं आसरा त्रिभुवनीं ।
काका, मामा, बंधु, बहीण, तूंचि जनक जननी ।
कृपादृष्टीं पाहीं आतां कुळंबिण[1]बाळालागोनी ।
पतीतपावन हें नाम गर्जे वेदवाणी ।
दीनानाथ जाणोनीयां येईं त्वरें देवराया ! ॥ धांव० ॥ २ ॥
निर्गुण निर्विकार निरंजन रहिवासी ।
भक्तजन तारावया सद्गुणरूपातें धरिसी ।
त्रैमूर्ति होउनियां स्वच्छंदें वि[2]चरसी ।
भागीरथी स्नान संध्या, गंध लावी पंढरीसी ।
कोल्हापुरीं भिक्षा घेउन भोजन पंचगंगे ठाया ॥ धांव० ॥ ३ ॥
दिव्य रूप सुंदर कांति, मा[3]थां शोभे जटाभार ।
शंख चक्र गदा पद्म कर्णीं कुंडल मकराकार ।
वैजयंती वनमाळा, कासे शोभे पीतांबर ।
कोटी रविसम तेज मुगुट दिसे तेजाकार ।
[4]अतसिकुसुमसम दिसे सुंदर काया ॥ धांव० ॥ ४ ॥
माहुरगडीं निद्रिस्थ मेरूशिखरीं आसन ।
जप तप ध्यान मुद्रा सहन ।
लीळा ज्याची पूर्ण स्मरगामी दर्शन ।
ऐसें पहा दैवत हें नाहीं त्रिभुवनीं आन ।
कृष्णदास अनन्य भावें लागे श्रीगुरुद[5]त्तपायां ॥ धांव० ॥ ५ ॥

## पद २३ वें.

काय करूं वो बाई ! हृदयीं । व्यापिली विठाई ॥ ध्रुवपद. ॥
मावळली विषयांची चिंता देहीं । देह विदेहीं ।
[6]श्रवणीं नयनीं वदनीं । मनाशिं न रुचे कांहीं ॥ काय० ॥ १ ॥
प्रापंचिक व्यवहारीं असतां । हिंडे दिशा दाही ।
बसतां उठतां येतां जातां । कोठेंही मन नाहीं ॥ काय० ॥ २ ॥

---

१. कुळंबी याचा अर्थ येथें फक्त हीन, नीच असा समजावा. २. फिरसी. ३. मस्तकावर. ४. जवसाच्या फुलाप्रमाणें. अतसि=जवस. ५. या पदांत दत्तात्रयाची दिनचर्या, वसतिस्थान इत्यादिकांचें वर्णन आहे. ६. कानांनीं.

कृष्णदास करुणाकर[1] जननी । निज भक्तां सुखदाई[2] ।
सुख त्याहुनी सद्गुरुभजनीं । रत मानस हें निज ठाईं ॥ काय० ॥ ३

## पद २४ वें.

मना! नरहरि गुरुपद भज रे! । दृढ धरी रे! ।
मोह त्यज किती रे! । धन सुत देह गेहें[3] ॥
माया रे! जाया रे! । भ्रमें भुलला रे! ॥ ध्रुवपद. ॥
सकल जीव जंतु देवादिक । इच्छिति दुर्लभ ऐशी ।
प्राप्त नोहे पुन्हा रे! । मानवी काया रे! ॥ मन० ॥ १ ॥
प्रपंचीं सत्यत्व मानोनि वृथा शीण । धरिसी अनित्य हे ।
स्वप्नापरिही मिथ्याचि[4] । जाइल वांया रे! ॥ मन० ॥ २ ॥
देहाभिमान त्यागोनि भक्ति ज्ञान । विरक्ति साधिसी जरी ।
कृष्णदासा असि । त्वरें करिल दया रे! ॥ मन० ॥ ३ ॥

## पद २५ वें.

येउनियां नरदेहा प्राण्या! शोध करीं अपुला ।
सद्गुरुचरणा शरण जाउनि चुकवीं जन्म झाला. ॥ ध्रुवपद. ॥
कोण मी कैंचा कोठून येणें जाणें हें पाहीं ।
विचार करुनि हृदयमंदिरीं आत्मसुखें तूं राहीं ।
एक एक योनी कोटी फेरे भोगुनियां महीं ।
मानव देह हा तुला मिळाला पुण्य प्रवाहीं ॥
चाल ॥ भोगिल्या योनी नव लक्ष जळचरीं ।
दशलक्ष दुर्घट पक्ष्यांभीतरीं[5] ।
कृमी कीटिका[6] अकरा विंशती स्थावरीं ।
तीस पशू, चार मानव[7] झाले तरी ॥
टीप ॥ गणतिला चौऱ्यायशीं लक्ष बेरिज प्रचित[8] पहा तूं वहिला ॥ येउ० ॥ १ ॥
पाप पुण्य हें समान जेव्हां ब्राह्मण हा जन्म ।
तुला मिळाला शेवट याचे चुकवीं जन्म मरण ।
दुर्धर माया धन सुत जाया[9] बंधु[10] ही बहीण ।
'माझे माझे' म्हणसिल, अंतीं देतिल टाकून ॥

---

१. दयेची खाण. २. सुख देणारा. ३. घर. ४. खोटी. ५. भीतरीं=मध्यें. ६. किडे. ७. मनुष्य. ८. अनुभव. ९. बायको. १०. भाऊ.

चाल ॥ देह नाशिवंत पाण्याचा बुडबुडा ।
व्यर्थचि कां भुललासि रे! मूढा! ।
आप्तसोयरे[१] पायीं बेडी खोडा ।
करीं विवेकें जाईं संतापुढां ॥
टीप ॥ सद्गुरूपदासी मिठी घालुनि तोडीं पाशाला ॥ येउ० ॥ २ ॥
[२]पंचभूतात्मक पिंड पसारा दुर करुनी सारा ।
महावाक्याचा विचार करुनी फिर तूं माघारा ।
त्रिगुणात्मक दुस्तर गुंती उगवी हा दोरा ।
चौदेहांचा निरास करुनी घे आत्मपदीं थारा ॥
चाल ॥ **'त्वंपद' 'तत्पद'** निजगुज हें कानीं ।
तूं **'असिपद'** भाव लीन भोगी उन्मनीं ।
तुम्हीं अनन्य भावें लागा गुरुचरणीं ।
मग सहजचि दैवत जाइल नाशोनी ॥
टीप ॥ कृष्णदास हा सद्गुरुकृपें नाशी [३]संसृतिला ॥ येउ० ॥ ३ ॥

**पद २६ वें.**

**'दत्तात्रय'** चतुरक्षरी मंत्र जपतां निजवदनीं ।
ऋद्धि सिद्धी द्वारीं तिष्ठती अखंड निजसदनीं ॥ ध्रुवपद. ॥
**द**श दिशा व्यापक योगी हा सच्चिदानं**द**, ।
**द**श इंद्रियें चालक, चराचरीं असोनी निर्द्वं**द** ।
**दं**ड कमंडलु त्रिशूल माळा करीं कमलमकरं**द**, ।
**द**र्शनमात्रें भक्तालागीं देतो निजप**द** ।
**द**याळ पतितपावन नाम गणती अठरा पुराणीं. ॥ **द**त्ता० ॥ १ ॥
**ता**त अत्रीऋषी, अनसूया मा**ता** ।
**ता**रिसी शीघ्र भक्तजनांशिं देउनि अनन्य**ता** ।
**ता**पस[४]वृंद निशिदिनीं ध्याती **द**त्त अवधू**ता** ।
**ता**त्काळचि भेट देशी जैशी कनवाळू मा**ता** ।
**ता**रक रक्षक किति मी वर्णूं गर्जे वेदवाणी ॥ **द**त्ता० ॥ २ ॥
**त्र**यमूर्ति होउनी **द**त्त विचरे स्वतं**त्र** ।
**त्र**यलोकीं गमन ज्याचें जाणती सर्व**त्र** ।

१. विचार. २. आप, तेज, वायु इत्यादि. ३. संसारास. ४. वृंद=समूह.

त्रयतापहारक नाम जगीं पवित्र ।
त्रस्त[1] पाहुनि शरणागता तारिसी क्षणमात्र ।
तृषित चकोर देखुनि इंदुपीयूष[2] दे वदनीं ॥ दत्ता० ॥ ३ ॥
यदुरायाशीं ब्रह्मबोध हा केला अद्वय ।
यउनि भागिरथीं स्नान करिती दत्तराय ।
या स्वरूपाचा अगाध महिमा वर्णूं मी काय? ।
यक मुखें किति मी वर्णूं? शेष थकित होय ।
यकात्मभावें कृष्णदास हा शरण तव चरणीं[3] ॥ दत्ता० ॥ ४ ॥

**पद २७ वें.**

पुंडलीकें रचिली पेठ[4] । भूवैकुंठ. ॥ ध्रुवपद. ॥
वैकुंठाहून श्रीहरी । आले चंद्रभागातीरीं ।
कर ठेवुनि कटावरी । सम पद नीट ॥ पुंडलीकें० ॥ १ ॥
दिव्यरूप मनोहर । कांसे शोभे पीतांबर ।
गळां वैजयंती हार । माथां मुगुट ॥ पुंडलीकें० ॥ २ ॥
कौल दिधला पुंडलिकानें । 'या रे! या रे!' अवघे जन ।
नामसौदा[5] भरा तेणें । करावी लूट ॥ पुंडलीकें० ॥ ३ ॥
दिंड्या पताकांचे भार । वैष्णव मिळाले अपार ।
करिती नामाचा गजर । कलकलाट ॥ पुंडलीकें० ॥ ४ ॥
ऐसा थाट नाहीं कोठें । देव उभा उभीं भेटे ।
खळा तात्काळ पाझर फुटे । सद्गदीत कंठ ॥ पुंडलीकें० ॥ ५ ॥
सर्व गोकुळिंची रचना । संगें घेउनी यादवराणा ।
गोपाळपुर वसविलें जाणा । सुंदर हाट[6] ॥ पुंडलीकें० ॥ ६ ॥
आषाढी कार्तिकी महा पर्वणी । सुरवर येताती धांवोनी ।
अठ्यायंशीं सहस्र ऋषिमुनी । मिळाला थाट ॥ पुंडलीकें० ॥ ७ ॥
नाम ब्रह्म हें पंढरी । कर्म ब्रह्म काशीपुरी ।
ओढ्या जगन्नाथ नगरी । अन्न ब्रह्म स्पष्ट ॥ पुंडलीकें० ॥ ८ ॥

---

१. दुःखित. २. चंद्राचें अमृत. ३. या पदांतील प्रत्येक पंक्तीच्या आदिम व अंतिम स्थानीं तेंच अक्षर योजून कवीनें साहजिकपणें चमत्कृतिजनक अक्षररचना केली आहे. ४. हें पंढरपुरक्षेत्राचें वर्णन केलें आहे. ५. नामरूप सौदा. 'सौदा' हा शब्द फारसी आहे. ६. बाजार.

उत्तम नरदेह पावुनी । पांडुरंग पाहवा नयनीं ।
ऐसें दैवत त्रिभुवनीं । नाहीं कोठें ॥ पुंडलीकें०.॥ ९ ॥
विनवी कृष्णदास सकळांशीं । धरा निश्चय मानसीं ।
ठाव देइल चरणांशी । सन्निध निकट ॥ पुंडलीकें० ॥ १० ॥

### पद २८ वें.

औदुंबरवासी मज । तारि तारि हो! ॥ ध्रुवपद. ॥
श्रीभीमाकृष्णातटीं । संगमिं राहूनि निकटीं ।
दासाचें सर्व भय । वारि वारि हो? ॥ औदुंबरवासी० ॥ १ ॥
पोटशूळ महा व्याधी । भूत प्रेत समंधादी[१] ।
आर्तिसमयीं दंड त्यासी । मारि मारि हो! ॥ औदुंबरवासी० ॥ २ ॥
विनवी दासानुदास । हरवी संसारत्रास ।
कृष्णदास भाविकास । तारि तारि हो! ॥ औदुंबरवासी० ॥ ३ ॥

### पद २९ वें.

तुजला मी शरण श्रीपादराज ।
बुडतों भवसिंधूमाजी तारीं तारीं राखीं लाज ॥ ध्रुवपद. ॥
भोगियलें सुख दुःख पाप पुण्यें करोनियां ।
नाना योनीं फिरोनियां नरदेहीं आलों आज ॥ तुज० ॥ १ ॥
[२]दीपपतंगाचेपरी संसाराची प्रीति भारी ।
तव भक्ति सोडोनियां विषयाची करी काज ॥ तुज० ॥ २ ॥
तापत्रय वडवाग्नीनें पोळलों[३] मी नरहरी! ।
कृष्णदास दीनावरी कृपा करी महाराज ॥ तुज० ॥ ३ ॥

### पद ३० वें.

दत्तात्रया! श्रीपाद नरहरी ।
तारी रे! भक्तकाजकैवारी ।
सर्वार्थदायी दीनाची आई त्वरें कृपा करी ।
धांवें पावें झडकरी । भस्म अंगीं त्रिशूळधारी ॥ ध्रुवपद. ॥
गजेंद्रासी नक्रें धरियलें सरोवरीं ।

---

१. पिशाचादि. २. पतंग (टोळ). दिव्याच्या लोभानें दिव्यावर झडप घालतो आणि अखेरीस प्राणास मुकतो त्याप्रमाणें संसारप्रीति अंतीं हानिकारक आहे. ३. भाजलों.

स्मरतां घेउनि चक्र आलासि करीं ।
उद्धार करुनि नेलें वैकुंठासी तेणें परी ॥ दत्तात्रया० ॥ १ ॥
प्रल्हादासि गांजितसे परोपरी ।
प्रगट होउनि स्तंभीं दैत्यातें[1] मारी ।
आठवुनि ब्रिद ऐसें भक्ताभिमान धरी ।
तेणें परि धांवे पावें झडकरी ॥ दत्तात्रया० ॥ २ ॥
द्रौपदिचीं वस्त्रें फेडी दुःशासन दुराचारी ।
राखियली लाज तिची सभेमाझारी ।
प्रीतीनें सतत कृष्णदासाचें पाळण करी ।
तेणें परि धांव झडकरि ॥ दत्तात्रया० ॥ ३ ॥

### पद ३१ वें.

मनीं श्रीपाद आठवा । धरुनि श्रद्धा रेंति[2] भक्तिभावा हो! ॥ ध्रुवपद. ॥
होता निर्गुण निर्विकार । झाला सगुण साकार ।
भक्तां प्रेमें निर्धार । त्याशि आवडे भोळी सेवा हो! ॥ मनीं० ॥ १ ॥
'गुरुचरित्र'[3] कामधेनू । पठणीं ज्याचा नित्य नेमू ।
त्याची होइल पूर्ण कामू । म्हणोनियां त्वरें गावा हो ! ॥ मनीं० ॥ २ ॥
हरुनि सकल आपदा । नेइल आपुलिया पदा ।
कृष्णदासा छंद सदा । दासासाठीं केला धांवा हो! ॥ मनीं० ॥ ३ ॥

### पद ३२ वें.

मोरया! तुला कशी माझि दया नाहिं रे! ॥ ध्रुवपद. ॥
या भवतापें बहुत मी तपलों । चरणीं ठेवियली डोई रे! ॥ मोरया० ॥ १ ॥
भार्यासुतादि[4] मोहिं गुंतलों । मुक्त करीं लैंवलाहीं[5] रे! ॥ मोरया० ॥ २ ॥
कृष्णदास हा गुरुकृपेनें । आवडिनें नाम तुझें गाई रे! ॥ मोरया० ॥ ३ ॥

### पद ३३ वें.

गगनिं घडड घैन[6] गरजे ।
चमचमात चमकतसे चैंपला[7] व्रजजन कांपे ।
थर थर थर थर वाजे ॥ ध्रुवपद. ॥

---

१. हिरण्यकशिपूस. २. थोडीतरी, किंचित्. ३. या नांवाची पोथी. ४. स्त्रीपुत्र वगैरे. ५. लवकर, शीघ्र. ६. मेघ, ढग. ७. वीज.

मथुरा गोकुल व्रज वृंदावन।
जलमय होउनि बुडे सकल जन।
उन्मळोनी तरुवर खालीं पडती ।
वायु सुटला सणणणणण भर भर भर भर वाजे ॥ गगनिं० ॥ १ ॥
इंद्र कोपला महा भयंकर मुसलधारी पर्जन्य वर्षतो।
.................................................. ।
अडखळोनि गोप गाई पडति धरणी।
नाद घुम घणणणणण घड घड वाजे ॥ गगनिं० ॥ २ ॥
त्या समयीं स्थूल गिरी गोवर्धन।
नखाग्रीं उचलुनि धरी सकल जना।
कृष्णदास करित नमन अर्पण।
शिव शिव शिव शिव हर हर हर हर गिरिजेश्वर ॥ गगनिं० ॥ ३ ॥

## पद ३४ वें.

पाई मन ठेवीं रामपाई ॥ ध्रुवपद. ॥
वेंचिलें[1] आयुष्यनाणें। जोडिलें विषयसुख तेणें।
न सरे येणेची जाणें। पडशील अपायीं ॥ पाई मन० ॥ १ ॥
अपवित्र देह जाण। अविद्येचे जाण पण।
श्रीहरिभजनावीण। सोडुनियां देई ॥ पाई मन० ॥ २ ॥
कृष्णदासप्रभुविण। येथें तुझा सखा कोण।
तुला श्रीरामाची आण[2]। विचारुनि पाहीं ॥ पाई मन० ॥ ३ ॥

## पद ३५ वें.

न्हाणी न्हाणी त्या निर्मळातें न्हाणी।
गंगा चरणीं त्यावरि मी घालीं पाणी।
भाव नंदची, हे भक्ति यशोदाराणी।
न माय गगनीं[3] पायावरी चक्रपाणी हो ! ॥ ध्रुवपद. ॥
ज्याच्या स्नेहें देहबुद्धिविरहित केलें।
ज्याच्या स्नेहें देहाचें मीपण गेलें।

---

१. खर्च केलें. २. शपथ. [आज्ञा=आण. याचा अर्थ शपथ असा कालांतरानें झाला.]
३. आकाशांत.

ज्याच्या स्नेहें मन तन्मय होऊनि ठेलें ।
त्याचे मस्तकिंन्नें जावळ माखि तेलें हो! ॥ न्हाणी० ॥ १ ॥
ज्याची प्राप्ति नोहे नाना अनुष्ठानें ।
सर्वथाही न लभ्य या कष्टानें ।
ज्याचे श्वासीं वेदाचीं अधिष्ठानें ।
त्याचें नासिक उजळीतें आंगुळ्यानें हो! ॥ न्हाणी० ॥ २ ॥
ज्याचे स्मरणें दोषी वैकुंठासी जाती ।
ज्याच्या ध्यानें शिव लाभे पर विश्रांती ।
ज्यातें स्तवितां ते वेद मौनें ठाती ।
त्याचें भाळीं लाविती निज चरणाची माती हो! ॥ न्हाणी० ॥ ३ ॥
कृष्णदासप्रभु पुत्रातें अवलोकीं ।
मीपण नेऊनि उपदेश केला सेखीं ।
वृत्ति बोलतां चालतां मूकी ।
त्या कृष्णाचे न्हाणुनि कान फुकी हो! ॥ न्हाणी० ॥ ४ ॥

**पद ३६ वें.**

हरि म्हणे गडियांतें । हात पुसा घोंगडियांतें ।
ऐसें बोलतां कानया तें । सर्वेही ते मानवती ॥ ध्रुवपद. ॥
पेंधा बोले वचन । तरी यमुनेसि जाइन ।
जीवन अगत्य सेवीन । आपुल्या करें करोनियां. ॥ हरि० ॥ १ ॥
मग पेंधा त्या अवसरा । वेगें आला यमुनातीरा ।
न्याहाळूनि पाहे बरा । विवसी कोठें म्हणोनि ॥ हरि० ॥ २ ॥
तों यमुनाजीवना खळाळ । कानीं पेंधा ऐके तुंबळ ।
घोंगडी खालीं ठेवी तात्काळ । जाळीमाजी अवळिला. ॥ हरि० ॥३॥
पेंधा म्हणे यमुनेसी । तूं बायको होऊनी आम्हांसी ।
हमामा आजि घालिसी । कैसी तगसी पाहूं आतां? ॥ हरि० ॥ ४ ॥
जरी मी कृष्णदास असेन सत्य । तरी तुज करीन शांत ।
म्हणवूनि हमामा त्वरित । मांडियला यमुनेसी. ॥ हरि० ॥ ५ ॥

---

१. स्थानें. २. पापी जन. ३. अंतीं. ४. मान्य करिती. ५. पाणी.

## पद ३७ वें.

रमाकांत न ये मी वो! सये! काय करूं ॥ ध्रुवपद. ॥
दूर करुनि चंदनासि । दावि नंदनंदनासि ।
शशीकळा गमती रोग, नको सजणि भांग भरूं. ॥ रमाकांत० ॥ १ ॥
श्रम मनिं बहु दाटताति । युगसम पळ वाटताति ।
म्लानवदन चंद्र नको दर्पणासी आणि धरूं. ॥ रमाकांत० ॥ २ ॥
नवस करुनि चंडिकेशिं । दावि मला हृषिकेशी ।
कृष्णदास विरहसिंधु सांग सखे! केंवि तरूं. ॥ रमाकांत० ॥ ३ ॥

## पद ३८ वें.

जसोमतसुत नंदलाला । बृजकी गैल डोले. ॥ ध्रुवपद. ॥
पीतांबर कछनि कास ग[1]व्वनके संग जात ।
फेट मुरलि मुगुट शीस बैस बैन बोले. ॥ जसो० ॥ १ ॥
ग्वालबाल संग लिये अंग अंग जोरे ।
हात लकुटि दुधकी मटकी सखियनसो जोरे. ॥ जसो० ॥ २ ॥
वृंदावन कुंज जात गावत हरि कृष्णदास ।
या छबी कुछ कहि न जात रसनामृत थोरे. ॥ जसो० ॥ ३ ॥

## पद ३९ वें.

बाजिराव महाराज अर्जी ऐकतो बायकांची ।
चल गडे! जाऊं पुण्याशी, हौस मोठी माझ्या मनचीं ॥ ध्रुवपद. ॥
या चैत्रमासीं आनंद करा हळदी कुंकु गौरीचें, ।
नार गेली ग! वाड्यांत इनें भेट घेतली खाशाची ।
चाल ॥ या नारिनें जाऊन कसा लाविला लाग? ।
पति अमुचे घरीं बसले कांहीं रोजगार सांग ।
हा सर्वस्वीं देह केला अर्पण करुनि आण तुमची. ॥ बाजिराव० ॥१॥
अर्जी करुनियां, पतिची चाकरी केली हुजुरीची ।
दिली एक अबदागीरी घोडी बसाया बरोबरीची ।
भरजरी दिला पोषाख दिली शालजोडी कलाबतुची. ।

१. गौळ्यांबरोबर.

चाल ॥ कधिं नित्य जाई पालखींत बसून ।
कधिं नित्य येइ जरतार पितांबर नेसून ।
दिले हातीं हात सर दोन दोर गुलजार ।
कानिंचे कर्णफुल पाचूचे हिरवे चार ।
नाकियाची नथ जोडी उंच मोलाची ॥ बाजिराव० ॥ २ ॥
श्रावणमासीं दाटि पुण्यामधें नागपंचमीची ।
शुक्रवारपेठेंत बसुनि हाजिरी घेतो बायकांची. ।
चाल ॥ काळी सांवळी गोरीचा तोरा फार ।
उभे रस्त्यानें चालले पहा जोडव्याचें ठणकार ।
जशी ज्याची योग्यता पाहुनि पैठवण करि तीची ॥ बाजि० ॥ ३ ॥
नारिच्या बलावर साधुनियां दरबार ।
कोट्यानकोटी द्रव्य मिळविलें हे फार ।
[1]कृष्णदास म्हणे ऐशा स्त्रिया घरोघरी [2]असती ॥ बाजिराव० ॥ ४ ॥

---

## ९. मुक्ताबाईकृत पदें.

### पद ४० वें.

असत्य न बोलों तोंडें रे खेळया ! ॥ ध्रुवपद. ॥
मुंगीनें [3]मेदिनी धरियली माथां, वायूची बांधली मोट ।
सशानें सिंह फाडुन खादला, तिळान फोडिली लाठ ॥ असत्य० ॥ १ ॥
शीतानें सूर्य बांधला पायीं, चंद्रासि झोंबला ताप ।
गाईनें व्याघ्र फाडियला, तेणें बेडकें गिळिला साप ॥ असत्य० ॥ २ ॥
वाळुचीं वेंटीं थोट्यानें वीणली, तोंडाळ झालें मुकें ।
पांगुळ चढला गिरिच्या माथां, गगनीं फोडिलें टांकें ॥ असत्य० ॥ ३ ॥
वांझेच्या पुत्रानें उदीम केला [4]कुंपान खादलें शेत ।
स्त्रीविणें पुरुष बाळक व्याला, पुरला तयाचा अंत. ॥ असत्य० ॥ ४ ॥

---

१. हा कृष्णदास कोणी दुसरा असावा. २. ह्या पदांत कवीनें शेवटील 'बेहिमती' व 'नामर्द' बाजीरावाच्या कारकीर्दींत नट्यापट्या करणाऱ्या बायकांचा वरचष्मा कसा असे हें दाखविलें आहे. ३. पृथ्वी. ४. कुंपणीनें, आवारानें.

मुक्ताबाई म्हणे गुरुपुत्रा! आम्हीं बांधली गगनीं वाट ।
सकळ ब्रह्मांडें घेउनि हातीं भरिला त्याचा घोट ॥ असत्य० ॥ ५ ॥

### पद ४१ वें.

वाह्वा साहेबजी! सद्गुरुलाल गुसाई जी! ॥ ध्रुवपद. ॥
लालबिचमों उदीला काला औंठ पीटसों नीला ।
पीत उन्मनी भ्रमर गुंफा रस झुल बाबा ॥ वाह्वा० ॥ १ ॥
सहस्त्रदलमों डलखलीखाये आजलों परमाना ।
जहां तहां साधू दसवा आप ठिकाना ॥ वाह्वा० ॥ २ ॥
सद्गुरु चेले दोनो बराबर येक दसमों भाई ।
एकसे ऐसे दरसन पायो महाराज मुक्ताबाई ॥ वाह्वा० ॥ ३ ॥

---

## ६. नामदेवकृत पदें.

### पद ४२ वें.

पहुडावें कान्हा! कमलदललोचना । शयनीं शयन करावें जी! ॥ ध्रुवपद. ॥
जाइ जुइ सेवती मोगरा मालती । कोमाइल्या[1] पुष्पयाति[2] जी! ॥ पहु० ॥ १ ॥
सहस्त्रफणी[3] तिष्टत उभा । देहा चीज रचुनियां जी! ॥ पहु० ॥ २ ॥
इंद्रादिक देव तिष्टत उभे । आज्ञा द्यावी जायाशीं ॥ पहु० ॥ ३ ॥
रुक्मिणीसहित करावी निद्रा । नयन कोमावले जी! ॥ पहु० ॥ ४ ॥
देव आले निज मंदिराशीं । आज्ञा द्यावी नामयाशी ॥ पहु० ॥ ५ ॥

### पद ४३ वें.

येईं हो! विठ्ठले! माझे माउलिये! ।
निढेंळावरि[4] कर ठेवुनि वाट मी पाहें. ॥ ध्रुवपद. ॥
आलीया गेलीया हातीं धाडीं नीरोप ।
पंढरपुरीं आहे आइबाप. ॥ येईं० ॥ १ ॥
पिंवळा पीतांबर कैसा गगनिं झळकला ।
गरुडावरि बैसोनी कैवारी आला. ॥ येईं० ॥ २ ॥

---

१. कोमेजल्या. २. पुष्पांच्या जाति (प्रकार). ३. शेष. ४. कपाळावर.

विठोबाचें राज्य आम्हां नित्य दिवाळी।[1]
विष्णुदास नामा जिवें भावें ओंवाळी. ॥ येई० ॥ ३ ॥

### पद ४४ वें.

'पतितपावन'[2] नाम ऐकुनी आलों मी द्वारा।
पतितपावन न होसी म्हणुनी जातों माघारा. ॥ ध्रुवपद. ॥
सोडीं देवा! ब्रीदें[3] आतां न होसी अभिमानी।
पतितपावन नाम तुजला ठेवियलें कोणीं? ॥ पतित० ॥ १ ॥
घेसी तेव्हां देसी ऐसा अससी उदार।
काय देवा! रोधूं तुमचें कृपणाचें द्वार? ॥ पतित० ॥ २ ॥
उच्छिष्टाचें सीत देवा न टाकिसी बाहेरी।
कोणी दिधली भगवंत तुजला भूषणाची थोरी? ॥ पतित० ॥ ३ ॥
नामा म्हणे बा! तुमचें नलगे मज कांहीं।
प्रेम असों द्या, हृदयीं तुमचे आठवीन पायीं. ॥ पतित० ॥ ४ ॥

### पद ४५ वें.

गोविंदा! रामा! नरहरी! ॥ ध्रुवपद. ॥
बाबा! अहंकार[4] निशि घनदाट। गुरुवचनासी फुटली फांट[5]।
माता भक्तीचे भेटली वरवंट। तिनें मार्ग दाखविले चहुंकडे ॥ गो० ॥ १ ॥
एक शब्द स्पष्ट बोलावा। वाचे 'हरी हरी' म्हणावा।
संतसमागम धरावा। तेणें ब्रह्मानंद होय आघवा. ॥ गो० ॥ २ ॥
आला शीतळ शांतीचा वारा। तेणें सुख झालें शरीरा।
सुटल्या पातकाच्या धारा। कळिकाळासीं भय धरा. ॥ गो० ॥ ३ ॥
अनुहात वाजवा टाळ। अनुक्षिर गीत रसाळ।
अनुभव तन्मय सकळ। नामा म्हणे केशव कृपाळु गा[6]. ॥ गो० ॥ ४ ॥

### पद ४६ वें.

गडे! हो! राजा कीं रे! झाला। कृष्ण सिंहासनीं बैसला. ॥ ध्रुवपद. ॥
पांवा मोहरी घोंगडी। आम्ही खेळों यमुनाथडी।
कृष्ण आमुचा कीं रे! गडी। यमुनेच्या पैलथडी ॥ गडे० ॥ १ ॥

---

१. 'पंढरपुरीं आम्हा नित्य दिवाळी' असा अन्य पाठ. २. पातकी जनाला पवित्र करणारा. ३. लौकिक. ४. गर्व. ५. 'वाट' असाही पाठ आहे. ६. ध्या, भजा.

टाकुनी काळा कांबळा । कांसे पीतांबर कसिला[1] ।
आतां काय बागुलभय त्याला । ............... ॥ गडे० ॥ २ ॥
खेळों हुतूतू हुंबरी । थडका हाणों टीरीवरी[2] ।
हा तों चालिला दळभारीं । आमुचे यशोदेचा हरी ॥ गडे० ॥ ३ ॥
तुम्हीं आम्हीं संगें जेवूं । गाई वळावया जाऊं ।
याच्या मानेंत बुक्या देऊं । आतां जवळि जातां भिऊं ॥ गडे० ॥ ४ ॥
नामा म्हणे चला जाऊं । जवळि जाऊनि उभे राहूं ।
पायां पडोनि मागुनि[3] पाहूं । जनीं वनीं कृष्णजी पाहूं ॥ गडे० ॥ ५ ॥

## पद ४७ वें.

कैसी हो ! केली देवा ! । ठकवूनि दीनाची सेवा ॥ ध्रुवपद. ॥
पहा जगाची जी आई । जिचें नांव रखुमाबाई ।
तिनें पाणी आणावें काई । कुंभारीण होउनीयां ॥ कैसी० ॥ १ ॥
देवा ! गरुड तुमचें वहान । पक्ष्यांमाजी इंद्र जाण ।
त्यानें गाढव होऊन । माती आणावी काई ॥ कैसी० ॥ २ ॥
जळो जळो हा संसार । कर्म बळिवंत दुस्तर ।
शिणविला रुक्मिणीवर । नामा म्हणे भक्तिनें ॥ कैसी० ॥ ३ ॥

## पद ४८ वें.

विठ्ठलाचा धर्म जागो । तयाच्या चरणीं लक्ष लागो ॥ ध्रुवपद. ॥
या जंबुद्वीपामाजी एक पंढरपुरगांव ।
धर्माचें नगर तेथ विठोपाटील त्याचें नांव ॥ तयाच्या० ॥ १ ॥
भाव आणि भक्तिचा जेणें गुंफिला झेला[4] ।
विठ्ठल दातयाच्या घरा उचित नेला ।
उचित पाहुनियां जन्म वेगळा केला. ॥ तयाच्या० ॥ २ ॥
सुदामा ब्राह्मण थोर दारिद्रें पीडिला ।
मूठभर पोह्यांसाठीं हेमपुरी पावला. ॥ तयाच्या० ॥ ३ ॥
नामा म्हणे देवराया ! आम्हां[5] तारीं श्रीहरी ! ।
तुजवीण कोण काया धांवूनि येईं बा ! सत्वरी. ॥ तयाच्या० ॥ ४ ॥

---

१. बांधिला. २. कटिपश्चाद्भागावर, कुल्यावर. ३. 'वांटा मागूं' असा अन्य पाठ. ४. गुच्छ.
५. 'आतमा' असा अन्य पाठ आहे.

## पद ४९ वें.

धांव रे! पांडुरंगा । भक्ताचिया अंतरंगा ॥
पाव रे! संकटीं बा! । गोरोबाच्या प्रसंगा. ॥ ध्रुवपद. ॥
गोरोबा भक्त तुझा । माती तुडवितां पाहीं ॥
तुझिया नामस्मरणें । भान देहाचें तें नाहीं ॥
एकुलता एक पुत्र । नकळत तुडविलाही ॥ धांव० ॥ १ ॥
एकुलता एक पुत्र । तुडवितां निमाला[1] ॥
संतान बुडालें गा! । तुज स्मरतां विठ्ठला! ॥
लाज ही कोणाची बा! । गेली राखीं ब्रिदाला[2] ॥ धांव० ॥ २ ॥
कीर्तनीं नामदेव । हांका मारी विठ्ठलाला ॥
गोरोबाच्या कांतेची । दया येऊं दे तुजला ॥
झाली कृपा नामा म्हणे । पुत्र रांगतचि आला ॥ धांव० ॥ ३ ॥

## पद ५० वें.

ते मुंगी उमगा[3] ते मुंगी उमगा । मुंगीचे मुखीं त्रिवेणी गंगा ॥ ध्रुवपद. ॥
उदकाचे ढवळे मशीची वाती । तेथें अंधारी मुंगीनें लाविली ज्योती ॥ ते० ॥ १ ॥
अवघें आकाश मुंगीये मागें । मुंगीनें संसार सांडिला मागें ॥ ते० ॥ २ ॥
विष्णुदास नामा मुंगीये मागें । मुंगी उमगली खेचरसंगें[4] ॥ ते० ॥ ३ ॥

## पद ५१ वें.

पांच पोळ्या सात भाकरी । दीड कानूला अर्धी पुरी ।
माझी हिरुनी नेली सिदोरी । कानोबा निवडी आपुलीं गोधनें ।
काडी हुडकून[5] गोधनें ॥ ध्रुवपद. ॥
कानोबा वोढाळ तुझ्या गाई । उभ्या न राहती कदंबा छाई ।
उड्या घेती यमुना डोहीं । आम्हाला रागें भरेल तुझी आई ॥ का० ॥ १ ॥
परियेसी शारंगधरा । तुझा बैल चुकला मोरा ।
सांगूं गेलों तुझिया घरा । तुझा पाठी लागला म्हातारा ॥ का० ॥ २ ॥
परीयेसी हृषीकेशी । गाई दुभल्या दूध पिसी ।
वत्सें प्यालीं म्हणुनी सांगसी । उद्यां तक्र नाहींच आम्हांसी ॥ का० ॥ ३ ॥

---

१. मृत्यु पावला. २. लौकिक. ३. ओळखा. ४. विसोबा खेचर हा नामदेवाचा गुरु त्याच्या संगतीनें. ५. शोधून, तपास करून.

नामा म्हणे शेषशायी । तूंची बाप तूंची आई ।
आम्हीं वत्सें तूं गाई । येऊनी अखंड हृदयीं राहीं ॥ का० ॥ ४ ॥

## पद ५२ वें.

कुतना! थमाल ले! थमाल अपुल्या गाई ॥ ध्रुवपद. ॥
'कुतना! थमाल ले! थमाल अपुल्या गाई ।
आम्हि दातों ले! आपल्या घलास दातों भाई! ।
येथें यायाता आमचा इलाज नाहीं ।
तुजी थंगत ले! थंगत कलली भाई! ॥ कुतना० ॥ १ ॥
तुम्ही थोलल्या पातलाचे लेंक ।
मला म्हनता ले! जाई गाई लाख ।
तुम्हामधीं ले! मी आहें गलीब एक ।
किती मी धांवूं ले! कांता लागला पायीं. ॥ कुतना० ॥ २ ॥
काली पिवली ले! गाय आहे तानेली ।
या या गवल्याची धवली गाय पलाली ।
मदला बघून ले! गवली तो माला माली ।
काती कामली हिसकून घेतली साली. ॥ कुतना० ॥ ३ ॥
काल बलाचि ले! बलाचि खलवस केला ।
[1]तुम्ही अवध्यांनीं फाल फाल घेतला ।
मी निपजत ले! म्हनुनी थोलका दिला ।
तूं म्हणसिल ले! याला कलत नाहीं कांहीं ॥ कुतना० ॥ ४ ॥
यमुनातीलीं ले! नित कलिती आंघोली ।
म्हणतां मजला ले! आणी सिदोली ।
कईंची आनुं ले! वरन आनि भाकली ।
माजा * * * ले! काम आइकतो भाई!' ॥ कुतना० ॥ ५ ॥
कृष्ण म्हणे, 'रे! उगा राहिं बोबड्या! ।
तुझ्या गाइ रे! मीच वळवितों गड्या! ।
नाहींतर धाडिन रे! गोपाळांच्या जोड्या' ।
नामा म्हणे, 'रे! गोष्ट रो[2]कडी पाहीं.' ॥ कुतना० ॥ ६ ॥

---

१. 'गूल घालुनी बलाच गोल केला' असाही पाठ आहे. २. खरी.

## पद ५३ वें.

करितों जोहार करितों जोहार । मी संतघराचा महार. ॥ ध्रुवपद. ॥
विवेकनाइक आमचें नांव । निर्गुणपुर हें माझें गांव ।
बसवी पंचभूतांचा ठाव । रस्ते चार रस्ते चार ॥ मी संत० ॥ १ ॥
आत्मधनी हा पाटिल बाबा । मनाजी प्यादा चालवी गावा ।
बुधोजीशेटी बळकट बरवा । घरांत बैसलीसे आवा ।
खेळवी पोर खेळवी पोर ॥ मी संत० ॥ २ ॥
कौल शत वर्षांचें मूल । तीनशें साठ बहात्तर कूळ ।
कामाजी देशमुख सबळ । क्रोधाजी देशपांड्या खळ ।
नेणे सरकार नेणे सरकार ॥ मी संत० ॥ ३ ॥
शेवटीं नारी तुमची धड । पडेल चौऱ्यांशीचा कोड ।
अंतीं जीवाजीशी सांकड । सांगतों खरें सांगतों खरें ॥ मी संत० ॥ ४ ॥
हिशेब पडेल जव सरकारी । येईल यमाजीची स्वारी ।
धरोनि जिवाजी कारभारी । देतील मार देतील मार ॥ मी संत० ॥ ५ ॥
आवडी राखा मजवरी हेत । मी तंव करीन तुमचें हेत ।
संतसंगीं लावीन चित्त । नामया सार नामया सार ॥ मी संत० ॥ ६ ॥

## पद ५४ वें.

कान्होबाची संगती ब्रह्मादिक इच्छिताती धन्य ।
आम्हा म्हणती । आलललल रे! ॥ ध्रुवपद. ॥
अजगर मारिला वणवा गिळिला, ।
गोवर्धन उचलला । अबबब रे! ॥ का० ॥ १ ॥
मामा मारुं गेलासी । आपटले गजासीं; ।
मल्लयुद्ध खेळशी. । हुतुतुतु रे! ॥ का० ॥ २ ॥
पूतनेशीं शोषिलें । नारदा मोहीलें, ।
गणिकेशीं तारिलें. । अहाहाहा रे! ॥ का० ॥ ३ ॥
गवळ्यांच्या घरीं जाशी । दुग्धलोणी खाशी, ।
त्यांच्या सुना तूं भोगिशी. । छीछीछीछी रे! ॥ का० ॥ ४ ॥
मुरली घेउनी सत्वरी । जाशी यमुनेतीरीं, ।
वाजवीशी नानापरी । रुणझुणरुणझुण रे! ॥ का० ॥ ५ ॥

यमुनाडोहीं पोहतां । काळिया सर्प तेथें होता, ।
नाचतसे त्याचे माथा । थै थै थै थै रे! ॥ का० ॥ ६ ॥
गोपी गेल्या स्नानाशीं । वस्त्र वृक्षीं ठेवीशी, ।
नागव्या त्यांना नाचविशी. । अरे रे रे रे! ॥ का० ॥ ७ ॥
सोळासहस्र गोपींशीं । कृष्णनाथा भोगीशी, ।
ब्रह्मचारी म्हणविशी । ळुळुळुळु रे! ॥ का० ॥ ८ ॥
ऐसे तूझे पोवाडे । वर्णीताती वाडेकोडे, ।
विष्णुदास नामा म्हणे । हु हु हु हु रे! ॥ का० ॥ ९ ॥

### पद ५५ वें.

नर राम भजनबिन गत न तरनकी ।
कोटि उपाव कर रे! ॥ ध्रुवपद. ॥
होम नेम व्रत तीरथ साध्यो । क्या हुआ बनखडबासा रे! ।
चरन कमल उरमा उपजे । नहिं तों लग झूटी आसा रे! ॥ नर० ॥ १॥
नर तनुपायो राम नहिं गायो । भूल्यो पशू गव्हारा रे! ।
सिरपर काल खडा शर साधें । नामदेव कहे पुकारा रे! ॥ नर० ॥ २ ॥

---

## ७. रमणतनयकृत पदें.

### पद ५६ वें.

'यशोदासुत गाई रे! । यशोदासुत हरि गोविंद हरे आदिपुरुष आनंदकंद अनुदिनिं मुचकुंदवरद श्रीमुकुंद गाई रे! ॥ ध्रुवपद. ॥

मधुमुरहर[१] मदनजनक विधिसुरनुत[२], स्तविति सनक, पालक त्रैलोक्य-व्यापक एक सर्वा ठाई । येकि सकळ जग अनेक मृगजळमय भास फोक हरुनि मोह शोक नाम घोकतचि तूं जाई. ॥ यशोदा० ॥ १ ॥

इंदिरावरद गरुडगमन मंदरधर असुरदमन तो हरि वृजीं नंदतपें प्रगटुनि सुखदाई । शोभत कटिं पीतवसन मोर मुगुट मंजुहसन, मुरलिधर गोपीजीवन क्रीडत कुंजशाई[३]. ॥ यशोदा० ॥ २ ॥

कमलनयन कलुषहरण[४] विमलचरित भक्ततरण जननमरणभ्रमण हरुनि

---

१. मधु व मुर या दैत्यांस मारणारा. २. स्तुत. ३. कुंजांत शयन करणारा. ४. पापहर्ता.

चरणीं शरण जाई। वर्णिति ज्या श्रुतिपुराण वदत **व्यास** हें प्रमाण **रमण**तनय निश्चय जाण रत **हरि**गुरुपायीं. ॥ **यशोदा**० ॥ ३ ॥

**पद ५७ वें.**

तव गुणमहिमा । श्री**हरिरा**मा । वर्णिला न जाय. ॥ ध्रुवपद. ॥
न कळेचि पार निगमा, । शिणला चतुर्मुख **ब्रह्मा** ॥
तेथें आम्हा [1]आतुडशी काय रे! ॥ तव गुण० ॥ १ ॥
शिणलीं सहस्र तोंडें । फणा**शे**षा ऐशीं धेंडें ॥
झाले वेडे न चले उपाय रे! ॥ तव गुण० ॥ २ ॥
तेथें माझी वाणी किती । **रम**णात्मज करी विनती ॥
द्यावी मुक्ति, दावीं तव पाय रे! ॥ तव गुण० ॥ ३ ॥

**पद ५८ वें.**

आणाना **य**दुराज । झडकरि आणाना **य**दुराज. ॥ ध्रुवपद. ॥
माळ गळ्यांतिल [2][3]व्यांळसमचि, **घन**नीळ नये सदनाला ।
वेळ नका बहु लावुं तयाविण राहिना जीव आज ॥ झड० ॥ १ ॥
भोग सुखादिक रोग गमति वियोग न साहे सख्यांनो! ।
वेगिं आणिं सये! बाई! तयाविण राहीना मम प्राण ॥ झड० ॥ २ ॥
**नं**दतनय **ब्र**जवृंदसहित **का**लिंदितटीं करि लीला ।
मंदिरीं आणिं सखे, **र**मणात्मज वंदित पादसरोज ॥ झड० ॥ ३ ॥

**पद ५९ वें.**

येउं दे करुणा [4]**मा**रमणा! । दीनोद्धारणा! रे! ॥ ध्रुवपद. ॥
बुडलों रे! भवसागरडोहीं । तारिं आम्हा शरणा ॥ येउं० ॥ १ ॥
हरिं अवघ्या विषयादिक [5]भ्रमणा । देउनि सत्क्रपणा ॥ येउं० ॥ २ ॥
विनवितो **र**मणात्मज जाणा । श्रीगुरु तवचरणा ॥ येउं० ॥ ३ ॥

**पद ६० वें.**

जातसे वय हें वायां कां रे! तुम्ही नायका? ।
क्षणभंगुर देह शाश्वत मानुनि कां न भजसि **य**दुनायका? ॥ ध्रुवपद. ॥

---

१. बरोबरी करशी. २. सर्प. ३. सर्पाप्रमाणें. ४. लक्ष्मीपति. ५. फेरे.

चित्स्वरुपीं मन लावुनि सेविसि नामामृत [1]रसना एका ।
विषयसुखीं रमतां तूं होशिल पात्र [2]रविसुतसायकां ।। कां० ।। १ ।।
विषवत् विषय समस्त गृहादिक त्यज सुतधनपशुबायका ।
सत्संगति साधुनियां सेविसि गुरु [3]अक्षयपददायका ।। कां० ।। २ ।।
कनकीं नग, घटिं माति, सुतीं पट, तैसें जाण रुपा एका ।
रमणतनय सद्गुरुचरणीं रत आवडि हरिगुण गायका ।। कां० ।। ३ ।।

## पद ६१ वें.

हरिविण मज गमेचि ना वो! ।। ध्रुवपद. ।।
कमलनयन प्रभु [4]जलधिशयन हरी ।
ज्याला सुरवर स्तविति सनकशुकविधिहरनिगमागमें ।। हरि० ।। १ ।।
नंदात्मज आनंदकंद वृजललनेसि रमे ।
गोधनपाल दयाळ पाहतां [5]भव हा [6]उपशमे ।। हरि० ।। २ ।।
मुरलि अधरिं धरि वाजवि मंजुळ ऐकुनि त्रिभुवन भ्रमे ।
मारजनक सकुमार श्याम येइल मंदिरिं मज गमे ।। हरि० ।। ३ ।।
जाय सखे! हरिपाय धरुनि उपाय हाचि करशील [7]क्रमें ।
रमणात्मज विनति करी आणीं श्रीवर कल्पद्रुमे. ।। हरि० ।। ४ ।।

## पद ६२ वें.

[8]सोडीं सोडीं तूं माया रे! ।। ध्रुवपद. ।।
.................................... ।
नदीदोका ह.............................. ।। सोडीं० ।। १ ।।
.................................... ।
तंतु पट घट .............................. ।। सोडीं० ।। २ ।।
गुरुप्रती रमणात्मज झाली मोक्षप्राप्ती ।
अनुदिनिं विश्वस्वरुपीं दावी तव पाय रे! ।। सोडीं० ।। ३ ।।

---

१. 'सरसा' असाही पाठ आहे. २. यमाच्या बाणांस. ३. मोक्षपद देणारा. ४. क्षीरसागरशायी. (कृष्ण.) ५. संसार. ६. शांत होई, नाश पावे. ७. अनुक्रमानें, हळूहळू. ८. हें पद त्रुटित आहे. शोधकांनीं समग्र मिळविण्याचा प्रयत्न करावा. उपलब्ध झाल्यास त्याचा उपयोग परिशिष्टांत करितां येईल.

## ८. विठ्ठलनाथकृत पदें.[1]

### पद ६३ वें.

जडदेह कसा घेउनि गेला तुकाराम वाणी ॥ ध्रुवपद. ॥
भजन पुजन भाव बळें । जिंकियले कळी काळ ॥
गर्जताति तिन्ही ताळ । ऐकताति कानीं. ॥ जडदेह० ॥ १ ॥
पंढरिचा देव गडी । पाववील पैल थडी ॥
विठ्ठलनाथ गरिब गडी । त्यासि कोण मानी ॥ जडदेह० ॥ २ ॥

### पद ६४ वें.

धिग ब्रह्मबोध करुनि काय मूढमानवाला ॥ ध्रुवपद. ॥
रात्रदिवस जोडि[2] दाम । हृदयिं वसे तंत्र सकाम ।
नाठवितां रामनाम । देवदानवांला ॥ धिग० ॥ १ ॥
बुडतयासि देउनि हात । आपापणांसि करिल घात ।
विठ्ठलनाथ देउनि लात । सोडि पालवाला ॥ धिग० ॥ २ ॥

### पद ६५ वें.

मजकडे आधिं निकट[3] करुनि येइं पांडुरंगा! ॥ ध्रुवपद. ॥
कलियुगीं बहूत दास । होसी दासां घरीं दास ।
माझ्या आयुष्याचा नाश । जात आहे भंगा. ॥ मज० ॥ १ ॥
आसनिं[4] शयनिं मनीं ध्यात । तूंचि बंधुमायतात ।
विठ्ठलनाथ रसिक गात । नाम प्रेमसंगा. ॥ मज० ॥ २ ॥

### पद ६६ वें.

राधिकेचा रंग पाहुनि कृष्ण दंग जहाला ॥ ध्रुवपद. ॥
वेणी फणी करुन भांग । काजळ कुंकु ल्यालि चांग[5] ।
गोरें अंग चोळी तंग । दाखवी श्रीहरिला ॥ राधि० ॥ १ ॥
राधिकेचा झकाझोंक । कृष्ण पाहुनि लावि नोक ।
जरीपातळाचा झोंक । पदर सांवरीला ॥ राधि० ॥ २ ॥
कृष्ण पाहुनि झाली वेडी । हांसतांचि नेत्र मोडी ।
विठ्ठलनाथ भक्त गडी । चरणीं रंगला ॥ राधि० ॥ ३ ॥

---

१. हा कवि शेणवई ब्राह्मण होता. व कोल्हापुरानजीक आंजरें या गांवीं राहात असे—अशी माहिती कळते. २. मिळवी. ३. घाई करून. ४. 'अशनीं' असा अन्य पाठ आहे. ५. उत्तम.

### पद ६७ वें.

ढीग कासयासि करिसी जोग, लोक शीणवीया ॥ ध्रुवपद. ॥
देणें घेणें कारभार । लेवालेवी उदिम फार ।
कर्ज देउनि धरिसि द्वार । शेण कालवाया ॥ ढीग० ॥ १ ॥
मंत्र, तंत्र, कळा जाण । आत्मस्वरुपीं नाहीं ध्यान ।
**वि**ठ्ठलनाथ लावुनि वात । दीप मालवाया ॥ ढीग० ॥ २ ॥

### पद ६८ वें.

काय मना! जना धना गुंतलासि लोभा ॥ ध्रुवपद. ॥
जन्ममरण नरकद्वार । वासनेसि येरझार ।
विषय ध्या संभ्रमांत फार । नाशिवंत शोभा ॥ काय० ॥ १ ॥
विसरलासि शाश्वताचें । नाम आत्मघाता ।
[1]रतला कसा **वि**ठ्ठलनाथ । अंतकाळीं तो बा! ॥ काय० ॥ २ ॥

### पद ६९ वें.

कसा तारिल पंढरीराव? ॥ ध्रुवपद. ॥
भाव धरीना भक्ति करीना । उगाच हरि! मज पाव. ॥ कसा० ॥ १ ॥
माता पित्याशीं लाथा मारी । मेल्यावरि करि काव ॥ कसा० ॥ २ ॥
थरथर कांपे शक्ति हरल्या । म्हणे, 'देवा! आतां धांव.' ॥ कसा० ॥ ३ ॥
**वि**ठ्ठलनाथा सद्गुरुचरणीं । दिधला अक्षय [2]ठाव. ॥ कसा० ॥ ४ ॥

### पद ७० वें.

कां रे! भुललासी [3]गंव्हार! । कां रे! भुललासी ॥ ध्रुवपद. ॥
सर्व म्हणसि माझें माझें । कुटुंबासी वाहसी ओझें ।
अंतकाळीं कोण तूझें । एकलाची जासी ॥ कां रे० ॥ १ ॥
आलासि कोठुनी जासिल कोठें । आगम निगम पाहें वाट ।
काळ करिल आठवाट । त्या काय जबाब देसी ॥ कां रे० ॥ २ ॥
जन्मा येउनि सार्थक करीं । सद्गुरुचे पाय धरीं ।
**वि**ठ्ठलनाथ भजन करी । बोध भाविकांसी ॥ कां रे० ॥ ३ ॥

---

१. आसक्त झाला. २. मुक्ति, कैवल्य. ३. गांवढळा, मूर्खा.

## ९. रामकृष्णकृत पदें.

### पद ७१ वें.

धांवा धांवा धांवा **उद्धवा**! आणा **मा**धवा ।
**अ**क्रुर नव्हे हा क्रूर साधिला दावा[1] ॥ ध्रुवपद. ॥
पहा पहा **अ**क्रुरें कसा कापिला गळा ।
नेलें मथुरेशीं **ब**ळराम आणि **गो**पाळा[2] ।
त्या दिवसापासुन **गो**कुळास आली अवकळा[3] ।
रात्रंदिवस चैन पडेना, लागेना डोळा ॥
चाल ॥ अशि काय **कु**ब्जा चांगली मोठी सरस ।
तिशीं जाउन रतला, धरुन आमचा हिरीस[4] ।
विरहें तळमळतों आम्हा लागला चिरेस[5] ॥
टीप ॥ एकदां येउन व्रजवधूंचा कंठ वधावा. ॥ धांवा० ॥ १ ॥
ब्रह्मज्ञानाची कथा सांगतां वृथा ।
हा पूर्णब्रह्म **रा**धिकेशीं रतला होता ।
रथीं गुप्त होउनि बैसला आम्हा देखतां ।
'येतों मी' म्हणुनि सकळांशीं दिधला गोता[6] ॥
चाल ॥ हिकडेचि आम्ही झुरझुरुन जाऊं मरून ।
येथें कितिक दिवस धीर धरून राहवें ठरून[7] ।
कधिं पडतिल दृष्टी फिरुन डोळां भरून ॥
टीप ॥ शिणलों नवस करकरून **ह**रीचा धांवा ॥ धांवा० ॥ २ ॥
**कं**सासी वधूनि राज्याचे जाहले धनी ।
त्यामुळें आमचा लोभ दिला सोडुनी ।
कसा दोर अर्धा आडामाजी कापुनी ।
वाटतो त्यजावा प्राण सर्व त्यागुनी ॥
चाल ॥ होता रुसवा येती न तिनदां घरास ।
**य**मुनेतीरीं अडवी जैशी याची मिरास[8] ।

---

१. वैर. २. कृष्णाला. ३. ऱ्हास. ४. इच्छा, अधाशीपणा. गोपींच्या म्हणण्याचा भाव कीं पहिल्यानें आम्ही कृष्णाला पाहिजे होतों पण आतां तो कुब्जेवर आषक झाला. ५. द्वेष, तिरस्कार. ६. गोता देणें=गटंगळ्या खायला लावणें, नुकसान करणें, निराश करणें. ७. थांबून. ८. हक्क, वतन.

मधुवनीं खेळतां रास भुवनसुंदरास ॥
टीप ॥ वाटतो योग असा सर्वदा साधावा ॥ धांवा० ॥ ३ ॥
पाहोनी गोपींचा भाव म्हणे उद्धव ।
अंतरीं व्यापिला देव केवढें दैव ।
त्यागोनि आपुले धव[1] रमती माधव ।
अंतरीं धरा श्रीधरा असें बोधावें ॥
चाल ॥ रविबिंब जसें का दिसे सकळिका घटांत ।
जगदीश व्यापिला असे किं तंतूपटांत ।
यापरी पहा श्रीहरी हृदयसंपुटांत ॥
टीप ॥ म्हणे रामकृष्ण साधनीं असा साधावा ॥ धांवा० ॥ ४ ॥

## पद ७२ वें.

धाडुं[2] नको वनिं राम । कैकयी! ॥ ध्रुवपद. ॥
वृद्धपणीं मज चारही बाळें ।
प्राणाचा रघुपति विश्राम ॥ धाडुं० ॥ १ ॥
अतिसकुमार कुमार रवीचा ।
कोमल तनु घनश्याम ॥ धाडुं० ॥ २ ॥
रामकृष्णप्रभु दृष्टी न पडतां ।
जाइन मी निजधाम[3] ॥ धाडुं० ॥ ३ ॥

## पद ७३ वें.

कधिं येतिल गोकुळासि सांग उद्धवा! ।
वाटतें जीवासि भेटवा रे! माधवा! ॥ ध्रुवपद. ॥
गहिंवरोनि रडती सकळ पडती गोपिका ।
कुरळ केश विरुळ रुळताती मृत्तिका ।
अनुसरलों आम्ही, न लभे जो शुकादिका ।
तो कसा असेल कीं येइल केधवां? ॥ कधिं० ॥ १ ॥
न रुचे तृणनीरक्षीरपान वांसरां ।
नंद यशोदेशि बैसलासे धोसरा[4] ॥

---

१. पति, भ्रतार. २. राम वनांत जातेसमयीं दशरथानें केलेला विलाप. ३. काव्यसंग्रह-ग्रंथमाला—पदसंग्रह—भाग १ पृष्ठ १३४ रामदासकृत पदें—पद ३०८ पहा. ४. धोसरा बसणें= धक्का बसणें, ढोसरा बसणें, कंबर खचणें.

कुब्जा[१] कमनीय रूप दिसे अप्सरा ।
ती कशी तुटेल, तो सुटेल केधवां? ॥ वाटतें० ॥ २ ॥
निष्ठुर अक्रुर क्रूर बहुत वाटला ।
करुनि लंदफंद हळुच नंद फासला ।
नेला मथुरेस, ईश स्वस्थ बैसला ।
मोकलिती[२] धाय हाय! हाय! माधवा! ॥ कधिं० ॥ ३ ॥
उद्धव म्हणे थोर भाग्य फार चांगल्या ।
जडला विश्वास निजरूपास लागल्या ।
रतला श्रीरंग निजरंगीं रातल्या ।
दाविताति ग्लानी रामकृष्ण बोधवा ॥ वाटतें० ॥ ४ ॥

---

## १०. रामकविकृत पदें.

### पद ७४ वें.

गुरु महाराजें महाराजें । अद्भुत ऐसें केलें ॥ ध्रुवपद. ॥
दातारें मस्तकिं ठेवुनि कर । वारियला[३] जन्म घोरें ॥ गुरु० ॥ १ ॥
अध्यात्म विद्येचा उपदेश केला । देहध्यास सर्व गेला ॥ गुरु० ॥ २ ॥
निजरूप कैवल्य दाखविलें डोळां । तेथें मना लय जाला ॥ गुरु० ॥ ३ ॥
हरिची स्मृति हृदयीं प्रकाशली । द्वैताद्वैत ना राहियली ॥ गुरु० ॥ ४ ॥
राम म्हणे आतां गुरुसि शरण । निजानंदें परिपूर्ण ॥ गुरु० ॥ ५ ॥

### पद ७५ वें.

ब्रह्ममुखा करिसि तळमळ । शरण जाई संता एक वेळ ॥ ध्रुवपद. ॥
अहंममता विषयकरीं विसर । ब्रह्मास्मिचा नित्य करीं स्मर[५]. ॥ ब्रह्म० ॥ १ ॥
प्राणापान समते ईश्वर वरी । येणें संचित क्रियमाण भस्म करी ॥ ब्रह्म० ॥२॥
ज्ञान वैराग्य क्रियानिरहंकृति । प्रारब्धभोग कृष्णार्पण होती ॥ ब्रह्म० ॥ ३ ॥
बुद्धिनेत्रें[६] निजरूप पाहीं । तेणें सुखें सुखरूप होई ॥ ब्रह्म० ॥ ४ ॥
राम म्हणे संतमहिमा अपार । म्हणउनि गुरुचरणीं जालों स्थिर ॥ ब्रह्म० ॥५॥

---

१. सुंदर. २. धाय मोकलणें=रडणें, छाती बडवणें, दुःख करणें. ३. निबारिला, दूर केला. ४. भयंकर. ४. तदाकार मन झालें. ५. स्मरण. ६. बुद्धिरूप नेत्रें.

## पद ७६ वें.

सतत प्रेमें करिं कृष्णस्मरण । त्यासि कधीं नसे जन्ममरण. ॥ ध्रुवपद. ॥
श्यामतनु सुंदर कमलनयन । कंठीं वैजयंती शोभायमान ॥ सतत० ॥ १ ॥
कौस्तुभसहित कासे पीतांबर । माथां मुगुट मुरली मनोहर ॥ सतत० ॥ २ ॥
कर्णीं कुंडलें तिलक केशर । पायीं नेपुरें वाजती झणकार ॥ सतत० ॥ ३ ॥
ऐसा गोपाळ पाहिला यमुनेतीरीं । भक्त भजती त्यांचें [1]भवभय हरी ॥स०॥४॥
निर्गुण सगुण अवघा हाचि देव । राम म्हणे माझा चरणीं [2]भाव ॥ सत० ॥५॥

## पद ७७ वें.

पंढरपुर वैकुंठभुवन । विठ्ठल नांदे महाराज रुक्मिणीरमण ॥ ध्रुवपद. ॥
श्यामसुंदर हस्त कटावर । कमललोचन गळां पदकहार ॥ पंढर० ॥ १ ॥
मस्तकीं मुगुट कासे पितांबर । हास्यवदन उभा विटेवर ॥ पंढर० ॥ २ ॥
भाळीं टिळक, गळां तुळसीहार । आंगीं उटि चंदन केशर ॥ पंढर० ॥ ३ ॥
शंख चक्र गदा पद्म आयुध । कौस्तुभ वैजयंती माळ सुगंध ॥ पंढर० ॥ ४ ॥
सर्व तीर्थांचें तीर्थ चंद्रभागा । स्नान करितां पातक जाई भंगा ॥ पंढर० ॥५॥
ऐसें पांडुरंगाचें पूर्ण ध्यान । दर्शन होतां नासे जन्ममरण ॥ पंढर० ॥ ६ ॥
[3]भगवज्जन प्रेमभावें भजती । त्यांसी मोक्ष त्वरित होय प्राप्ति ॥ पंढर० ॥ ७ ॥
राम म्हणे शरण देवा! तुज । तुझी स्मृति सतत देई मज ॥ पंढर० ॥ ८ ॥

## पद ७८ वें.

कृष्णा! घननीळा! लौकर येई ।
देवा! श्रमलों मला मुक्ति देई देई ॥ ध्रुवपद. ॥
संसाराचें दुःख झालें भारी । कन्यापुत्रावरी लोभ बहुपरि ।
येणें चित्ता [4]व्यामोह मुरारि! । आतां दिनातें सोडवी हरि हरि ॥ कृष्णा० ॥१॥
[5]कामसर्पें मज ग्रासियलें । तेणें मन भ्रांतिमध्य पडियलें ।
म्हणुनि निजसुख अंतरलें । हरि! सोडवीं आयुष्य गेलें गेलें ॥ कृष्णा० ॥ २॥
नारायणा! देवा! कृपा करीं । जन्ममरण मोह निवारीं ।
मला मायानदितें उतारीं । ऐसें विनवितों कुंजबिहारी हो हरि! ॥कृष्णा०॥३॥
हृदयीं गोपाळ प्रगटला । तेणें ब्रह्मानंद थोर जाला ।
अहंममता विसर पडियेला । राम म्हणे द्रगदृश्यभाव गेला गेला ॥कृष्णा०॥४॥

---

१. संसारांतील भयें. २. भक्ति. ३. भक्त, संत, साधू. ४. दुःख, मूर्च्छा. ५. मदनरूप सर्पानें.

### पद ७९ वें.

हरि! मज दीनातें उद्धरीं ॥ ध्रुवपद. ॥
त्रिविध ताप वैरी जाळितातीं। बहु याचें दुःख होतसे भारी ॥ हरी० ॥ १ ॥
वासनेच्या छंदें काम्यकर्मं केलीं। इहस्वर्ग फळ भोगकारी ॥ हरि० ॥ २ ॥
आतां देवा! भ्रमांत बुडालों। कृपा करी, भवाब्धितें[1] तारी ॥ हरि० ॥ ३ ॥
**राम** म्हणे **कृष्णा**! करुणा परिसावी। तव स्मृति देई अंतरीं ॥ हरि० ॥ ४ ॥

### पद ८० वें.

**कृष्णा**! स्मृति मनिं धरिं धरिं प्राण्या! ॥ ध्रुवपद. ॥
नरतनुमाजि सार्थक तूं करीं ॥ **कृष्णा**० ॥ १ ॥
सर्व भूतीं देव हाचि भाव धरीं।
येणें जन्म मरण निवारीं प्राण्या! ॥ **कृष्णा**० ॥ २ ॥
निरहंकृति[2] सत्कर्म करूनियां।
सतत कीर्तनीं प्रेम धरीं प्राण्या! ॥ **कृष्णा**० ॥ ३ ॥
**राम** म्हणे अरे! हेंचि हें सार्थक।
**हरि** निशिदिनीं ध्यान करी प्राण्या! ॥ **कृष्णा**० ॥ ४ ॥

### पद ८१ वें.

हरिचरणीं प्रेम धरी प्राण्या रे! ॥ ध्रुवपद. ॥
नवविध[3] भक्ति करूनि सतत।
अहंधर्म त्याग करी प्राण्या रे! ॥ हरि० ॥ १ ॥
एक आत्मा व्यापक द्वैत नाहीं।
हेचि स्मृति निशिदिनीं धरीं प्राण्या रे! ॥ हरि० ॥ २ ॥
सर्व भूतीं देव भाव हाचि ठेवीं।
येणें अज्ञान नाश करीं प्राण्या रे! ॥ हरि० ॥ ३ ॥
**राम** म्हणे आतां सावध होई।
संतपायीं लक्ष[4] लावीं प्राण्या रे! ॥ हरि० ॥ ४ ॥

### पद ८२ वें.

निजरूपीं प्रेम रे!। निसिदिनीं आनंदे करूनि रे! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. संसाररूप समुद्रातें. २. गर्वरहित. ३. नऊ प्रकारची भक्ति. त्या नऊ भक्ति अशा:—
'श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्। अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥.' ४. ध्यान.

मायानदींत भ्रमलों जन्म जाले बहु ।
विषयसुख घेतां देवा! आयुष्य गेलें रे! ॥ निज० ॥ १ ॥
काम क्रोध वैरी यांचें दुःख थोर ।
येणें मन चंचळ आतां सोडवी श्रीहरि! ॥ निज० ॥ २ ॥
देवा! पूर्ण कृपा करीं । अंतरीं[1] प्रगट होई ।
भक्तिप्रेम देउनि जन्ममरण वारीं ॥ निज० ॥ ३ ॥
**राम** अनन्य शरण प्रार्थना करितो ।
चरणिं ठाव देउन निज सुख देईं रे! ॥ निज० ॥ ४ ॥

## पद ८३ वें.

श्यामसुंदर प्रसन्नवदन मूर्ति **हरि**चि देखिली ॥ ध्रुवपद. ॥
प्राणापानसमता करुनि । सहस्रदळावरि पाहिली ॥ श्याम० ॥ १ ॥
ज्ञानवैराग्य दृश्य निरसुनि । बोधें हृदयीं ध्यायली ॥ श्याम० ॥ २ ॥
द्वैताद्वैतभाव त्यजुनियां । त्रैलोकीं हे व्यापिली ॥ श्याम० ॥ ३ ॥
नवविध भक्ति आत्मनिवेदनीं । स्मृति **हरि**ची प्रकाशिली ॥ श्याम० ॥ ४ ॥
**राम** म्हणे सद्भावें करुनि । **कृष्ण**चरणीं प्रीति जडली ॥ श्याम० ॥ ५ ॥

## पद ८४ वें.

काय सांगूं तुज जिवा! । हे बहु सोय धरिसि ना? ॥ ध्रुवपद. ॥
माया ममता लोभ । सुख घेसी अहर्निशी[2] ।
आयुष्य गेलें विचार करिसि ना ॥ काय० ॥ १ ॥
बहु जन्मांच्या अंतीं । नरतनु पावलासी ।
सार्थ करुनि भवाब्धि ते कां तरेसि ना ॥ काय० ॥ २ ॥
आतां तूं ऐसें करीं । संतचरणीं प्रेम धरीं ।
तेणें निजरूपीं भक्ति कां करिसि ना ॥ काय० ॥ ३ ॥
**राम** म्हणे आतां । सर्व त्याग करुनियां ।
एक **हरि**चि स्मृति हृदयीं धरिसि ना ॥ काय० ॥ ४ ॥

## पद ८५ वें.

भज **राम हरि** । भवभय दूर करी ॥ ध्रुवपद. ॥
बहु अमुत्र सुख वाटलेलें गोड । परिणाम विष मज तारी. ॥ भज० ॥ १ ॥

---

१. अंतःकरणांत, मनांत. २. रात्रंदिवस.

काम क्रोध लोभ येणें मी संतप्त । नानापरि दुःख जालें भारी. ॥ भज० ॥ २ ॥
अहं आप्तवर्ग मोहजाल फार । आयुष्य गेलें दिनातें उद्धरी. ॥ भज० ॥ ३ ॥
भज आतां **गो**पाळा तूंची कृपा करीं । मुक्ति देई भय दूर करीं. ॥भज० ॥४॥
**अच्युतसुत राम** विनवितो । देवा! भवाब्धितें उतरीं. ॥ भज० ॥ ५ ॥

### पद ८६ वें.

**कृ**ष्णा! **रा**मा! तव चरणीं लागो प्रीति ।
म्हणुनि आतां निज सुख दे **क**मळापति! ॥ ध्रुवपद. ॥
काम्यकर्म करूनि सुखस्वर्ग प्राप्त जालें ।
क्षीण पुण्य होतां मर्त्यलोकीं [1]जनन आलें ।
आशा भय तृष्णा येणें मज भुलविलें ।
यास्तव तुझे चरणीं अंतर पडियेलें ॥ **कृ**ष्णा० ॥ १ ॥
संसाराचा छंद लागला निशिदिनीं भारी ।
[2]योषितेच्या संगें मन लुब्ध अनेकापरी ।
येणें येणें जाच जाला हो! श्री**ह**रि! ।
मी अपराधी मज दीनातें उद्धरीं ॥ **कृ**ष्णा० ॥ २ ॥
आतां **गो**पाळा मजलागीं प्रसन्न होई ।
द्वैतभाव निरसुनि मुक्ति देई ।
अहर्निशि हृदयीं प्रकाशक होई ।
**राम** विनवितो चरणीं सेवा घेई ॥ **कृ**ष्णा० ॥ ३ ॥

### पद ८७ वें.

**कृ**ष्णा! **रा**मा! लौकरी येई रे! ।
भक्तवत्सला **गो**पाला **ह**रि! ॥ ध्रुवपद. ॥
ग्रंथ पाहुनिया शब्दज्ञान जालें ।
मन चंचळ बहु बुद्धि नसे थारी ॥ **कृ**ष्णा० ॥ १ ॥
वासना दुर्धर ईचें भय भारी ।
आतां कृपा करी भवाब्धितें तारीं ॥ **कृ**ष्णा० ॥ २ ॥
देवा! ऐसें करा अज्ञान[3]ग्रंथि तोडीं ।
भक्तिपद देई दीनातें उद्धरीं ॥ **कृ**ष्णा० ॥ ३ ॥

---

१. जन्म. २. स्त्रीच्या. ३. गांठ.

अच्युतसुत **राम** विनवितो ।
चरणीं ठाव देईं जन्ममरण वारी ॥ **कृष्णा०** ॥ ४ ॥

**पद ८८ वें.**

ब्रह्मज्ञान बरें चांगलें । तूं शीघ्र प्राप्ति करूनि घेईं रे! ।
येणें भवपाश तोडिं रे! त्वरें ॥ ध्रुवपद. ॥

**'तत्त्वंपद'** शोधुनियां वाक्य ।
उत्तम पुरुषीं लक्ष ठेविं रे! त्वरें ॥ ब्रह्म० ॥ १ ॥
पिंडब्रह्मांडाचा स्मर विसरूनियां ।
एक आत्मा मनिं धरिं रे! त्वरें ॥ ब्रह्म० ॥ २ ॥
[1]अवस्थात्रय [2]पंचकोशातीत ।
सर्वसाक्षीचिंतन करिं रे! त्वरें ॥ ब्रह्म० ॥ ३ ॥
माया नाहिं नाहिं सर्वचि ब्रह्म ।
स्मृति हृदयीं हेचि धरीं रे! त्वरें ॥ ब्रह्म० ॥ ४ ॥
अच्युतसुत **राम** शरणागत ।
**कृष्णा**! भक्तिपद देईं रे! त्वरें ॥ ब्रह्म० ॥ ५ ॥

**पद ८९ वें.**

अनन्य होई सद्गुरुचरणीं रे! ॥ ध्रुवपद. ॥
विषयाचें सुख घेसी अहर्निशि । अझुनि तुझी तृप्ति नाहीं रे! ।
**काळ** तुला नेईल [3]अधोगति । सावध हो हरीतें स्मरीं रे! ॥ अनन्य० ॥ १ ॥
आतां तूं ऐसें करीं अहं दृश्य सर्व विसरीं । एकचि हेंचि ध्यान करीं रे! ।
सर्वभूतीं भक्तिभाव ठेउनि । भवसिंधुपार होईं रे! ॥ अनन्य० ॥ २ ॥
सहज स्वभावें सत्कर्म करूनि । संचित क्रियमाण जाळीं रे! ।
निशिदिनिं मुखीं **रामकृष्ण** वदोनि । **राम** म्हणे हेंचि सार्थक रे! ॥ अनन्य० ॥ ३ ॥

**पद ९० वें.**

आम्ही कैवल्यपदींचे संत मुखीं वदूं **हरिगोविंद** ।
सतत कीर्तनीं प्रेमा निजरूपीं आनंद ॥ ध्रुवपद. ॥

---

१. तीन अवस्था:—बाळपण, तरुणपण आणि म्हातारपण. २. पंचकोशांचीं नांवें:—अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय. ३. नरकांत.

परात्पर बांधुनि घर तेथें करूनि वस्ती ।
मुक्ति आमुची माता वर्ण असे ब्रह्म ।
विवेक हेंचि गोत्र सत्ता करी कर्म ।
स्मृति हेंचि सूत्र[1] नाम आमुचें धर्म. ॥ आम्ही० ॥ १ ॥
बोध अखंड क्रिया ध्यान उत्तम वस्त्र ।
परा वाचा वाणी गुण अलंकारसहित ।
विहार करूं विजनीं[2] प्रेम निर्निमित्य ।
सूक्ष्म अष्टधा कवच भावें स्मरो **अनंत** ॥ आम्ही० ॥ २ ॥
हेंचि **कृष्णा**चि भूषण लेउन साधु ।
वैकुंठाहुनि आले जग उद्धरण हेतु ।
जीव भ्रांतीमधें पीडित करुणा करिती बहुत ।
यासि मोक्ष द्यावा म्हणुन आले त्वरित ॥ आम्ही० ॥ ३ ॥
**राम** म्हणे ऐसा संतमहिमा अपार ।
येथें ठेवा भाव[3] व्हा भवाब्धि पार ।
निशिदिन करा सेवा ब्रह्मपदीं राहे स्थिर ।
याहुनि साधन नाहीं हा दृढ विचार ॥ आम्ही० ॥ ४ ॥

**पद ९१ वें.**

काय सांगूं याचें माहात्म्य तुला रे ! ।
निजरूपच जेथें द्वैत संभव नाहीं रे ! ॥ ध्रुवपद. ॥
वेद मौनावले[4] वाचा परतल्या ।
मनासि अप्राप्य[5], सुगम कसें रे ! ॥ काय० ॥ १ ॥
साधनें करूनि प्राप्त करिसि ।
हा संपूर्ण मिथ्या भ्रम विचार रे ! ॥ काय० ॥ २ ॥
**कृष्ण** कृपा करि । कांहीं एक घडे ।
यास्तव तूं अनन्य होई रे ! ॥ काय० ॥ ३ ॥
**अच्युतसुत राम** आनंदें ।
देवा ! तुला प्रेमें शरण रे ! ॥ काय० ॥ ४ ॥

---

१. यज्ञोपवित, जानवें. २. अरण्यांत. ३. भक्ति. ४. मुके झाले. ५. मिळण्यास कठीण.

### पद ९२ वें.

कृष्णा! तूं लौकर येई रे! ॥ ध्रुवपद. ॥

दीनदयाळा भक्तवत्सला । म्हणुन तुला प्रार्थितों रे! ॥ कृष्णा० ॥ १ ॥
वेदाज्ञे करूनि सत्कर्मि रत । हेही अर्पण तुला रे! ॥ कृष्णा० ॥ २ ॥
सर्वांभूतीं तूंचि देव स्मरूनियां । भक्तिभाव ध्यास होतो रे!॥ कृष्णा०॥३॥
अच्युतसुत राम अनन्य देवा! । चरणिं ठाव देई रे! ॥ कृष्णा० ॥ ४ ॥

### पद ९३ वें.

सावध होउनि सद्भावें । शरण जावें गोपाळा रे! ॥ ध्रुवपद. ॥
जो परात्परनिगम अगोचर । तेथें तूं अनन्य होई रे! ॥ साव० ॥ १ ॥
मीपण त्यजुनि शुभाशुभ कर्म । न जाणोनि हरितें अर्पी रे! ॥ साव० ॥२॥
सर्व संकल्पाचा [1]न्यास करूनियां । कृष्णातें हृदयीं ध्याई रे! ॥ साव०॥ ३ ॥
अहर्निशि मुखि रामनाम वदोनि । जन्ममरण नि[2]वारी रे! ॥ साव० ॥ ४ ॥
अच्युतसुत राम भक्ति करूनि । या संसारीं हेंचि सार्थक रे! ॥ साव०॥ ५ ॥

### पद ९४ वें.

सावध आतां होई । संतासि शरण जाई. ॥ ध्रुवपद. ॥
[3]जननीजठरीं जन्मलासि । नामरूप ध्यास धरिसि ।
विषयातें भुललासि । येणें गति तुज कैसी ॥ साव० ॥ १ ॥
योषि[4]तेचि प्रीति ऐसी । रात्रंदिवस क्रीडा करिसि ।
हानि केली आयुष्यासि । अझुन विचार न करिसी ॥ साव० ॥ २ ॥
संसाराचा छंद धरीसि । द्रव्याचाहि लोभ करिसि ।
कन्यापुत्रा लुब्ध होसि । परावृत्ति नाहिं मनासि ॥ साव० ॥ ३ ॥
आतां तूं ऐसें करीं । संतवाक्य मनीं धरीं ।
प्रेमें करुनि हरितें स्मरीं । येणें जन्ममरण वारी ॥ साव० ॥ ४ ॥
राम म्हणे संतमहिमा । जगिं दुजी नाहीं उपमा ।
म्हणोनि शरण आलों तुम्हा । आतां मजवर करा प्रेमा ॥ साव०॥५॥

### पद ९५ वें.

आतां तूं ऐसें करीं । गोपाळातें स्मरीं ॥ ध्रुवपद. ॥

---

१. त्याग. २. नाहींसें कर. ३. आईच्या पोटांत. ४. बायकोची, स्त्रीची.

शमें इंद्रिय निग्रह कर । मनीं सोडीं विषय थार ।
'अहंब्रह्मास्मि' स्मर । मग नाशीं हा संसार ॥ आतां० ॥ १ ॥
नवविधभक्ति[1] निवेदन । निजहंकृति करिं अर्पण ।
बुद्धिमधिं धरि ध्यान । निवारी जन्ममरण ॥ आतां० ॥ २ ॥
सर्वभूतीं देव पाही । हाचि भक्तिभाव घेई ।
हरिचि स्मृति प्रकाश हृदई । मग सुखें निर्भय होई ॥ आतां० ॥ ३ ॥
राम म्हणे गुरूसि शरण । ब्रह्मानंदें परिपूर्ण ।
सप्रेम भावें भक्ति करून । चरणीं मस्तक ठेवीं ॥ आतां० ॥ ४ ॥

**पद ९६ वें.**

धन्य धन्य सद्गुरू कृपावंत । चरणीं ठेविन भाव अखंडित ॥ ध्रुवपद. ॥
देहासहित दृश्य भाव गेला । निरहंकृति मना लेय[2] जाला ।
तिहीं लोकीं देव प्रकाशला । ऐशा बाधे आनंद पूर्ण जाला ॥ धन्य० ॥ १ ॥
जाय स्वप्न सुषुप्ति वावजालि । तूर्या सतत एकत्वें प्रकाशली ।
नैष्कर्म कर्मे ब्रह्मार्पण जाली । स्वस्वरूपीं बुद्धि स्थिरावली ॥ धन्य० ॥ २ ॥
क्षराक्षर अभावी द्वैत गेले । जन्ममरणासि मरण सहज आलें ।
प्रेमभावें समरस[3] अवघें जाले । निजरूपीं लक्ष पूर्ण ठेलें ॥ धन्य० ॥ ३ ॥
राम म्हणे गुरूचे उतराई । कैसा होउ हे मज ज्ञान नाहीं ।
म्हणुनी मीच नाहिं नाहिं । गुरूचि स्मृति एकचि असे तेहि ॥ धन्य० ॥ ४ ॥

**पद ९७ वें.**

निजरूपीं सतत प्रीति धराना । नरतनुमाजी सार्थक कराना ॥ ध्रुवपद. ॥
सर्व ब्रह्म अनुभव घेउनि । निरहंकृति बोध असाना ॥ निज० ॥ १ ॥
महावाक्य क्षराक्षर निरसुनि । भावबळें एक देव स्मराना ॥ निज० ॥ २ ॥
हरिचि स्मृति हृदयीं धरूनि । जन्ममरण नाश कराना ॥ निज० ॥ ३ ॥
सद्गुरूभक्ति प्रेमेंकरूनि । राम म्हणे स्वसुख कां ध्याना ॥ निज० ॥ ४ ॥

**पद ९८ वें.**

गुरुचें नाम मुखीं सतत असावें । नलगे त्यास वैराग्य करावें ॥ ध्रुवपद. ॥
एकचि आत्मा द्वितीय नाहीं । अखंडित हें मनिं स्मरावें ॥ गुरु० ॥ १ ॥

---

१. नऊ भक्तिः—श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्यत्व, सख्य व आत्मनिवेदन. २. नाश. ३. एकरस, ब्रह्मानंद.

सगुण निर्गुण अवघा देव । ऐसें ध्यान हृदयीं धरावें ॥ गुरु० ॥ २ ॥
राम म्हणे अनुभवें करूनि । हरिचरणीं लीन असावें ॥ गुरु० ॥ ३ ॥

## पद ९९ वें.

साधक हो हृदयीं राम स्मरणा । तत्क्षणीं भवसिंधु तराना. ॥ ध्रुवपद. ॥
अहंममता लोभ विषय । याचा मनीं ध्यास सत्य ज्यांना ॥ तत्क्ष० ॥ १ ॥
तत्क्षणीं आसनीं भोजनीं । सतत निशिदिनिं भावबळें हरितें भजाना ॥तत्क्ष०॥२॥
निरहंकृति नैष्कर्मयुक्त । भक्तिबळें हरिपूजा कराना ॥ तत्क्ष० ॥ ३ ॥
अध्यात्मबोध वैराग्य करुनि । आत्मा एकचि ध्यान धराना ॥ तत्क्ष० ॥ ४ ॥
सप्रेम भावें आनंदेंकरुनि । राम म्हणे गुरुसि शरण जाना ॥ तत्क्ष० ॥ ५ ॥

## पद १०० वें.

हा बाई चिमणा गोपाळ गे ! ॥ ध्रुवपद. ॥
हा जगजेठी[1], हातीं काठी, यमुनेतटीं, केवळ[2] मुठी ।
गोपाळातें करी लटापटी ॥ हा बाळ० ॥ १ ॥
सुंदर वदन, कमललोचन, श्यामवर्ण, दिसतो लहान ।
क्रीडा करी सखे मिळुनि ॥ हा बाळ० ॥ २ ॥
गोपिकांचे घरिं जाउन, गोपाळांसहित भक्षुन, कामरूपें प्रीति करून, पलंगावरि स्वयें जाउन ।
मुखिं घेतो चुंबन ॥ हा बाळ० ॥ ३ ॥
हा मुरारि, कालिंदीतिरीं, कळंबावरी, परनारींची वस्त्रें चोरी ।
नग्न स्त्रियांतें देखोनि विनोद करी ॥ हा बाळ० ॥ ४ ॥
हा खिल्लारी[3], वृंदावनीं गाई चारी, तेथें येती विघ्नें भारी, त्यांतें आपस्वयें निवारी ।
ऐसे बहु विलास करी ॥ हा बाळ० ॥ ५ ॥
राम म्हणे हरीची लीला, अद्भुत कळा, भक्तजनासि करी सोहोळा, शरण जावें या गोपाळा ।
त्यासि करी निर्भय काळा ॥ हा बाळ० ॥ ६ ॥

## पद १०१ वें.

रुक्मिणीवरा ! मनोहरा । मज दीनातें उद्धरा ॥ ध्रुवपद. ॥
मी अपराधी काम्य कर्म करूनि ।
फळ हेतु स्वर्गसुख करीं इच्छा धरूनि ।

१. जगश्रेष्ठ. २. ग्रास, घांस. ३. गुरांचे कळप राखणारा.

भोग आशा बहु परि तृष्णा मनीं ।
यास्तव अंतर फळलें तुझ्या कीर्तनीं ॥ रुक्मिणी० ॥ १ ॥
अहं देह धर्म धरूनि ध्यास करितों ।
लोभ सतत म्हणुनि अपुले म्हणतों ।
गृहपुत्रदारा येथें निशिदिनिं रमतों ।
येणें मी निमग्न भ्रमांत श्रीहरी बुडतों ॥ रुक्मिणी० ॥ २ ॥
आतां वनमाळी तूं पूर्ण कृपा करीं ।
मायामोह [1]नासून भवसिंधु उतरीं ।
भक्तिपद देउनि स्मृति दे अंतरीं ।
**राम** अनन्य तव चरणीं **मुरारी**! ॥ रुक्मिणी० ॥ ३ ॥

## पद १०२ वें.

श्रीहरिचरणीं सतत लीन व्हा रे! ॥ ध्रुवपद. ॥
आशाभवतृष्णीं लोभ त्यजुनियां ।
एक **गोपाळ** मनीं ध्यात जा रे! ॥ श्रीह० ॥ १ ॥
जो परात्पर अलक्ष अगोचर ।
[2]निशिदिनिं अंतरीं रमत जा रे! ॥ श्रीह० ॥ २ ॥
अहं धर्म दुर्ग दृश्य विसरूनि ।
निर्निमित्य अनादि असत जा रे! ॥ श्रीह० ॥ ३ ॥
निर्गुण सगुण भगवान व्यापक ।
हा चिद्विलास मुखीं गात जा रे! ॥ श्रीह० ॥ ४ ॥
**राम** म्हणे द्वैत भ्रांति निरसुनि ।
**कृष्ण**पदीं तुम्ही अनन्य व्हा रे! ॥ श्रीह० ॥ ५ ॥

## पद १०३ वें.

रुक्मिणिकांत कां अजुन नये श्रम अहर्निशी ॥ ध्रुवपद. ॥
अध्यय अपवाद करुनि । दुःख भोगिलें निशिदिनि ।
आतां मी दीन हीन ग्लान विनवितों [3]हृषीकेशी ॥ रुक्मि० ॥ १ ॥
**कृष्णा**! माझा अंत पाहसि । क्लेश होती अनेकविसि ।
भक्तवत्सल दीनोद्धार हें ब्रीद वागविशी ॥ रुक्मि० ॥ २ ॥

---

१. नष्ट करून. २. रात्रंदिवस. ३. कृष्णा. हृषीक+ईश=इंद्रियस्वामी, जितेंद्रिय.

त्रिविधताप[1] हे प्रचंड । जाळती क्रूर अखंड ।
येणें जिव माझा व्याकुळ पडिलों भ्रमासी ॥ रुक्मि० ॥ ३ ॥
तुला भक्त अनेकपरि । म्हणुनि माझा विसर हरि[2] ।
आतां झडकरि येउनि तव स्मृति दे त्वरेसी ॥ रुक्मि० ॥ ४ ॥
अच्युतसुत **राम** विनवी । माझी करुणा परिसावी ।
मज दिनातें उद्धरीं न ठाव दे चरणासी ॥ रुक्मि० ॥ ५ ॥

## पद १०४ वें.

कृष्णस्मरणीं निशिदिनिं रत । अन्य तूं न जाणे ॥ ध्रुवपद. ॥
निरहंकृति कर्म करुनि ईश्वरा अर्पण करणें ।
येणें संचित क्रियमाण जाळुनि मोक्षपदीं रमणें ॥ कृष्ण० ॥ १ ॥
चराचरभूतीं देव स्मरुनि भक्तिभाव धरणें ।
हेंचि हें साधन सतत विवेकबळें भवाब्धितें तरणें ॥ कृष्ण० ॥ २ ॥
कलिमाजि श्रेष्ठ साधन कीर्तनसुख घेणें ।
कामक्रोधलोभ त्यजुनि **राम**कृष्ण मुखीं वदणें ॥ कृष्ण० ॥ ३ ॥
नरतनुमाजि सार्थक वदे आज्ञा करि श्रवणें ।
गुरुभक्ति प्रेमभावें हाचि बोध **राम** म्हणे ॥ कृष्ण० ॥ ४ ॥

## पद १०५ वें.

आज कृष्ण मीं पाहिला । तेणें ब्रह्मानंद जाला ॥ ध्रुवपद. ॥
जो अलक्ष अगोचर । तोचि सतत हृदयीं ध्याइला ॥ आज० ॥ १ ॥
त्रैलोकीं व्यापक असे । हाचि चराचरभूतीं देखिला ॥ आज० ॥ २ ॥
सर्वभावें भक्ति करुनि । जन्ममरण मोह नासिला ॥ आज० ॥ ३ ॥
**राम** प्रेमभावें अनन्य । कृष्णचरणीं ठाव द्या मला ॥ आज० ॥ ४ ॥

## पद १०६ वें.

अरे मना! **राम**नाम स्मर अहर्निशी ॥ ध्रुवपद. ॥
विषयाचा छंद फार । येणें सुख घेसी अपार ।
परिणामीं विष थोर । काळ तुला ग्रासी ॥ अरे० ॥ १ ॥

---

१. आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक हे तीन प्रकारचे पाप. २. हरण कर.

जन्मोजन्मीं दुःख जालें । देहध्यासें भुलविले ।
आयुष्य तुझें व्यर्थ गेलें । विचार न करिसी ॥ अरे० ॥ २ ॥
आतां तूं ऐसें कर । चराचरी देव स्मर ।
तेणें जन्म नाशकर । सुख घे दिननिशीं ॥ अरे० ॥ ३ ॥
नरतनूंत येउनि । स्वहितकर उमजुनि ।
राम म्हणे शरण । प्रेमें जा कृष्णासी ॥ अरे० ॥ ४ ॥

**पद १०७ वें.**

अरे जिवा! कृष्णचरणीं रत होई दिननिशीं ॥ ध्रुवपद. ॥
संसाराचें दंभ धरोनि । नानापरि सुख घेउनि ।
देह धर्म लोभ करूनि । येणें फजित होसी ॥ अरे० ॥ १ ॥
योषिता प्रिय अपार । काम लोभ अंतीं थोर ।
वासना तुझी अनिवार । व्यर्थ तूं लुब्ध होसी ॥ अरे० ॥ २ ॥
अजुनि तुझी तृप्ति नाहीं । काम्यकर्म[1] करिसि पाही ।
स्वर्ग इच्छा धरिसिहि । येणें दुःख पावसी ॥ अरे० ॥ ३ ॥
अविद्या अभ्यास बहु केला । याचा अहंकार जाला ।
विनय विनव्यर्थ गेला । भ्रमें बुडालासी ॥ अरे० ॥ ४ ॥
आतां तुझेसे करी । दृश्य सर्व विसरी ।
हरिचें ध्यान सतत करीं । जन्ममरण नासी ॥ अरे० ॥ ५ ॥
राम म्हणे ऐका ऐका । हरिचरण विसरूं नका ।
मायेचा चुक बाधका । भक्ति करा अहर्निशी ॥ अरे० ॥ ६ ॥

**पद १०८ वें.**

निर्गुणपदिं मी जाउं । कैसे बाई! ॥ ध्रुवपद. ॥
पिंडब्रह्मांड विस्तारले थोर । याचा लोभ मला असे बहु ॥ कैसे० ॥ १ ॥
निगम अगोचर मनासि अप्राप्य । तेथें मी कोणे बोधीं ध्याऊं ॥ कैसे० ॥ २ ॥
कृष्णा कृपा करीं स्मृति हृदयीं देई । या बळें निजपद पाहूं ॥ कैसे० ॥ ३ ॥
अच्युतसुत राम अनन्य । सतत हरि मुखीं गाउं ॥ कैसे० ॥ ४ ॥

**पद १०९ वें.**

यमुनेतीरीं आहे गोपाळ कैसें करूं ॥ ध्रुवपद. ॥
श्यामसुंदर आत्मा मनोहर । मन माझे जालें विव्हळ ॥ कैसें० ॥ १ ॥

---

१. कांहीं फळ प्राप्त व्हावें या हेतूनें केलेलीं कामें.

आम्ही स्त्रिया सुंदर स्वधर्मयुक्त । जाउं तरि हंसति सकळ ॥ कैसें० ॥ २ ॥
कृष्ण स्त्रियांचा अतिलंपट । येणें माझा जिव व्याकुळ ॥ कैसें० ॥ ३ ॥
बाई! हरि हा आला मंदिरीं । तल्लीन मी झालें केवळ ॥ कैसें० ॥ ४ ॥
राम म्हणे भाग्यवंत नारि! । इच्छा पुरवितो घननीळ ॥ कैसें० ॥ ५ ॥

### पद ११० वें.

शिवहर सांबा! उमावरा! । नीलकंठा! मनोहरा! ॥ ध्रुवपद. ॥
भस्म सर्वांगीं लेपन । चर्मांबर आसन ॥ शिव० ॥ १ ॥
मस्तकिं गंगा विराजमान । गळां [1]नागेंदुभूषण ॥ शिव० ॥ २ ॥
श्रोत्रीं कुंडलें रत्नजडित । त्रिशूलडमरू आयुधयुक्त ॥ शिव० ॥ ३ ॥
श्वेत अतिरुचिर वसन । भाळीं [2]इंदुधवळ पूर्ण ॥ शिव० ॥ ४ ॥
कैलासशिखरे रम्यस्थान । नंदी असे वहन ॥ शिव० ॥ ५ ॥
वामांकीं गिरिजा सुंदर । त्रिनयन [3]कर्पूरगौर ॥ शिव० ॥ ६ ॥
देवा! तुला अनेक भक्त भजती । ते भवाब्धीतें तरती ॥ शिव० ॥ ७ ॥
राम म्हणे चरणीं अनन्य । सांबा! कृपा करीं परिपूर्ण ॥ शिव० ॥ ८ ॥

### पद १११ वें.

कृष्ण हरि स्मर तूं । सतत ॥ ध्रुवपद. ॥
अरे! हे अशाश्वत । दृगदृश्य विपरित ।
लोभ तुला बहुत । याचा त्याग करीं त्वरित ॥ सत० ॥ १ ॥
विषयाचा छंद धरिसि । निशिदिनिं क्रीडा करिसि ।
तृप्ति नाहिं वासनेसि । हानी केली आयुष्यासि ॥ सत० ॥ २ ॥
निरहंकृति कर्म आचरीं । भूतीं देव भाव धरीं ।
वासनेचा क्षय करीं । येणें जन्म मरण वैरीं ॥ सत० ॥ ३ ॥
एक हरि हृदयीं ध्याई । येणें तुझा मोह जाई ।
निजरूपीं सुख घेई । ब्रह्मानंदीं तल्लीन होई ॥ सत० ॥ ४ ॥
राम म्हणे हें साधन । प्रेमभावें भक्ति करून ।
गुरुचरणीं रत होउन । कैवल्यपदीं हो अनन्य ॥ सत० ॥ ५ ॥

### पद ११२ वें.

आजि राम मी ध्याइला । तेणें अहंभाव सर्व नासिला ॥ ध्रुवपद. ॥

---

१. सर्प व चंद्र याचें भूषण. २. चंद्रासारखें स्वच्छ. ३. शिव. ४. नाहींसें कर, टाळ.

योगियाच्या हृदयीं रमे । तोचि पिंडब्रह्मांडीं देखिला ॥ आजि० ॥ १ ॥
सगुण निर्गुण राम । हाचि सतत स्मर प्रकाशिला ॥ आजि० ॥ २ ॥
अवघा चिद्विलास असे । येणें मायामोहो भ्रम संपला ॥ आजि० ॥ ३ ॥
राम म्हणे कृष्ण शरण । कैवल्यपदीं[1] ठाव द्यावा मला ॥ आजि० ॥ ४ ॥

## पद ११३ वें.

सावध होईं रे! होईं रे! । जन्ममरण चुकवीं रे! ॥ ध्रुवपद. ॥
नरतनुंत आलासि । विपरीत दृश्यातें भुललासि ॥ सावध० ॥ १ ॥
प्रारब्धाधीन देह । कर्तृत्वाचा कां आग्रह ॥ सावध० ॥ २ ॥
व्यापक हरिची सत्ता । नको अहंकार[2] धरूं आतां ॥ सावध० ॥ ३ ॥
अरे! आलासि कोठुन । हें मूळ पाहीं तूं शोधुन ॥ सावध० ॥ ४ ॥
आतां भ्रांति सोडीं । हरिचरणाचि घे गोडी ॥ सावध० ॥ ५ ॥
एक आत्मा पाहीं । हेचि स्मृति धरीं हृदयीं ॥ सावध० ॥ ६ ॥
अंतरबाह्य देव । हाचि करीं भक्तिभाव ॥ सावध० ॥ ७ ॥
राम म्हणे सार्थ करीं । कृष्णचरणीं प्रेम धरीं ॥ सावध० ॥ ८ ॥

## पद ११४ वें.

कृष्णा! शेवटीं मज सांभाळीं ॥ ध्रुवपद. ॥
अनाथासि पावन करीं नारायणा! । ठाव देईं चरणाजवळी ॥ कृष्णा० ॥ १ ॥
जन्मोजन्मीं सेवा केली बहुपरि । निजसुख देईं वनमाळी ॥ कृष्णा० ॥ २ ॥
कृष्णा! तुझा देवा स्मर[3] सतत असावा। मग भय नसे कोणे काळीं॥कृष्णा०॥३॥
राम म्हणे अनन्य गोविंदा गोपाळा । कृपा पूर्ण करीं अंतकाळीं ॥कृष्णा०॥४॥

## पद ११५ वें.

अहो! धन्य धन्य प्रेमभावें मी । कृष्णाविण न जाणें अन्य मी ।
म्हणोनि जालों जगीं मान्य मी । नेणों आचरलों कोण भक्तिसीं ॥ध्रुवपद.॥
नैनांपुढें[4] देव देखिला । तेणें दृश्यभाव संपला ।
सर्वभूतीं गोपाळ दाटला । आतां भवसिंधु सर्व आटला ॥ अहो० ॥ १ ॥
हृदयीं हरीचे चरण धरिले । तेणें मीपण सर्व नासिलें ।
ब्रह्मानंदें सुख व्यापिलें । आतां जन्म मरण काय बापुडें? ॥ अहो० ॥ २ ॥

---

१. मोक्षपदीं. २. गर्व, अभिमान. ३. स्मरण. ४. नयनांपुढें.

आतां शरण कोणासि जाईना । निजरूपीं लक्ष सोडीना ।
अहंममता स्मर स्मरेना । आतां भ्रमाचें द्रय असेना ॥ अहो० ॥ ३ ॥
तिहीं लोकीं देव पाहिन । हाचि भक्तिभाव करिन ।
आलक्ष लक्षीं लक्ष ठेविन । अच्युतचरणीं **राम** शरण ॥ अहो० ॥ ४ ॥

### पद ११६ वें.

साधुसंगें भक्तिरंगें स्मरण करावें[1] ।
कीर्तनछंदें **रामा**संनिध प्रेमें डोलावें ॥ ध्रुवपद. ॥
अध्यात्मचरित्र परम पवित्र **ह**रिचें वर्णावें ।
मननें करूनि बोध भावें चित्तीं धरावे ॥ साधु० ॥ १ ॥
.................................................. ।
वैराग्यभक्ति ज्ञाना करुनि अंतरीं ठेवाव्या ॥ साधु० ॥ २ ॥
जेणेंकडुन हृदयीं स्मृति व्हावी **कृ**ष्णाची ।
ऐसी कीर्तनशक्ति आहे साधूचे घरची ॥ साधु० ॥ ३ ॥
अखंडित भजनें निजरूप स्मरणे वाजवि हो टाळी ।
**अ**च्युतचरणीं **रा**म निर्भय जाला त्रैकाळीं[2] ॥ साधु० ॥ ४ ॥

### पद ११७ वें.

मज नाहीं प्रीति अनेक आकारीं ॥ ध्रुवपद. ॥
तीन्हि लोक अहंस्फुर्ति ब्रह्मीं हे विलया जाति ।
वाचा श्रुतिस्मृति मौनावल्या[3] ॥ मज० ॥ १ ॥
दिव्य चक्षु कृष्णांजन देव दिसे एकपणें ।
महाराज अवघा **पांडुरंग** ॥ मज० ॥ २ ॥
**'तत्वमसि'** महावाक्य विसरूनियां क्षराक्षर ।
बोधें मथुनियां सार एक आत्मा ॥ मज० ॥ ३ ॥
अवघा **ह**रि प्रकाशला द्वैतभाव[4] सर्व गेला ।
गुरूचरणीं लीन **राम** जाला ॥ मज० ॥ ४ ॥

### पद ११८ वें.

निजस्मृति निशिदिनिं हृदयीं स्मरत जावें[5] ॥ ध्रुवपद. ॥

---

१. पदसंग्रह–भाग १, एकनाथकृत पदें–पद ४७, पृष्ठ २७ पहा. २. त्रिकाळीं. ३. मुक्या झाल्या, कुंठित झाल्या. ४. ईश्वर व आत्मा यांत भेद. ५. अनंतकृत काव्यें–पृष्ठ ११० पद १ पहा.

अहंभाव देहधर्म दृगदृश्य सर्व रे! ।
त्यजुनि गोपाळ मनीं ध्यात जा रे! ॥ निज० ॥ १ ॥
निरहंकृति कर्म करूनि निष्कर्मी वर्त रे! ।
येणें जन्ममरणपाप तुझें चुकति रे! ॥ निज० ॥ २ ॥
सर्वभूतीं देव पाहे हाचि भक्तिभाव रे! ।
प्रेमभावें श्रीहरितें गात जा रे! ॥ निज० ॥ ३ ॥
राम म्हणे शरण आलों तव स्मृति देई रे! ।
पूर्ण कृपें मज दीनातें उद्धरीं रे! ॥ निज० ॥ ४ ॥

## पद ११९ वें.

राम सीतापति ध्याउं या या ॥ ध्रुवपद. ॥
दशरथनंदन [1]राजिवलोचन । सगुण मूर्ति ध्यान पाहुं या या ॥ राम० ॥ १ ॥
सप्रेम भावें पूजन करोनि । अहंभाव पुष्पांजलि वाहुं या या ॥ राम० ॥ २ ॥
सर्वत्यागे दृश्य निरसुनि । निरंतरीं अंतरीं स्मरूं या या ॥ राम० ॥ ३ ॥
राम म्हणे देवाचरणीं प्रीति । अखंडित भक्ति तुझी करूं या या ॥ राम० ॥४॥

## पद १२० वें.

निज घन स्वरूप तुझें रूप गुरुराया! ।
बुद्धिनेत्र पाहातांचि दृश्य गेलें लया ॥ ध्रुवपद. ॥
एक हरि प्रकाशला द्वैत कोठें नाहीं ।
ऐसि ज्यासि प्राप्ति होय तोचि मुक्त पाहीं ॥ तुझें० ॥ १ ॥
तुझी कृपा व्हावी म्हणुन साधन करिताती ।
[2]नेति नेति वदुनियां श्रुति मौन धरिती ॥ तुझें० ॥ २ ॥
अहंभाव जिव शिव आहे सर्व भ्रम ।
माया नाहीं नाहीं अवघा आत्माराम ॥ तुझें० ॥ ३ ॥
राम म्हणे गुरुपदीं अनन्य शरण ।
न जाणुनि प्रेम भावें भक्ति करीन ॥ तुझें० ॥ ४ ॥

## पद १२१ वें.

लवकरि यावें हो! गोपाळा । मधुसूदना! घननीळा! ।
श्रमलों संसारीं अपार । मज दीनातें उद्धरीं ॥ ध्रुवपद. ॥

---

१. कमलनयन. २. असें नव्हे, असें नव्हे.

विषयसर्पें हो! डंखिलें । तेणें मन भ्रमलें ।
निशिदिनिं तळमळ । बहु आहे कृपादृष्टि पाहे ॥ लव० ॥ १ ॥
देहाअभिमान सौजन्य । आयुष्य गेलें जाण ।
आतां गति कैसी श्रीहरि । भवसिंधूतें[1] उतरी ॥ लव० ॥ २ ॥
ऐसा मोहो हा असे फार । बुद्धि नाहीं स्थिर ।
काळ ग्रासिल भय भारी । जन्ममरण वारी ॥ लव० ॥ ३ ॥
**राम** विनवितो अनन्य । भक्तिभावेंकरुनि ।
**कृष्ण** महाराजा वनमाळी । शेवटीं मज सांभाळी ॥ लव० ॥ ४ ॥

### पद १२२ वें.

सतत मुखीं वदे **कृष्ण** नाम । त्याचा नासे अज्ञान सर्व भ्रम ॥ ध्रुवपद. ॥
एक आत्मा ऐसा बोध जाला । तोचि भवसागर तरला ॥ सत० ॥ १ ॥
**हरि**ची सत्ता हृदयीं प्रकाशली । तेणें क्रियमाण संचित भस्म जालीं॥सत०॥२॥
सर्वभूतीं देव भक्ति करी । येणें जन्ममरण निवारी ॥ सत० ॥ ३ ॥
**राम** म्हणे शरण देवा तुज । [2]दीननाथा! कृपा करी मज ॥ सत० ॥ ४ ॥

### पद १२३ वें.

उत्तम तुझें नाम **कृष्णा**! वाटतें मज प्रिय ।
द्वैत विचारिता मना लागे अप्रिय ॥ ध्रुवपद. ॥
स्वधर्म कर्म अर्पण केलें असे जयालागीं ।
मुमुक्षु शिणले येच अर्थीं बहु जगीं ॥ उत्तम० ॥ १ ॥
भक्तिमुक्ति तुझ्या चरणीं आहे ती प्रत्यक्ष ।
श्रुतिशास्त्रें ऐसी देतातहि साक्ष ॥ उत्तम० ॥ २ ॥
शरीर वाचा चित्त तुझें पायीं हें अर्पण ।
सप्रेम भक्तिभावें **राम** जालासे लीन ॥ उत्तम० ॥ ३ ॥

### पद १२४ वें.

अजुन कां रे! भ्रमें भुललासी । आयुष्य गेलें काळ तुला ग्रासी ॥ध्रुवपद.॥
बाळपण गेलें तारुण्य उभारलें । योषितेच्या संगें मन थिजलें ।
आप्तवर्गीं स्नेह विस्तारिले । येणें तुझें वय व्यर्थ गेलें ॥ आजु० ॥ १ ॥

---

१. संसारसमुद्र. २. गरीबांचा स्वामी.

लोभसर्पें तुला डंखियलें । वासनेनें बहु भुलविलें ।
संसारचक्रीं चित्त लुब्ध जालें । तेणें हरिचें स्मरण अंतरलें ॥ आजु० ॥ २ ॥
आतां तूंचि करी द्वैतत्यांग । आत्मबोधें होई अंतरंग ।
विवेकज्ञानें होसी तूं निःसंग । येणें तुझा जाईल भवरोग ॥ आजु० ॥ ३ ॥
राम म्हणे सार्थक हेंचि जालें । जीव देवा! शरण ऐसे आले ।
त्याचें जन्ममरण वांव जालें । प्रेमभावें आनंदें पूर्ण धाले ॥ आजु० ॥ ४ ॥

## पद १२५ वें.

कांय सांगूं गुरुपदींची बाई! मात ॥ ध्रुवपद. ॥
बोधें करुनि मन हरपलें । वृत्ति लीन जाली अकस्मात ॥ काय० ॥ १ ॥
द्वैताद्वैत निरसुन गेलें । हरी प्रकाशला हृदयांत ॥ काय० ॥ २ ॥
ध्येय ध्याता ध्यान सर्वही गेलें । चैतन्यचि चित्त आनंदांत ॥ काय० ॥३॥
सगुण निर्गुण अवघा देव । मग सहजचि अभिमान ॥ काय० ॥ ४ ॥
अच्युतसुत राम अनन्य । कृष्णचरणीं निवांत ॥ काय० ॥ ५ ॥

## पद १२६ वें.

कृष्णचरणीं सतत लीन प्रेमें असावें ॥ ध्रुवपद. ॥
वर्णाश्रम धर्मयुक्त निरेंहंकृति कर्म करूनि ।
फल इच्छा त्यजुनि मनीं ईश्वरीय पावे ॥ कृष्ण० ॥ १ ॥
अहंममता लोभभयें दृगदृश्य त्यजुनी सर्व ।
एक देव निशिदिनीं स्मर अंतरीं भजावें ॥ कृष्ण० ॥ २ ॥
नवविध भक्ति आचरूनि आत्मनिवेदनीं समर्पुनि ।
मायानदी उल्लंघुनि निजरूपीं रमावें ॥ कृष्ण० ॥ ३ ॥
अच्युतसुत राम म्हणे पूर्णानंदीं सुख घेउनी ।
रामनाम मुखीं वदुनि हरीपदीं रंगावें ॥ कृष्ण० ॥ ४ ॥

## पद १२७ वें.

हरिचरणीं प्रेम धरी मना! रे!। अरे! मना! मी किति तुज विनवूं॥ ध्रुवपद. ॥
त्रैलोकीं हिंडुनि सुख घे दिननिशि । आझुनि सावध होइशी ना रे!॥हरि०॥१॥
बहु पुण्य करुनि नरतनु प्राप्ति । यांत सार्थक करिसि ना रे! ॥ हरि०॥ २ ॥
दृग दृश्य सर्व विसरुनि द्वैत । एक आत्म स्मर धरिसि ना रे! ॥ हरि०॥३॥

---

१. व्यर्थ, निष्फळ. २. तृप्त झालें. ३. पद १३२ वें पहा. ४. गर्वरहित.

वासनेचा क्षय करूनियां बोधें । भवसिंधु पार होसिना रे! ॥ हरि० ॥ ४ ॥
राम म्हणे आतां हेंच या साधनीं । कृष्णचरणीं [1]अनन्य रमसिना रे! ॥ हरि० ॥ ५ ॥

## पद १२८ वें.

गुणमय सुंदर मूर्ति हरिची ॥ ध्रुवपद. ॥
श्यामतनु गोजरी नेत्रविशाळ । वदनीं मुरली मधुर ध्वनिची ॥ गुण० ॥ १ ॥
मस्तकीं मुगुट गळां वनमाळा । अंगीं उटि केशराची ॥ गुण० ॥ २ ॥
गुण रत्नमय कुंडल भाळीं टिळक । घोंगडी काळी जरिकांठाची ॥ गुण० ॥ ३ ॥
ऐसा हा घननीळ यशोदेमंदिरीं । आवडि यासि गोपिकांची ॥ गुण० ॥ ४ ॥
राम म्हणे कृष्ण व्यापक पूर्ण । चरणीं प्रीति जडली मनाची ॥ गुण० ॥ ५ ॥

## पद १२९ वें.

गुरुचरणीं लीन सख्या! होय लौकरि ॥ ध्रुवपद. ॥
काळ प्रचंड अतिक्रूर । याचें भय मानी थोर ।
आतां स्वहित करी झडकरि ॥ गुरु० ॥ १ ॥
मन तुझें बहु चपळ । विषयसंगीं अतिविपुळ ।
तेणें जन्म गेलें बहुपरि ॥ गुरु० ॥ २ ॥
आतां सर्व भ्रांति त्याग । हरि ध्याई अंतरंग ।
येणें माया मोहो निवारी ॥ गुरु० ॥ ३ ॥
सर्वभूतीं देव स्मरीं । हेंचि ध्यान सतत धरीं ।
मग निजपद पावसि त्वरीं ॥ गुरु० ॥ ४ ॥
राम म्हणे हेंचि साधन । अनन्य उपाय नाहीं याविण ।
कृष्णचरणीं प्रीति तूं धरीं ॥ गुरु० ॥ ५ ॥

## पद १३० वें.

क्षणभंगुर हें खरें । मना! रे! सावध होईं त्वरें ॥ ध्रुवपद. ॥
अहंममता लोभें करुनि । फिरवी देशांतरीं ।
काळ तुला त्वरित ग्रासि । येति गर्भवास रे! ॥ क्षण० ॥ १ ॥
वासनेच्या छंदें विषय घेसि । तृप्ति तुझि नाहीं रे! ।
नरतनु [2]दुर्लभ भ्रांति सांडीं । चुकवी जन्मांतरीं ॥ क्षण० ॥ २ ॥
अध्यात्म बोधें वैराग्ययुक्त । हरितें नित्य स्मरीं रे! ।
भूतीं देव ध्याउन सतत । निजपदीं स्थिर होईं रे! ॥ क्षण० ॥ ३ ॥

---

१. लीनतापूर्वक. २. मिळण्यास कठीण, असाध्य.

राम म्हणे शरण साधुसि जावें । अन्य उपाय नाहीं रे ! ।
रामनाम मुखीं वदुनि कृष्ण-। पदीं लीन होई रे ! ॥ क्षण० ॥ ४ ॥

## पद १३१ वें.

हरी कसा नेईल निजधामा? ॥ ध्रुवपद. ॥
विषयाचि प्रीति धरितो निशिदिनिं । म्हणोनि विसर[1] रामा ॥ हरी० ॥१॥
वेद आज्ञायुक्त कर्मेंही करितो । फळ इच्छा स्वर्गकामा ॥ हरी० ॥ २ ॥
शास्त्राभ्यासें शब्दज्ञान जालें । तेणें तुझा नाहीं प्रेमा ॥ हरी० ॥ ३ ॥
अहं आप्तवर्ग याचा मना लोभ । यास्तव चुकलों नेमा ॥ हरी० ॥ ४ ॥
नरतनुप्राप्ति सार्थक नाहीं । भ्रमलों या भवभ्रमा ॥ हरी० ॥ ५ ॥
राम म्हणे कृष्णा ! शरण तुज । कृपा करीं पुरुषोत्तमा[2] ! ॥ हरी० ॥ ६ ॥

## पद १३२ वें.

काय[3] बोलों निजपदींची बाई ! मात ॥ ध्रुवपद. ॥
जिकडे तिकडे घनरूप भरलें । दृश्य लया गेलें अकस्मात ॥ काय० ॥ १ ॥
माझें मीपण अवघें गेलें । पूर्णानंद जाला सहजांत ॥ काय० ॥ २ ॥
माया आहे नाहीं याचि होती भ्रांति । आतां गेली स्वस्थ निवांत ॥काय०॥३॥
अवघा चिद्विलास असे । भक्तिप्रेमें सतत सुखांत ॥ काय० ॥ ४ ॥
राम म्हणे कृष्णाचरणीं शरण । तंव स्मृति असो हृदयांत ॥ काय० ॥ ५ ॥

## पद १३३ वें.

सावध होई हें बरें । प्राण्या रे ! हरितें ध्याई त्वरें ॥ ध्रुवपद. ॥
इंद्रियनिग्रह विषय त्यजुनि । प्राणापान समता रे ।
सहस्रदळावरि जाउनि । मना स्थिर करि रे ! ॥ सावध० ॥ १ ॥
सत्कर्म करूनि निरहंकृति । ईश्वरीं त्यजीं रे ! ।
तस्य प्रसादात्[4] मोक्षपद तूं । पावसि लौकरि रे ! ॥ सावध० ॥ २ ॥
नवविध भक्ति सतत करुनि । कीर्तनीं प्रेम धरीं रे ।
भूतीं देव भावें धरुनि । जन्ममरण वारी रे ! ॥ सावध० ॥ ३ ॥
अच्युतसुत राम म्हणे । सार्थक हेंचि रे ! ।
पांडुरंग वदुन नित्य । अनन्य होई रे ! ॥ सावध० ॥ ४ ॥

---

१. विस्मृति. २. पुरुषश्रेष्ठा (कृष्णा). ३. पद १२५ वें पहा. ४. त्याच्या (ईश्वराच्या) प्रसादामुळें.

### पद १३४ वें.

आंवरीं आपुला हरी । यशोदे! आंवरीं अपुला हरी ॥ ध्रुवपद. ॥
तडतडतडतड मला झोंबतो दहींदुध अवघें हरी[1] ।
दिसतो लहानापरी । यशोदे! ॥
काळी कांबळी काळी रात्र अंधारीं येतो माझे घरीं ।
निजली मी सेजेवरी । यशोदे! ॥
हळू हळू हळू हळू हाहि सांवळा हात ठेवी माझे उरीं ।
चाल ॥ दचकुनी उठली खरी । यशोदे! ।
तळमळ मम अंतरीं यशोदे! ।
चोर म्हणुनि घाबरी यशोदे! ।
म्हणे 'मी' धिटाचेपरी यशोदे! ।
टीप ॥ 'उगि उगि उगि उगि' मला दटावीतो अशी करि सोदेगिरी ॥ १ ॥
फन फन फन फन सदा सासूबाई करिती आम्हावरी ।
नाहीं सुख आम्हां घरीं । यशोदे! ॥
मर मर मर मर जिणें आमुचें आलें या संसारीं ।
जाऊं सोडुनि या नगरीं । यशोदे! ॥
काय काय काय काय कोठें गेल्यानें मिळणार नाहीं भाकरी ।
कोठें फिर्याद जावी तरी । यशोदे! ॥
तुम्ही तुम्ही तुम्ही तुम्ही अहा पाटील बसले डोईवरी ।
वय झालें म्हातारी यशोदे! ॥
सांड सांड सांड सांड काळें कारटें कौतुक वाटतें भारी ।
चाल ॥ आतांशी नवी वैखरी[2] यशोदे! ।
किति बडबड करणें तरी यशोदे! ।
तुज द्रव्याची भरभरी यशोदे! ।
जाती उग्याच बोलुन घरीं यशोदे! ।
टीप ॥ नको नको नको नको रागें भरुं सुधी[3] राम विनंती करी. ॥ २ ॥

### पद १३५ वें.

संतो! खूब समजना जी! । सबकी लालच[4] त्यजना जी! ॥ ध्रुवपद. ॥
हड्डी गोस्त लव मल मुतर दुर्गंध बीच जमाया ।
उप्पर तो चमडेसे लपटा सुंदर करके दिखाया ॥ संतो० ॥ १ ॥

---

१. हरण करी. २. वाणी, बोलणें. ३. उत्तम आहे ज्याची बुद्धि तो (रामकवि). ४. लोभ.

तरी पगरी भो चमरो रे धन कामा न बढाया ।
आखर सबही त्यजके जाकर आपही जंगल सोया ॥ संतो० ॥ २ ॥
एक तनूकी खाक[1] भयी तद दुजा जनमही लिया ।
लछ चौऱ्यासी योनी फिर फिर अपना हित नहिं किया ॥ संतो० ॥ ३ ॥
मै मै सबही कहते फिर मैं कोन ये भेद नहीं पाया ।
**राम** कहे गुरु दयाल मिल गये उन्हे मरम बताया ॥ संतो० ॥ ४ ॥

---

## ११. कृष्णकिंकरकृत पदें.

### पद १३६ वें.

भक्तजना सांभाळीं सांवळ्या! येइं रे! **वन**माळी! ॥ ध्रुवपद. ॥
श्यामसुंदरा! जगदोद्धारा! । कृपादृष्टिं न्याहळीं[2]. ॥ भक्तजना० ॥ १ ॥
ठाण पहुडे मुरली अधरीं । वाजवी कदंबातळीं. ॥ भक्तजना० ॥ २ ॥
मोर मुगुट शिरीं दिव्य कुंडलें । शोभे टिळक भाळीं. ॥ भक्तजना० ॥ ३ ॥
कामक्रोध मद मत्त **का**लिया । रगडी पायांतळीं. ॥ भक्तजना० ॥ ४ ॥
आशा मनशा विषयवासना । मोहोजाळ समूळीं. ॥ भक्तजना० ॥ ५ ॥
गोप गोधनें वनीं चारितां । दध्योदन करकमळीं. ॥ भक्तजना० ॥ ६ ॥
पापी **अ**घासुर **ब**की **पिं**गला । उद्धरिल्या व्रजबाळी. ॥ भक्तजना० ॥ ७ ॥
**कृ**ष्णकिंकरा पाहीं कृपेनें । अभय हस्तें कुरवाळीं. ॥ भक्तजना० ॥ ८ ॥

### पद १३७ वें.

धन्य सद्गुरु कारागिर हा देखिला नयनीं ।
चिन्मय कंकण लेववुनि मजला नेलें निजभुवनीं. ॥ ध्रुवपद. ॥
अनंत जन्मिचें सुकृत[3] बाई! होतें मम पदरीं ।
अवचित गांठ पडली, त्याणें धरिलें मजला करीं, ॥
संनिध बैसुन दृष्टीं न्याहाळुन पद्महस्त शिरीं ।
ठेवुन, सहा गुरुनाथ दावी नवल कुसरी[4] ॥
श्रवणीं पेरिलें नयनीं उगवलें काय सांगूं परी ।
स्वात्मस्वरूपीं मन वेधलें निमग्न अंतरीं ॥
भक्तिहळद[5] आंगीं मर्दुनी प्रेम गळसरी ।
सौभाग्याचें भाळीं कुंकूं लाविली चिरी ॥

---

१. रखा. २. पाहीं. ३. पुण्य. ४. कौशल्य. ५. भक्तिरूप हळद.

चाल ॥ घातलें ज्ञानांजन मम[1]नेत्रीं ।
श्रवणीं[2] अनुभव बुगडी मळसुत्री ।
विवेक कोंदण केलें कडसुत्रीं ।
लागलें ध्यान अखंड 'सोऽहं'मंत्रीं ।
टीप ॥ भाव बिजवरा[3], दया सरी[3] ही, स्वधर्म तनमणी[3], ।
तऱ्हेतऱ्हेचें भूषण मजला दिधलें साजणी. ॥ धन्य ० ॥ १ ॥
ऐक साजणी! औट शिखरीं देखिली म्यां कळा ।
शांति ठुसी[3], विवेक टिका[3] दिसे दिव्य गळां, ॥
अक्रोधाचें पदक लेइलें जडित फांकली कळा[4], ।
अदंभची पेट्या[3], अहिंसा शोभे बोरमाळा[3], ॥
जितेंद्रियांचे कांप[3] कानीं, दिसे चंद्रकळा[5], ।
शम चूडा[3], दम पाटली[3], बोध टिकली भाळां, ॥
सप्त पुतळी अनुभव सूत्रें गुंफिली माळा, ।
........................................ ॥
चाल ॥ यम[6] नेत्र हे विरवल्या[3] तोडर[3] ।
दम तीं तीक्षा जोडवीं[3] पोल्हार[3] ।
उपरतीं बिचवे विरूपीं सुंदर ।
सप्त पुतळी आनंद हातसर ।
टीप ॥ निर्वैर केतक शिरीं विराजे चंद्रकोरवाणी[7] ।
क्षेम राखडी[3], पूर्ण मूद[3] दिधली श्रीगुरूनीं. ॥ धन्य० ॥ २ ॥
निर्गुणपुरिचा सद्गुरु जोहरी[8] देखिला नयनीं ।
जडाव कोंदण नग मजला दाखविलें त्यांणीं ॥
श्रद्धा मोतीं गुंफुन भाळीं मस्तकिं रेखोनी ।
समाधी मोहनमाळ[3] डुल्लडी[3] झालेला उन्मनीं ॥
चौंपुरुषार्थ करीं मुद्रिका चटक चांदणी ।
श्रवण मनन निजध्यास कंठा शोभे फुलवेणी ॥
शुद्ध सत्व हा चितांग कंठीं शोभे बहुगुणी ।
महावाक्याचे पंखे बाळ्या त्यालें मी श्रवणीं ॥

---

१. मोझ्या डोळ्यांत. २. कानांत. ३. अलंकारविशेष. ४. प्रकाश, प्रभा. ५. चंद्राप्रमाणें कांति. ६. दोन. ७. चंद्र+कोर+वाणी.=चंद्राच्या कोरेप्रमाणें. ८. हक्कदार, वतनदार.

चाल ॥ शुद्धमति बाजुबंद कंकण ।
चंद्रहार परमार्थ[1] हा जाण ।
निर्हेतु हे अलंकार पूर्ण ।
लेवुन सद्गुरुचरणीं मी लीन ।
टीप ॥ जन्म मरण हा भ्रांति पडदा गेला निरसोनी ।
निश्चळ निवात होउनि रत मी झालें गुरुचरणीं ॥ धन्य० ॥ ३ ॥
ऐसें अपार लेणें मजला सद्गुरुनें लेवविलें ।
द्वैतभयातें दूर सारुनी निजपद दाखविलें ॥
देहचतुष्टय पिंड ब्रह्मांडांतुन वेगळे केले ।
पंचभूत आणि त्रिगुण विषय सहज निरखिले ॥
उन्मनी शेजे जाउनि सखये! सुखें पहुडल्यें[2] ।
अद्भुत तेज पाहुन मन हें आत्मपदीं रमलें, ॥
सद्गुरुनाथ दया करुनियां अनिर्वाच्य केलें, ।
काय होऊं उतराई तयासि जीवन्मुक्त झालें ॥
चाल ॥ धन्य धन्य ती सद्गुरुमाउली[3] ।
दीन वत्सावरि धांवोनि आली ।
माझी मजला वस्तू दाविली ।
भक्ति वरली मुक्ति मज दिधली ।
टीप ॥ लेउन भूषण कृष्णकिंकर रतला गुरुचरणीं ।
'त्वंपद' 'तत्पद' सारुनि अशी पदीं रमलों आनंदानीं ॥ धन्य० ॥ ४ ॥

## पद १३८ वें.

अनुभवचोळी लेउनि साजणी निमग्न मी झालें ।
परात्पर चिन्मयरूप नयनीं देखिलें ॥ ध्रुवपद. ॥
प्रपंचमाया सोडुन सदये! झालें मी वेडी ।
आशा मनशा तृष्णा सोडुनि झालें मी उघडी ॥
काम क्रोध हा लोभ साजणि! केला देशधडी ।
पंचविषय हा व्यर्थ पसारा विवेकबळें रगडी ॥
चौं देहांचा निरास करुनि गेलें पैलथडी ।
सद्गुरुकृपें कुंकू लेउनि त्रिगुण गुंती[5] तोडी ॥

---

१. नाहींसा झाला. २. निजल्यें, पडल्यें. ३. माता, आई. ४. तहान. ५. गुंतागुंत.

मोह[1] वासना[2] ममता यांची केली कंथा साडी ।
कारें धरुनी सद्गुरुनें दिधली चिद्रत्न जोडी ॥
त्रिवेणीसंगमीं[3] स्नान करोनी चोळी मी ल्यालें । परात्पर० ॥ १ ॥
काय सांगूं सख्ये! बाई! नवल मी सद्गुरुची करणी[4] ।
चिद्रूपाची चोळी मजला दिधली बेतोनी ॥
पंचरंगी हें रेशिम सुंदर केलीसे आटणी ।
पांच पंचविस डूल छत्तिस पाहिले नयनीं ॥
तुकडे प्रेमसुईनें[5] केलीसे जडणी ।
चंद्रसूर्य हे दोहों बाह्यांसि प्रकाश कोंदणी ॥
अधोमुखी ही नागिण सुंदर नांव कुडलणी ।
........................................ ॥
षडचक्राचा भेद करूनी निवांत मी झालें । परात्पर० ॥ २ ॥
चार सहा दहा बारा पाहिलें कमळ ।
षोडश दोन सहस्र दळांचा मार्ग हा[6] अचल ॥
सत्रावीचें[7] पान करोनी झालें मी विमळ[8] ।
इडा पिंगळा मार्ग सुषुम्ना तपस्वी बाळ ॥
आउट पीठ गोल्हाट वाट ही सरळ ।
त्रिकुटावरते भ्रमरगुंफा पाहिली निवळ ॥
झगमग नयनीं ज्योत देखिली विचित्र हा खेळ ।
शुद्धस्वरूपीं मन वेगळें झालें मी सुशीळ ॥
अक्षय चोळी आंगीं लेउन सोंवळी मी झालें. । परात्पर० ॥ ३ ॥
आणिक एक म्यां नवल देखिलें उफराटा पिंजरा ।
तीनशें साठ तुकडे जोडुन केलासे पुरा, ॥
बाहात्तर खोल्या सांधे सोळा नवखंड वसुंधरा[9], ।
स............औट कोटी पाहे शरीरा ॥
एकविस मणके, माळ साजिरी पाहें तूं माघारा ।
जें जें पीडित तें ब्रह्मांडीं बोले वेदगिरा[10] ॥

---

१. माया. २. इच्छा. ३. जेथें भागीरथी, यमुना व सरस्वती ह्या नद्या मिळतात तेथें. ४. कृति. ५. प्रेम हीच सुई तिनें. ६. न हलणारा. ७. जीवनकलेचें. ८. पवित्र. ९. पृथ्वी. १०. निगमवाणी.

सद्गुरुकृपें अनुभव जाणुनी वाचें मौन्य[1] धरा. ।
....................................................... ॥
सच्चित्सुखघनरूप पाहुन तल्लिन मी झाल्यें. । परात्पर० ॥ ४ ॥
बारा सोळा एकविस हजार अखंड दिननिशीं ।
अहोरात्र हें माप चालिलें पहा तुम्ही त्यासी ॥
'सोऽहं' ध्यानीं लक्ष्य लावुनी पहा स्वरूपाशी ।
त्रैलोकींची चोळीरचना माझी ही सुरसी[2] ॥
सद्गुरुचरणा शरण जाउनी जन्ममरण निरसी ।
दृश्यपदार्थोत्पांग करोनी अक्षय तूं होसी ॥
माझें रूप मज दाविलें आश्चर्य मानसीं ।
चिन्मय चोळी लेउन शरण सद्गुरुशीं ॥
करीं धरोनी कृष्णकिंकरा निजपद दावीलें. । परात्पर० ॥ ५ ॥

## पद १३९ वें.

मी अपराधी खरा । विठोबा! तारीं दयासागरा[3]! ॥ ध्रुवपद. ॥
या भवडोहीं बुडतों मी पाहीं । नेईं तूं पैलतीरा. ॥ विठोबा० ॥ १ ॥
षड्रिपु जळचर ओढिती मजला । धांव वेगीं गिरिधरा! ॥ विठोबा०॥ २ ॥
लक्षचौऱ्यायशीं फेरे फिरतां । श्रमलों कमलावरा! ॥ विठोबा० ॥ ३ ॥
पतितोद्धारक नाम जगत्रयीं । पिटी निगम दांडोरा. ॥ विठोबा० ॥ ४ ॥
कृष्णकिंकरा पाहीं कृपेनें । देईं चरणीं थारा. ॥ विठोबा० ॥ ५ ॥

---

## १२. अवधूतकृत[4] पदें.

## पद १४० वें.

सखये! मज घेउनि जाय तुं सद्गुरुसदना ॥ ध्रुवपद. ॥
नावडे सुत माहेर सासुर संपति सदना ।
....................................................... ॥
नलगे हेमवसन भक्षण, जाळिलें मदना ।
पाहेना कांधें दाखवी लौकरी, देशिकवदना[5] ॥ सख० ॥ १ ॥

---

१. मुकेपण. २. उत्तम. ३. कृपासागरा. ४. हा कवि नागपुराकडील राहणारा असावा असें दिसतें. कारण हीं सर्व पदें फक्त नागपुराकडील पोथ्यांतूनच मिळाली आहेत. या कवीच्या बापाचें नांव अनंत असावें असें वाटतें. ५. देशिक=गुरु.

घेउनि सखि चालिली वाटेनें दावित लक्षणा ।
नेउनि पुढें स्थीरत्व बैसवी तुर्येचे आसना ॥
त्यागवि देहकोशते अवस्था करोनि अभिन्ना ।
पाहतां पाहतां मी न दिसें आपली आपणा ॥ सख० ॥ २ ॥
देखतां दृश्य देखणे, नाढळे, प्रकाश कोंदला ।
परेचा जो कां पवाडा, शब्दाचा मुका होउनि ठेला ॥
सुखाचा बहु सुकाळ मांडिला, भेद निर्वाळिला ।
अवधूतपण मोडुनि आत्मारामचि जाहला ॥ सख० ॥ ३ ॥

## पद १४१ वें.

जय विद्याधीशा! गणेशा! ॥ ध्रुवपद. ॥
कुंजरतुंड उदंड सुखप्रद । झिरपत गंड अपार दयाद्रव. ॥
लंबोदर पीतांबर सुंदर । उंदिरवाहन पापविनाशा! ॥ जय० ॥ १ ॥
खंडित दुर्मति दंडि वितंडित । मंडित महिसुर पंडित वाहिती ॥
खंडित अघगण सांडित दुर्जन। कुंठित करि अभिमानविषा ॥ जय० ॥ २ ॥
मालारतु विशालाधर कटीं । वाल डमरु त्रिशूलाधर करीं ॥
पाशांकुश सुमुखाला ध्याउनि। अवधुत अर्पित पदयुगीं शिरसा ॥ जय० ॥३॥

## पद १४२ वें.

सीतारमणा! । रामचंद्रा! हो! ॥ ध्रुवपद. ॥
रामचंद्र निगमागम स्तविति । निर्जरगण अनुरत पद वंदिति ।
निपुणित मुनिजन कवि गुण वर्णिति । निरतिशय सुंदर करिं करुणा ॥ सी० ॥
रजनिचरांतक रविकुलदीपक । राजिवनेत्र रमामनरंजक ।
मुनिमखरक्षक मदनजनक । सुखदायक दिनकरवंशाभरणा ॥ सीता० ॥ २ ॥
पापविनाशन रिपुकुलशासन । भवतुवितोषन दुर्जनशासन ।
शांतिपदासन भ्रांतिविमोचन । निशिदिनीं रत अवधुत तवचरणा ॥ सी० ॥३॥

## पद १४३ वें.

जाइं जाइं रे! । गुरुपदिं मन देईं ॥ ध्रुवपद. ॥

---

१. जेथें मनाचा लय होतो ती अवस्था. २. परा=कान. ३. नाहींसा केला. ४. पाप-समूह. ५, मस्तक. ६. देव. ७. राक्षसांतक. ८. रमेच्या मनाला रंजविणारा. ९. विश्वामित्रयज्ञरक्षणकर्ता.

एकनिष्ठ परि निविष्ट होउनि । सृष्टिभाव दृष्टीस न घेउनि ।
श्रेष्ठ वाक्य गुरुउच्छिष्ट सेउनि । वेष्टिसमेष्टी परता होई ॥ जाइं० ॥ १ ॥
कष्ट कार्य, त्यजि नष्ट काममोह । स्पष्ट पाहें निज स्पष्ट लोचनीं ।
ज्येष्ठ स्वामी सनकादिक रमती । वसिष्ठ शुक वसती जे ठायीं ॥ जाइं० ॥२॥
अष्टभाव वरिं, अष्ट त्याग करीं । अष्ट प्राप्ती होति त्या अन्हेरीं ।
अष्टाक्षरि अविद्या[1] मारुनि । अवधूत अखंड सुखी होई ॥ जाइं० ॥

## पद १४४ वें.

**यादवेंद्रा! रे! । रुक्मिणीरमणा!** ॥ ध्रुवपद. ॥
**यादवेंद्र** यज्ञोद्भवयंता[2] । यज्ञदेव ब्राह्मणरूपधर्ता ।
यज्ञदानतपपालनकर्ता । यज्ञकामसक्रतुफलदाता ॥ **याद०** ॥ १ ॥
वेद विदित **विधिउद्भव** कारण । विद्वज्जन सम्मिनि जीवन ।
विप्रपालना विपुनित तोषण । **विरिंचि** विनवित तव पदपंकजा ॥ **याद०** ॥२॥
**देवकीनंदन** अघगणखंडन । दानवकंदन यदुकुलमंडण ।
दुर्मतिदंडन देवदयाकर । **अवधुत** शरणागत तवचरणा. ॥ **याद०** ॥ ३ ॥

## पद १४५ वें.

**गिरिजारमणा!** । पाहि पाहि रे! ॥ ध्रुवपद. ॥
जटामुगुटमंडित अखंडित । खंडित द्वैत अखंडित शाश्वत ।
भिंडिपालधर रुंडमालधर । **शिवदयार्णव** भवनिधितरणा[3]! ॥ **गिरि०** ॥ १ ॥
चंद्रसूर्य शिरीं नेत्रत्रय **शिव** । पंचवक्त्र सूत्रत्रयधारक ।
शत्रुकाम तृणपावकसम हत । मूल मंत्र जपका करि शमना ॥ **गिरि०** ॥ २ ॥
दशकर कलशत्रिशूलडमरुधर । व्याघ्रांबरधर विश्वबिज निज ।
**विश्वनाथ** विरुपाक्ष विराजित । **अवधुत अनंत** तत्पर चरणा ॥ **गिरि०** ॥३॥

## पद १४६ वें.

**रामा! रामा!** हो! । **श्री**[4]सुखदायी! ॥ ध्रुवपद. ॥
**रामा!** न भजुनि कामादि नको । दामारहित सुदामा समगति ।
क्षमाजाधिप ध्याउनि निजगति । पाउनि समगति **रामा रामा** ॥ **रामा०**॥ १ ॥
योध्याधिप तत्पदीं आणुनि । सध्या सुख मन बुध्यादिक करि ।
विद्या प्रगट अविद्या नासुनि । निज अंतरीं प्रगटवि जो रामा ॥ **रामा०**॥

---

१. अज्ञान. २. यंता=सारथी. ३. संसारसागर पार करणाऱ्या. ४. लक्ष्मीला सुख देणाऱ्या.

लक्ष्य धरुनि वरि मोक्ष फुकाचा । पक्ष अवदती तो विबुधाचा ॥
शास्त्रश्रुतिइतिहासस्मृतिचा । जाणुनि अनंतसुत धरि प्रेमा. ॥ रामा० ॥ ३ ॥

### पद १४७ वें.

रामचंद्रा ! रे ! । राजाधिराजा रामा ! ॥ ध्रुवपद. ।
रामचंद्र रघुवीर रघूत्तम । राजीवनेत्र[1] रविकुलदीपक ॥
रावणमारक रजनीपतिधर- । प्रियकर सुरवरदायक रामा ! ॥ रा० ॥ १ ॥
महिजापति महाराज महाबळी । महिसुत तारितसे उदधीजळीं ॥
मदनदहनमुनिमानस जो बळी । महिमा न कळत निगम निराक्रमा. ॥रा०॥२॥
चराचरांतर बाहेर सुखकर । चर्मचक्षुसी नव्हेसि गोचर[2] ॥
चर्मांबरधर ध्यानिं निरंतर । चंदन चर्चुनि मंगळधामा. ॥ रा० ॥ ३ ॥
अयोध्याधिप अपराध क्षमा करीं । अंजनिसुत हृद्भुवनिं निरंतरीं ॥
अज अव्यय अनाम अक्षरी । अनंतसुत सुखदायक रामा. ॥ रा० ॥ ४ ॥

## १३. गिरिधरकृत पदें.

### पद १४८ वें.

ये रे ! ये रे ! नंदकिशोरा ! रे ! । गोपिविहारा ! रे ! ।
अधरिं धरुनि मधुर मधुर मुरली वाजविशी पोरा ! रे ! ॥ ध्रुवपद. ॥
गोपललना[3] तुजला ध्याती । कळला आहेसी चोरा रे ! ॥ ये० ॥ १ ॥
अझुनी कां रे ! सोय न धरिसी । करिसी व्रजसंचारा रे ! ॥ ये० ॥ २ ॥
गिरिधरांकित चरणीं तुझ्या । मागतसे निजथारा रे ! ॥ ये० ॥ ३ ॥

### पद १४९ वें.

बाई ! गे ! हा वनमाळी । आहे कानडा कपटी. ॥ ध्रुवपद. ॥
गोरसहारी गोधन चारी । रंजित[4] पीतपटीं[5]. ॥ बाई० ॥ १ ॥
मुरलीरवें मोहित व्रजललना । क्रीडत यमुनातटीं. ॥ बाई० ॥ २ ॥
गिरिधरांकित प्रेमरसें तुज । ध्यात हृदयसंपुटीं. ॥ बाई० ॥ ३ ॥

### पद १५० वें.

आम्ही देखिला माय ! तो श्रीहरी. ॥ ध्रुवपद. ॥

---

१. कमलनयन. २. दृश्य. ३. गवळ्यांच्या स्त्रिया. ४. विराजित. ५. पिंवळ्या वस्त्रानें.

जो का नित्य निर्विकार । ज्याचा नकळेची पार ।
तोची जाहला साकार । स्थान चिंमुर[1] ज्याचें. ॥ आम्ही० ॥ १ ॥
ब्रह्मचैतन्य केवळ । जो का अनादीचें मूळ ।
जेणें विश्व हें सकळ । इच्छामात्रें निर्मिलें. ॥ आम्ही० ॥ २ ॥
ज्याचा धरितां निजध्यास । तोडी जन्ममृत्युपाश ।
गिरिधर अंकिताची आस । स्वपदासी[2] पाववीं. ॥ आम्ही० ॥ ३ ॥

पद १५१ वें.

गाई माधव हा मधुपुरीचा ।
रमारमणु हा ध्याई अंतरीं हा विसावा मनिंचा ॥ ध्रुवपद. ॥
नदितटीं अधिष्ठान जयाचें । तो हा विलासी वृंदावनिंचा ॥ गाई० ॥ १ ॥
प्रतिवर्षी जन यात्रा ज्याची । नंदनंदन आणि यशोमतिचा ॥ गाई० ॥ २ ॥
गिरिधर अंकित अंकीं तूझ्या । तारी भवांतुनि[3] स्वामी आमुचा ॥ गाई० ॥ ३ ॥

पद १५२ वें.

तारीं तूं मजला श्रीराघवा ! । जानकीधवा ! हो ! रामा ! ॥ ध्रुवपद. ॥
रविकुलभूषणा ! नीरजलोचना[4] ! । शोभतसे अंकीं रामा[5] ॥ तारीं० ॥ १ ॥
दशरथनंदना ! दशमुखभंजना ! । वर्णितसे शिवउमा ॥ तारीं० ॥ २ ॥
गिरिधर अंकित तुजला प्रार्थित । नेई त्वरें निजधामा ॥ तारीं० ॥ ३ ॥

पद १५३ वें.

मुरलीधर हा समजावा. ॥ ध्रुवपद. ॥
त्याविण क्षणपळ युगसम वाटे । घेउनि येई विलंब न लावा ॥ मुर० ॥ १ ॥
तनु विरहें विगलित वो ! झाली । कोणितरी हरि नयनीं दावा ॥ मुर० ॥ २ ॥
गिरिधर अंकित त्याविण दुःखित । मज गमतो आज प्राण त्यजावा ॥ मुर० ॥ ३ ॥

पद १५४ वें.

भक्ती आंकळिला । कृपाघन भक्तिसि आकळिला. ॥ ध्रुवपद. ॥
पार्थरथीं सारथ्य करी जो । निजपद दे बळिला. ॥ कृपा० ॥ १ ॥
प्रल्हादास्तव प्रगटोनि स्तंभीं । दानव[6] निर्दळिला. ॥ कृपा० ॥ २ ॥
रुक्मिणीनें एक तुलसीदलानें । गिरिधरप्रभु तुलिला. ॥ कृपा० ॥ ३ ॥

---

१. हें चांदा जिल्ह्यांत आहे. २. मोक्षातें. ३. संसारांतून. ४. कमलनयना. ५. स्त्री (सीता). ६. हिरण्यकशिपू.

## १४. श्यामात्मजकृत पदें.

### पद १५५ वें.

**राम**ोदरीं जग, हृदयांतरीं । **राम** तुम्ही कां [1]वेळखाना? ॥ ध्रुवपद. ॥
नग कनकाचे, कनक नगीं पहा । **'अंतर्बहिश्च'** श्रुतिवचना. ॥ **राम०** ॥१॥
आवरीवार्ते **'भुवनेष्वंतः'** श्रुति । आंत खालींवर एक जाणा. ॥ **राम०** ॥२॥
राजस तामस सात्विक **राघव** । **'[2]ममैवांशो'** हरिवचना. ॥ **राम०** ॥ ३ ॥
**श्या**मात्मज वदे वेदलिखित खत । मंत पंडित साक्ष ध्याना. ॥ **राम०** ॥ ४ ॥

### पद १५६ वें.

**राम** जगीं भरला । अनुभव वेद वदे भरला. ॥ ध्रुवपद. ॥
चार दहा एक पांच मिळोनी । पाहातांची सरला. ॥ **राम०** ॥ १ ॥
पंचक टाकुनि चौदा घेउनी । एक असे विरला. ॥ **राम०** ॥ २ ॥
तुंडा जिनाविण घोडा पिटवुनी । संतांहीं धरला. ॥ **राम०** ॥ ३ ॥
**श्या**मात्मज म्हणे हें पद जाणिल । तोची [3]भव तरला. ॥ **राम०** ॥ ४ ॥

### पद १५७ वें.

बाई! मी [4]पिशी झाली ग! । नव पोरी एक सुत व्यालें ग! ॥ ध्रुवपद. ॥
जुना ठेवणा बहु दिवसांचा । नवरा त्यासी मी भ्यालें ग! ॥ बाई० ॥ १ ॥
चोखट पाहुनि पाट लाविला । [5]परपुरुषासी भ्यालें ग! ॥ बाई० ॥ २ ॥
काजळ कुंकू लावुनि डोळां । हळद वांटुनि प्यालें ग! ॥ बाई० ॥ ३ ॥
चुडा फोडुनि नवरंगाचा । उभी नभी मी नाहलें ग! ॥ बाई० ॥ ४ ॥
घोंगड वाणी ऐकुनि कानीं । **श्या**मसुता हसूं आलें ग! ॥ बाई० ॥ ५ ॥

### पद १५८ वें.

अशानें मिळेल तुला **हरि** काय? ॥ ध्रुवपद. ॥
बहुविध दोषा नित्य नूतन करी । स्वकृत [6]सुकृत गाय. ॥ अशानें० ॥ १ ॥
[7]निर्घृण निंदक कपटि अधार्मिक । वदत परासी न्याय. ॥ अशानें० ॥ २ ॥
वस्त्राभरणें सुशोभित कांता । निर्वसनें फिरे माय. ॥ अशानें० ॥ ३ ॥
**श्या**मात्मज म्हणे जन [8]भोंदाया । वरवर **हरिहर** गाय. ॥ अशानें० ॥ ४ ॥

---

१. ओळखीत नाहीं. २. भगवद्गीता—अध्याय १५ श्लोक ७ पहा. ३. संसार. ४. वेडी. ५. उत्तम पुरुषासी, ईश्वरासी. ६. पुण्य. ७. निर्दय, क्रूर. ८. फसवाया.

## पद १५९ वें.

कर्णधारें मज करणी केली कांहीं न बोलवे बोल ।
मन हें माझें भांबावलें. ॥ ध्रुवपद. ॥
उगीच आसनीं बसलें होतें एकांतीं मी स्थीर ।
मंजुळ वाहात होता समीर ॥
वोढावोढी करोनि त्यानें टेवुनि डोयीं कर ।
लाविलें मंदिराचें द्वार ॥
टीप ॥ बोल कुणाचे ऐकुं न येती झोंप आली एक पळ. ॥ मन० ॥ १ ॥
काय सांगूं झोंप सुखाची दिसला गे! आंधार ।
वाद्य ऐकिलें मग अपार ॥
घांट कठिन वाट चालतां पहांट वाटली जेर ।
निघाला तितक्यांतचि भास्कर ॥
टीप ॥ एक भागीं तो सोम शोभतो मध्यें तो अनिल ॥ मन० ॥ २ ॥
बारासोळा कळा मिळाल्या एक जागिं तेजाळ ।
जाहला अग्नीचा हिलाल ॥
इंदुवदन अणि कुंदरदन तें विशाल भाळ सोज्वळ ।
देखिला ज्योतिमध्यें एक बाळ ॥
टीप ॥ निसंगपणें ग्यां संग केला चित्पदीं जडेल. ॥ मन० ॥ ३ ॥
रतिसुखाचें सुख न वदवे काय सांगुं मी जनीं ।
अद्भुत श्रीगुरुची करणी ॥
गोष्टी लिहाया न पुरे सिंधू शाई, कागद मेदिनी, ।
देतिल साक्ष संत गुणी ॥
टीप ॥ एकाएकीं रामकृपेनें श्यामसुता लंघेल. ॥ मन० ॥ ४ ॥

## पद १६० वें.

ज्याचें मीपण आटेना । त्यासी देवहि भेटेना. ॥ ध्रुवपद. ॥
खेचरी भूचरी लावी अगोचरी । धनरामा विटेना. ॥ त्यासी० ॥ १ ॥

---

१. नावाडी. [येथें 'गुरू' असा अर्थ घ्यावा.] २. वारा, वायू. ३. जरा, थोडी. ४. चंद्र. ५. वायू. ६. कृति, कृत्य. ७. प्राप्त होईल. ८. अहंकार. ९. संपत्ति+बायको.

जप तप साधन सेवित विपिनीं[1] । काम्यप्रीति सुटेना. ॥ त्यासी० ॥ २ ॥
**श्या**मात्मज म्हणे गुरुबोधाविण । भवभ्रम तुटेना. ॥ त्यासी० ॥ ३ ॥

## पद १६१ वें.

दावा मज कोणि नयनीं । **दा**शरथी **आ**त्माराम. ॥ ध्रुवपद. ॥
वसे तेथें कांहीं न दिसे । दिसेना तेथेंचि असे ।
असे नसे टाकुनि म्हणति भजावें हो! निष्काम. ॥ दावा० ॥ १ ॥
अकामिका कामिक म्हणती । कामिका निष्कामिक वदती ।
कामिक निष्कामिक त्यजुनी म्हणति मुख्य एक नाम ॥ दावा० ॥ २ ॥
नाम तिथें धाम आहे । धामीं[2] **आ**त्माराम पाहे ।
**श्या**मात्मज म्हणे गुरुच्या सेवेविण दुर्लभ धाम[3] ॥ दावा० ॥ ३ ॥

## पद १६२ वें.

या मनगजेंद्रा आवरा जी! ॥ ध्रुवपद. ॥
**न**ळभूपाळा काय सोहळा । गांजियलें **ह**रिश्चंद्रा जी! ॥ या० ॥ १ ॥
सैंकुल[4] **रा**वण ठार मारिला । कलंक लाविला **चं**द्रा जी! ॥ या० ॥ २ ॥
मरे **दु**र्योधन मित्रसबांधव । भगांकित केलें **इं**द्रा जी! ॥ या० ॥ ३ ॥
**ना**रद नारी, **भ**स्मासुर भस्मचि । नग्न करी **भा**लचंद्रा जी! ॥ या० ॥ ४ ॥
**श्या**मसुत वदे जर्जर मुनिवर । काय पाड या **न**रेंद्रा जी! ॥ या० ॥ ५ ॥

## पद १६३ वें.

सर्व घटीं व्यापक गड्या! रे! वळखुन घेई **ह**री ।
भरला सबाह्य आणि अंतरीं. ॥ ध्रुवपद. ॥
देतां घेतां चालतां ऐकतां तुमच्या सवें वागतो ।
अवस्थात्रयांत जो जागतो. ॥
गुणातीत निर्गुण निरंजन[5] अरुप रूपीं लागतो ।
त्याचे वर बसे चालत बोलतो ॥
चाल ॥ क्षण एक बैस तूं शब्द एकीकडे ।
मग तूं पाहूं नको गड्या! कोणीकडे ।
हें मनसेंद्रिय तुझें **ह**रिपदीं जडे ॥

---

१. अरण्यांत. २. गृहांत. ३. मोक्ष. ४. कुळासह. ५. मायारहित.

टीप ॥ ब्रह्म रोकडे होसी तूंचि तूं कांहीं न उरे उरी
हृदयीं चिंतन गुरुचें करीं ॥ सर्व० ॥ १ ॥
तेथें गंगा झुळझुळ वाहती पिऊं नको तूं पाणी ।
ऐकुं नको गोष्ट कुणाची कानीं ॥
जोर बहुत तो घोर जिवाला स्थीर टेवितां हानी ।
उलटे दोर होती ती श्रेणी ॥
चाल ॥ मग गुरुकृपेनें वेगें जाशी नभा ।
तेथें पाहसी सखया! कोटिरवीची प्रभा ।
हा मार्ग गुरूविण इतरांसी सुभा ॥
टीप ॥ अनंत जन्मींचें पातक विखरे भेटतांचि श्रीहरी ।
कोटी कुळें स्वयें उद्धरी ॥ सर्व० ॥ २ ॥
चाले ना बोले डोले वय कीं फिरुन ये सत्वरीं ।
घाबरे निर्जल सरोवरीं ॥
जसा तळमळे मीन जळाविण मधुमासा अंतरीं ।
तसा मग उतरत कूपांतरीं ॥
चाल ॥ तेथें पंचविषय आंत साजिरे ।
मध्यें अक्षय फिरती षड्रिपु जलचरें ।
निघूं देती न कोणा आंतुन बाहेरी ॥
टीप ॥ कर्णधार कर धरोनि वोढी बाळसखा सत्वरी ।
श्यामतनयाचा साह्यकारी. ॥ सर्व० ॥ ३ ॥

**पद १६४ वें.**

गोटा पडो या पोटावरता हीन दैवाचा वांटा ।
दादला मिळाला करंटा. ॥ ध्रुवपद. ॥
पांच वीस लांकडें मेळवुनी बांधियलें झोंपडं ।
तीन धारण एकचि आड ॥
आंत मध्यें अंधार वरी दिसे उजेड ।
वरोनी वारा येतो गोड ॥
रविशशिचांदण्या दिसती नेत्राविण चोखटा ॥ दादला० ॥ १ ॥

---

१. शिडी. २. चैत्रांत. ३. सुंदर. ४. दगड. ५. नवरा. ६. सुंदर.

चिखल घरामध्यें अक्षय होतो वरुन वाहे पाणी ।
झोंप न लागे रात्रंदिनी ॥
चोर घरामध्यें फिरून जाती आंत दिसे केरसुणी ।
फुटकी दुजी असे बरणी ॥
पळुन जावयालागीं दिसती पुष्कळ मोठ्या वाटा ॥ दादला० ॥ २ ॥
विश्वामित्रीं गलित गात्रीं रदनाविण तृण खाया ।
स्वप्नामध्यें देती पैया[1] ॥
कान मान ज्या दांडी नाहीं ऐसा होता हेय[2] ।
चंचळ उडून नभासी जाय ॥
ढोल टाळ पखवाज झांजिऱ्या सदोदित बोभाटा ॥ दादला० ॥ ३ ॥
सुवर्णाचे पांच मिळेना मंगळसूत्रा मणी ।
जाहला फुकट जीवाला धणी ॥
परदेशामध्यें एकट जातो टाकुनी आम्हा वाणी ।
सांगावें दुःख कोणालागुनी ॥
**श्याम**सुतासी आनंद वाटे हर्ष न मावे दु ओंठा ॥ दादला० ॥ ४ ॥

## पद १६५ वें.

**राम**कथारस घेई रे । प्राण्या! ॥ ध्रुवपद. ॥
**राम**कथामृत **शं**कर घेउनि । शीतळ झाला देहीं रे! ॥ प्राण्या० ॥ १ ॥
**वा**ल्ह्या **वा**लिमक **राम**रसानें । अमर झाला तो पाहीं रे! ॥ प्राण्या० ॥२॥
**श्याम**सुत म्हणे कितीक तरले। **जन**कादि झाले विदेही[3] रे! ॥ प्राण्या०॥३॥

## पद १६६ वें.

धन्य धन्य वाणी । गुण वर्णी निशिदिनीं ॥ ध्रुवपद. ॥
जिव्हा नोव्हे **सर**स्वती । तेची जाणावी **भा**गीरथी ॥ धन्य० ॥ १ ॥
तेंचि **ल**क्ष्मीचें स्थान । तेथें वसे **ना**रायण ॥ धन्य० ॥ २ ॥
**श्याम**सुताचें[4] निजरूप । तेंचि जाणावें स्वरूप ॥ धन्य० ॥ ३ ॥

## पद १६७ वें.

**हरि** माझी विनंती । आयका जी! ॥ ध्रुवपद. ॥
जन्मोजन्मीं घडो मज सेवा । झडो माझी ही कुमती ॥ **हरि**० ॥ १ ॥

---

१. दुधा. २. हय, घोडा. ३. देहरहित, मुक्त. ४. 'श्यामसख्याचें' असा पाठभेद आहे.

करुणासागर म्हणूनि तुजला । येती बहु काकुळती ॥ हरि० ॥ २ ॥
श्यामसुत म्हणे निजभक्ताचा । कैवारी[1] तुज म्हणती ॥ हरि० ॥ ३ ॥

पद १६८ वें.

भज गोविंदं बालमुकुंदम् । सीतारमणम् आनंदकंदम् ॥ ध्रुवपद. ॥
मूलाधारे विद्रुमवर्णे वंशषं संवेदपत्रे रामचंद्रं भालचंद्रं विराजितं स्मर एकरूपम् ॥ भज० ॥ १ ॥
स्वाधिष्ठाने बालवर्णे शास्त्रदले तनुलिंगे पद्मे, अब्जयोनिं जानकिजानिं सुशोभितं श्रीपीतवर्णम् ॥ भज० ॥ २ ॥
नाभिपद्मे डंफवर्णे अवतारदले तं नंदनंदनम्, नीलवर्णं विगतमायं कपिधीशं कौसल्यातनयम् ॥ भज० ॥ ३ ॥
अर्कदले हृत्कमले कठंबीजे संमोहसदने वसंतम्, त्रिपुरांतकमहिल्योद्धारकम् अनिशं मूढमते! स्मर वारंवारम् ॥ भज० ॥ ४ ॥
विशुद्धचक्रे सोमपत्रे चंद्राकारे स्वरवर्णे कंठे, जीवशिवात्मक विश्वमूर्तिं सीतापतिं जप कपिधीशम् ॥ भज० ॥ ५ ॥
अज्ञानचक्रे द्विदले भृकुट्यां हंक्षंबीजे ज्ञानमूर्तिम्, कर्णाधारमवलोकय विष्णुं वन्हिशिखायां श्रीदाशरथीम् ॥ भज० ॥ ६ ॥
ऊर्ध्वमुखे वसुपत्रसरोजे सुरवंद्यं सुविशालनेत्रम्, श्रीभरताग्रजमनंतब्माद्यं लक्ष्मीकांतं अनाथनाथम् ॥ भज० ॥ ७ ॥
दलसहस्रे ऊर्ध्ववदने विमोहसदने रत्नपीठे, श्यामगुहं जाने.......... सरामं श्यामतनयो अचिंत्यमूर्तिम् ॥ भज० ॥ ८ ॥

## १५. चिन्मयनंदनकृत पदें.

पद १६९ वें.

सकळहि पावन होती । या हरिनामाच्या गजरें. ॥ ध्रुवपद. ॥
वेदपठण आणि शास्त्रपुराणें । अर्थसहित मग होती रे! ॥ या० ॥ १ ॥
विणाझल्लरीटाळमृदंग । श्रुतिस्मृतिही छंदें वाजती रे! ॥ या० ॥ २ ॥
दुर्जन दुर्मति स्त्रिया पुरुष कीं । तरतिल कुश्चळ[2] याती रे! ॥ या० ॥३॥
चिन्मयनंदन या संतांच्या । चरणिंची वंदिल माती रे! ॥ या० ॥ ४ ॥

---

१. रक्षणकर्ता. २. हीन.

## पद १७० वें.

आळवितों तुज····भावें । पांडुरंगे! लौकरी धांवें पावें. ॥ ध्रुवपद. ॥
हृदयभुवनीं आठवा······· । हेंची वाटे केवळ जीवन माझें. ॥ आ० ॥ १ ॥
दीनोद्धारणे! सांवळे! अनाथनाथे! । तुजवीण सोयरे कोण मातें? ॥आ०॥२॥
साच करणें आपुल्या बिरुदाशी । सांभाळावें चिन्मयनंदनाशी. ॥ आ० ॥३॥

## पद १७१ वें.

हरिला तुम्ही साजणि! जाउनि आणा । जिव जाइल जाणा ।
न गमे क्षण हरिविण जाणा । नग भासति सम पाषाणा. ॥ ध्रुवपद.॥
जो मुनिजनसुखकारी । शोकदुरितां परिहारी ॥
लोकां भवसिंधूपार उतारी । गोवर्धनधारी ॥
खेळे गोपाळकसा परिवारीं । मधुकंस विदारी ॥
दंडन करी उदंड रिपुशिं मार्तंडसुतनयापुलिनविहारी ॥ हरि० ॥ १ ॥
पति कां रुसले वो! आजी । मति कां भ्रमली हो! सहजीं ॥
पति का कळवळ का नाहीं आंगीं । रतिपति हा गांजी ॥
गति कांहिं न सुचे वो! मज माजी । पति माझ्या काजीं ॥
जाय तुं झडकरि काय करिल हरि पाय धरुनि उपाय करीं सखी ॥हरि०॥२॥
महिमा न कळे वो! बाई! । महिमा लागुनि हरिपायीं ॥
सुहिमाचलतनयावर पाहीं । अहिरिपु त्या नाहीं ॥
त्या नामस्मरणें भवभय नाहीं । करुं मी वो! काइ? ॥
वदन वदत हरिवदनापेक्षुनि मदनजनकपद वंदिन वद हे ॥ हरि० ॥ ३ ॥
करितें हरितें निजध्यासा । परि ते त्यजिली मम आशा ॥
धरितें तव चरणीं दृढ विश्वासा । करि हरि सहवासा ॥
गुरु चिन्मयनंदन विठ्ठलदासा । सुखी केला जैसा ॥
श्याम सगुण सुखधाम मनोविश्राम समागम करि सखी. ॥ हरि० ॥ ४ ॥

## पद १७२ वें.

आलाशी भ्रांति कसा जाणुनी । बरें पाहें विचारुनी. ॥ ध्रुवपद. ।

---

१. आप्त. २. लौकिकासी. ३. समजा. ४. दागिने. ५. पुष्कळ. ६. यमुनेच्या कांठावरील वाळूंत क्रीडा करणारा. ७. माझी. ८. शंकर.

रेत रक्त धातु असे मिळुनी । मूस बांधिलीसी गोठुनी ॥
नवमास ठेविलासे कोंडुनी । अमंगळ कोण याहुनी ॥ आला० ॥ १ ॥
देह मळमूत्र यांचा गाळ रे! कर्म भोगी जंजाळ रे! ॥
फुटलें वासनेचें जाळ रे! । तुज टपतो काळ रे! ॥ आला० ॥ २ ॥
चिन्मयनंदन प्रभुजीस रे! । जरी भावें भजसी रे! ॥
संतासी करि याची पूस[1] रे! । तरि भव[2] हा तरसी रे! ॥आला०॥३॥

## पद १७३ वें.

निशिदिनीं ध्यान तयाचें जडलें हृदयीं ।
नाम तयाचें जपतां सुख होय तयीं. ॥ ध्रुवपद. ॥
मुगुटीं कोटि दिवाकर तेज प्रकाश सुढाळ ।
रत्नकिळावरि जडिल्या बहु दीप्ति झळाळ ।
मोरपिसें वेष्टियलीं अति श्याम तमाल ।
केशर कस्तुरी तिलक रेखिला भाळ. ॥ निशि० ॥ १ ॥
कुंडल तळपती[3] मकराकृति ते श्रवणीं ।
पूर्ण प्रकाश मनोहर शोभा वदनीं ।
कमलदलाची उपमा साजे नयनीं ।
रतिपति पाहुनी रूप हें लज्जित मनीं ॥ निशि० ॥ २ ॥
कौस्तुभमणि अति सुंदर तो विलसे कंठीं ।
कनककमळ तुळसीच्या माळा निजकंठीं ।
चर्चियली तनुवरि ते श्रीखंडउटी ।
पाहतां रूप ऐसें हें भवभय निर्वेटी[4] ॥ निशि० ॥ ३ ॥
हृदयावरी ते विप्रपदांकित चिन्ह वरी ।
शंख चक्र अब्ज गदा पहा दिव्य करीं ।
नाभी विशाळ त्रिवलि विराजित उदरीं ।
कटितटीं क्षुद्र घंटा गर्जति गजरीं ॥ निशि० ॥ ४ ॥
पीतप हाटक तेंवि प्रकाश भला ।
चरणीं तोडर वांकी नखिं चंद्रकळा ।
ध्वजवज्रांकित चिन्हें पहा पादतळा ।
चिन्मयनंदन तेथें भावें रमला ॥ निशि० ॥ ५ ॥

---

१. विचारणा, विचारपूस. २. संसार. ३. शोभती. ४. निवारण करी. ५. कौस्तुभ.

### पद १७४ वें.

वृंदावन घनसंचारं श्रुति……………….[१] ॥ ध्रुवपद. ॥
….गान विहारं तम दम नम प………………मारं, तत्पद मंदारम् ।
विलसित…………रिक्षण सकल दुरितसंहारम्. ॥ वृंदा० ॥ १ ॥
………वतारं भवसिक्षाकारं प्रोदाद्गुण……………….भुवनैकसारम् ।
भूतभयापहचरित च…………टित कर्तारम् ॥ वृंदा० ॥ २ ॥
वृत्रारीमानस मधुपरि………मारं वृंदारक यूथप मुजित मुदारम् ।
वसु………च्चिन्मयनंदन चिंतनमुदितं अखिलगोपवधुजम् ॥ वृंदा० ॥ ३ ॥

---

## १६. गोविंदकृत[१] पदें.

### पद १७५ वें.

श्रीराम म्यां परिणिला[२] ग ! । रघुविर म्यां परिणिला ग ! ॥
याविरहित भूपाल सख्यांनो ! जनकासम[३] ते मला. ॥ ध्रुवपद. ॥
रघुविर कोमळ तनू ।
परम कठिण हें कमठपृष्टिसम[४] कठोर हें शिवधनू ॥
किशोर[५] हा सुखघनू ।
अतिकोमळ नवपल्लवसम हें; करकमळें लाहनू ॥
चाल ॥ मुखकमळाची शोभा ।
, पूर्णशशिसम प्रभा[६] ।
सुनिळ नभींचा गाभा ।
ऋषिघनवर हा उभा ॥
टीप ॥ ठाणमाण[७] लघु शरधनु विलसे, मम हृदयीं बैसला. ॥ श्रीरा० ॥ १ ॥
तळमळ बहु लागली ।
झर् झर झर झर झर झर नयनीं अश्रुधार चालली ॥
सद्गद अंतरीं झाली ।
थर थर थर थर गात्र कांपती, धरणीवर पडली ॥

---

१. हा कवि वऱ्हाडांत वणी येथें होऊन गेला असें कळतें. याच्या गुरूचें नांव नरहरि. सध्या तेथें ह्या कवीचे वंशज आहेत. २. वरिला. ३. बापाप्रमाणें. ४. कांसवाच्या पाठीसारखें. ५. बाळक. ६. कांति, तेज. ७. शरीराचा बांधा.

चाल ॥ सकळ सख्या धांवती ।
एक सावध बळविती ।
एक [1]वींझणा जाणविती ।
एक मधुर वचनें बोधिती ॥
टीप ॥ काय काय सखे! सावध कां हो! अतिशय कां मांडिला ॥ श्रीरा० ॥ २ ॥
सखयांनो! तुम्ही जा जा ।
मम जनकातें सांगा जाउनि झडकरि वृत्तांत माझा ॥
म्यां वरिला रामराजा ।
निश्चय हा दृढ अंतरीं माझ्या, त्याचिच मी प्रिय [2]भाजा ॥
चाल ॥ सांडि सांडि सांडि हा [3]पण ।
अति कठिण शिवधनु जाण ।
त्यासि चढविल कैसा [4]गुण? ।
मी त्यजीन आपुला प्राण ॥
टीप ॥ हे मानस दृढ समजुनि द्यावें अभय सख्यांनो! मला ॥ श्रीरा० ॥ ३ ॥
जय जय श्रीत्रिपुरारी! ।
तव कार्मुक हें [5]हळुवट व्हावें कृपायुक्त अंतरीं ॥
त्वां आपुले निज करीं ।
निरवावें मज करुणा भरितें श्रीरामाचे करीं ॥
चाल ॥ हर! हर! पार्वतीधवा! ।
योगाविधि वैभवा! ॥
सांबसदाशिव भवा! ।
गोविंदीं निज ठेवा ॥
टीप ॥ ऐकुनियां हे करुणा अंतरिं प्रेमभरें दाटला ॥ श्रीरा० ॥ ४ ॥

## पद १७६ वें.

कृष्णा! सकुमारा! नंदकुमारा! । दधिनवनितचोरा! ॥ ध्रुवपद. ॥
[6]शरणागतवत्सल हें ब्रिद पायीं । जाणुनियां हृदयीं ॥
आलों शरण मी तुला [7]लवलाहीं । दिनजनसुखदायी! ॥
बुडतों दुस्तर गांगप्रवाहीं । ओढीं चहुंबाहीं ॥ कृष्णा० ॥ १ ॥

---

१. पंख्यानें वारा घालिती. २. भार्या, बायको. ३. प्रतिज्ञा, नियम. ४. धनुष्याची दोरी. ५. हलकें, सूक्ष्म. ६. शरण आलेल्यावर दया करणारा. ७. सत्वर.

स्मरतां गज तांतडिनें उद्धरिला । गोवर्धन धरिला ॥
इंद्रें छळितां वांचविलें पुरिला । मद त्याचा हरिला ॥
गरळा मुखि धरितां दुर्धर अहिला । पदघातें चुरिला ॥ कृष्णा० ॥२॥
नाहीं हें संकट तुजला भारी । मज दीना तारीं ॥
अससी निजभक्तसखाकैवारी । मम दुष्कृत[1] हारीं ॥
वैरी षड्रिपु हे दुस्तर वारीं । सज्जनसुखकारी! ॥ कृष्णा० ॥ ३ ॥
ये रे! योगीजनमानसहंसा! । द्यावा मज धिंवसा[2] ॥
कंसांतक! गोपीहृदयविलासा! । निजजनद्वद्वंसा ॥
दास गोविंद न तारी केसा । तोडुनि भवफांसा ॥ कृष्णा० ॥ ४ ॥

## पद १७७ वें.

हरीविण झालें मी बहु दीन दीन ॥ ध्रुवपद. ॥
काय करूं किति धीर धरूं । गुण कैसे विसरूं त्याचे ।
तळमळ माझी कवणा सांगूं । जळविरहें जसा मीन मीन ॥ हरी० ॥ १ ॥
क्षण न गमे, युग साच गमे । न कांहीं चित्त रमे माझें ।
गोविंदप्रभु[3] जरी मज भेटे । तरी हा देह ओंवाळीन. ॥ हरी० ॥ २ ॥

## पद १७८ वें.

श्रवण करा हरिकथा । कथा तुम्ही ॥ ध्रुवपद. ॥
धनसुतदारा मायिक सर्वही । व्यर्थ मायाजालीं गुंता ॥ श्रवण० ॥ १ ॥
शुद्ध बुद्ध अविनाशन नामें । दूर करा भवव्यथा ॥ श्रवण० ॥ २ ॥
गोविंदगुण तुम्हि गाउनि । वाचे धरुनि जा ह्याचि पथा. ॥ श्रवण० ॥३॥

## पद १७९ वें.

हरिविण कोणि न दिसे मजलागीं । बाई! ॥ ध्रुवपद. ॥
आसनिं शयनिं मनिं कृष्ण हा भासे । त्याविण न रुचे कांहीं ॥ हरि० ॥ १ ॥
गमनागमनीं जनिंवनिं हरि दिसतो । तन्मय[6] झालें पाहीं ॥ हरि० ॥ २ ॥
गोविंदप्रभु निजरूप हें बरवें । ठसलें माझे हृदयीं. ॥ हरि० ॥ ३ ॥

## पद १८० वें.

दीनाचा प्रभु हा कनुवाळ । दीनाचा ॥ ध्रुवपद. ॥

---

१. पाप. २. धैर्य. ३. गोविंदाचा प्रभु (कृष्ण). ४. व्यर्थ. ५. संसारदुःख. ६. तदाकार. ७. उत्तम, चांगलें.

चतुर्मुखातें दर्शन दुर्लभ । तो फिरे आळोआळ ॥ दी० ॥ १ ॥
शि[1]ववंद्या ते म्हणे यशोदा । माझा चिमणा बाळ. ॥ दी० ॥ २ ॥
अवयव नसतां सावयव होउनि । म्हणवी यशोदाबाळ ॥ दी० ॥ ३ ॥
खल अघनाशक भक्तां पोषक । गोविंद षड्रिपुकाळ ॥ दी० ॥ ४ ॥

पद १८१ वें.

वैकुंठाधिपती ! । द्यावी भजनीं भव्य मती. ॥ ध्रुवपद. ॥
शुकसनकादिक नारद तुंबर । प्रेमें तुज गाती. ॥ द्यावी० ॥ १ ॥
ब्रह्मा हर सुरवर किन्नर । मुनि हृदयीं ध्यातां ॥ द्यावी० ॥ २ ॥
गोविंदप्रभो ! नरहरिराया ! । अद्भुत तव कीर्ती ॥ द्यावी० ॥ ३ ॥

पद १८२ वें.

ते[2] जगिं धन्य सती हो ! । जीच्या स्मरणें अघ[3] हरती ॥ ध्रुवपद. ॥
पतिवांचुन अन्यत्र न जाणे । विधिहरकमलापति हो ! ॥ ते० ॥ १ ॥
रवि माने आज्ञा, कर जोडुनि । सुरनरमुनि स्तविती हो ! ॥ ते० ॥ २ ॥
गोविंदावरि करुणा करुनी । दे मतिला स्फूर्ति हो ! ॥ ते० ॥ ३ ॥

पद १८३ वें.

ते पद दावीं मजलागुनि सीताकांता रे ! ।
दर्शनमात्रें निवारीं भवभयव्यथा रे ! ॥ ध्रुवपद. ॥
पदतल मृदु हे अरुणापरि शोभा साजे ।
पावन ब्रिद हें असुरावरि पैं जन गाजे ॥
ध्वजवज्रांकुश हीं चिन्हें त्यांत विराजे ।
योगिजनाचें मन रंजि[4]त पाय असे जे. ॥ ते पद० ॥ १ ॥
पदरजस्पर्शें उद्धरिली पं[5]द्मजबाळा ।
तेथुनि जाली मंदाकिनी शुद्ध जळाला ॥
मस्तकिं धरितां श्रीशंकर तो सुखि जाला ।
ज्या पदकमळा हृत्कमळीं सेवित कमळा ॥ ते पद० ॥ २ ॥
शुकसनकादिक ध्रुवनारद ज्यातें गाती ।
योगिजनाच्या प्रेमाची विश्रांती ॥

१. शिवानें वंदन करण्यास योग्य. २. अहल्यावर्णन. ३. पापें. ४. रंजविणारे. ५. विधिकन्या. (अहल्या.)

दर्शनमात्रें जडजीवां होते मुक्ती ।
गोविंदाची पुरवीं रामा! प्रीती ॥ ते पद० ॥०३ ॥

### पद १८४ वें.

हे आदिमाया प्रणवाकार राया! रे! ॥ ध्रुवपद. ॥

इंदिरा हृन्मंदिरावरि ठेवि श्रीधर सुंदराकृति मंदिराप्रति आणिली दशकंधरा कुलनाशकारण ॥ हे आदिमाया० ॥ १ ॥

सिद्धि घे, दुर्बुद्धितें करुणाब्धि! तूं स्निग्धांग पाहुनि स्त्री नव्हे भ्रम यत्र भुलवी मान वचन अनुमान दूर करीं ॥ हे आदिमाया० ॥ २ ॥

आण तिज बहु मान देउनि ध्यान धरि अज्ञान दूर करि ज्ञानयुक्त प्रणम्य करि निज दास दीन गोविंद प्रार्थी ॥ हे आदिमाया० ॥ ३ ॥

### पद १८५ वें.

सांग सुंदरी सखिये! मंदिरीं वरलेंस कोणाला? ॥ ध्रुवपद. ॥
कां गे! दुःखित, आतां शोधित उठलीस, मजकडे ।
पाहतां मोहुनी हा गेला ॥ सुंदरी० ॥ १ ॥
उषा म्हणे आज चार प्रहर । जवळी होते प्राणेश्वर ।
रूप तयाचें अति सुंदर । गे! सखयाला ॥ सुंदरी० ॥ २ ॥
बोलुनि बाला मूर्च्छित पडली गोविंदाचें अनुपद सरलें ।
दासीनें त्या सावध केलें शिंपुनि उदकाला. ॥ सुंदरी० ॥ ३ ॥

### पद १८६ वें.

आवडतो मनीं वर मजप्रती ।
बैसले उदंड पुंड भूप मुंड मुंड त्यांत चंडकीर्ण तोचि रघुपती ॥ध्रुवपद.॥
कोंवळी तनू मदनपूतळा ।
पाहिलें म्यां आज ऋषीराजयांत साज करुनि माज बाधि सहज आंवळिला ॥
किरिट कुंडलें कस्तुरी टिळा ।
चमकतो सुरंग रंग जालें दंग गुंग चित्त रंगभूमीस फांकती कळा ॥
माळ घेउनी उभी ते सती ॥ बैसले० ॥ १ ॥

---

१. मंदोदरीचा रावणास बोध. २. षोडषवार्षिकी स्त्री.

मैथिलाधिपें पैज घालुनी ।
पाहतो प्रताप बाप आणुनी काप चाप दाप अपघाली भूप जाउनी ॥
रामरूप हें रेखिलें मनीं ।
मंडपांत मात करुनि बैसलासे तात संशयांत चित्त साजणी ॥
पर्वतापरी धनुष्य आंगणीं ।
राम सकुमार फार हरचाप सारसार [1]भंगणार कोण या जनीं? ॥
इच्छिल्या वरा देइं भगवती! ॥ बैसले० ॥ २ ॥
गर्व रावणें करुनि तेक्षणीं ।
धनुष्यासि त्राण बाण वाण घेउनि अपमान म्लान होउनि पडे मेदिनी ॥
कलहमूळ हें बोलती मुनी ।
घनःशाम राम सिद्ध काम जगीं नाम करी श्याम वामहस्त लावुनी ॥
ओढि [2]त्र्यंबका कार्यसाधनीं ।
भंगिलें धनुष्य कडड तडड तडड झडड झडड लघु किंकणी ॥
सर्व नरपती चकित पाहती ॥ बैसले० ॥ ३ ॥
देव स्वर्गिचे पुष्प वर्षती ।
दुर्जनास भयत्रास श्वास दानवांस भक्तदास परम हर्षती ॥
जिवीं तोषती कनक सुमती ।
स्वामि ते वसिष्ठ शिष्ट ज्ञानदृष्ट तिष्ठ इष्ट देवता सदैव स्थापिती ॥
गोविंदरावजी यश वर्णिती ।
साधिला त्वरा वरा तो नोवरा [3]धरामरास लग्नसमयीं द्रव्य अर्पिती ॥
नेम नेमिला वाल्मिकें मती ॥ बैसले० ॥ ४ ॥

### पद १८७ वें.

आजुनी आली तों कां येईना शौरी । झाली हे तों रात्र भारी ॥ ध्रुवपद. ॥

मनि वाटे श्रीरमण, अन्यकामिनींना मोहुन, मदनासि वश होउन, चंचळ यदुराज बुझ विसरुनियां मजला, हर हर हरि तीशीं अनुसरला, लाज माझी हरुनी हे करणी अनुचित तूं सत्य संधांत धुरंधर मंदरधरणा ऐसें वद जा तक तक त थै थै यादिगिदिसिधीं ताना ताना दिरिना भुलवुनी मला मंजुतर वचनीं लाज माझी हरुनी हे करणीं अनुचित तूं सत्य संधांत धुरंधर मंदर-

---

१. मोडणार. २. त्र्यंबकधनुष्या. ३. भूदेवांस, ब्राह्मणांस.

धरणा ऐसें वद जा जलदनील गोविंदविभुगुणमंदिर करुणाजलधि कुंदर-
दनि तों तदनि तों तदर दानि तों दिरि दिरि ना त्रिरि तिलान दिरि ॥
आंजुनी आली० ॥ १ ॥

### पद १८८ वें.

हरि! तूं कृपा करीं झडकरी ॥ ध्रुवपद. ॥
तुझी कृपा होतां गोविंदा! । मुका निगम उच्चारी ॥ हरि!० ॥ १ ॥
[1]अंधाप्रति जग सर्वहि दीसे । पंगू लंघी गिरी ॥ हरि!० ॥ २ ॥
गोविंद म्हणे तुज चिंत्तिं निरंतर । षड्रिपु दूर करी ॥ हरि!० ॥ ३ ॥

### पद १८९ वें.

कोदंडशर पहातां हातीं, नयन भुकेले ॥ ध्रुवपद. ॥
दशशतरवि प्रभु मुकुटीं ज्याच्या । तेज व्यापिलें त्रिजगतीं ॥ पहातां० ॥ १ ॥
गोविंददास म्हणे मज आतां । पूर्णानंदीं विश्रांति ॥ पहातां० ॥ २ ॥

### पद १९० वें.

येइं रे! कीर्तनिं नाचत गणराया! । जी गौरीतनया! ॥ ध्रुवपद. ॥
देईं मति स्फूर्ति तव गुण गाया । तद्विघ्न हराया ॥
पाया नमितों ये धांवुनि सदया! । [2]दुष्कृत ने विलया ॥
चाल ॥ मायामोहित मन माझें ।
झालें, चुकवीं भवओझें ॥
टीप ॥ व्याजे प्रार्थित भवसिंधु तराया । जी गौरीतनया! ॥ येईं० ॥ १ ॥
अरुणापरि माथां सिंदुर विलसे । [3]क्षीरांबर कासे ॥
पाशांकुश फरश करीं धरिलेंसे । रवि मुकुटिं प्रकाशे ॥
चाल ॥ ऐसी तूं मंगलमूर्ति ।
वरदायक स्वामि अमूर्ति ॥
टीप ॥ सच्चित्सुखदा........ । जी गौरीतनया ॥ येईं०! ॥ २ ॥
दाया गुरुनाथ नृसिंहप्रसादें । लीला स्वच्छंदें ॥
तोषे मन कर्णासहित प्रमोदे । हृत्कमलीं दोंदें ॥

---

१. येथें 'मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् । यत्कृपा तमहं वंदे परमानंदमाधवम् ॥' या श्लोकावर कवीचा कटाक्ष दिसतो. २. पाप. ३. पाटांव, पीतांबर.

चाल ॥ उठती स्वानंदविलासा ।
प्रगटे ब्रह्मांडप्रकाशा ॥
टीप ॥ दासा गोविंदा क्षेम[1] दे सखया! । जी गौरीतनया! ॥ येई० ॥ ३ ॥

### पद १९१ वें.

श्रीगणराज वरदकरमंडित विघ्नहरण शुभदानी ।
लंबोदर गुणमंदिर सुंदर सुरवरनरवरदानी[2] ॥ ध्रुवपद. ॥
सिंदुरचर्चित दिव्य तनू पीतांबर जघनिं विलासे ।
मंदरसम अतिसुंदर वपुवरि रविशशितेज प्रकाशे ॥ श्री० ॥ १ ॥
ध्वजवज्रांकुश चिन्ह सकळ शुभयुग्म पदाब्जिं विराजे ।
नखिं दशधा शशि जडला पदिं ब्रिद पैंजण त्रिभुवनिं गाजे ॥ श्री० ॥ २ ॥
नागकटी कटिसूत्र सरळ वरि नाभिसरोजीं हीरा ।
रत्नजडितकरभूषणराजित शिरीं विलसित शुभ चीरा[3] ॥ श्री० ॥ ३ ॥
नागानन मनरंजन भंजन ध्यानें भवभजकांचा ।
शुंडा सरळ वितंड द्विरद अति चंडपराक्रम ज्याचा ॥ श्री० ॥ ४ ॥
गंडस्थळमदमंडित स्रवती भृंगावळि रस घेती ।
शूर्पकर्ण वरि वारितसे परि पुनरपि धांवुनि येती ॥ श्री० ॥ ५ ॥
मृगमदतिलकविराजित मायाललित कपोल विराजे ।
पाशांकुशशुल अंगुलिकांतरिं दूर्वांकुर शिरिं साजे ॥ श्री० ॥ ६ ॥
तो महाराज वरदगुरु गणपति अंतरसदनविलासी ।
सप्रेमें कनवाळु प्रसाद दिधला गोविंदासीं ॥ श्री० ॥ ७ ॥

### पद १९२ वें.

स्वच्छंदें नृत्य करीतो स्वानंदपुरनिवासी ।
त्रिभुवन जन मोहित झाले देहस्मृति नकळे त्यासी. ॥ ध्रुवपद. ॥
स्थिरचरजड चालविताहे सत्तेनें श्रीगणराणा ।
आरंभीं स्तविती ज्यातें वंद्य श्रुतिशास्त्रपुराणा ।
ब्रह्मप्रियादिक सखे सारे, नर्तविती लावुनि ध्याना ॥
चाल ॥ हालति ना पादप[4] नाना ।
ऋषि मुनि तपि त्यागिति ध्याना ।
सुर विसरति अमृतपाना ॥ स्व० ॥ १ ॥

---

१. क्षेम, आलिंगन. २. देवश्रेष्ठ व मानव यांस वर देणारा. ३. मंदिल. ४. वृक्ष, झाडें.

गौतमसरिताजळ तेव्हां वाहतां ते वेग विसरली ।
नृत्यध्वनि मंजुळ तीच्या द्वयकर्णांच्या मधें शिरली ।
मृगव्याघ्रचमरि वैरातें त्यजुनी एके स्थळिं रमली ॥
चाल ॥ द्वेषबुद्धि सर्वहि हरली ।
मनोवृत्ति तयाची फिरली ।
गणपतिच्या ध्यानीं मुरली ॥ स्व० ॥ २ ॥
ऋषिकांता सरितेलागीं आणाया गेली पाणी ।
जलकुंभ भरूं विसरली तटिं बसली न भरी पाणी ।
कामिनि एक वेणी विंचरतां मस्तकीं गुंतला पाणी[1] ।
चाल ॥ प्रेमाश्रु वाहती नयनीं ।
गणपति आणूं या ध्यानीं ।
डोलतसे भुजंगावाणी ॥ स्व० ॥ ३ ॥
वीणा घेउनि विधितनया गातसे मंजुळ शब्दें ।
मृदंग हरि वाजवितो तालावरि नानाछंदें ।
विमानावरि बैसुनियां पाहताति सुरांचीं [2]वृंदें ॥
चाल ॥ दशशतफणि डोले आनंदें ।
निघती प्रेमाचे दोंदे ।
शिव नाचे ब्रह्मानंदें ॥ स्व० ॥ ४ ॥
यापरि तो सगुणावतारी स्वच्छंदें नृत्यकरिता ।
त्रिभुवनिं स्थिरचर जिव सारे नाचति हृदि आनंदभरिता ।
गोविंद पुष्पांजळि घेउनि अर्पितसे गणेशमाथा ॥
चाल ॥ सप्रेमें तत्पदिं नमिता ।
तूं प्रसन्न हो वरदाता ।
वरद हस्त ठेवीं माथा ॥ स्व० ॥ ५ ॥

पद १९३ वें.

येई कीर्तनिं माराई ! माझे आई ! । सखे बाई ! ।
षड्भुजें कवळोनि क्षम देईं. ॥ ध्रुवपद. ॥

---

१. हस्त, हात. २. समुदाय, समूह.

त्रितापाग्नीनें तप्त माझी काया । **गण**राया ! ।
कृपांबूनें निववीं देवराया ! ।
भक्तवत्सल हें ब्रिद तुझ्या पाया । **गौ**रीतनया ! ।
**ब्र**ह्मादिकां अनिवार तुझी माया. ॥ येई० ॥ १ ॥
नाहिं पुण्याचा लेश कांहीं केला । संग्रहाला ।
पातकी मी हा जन्म वृथा गेला ।
असा प्रस्तर[1] जन्मास देह आला । अभाग्याला ।
कसा देवा तारिसी या दीनाला ॥ येई० ॥ २ ॥
तुझ्या नामें जळताति दोष बा ! रे ! । तुं कसा रे ! ।
**व्यास** देवें वर्णिलें गुह्य सारें ।
**वि**नायका सिद्धिविनायका रे ! । तारका रे ! ।
सख्या उद्धरिं **गो**विंदबाळका रे ! ॥ येई० ॥ ३ ॥

**पद १९४ वें.**

**म**यूरेशा[2] धांव रे ! । स्वानंदपुरनिवासा ॥ ध्रुवपद. ॥
हा अभिमान महाखळसिंधू । जाचित यावें तमाशा ॥ **म**०॥ १ ॥
बोध करीं घेउनि फरशायुध । यावें विघ्नविनाशा ॥ **म**० ॥ २ ॥
भक्तकामकल्पद्रुम हें ब्रिदें[3] । सांभाळी जगदीशा ॥ **म**० ॥ ३ ॥
दीन **गो**विंद करद्वय जोडुनि । प्रार्थितसे हृदयविलासा ॥ **म**० ॥ ४ ॥

**पद १९५ वें.**

**गण**राया येई रे ! । या कीर्तनिं नृत्य कराया ॥ ध्रुवपद. ॥
कर्मारंभीं सकळ तुज पूजिति । प्रार्थिति विघ्न हराया ॥ **गण**० ॥ १ ॥
हंसासनिं बैसुनि **वि**धितनया[4] । सादर तव गुण गाया ॥ **गण**० ॥ २ ॥
भक्ताची मनोवांच्छित सिद्धि । दासां वर दे वराया ॥ **गण**० ॥ ३ ॥
**गो**विंद प्रभु द्वयकर जोडुनि । वंदितसे तव पाया ॥ **गण**० ॥ ४ ॥

**पद १९६ वें.**

लटपट पाउल ठेव । रे ! **मू**षकवहना ! ।
पदिं ब्रिद वाजति छुं छुं ॥ ध्रुवपद. ॥
पीतपटी तगटी जरि रत्नें । कोर प्रकाश चुं चुं ॥ लट० ॥ १ ॥

---

१. दगड, पत्थर. २. मोरया ! ३. लौकिक, कीर्ति. ४. सरस्वती.

मदसारोदक माथां वाहे । बिंदु स्रवति घन घुं घुं ॥ लट० ॥ २ ॥
सिंदुवरदसुत सरितापतिचा । हरिली त्याची खुं खुं[1] ॥ लट० ॥ ३ ॥
गोविंदाचे हृत्कमळीं तूं । सिद्धीरमणा घुं घुं ॥ लट० ॥ ४ ॥

## पद १९७ वें.

गणपति विघ्नहरणा । मुनिहृत्तापशमना ॥ ध्रुवपद. ॥

नंदिकेश्वरनंदन प्रभु सिंदुरासुर[2]कंदनास्तव वंदुनी सुरवृंद मुनिगण मंद मंद स्तवोनि प्रार्थिति ॥ गण० ॥ १ ॥

चंड करि मुख शुंड सरळ वितंड षड्दोर्दंड सायुध लंड सिंधु वितंड फरशें मुंड धरुनी खंड करि गुरु ॥ गण० ॥ २ ॥

बाळ तव पदिं भाळ ठेवुनि आळ करि भवजाळ शमवुनि पाळ बहु लडिवाळ नरहरिदास नमि गोविंद गणपति ॥ गण० ॥ ३ ॥

## पद १९८ वें.

हे माय अंबे ! । संकटीं रक्षीं तूं ॥ ध्रुवपद. ॥
बिंबाधरप्रिय सांबा करि मुखचुंबा[3] । क्षणहि न विलंबे तुजला ॥ सं० ॥ १ ॥
महिषासुरदमने अघशमने । स्मरणें तारिसि भक्तजनाला ॥ सं० ॥ २ ॥
विश्वोद्भवस्थित्यंतरकरणे ! । गोविंददास म्हणवी तूं आपुला ॥ सं० ॥ ३ ॥

## पद १९९ वें.

जय कमलोद्भवकन्यके[4] ! जगदंबिके, वचन आइके, जगत्रयजननी ।
तूं कृपे करुनि मम स्फुरविं परादिक वाणी. ॥ ध्रुवपद. ॥
व्यासादिक कवि भले, पूर्वी जाहले, तिहीं वंदिले, तुझ्या पदकमला ।
वाचांशशक्ति वैखरी देसि तूं खरी कवीमुखकमला ॥
तूं सुरवरवरदायिनी, हंसवाहिनी, बुद्धिदायिनी, धन्य तव लीला ।
वीणापुस्तकधारिणी गासि निजवदनीं श्रीहरिलीला ॥
चाल ॥ वरदायिनि अतिकनुवाळे । राजसे ।

---

१. खोड मोडली. २. सिंदूर—हा असुर ब्रह्मदेवाच्या जांभईपासून उत्पन्न झाला. याचें सविस्तर वर्णन गणेशपुराणांत आहे. [गणपतिराव हरिहर पटवर्धन ऊर्फ बापूसाहेब कुरुंदवाडकर यांनीं केलेला ग्रंथ—गणेशपुराण आर्या—उत्तरार्ध पृष्ठ १७२-१९४ पहा.] ३. मुखचुंबन, मुका. ४. सरस्वती.

निजभक्तजनप्रतिपाळे । राजसे ।
गुणसरिते पद्मजबाळे । राजसे ।
उठाव ॥ मज दासावरि करि कृपा, आणि तूं रूपा, दावी चिद्रूपा, सखे मम जननी ।
तूं कृपा करुनि वरहस्त ठेविं मम मूर्ध्नि[1] ॥ जय० ॥ १ ॥
मी बाळ तुझा अज्ञान, नसे मज ज्ञान, करी परि ज्ञानबुद्धि दे माते ।
तुजवीण असें मी दीन, तव पदीं लीन सखे गुणवंते ।
इच्छा माझी परिपूर्ण, करावी तूर्ण[2], देई वरदान, कृपें अधमातें ।
धरुनि माझा अभिमान रक्षुनि मान न करिं अनमान, तारिं भवत्राते ।
चाल ॥ भवसिंधूपासुनि तारीं । राजसे ।
जन्मांतर दुष्कृत भारी । राजसे ।
असे किल्मिष कोण निवारी । राजसे ।
उठाव ॥ तव कृपे वाचस्पती, जाले वदुं किती, वदविं यदुपतिचे गुण गण वदनीं ॥
तूं कृपे करुनि मम स्फुरविं परादिक वाणी ॥ जय० ॥ २ ॥
आतां एकचि प्रार्थना, आणि तूं मना, बैस आननामाजिं तूं सदये ।
श्रीरामकृष्णगुणलीला वदवि निजलीले करुनि माये ।
विश्रांति नसे तुजविना, माझिया मना, पुरवी कामना चित्तिं जे आहे ।
मातें दासाभिमानी प्रगट हृद्भुवनिं येइं जननीये ॥
चाल ॥ गोविंदाप्रति मति द्यावी । राजसे ।
तवचरणीं प्रीति असूं द्यावी । राजसे ।
याविण अन्यत्र नसावी । राजसे ।
उठाव ॥ हे आळ, पुरवि लडिवाळ करीं, प्रतिपाळ, पोटासि धरुनि ॥
तूं कृपा करुनि मम स्फुरविं परादिक वाणी ॥ जय० ॥ ३ ॥

## पद २०० वें.

ये नरहरि! राया! । कीर्तनीं ॥ ध्रुवपद. ॥
आवडी देई तव गुण गाया । निजजनसुखसदया ॥ कीर्तनीं० ॥ १ ॥
दिव्य सभासद भागवतोत्तम । आले श्रवण कराया ॥ कीर्तनीं० ॥ २ ॥
गोविंद प्रभु नाथ नृसिंहा । भवगज[3] आंवराया ॥ कीर्तनीं० ॥ ३ ॥

## पद २०१ वें.

माझी गुरु माउली ग! नरहरी! ॥ ध्रुवपद. ॥

१. डोक्यावर. २. लौकर. ३. संसाररूपी हत्ती.

भक्तिज्ञान विरक्ति अंगीं । सद्भावें पावली ग! ॥ माझी० ॥ १ ॥
जे चैतन्यसुखाची मूर्ति । हृदयांतरिं राउळीं[1] ग ! ॥ माझी० ॥ २ ॥
**गो**विंद वत्सल तुज दीन तान्हे । ये सत्वर गाउली ! ॥ माझी० ॥३॥

### पद २०२ वें.

गुरु **न**रहरि वळला । तेव्हां विश्वंभर फळला[2] ॥ ध्रुवपद. ॥
नामरूपातित वस्तु सदोदित । शाश्वत जिविं धरिला ॥ गुरु० ॥ १ ॥
तो साम्राज्य सुखाचा दाता । निश्चय मज कळला ॥ गुरु० ॥ २ ॥
जो तंतू या विश्वपटाचा । **गो**विंदीं मिळला ॥ गुरु० ॥ ३ ॥

### पद २०३ वें.

श्रीगुरुनाथ परात्पर योगी या फणिपुरवासी[3] ।
चिद्घनदिव्य प्रकाशक आत्मा श्री**वि**ष्णू **का**शी ॥ ध्रुवपद. ॥
ताराया जगतीला आला हाची सुखदानी ।
जो स्वानंदविलासी लीला काय वदूं वदनीं ।
निरुपम उपमा न दिसे कांहीं पाहतां या नयनीं ।
तो करुणाघन वळतां मिळवी लैंवण[4] जसा जिवनीं[5] ॥ श्रीगुरु० ॥ १ ॥
संसारस्थिति दावी परि तो त्रिभुवन गोसाई ।
उघड समाधी ज्याची पाहे **ग**णपति सर्वा ठायीं ।
काय वदूं नवलाव तयाचा मति कुंठित पाहीं ।
वरदायक सद्गुरु **न**रहरिचा मी त्याच्या पायीं । श्रीगुरु० ॥ २ ॥
तो गुरुनाथ नरोत्तम उत्तम अक्षय पददाता ।
सहज कृपेनें पाहतां देतो अलक्षपद हाता ।
देहस्थिति मजकरितां धरिली काय वदूं आतां ।
बाह्यांतर व्यापक जो **गो**विंदाचा भयत्राता ॥ श्रीगुरु० ॥ ३ ॥

### पद २०४ वें.

जगदाकारस्वरुपा अरुपा श्रीसद्गुरुराया ।
तूं ब्रह्मांडविलासी माझी चुकवीं भवमाया ॥ ध्रुवपद. ॥
तूं विश्वाद्य प्रकाशक स्थिरचर भरोनि उरलासी ।
विश्वस्थिति उद्भवसी अंतीं स्वरुपीं[6] मेळविसी ॥ जग० ॥ १ ॥

---

१. देवालयांत. २. फळ देता झाला. ३. नागपुरवासी. ४. मीठ. ५. पाण्यांत. ६. आत्मस्वरुपीं.

रजतमसत्वगुणत्रय देवा! तुवांचि निर्मियले ।
घट प्रारब्धें जैसें तैसें तुवांचि वागविलें ॥ जग० ॥ २ ॥
हा संपूर्ण विलास तुझा **गो**विंद द्वैत हरी ।
अभयवरदकर माथां ठेवुनि दीनातें तारीं ॥ जग० ॥ ३ ॥

### पद २०५ वें.

श्रीगुरुदेवराया शरण मी तुज आलों ।
पाहतां चरण तुझे अंतरीं फारचि धालों[१] ॥ ध्रुवपद. ॥
संसारजन्य दुःखा भोगितां बहू श्रमलों ।
होईल गती कैसी मी मायेमध्यें बुडलों ॥ श्री० ॥ १ ॥
संसारीं मग्न झाली मम वृत्ती गुरुराया! ।
ना दिसे सौख्य कांहीं हे व्यर्थ गेली काया ।
सूचेना यत्न मातें अनिवार तुझी माया ।
सुकृत[२] नाहीं पदरीं व्यर्थ कां वांचुनियां ॥ श्री० ॥ २ ॥
देशिका[३]! तार आतां पतितास मायबापा! ।
हा जन्म वृथा गेला मजवरी करीं कृपा ।
परलोकसाधनाचा तूं दावीं मार्ग सोपा ।
**गो**विंददास तारी निवारीं जन्मखेपा ॥ श्री० ॥ ३ ॥

### पद २०६ वें.

सद्गुरुराया । धन्य केलें जी ॥ ध्रुवपद. ॥
अभयवरदकर शिरिं स्पर्शुनि मज । अरूपरूपा नयनीं दाखविलें ॥धन्य० ॥ १॥
जन्म सफळ भव निरसुनि दुसरेपण[४] । माझें सर्व निरसविलें ॥ धन्य०॥ २ ॥
दीन **गो**विंद शरण तुज येतां । स्वानंदामृत रस चाखविलें ॥ धन्य० ॥ ३ ॥

### पद २०७ वें.

सत्कीर्तनआरंभीं मति दे स्वामी गुरु **न**रहरिराया! ।
मी शरणागत तारीं वारीं दुष्कृत माझें ने विलया ॥ ध्रुवपद. ॥
नाहीं शुद्ध मुखांतील वाणी ज्ञान नसे शब्द वदाया ।
सत्संगति मज तेही न घडली व्यर्थचि गेलें वय वायां ॥ सत्की० ॥१॥
प्रऱ्हादास्तव स्तंभ विदारुनि होसी प्रगट दैत्य वधाया ।
मत्पतितावरि करुणा करुनी यावें कीर्तनीं लैवलाह्या[५] ॥ सत्की०॥ २ ॥

---

१. संतुष्ट झालों. २. पुण्य. ३. गुरुराया! ४. द्वैतभाव. ५. लौकर, सत्वर.

जें केलें [1]दुष्कृत सुकृत पदरीं नाहीं सुख सदया ।
हा संसार सुखप्रद मानुनि शिणविली आपुली काया ॥ सत्की० ॥ ३ ॥
अधमोद्धार न हे ब्रिदवाकी गर्जतसे प्रभुच्या पायों ।
दीन **गो**विंद तुझा शरणागत तार किंवा ने मज विलया ॥ सत्की० ॥ ४ ॥

## पद २०८ वें.

कीर्तनीं येईं रे! अतिसदया । श्रीगुरु **न**रहरिराया! ॥ ध्रुवपद. ॥
कृपादृष्टिनें पाही मला । सच्चिद्रूपा [2]अमला ।
**क**मला सेवितसे पदकमला । ठेवुनिया हृत्कमला ।
**क**मलोद्भवजनक ये हृदया ॥ श्रीगुरु० ॥ १ ॥
दुस्तर भवसिंधूच्या [3]जीवनीं । बुडतों येईं निदानीं ।
करुणा कर पाणी, मज धरुनी । नेईं परात्परसदनीं ।
निशिदिनीं आठवितो तव पाया ॥ श्रीगुरु० ॥ २ ॥
बाळक मी तूझा मंदमती । दे चित्सुख विश्रांती ।
[4]निगमागम गाती गुणकीर्ती । म्हणउनि मति दे स्फूर्ति ।
दीन **गो**विंद तुझ्या धरी पाया ॥ श्रीगुरु० ॥ ३ ॥

## पद २०९ वें.

मिरवे **व्यं**कटभूप मनोरथी. ॥ ध्रुवपद. ॥
सच्चित्सुखआनंदपरात्पर अनुपम तें स्वरूप ।
तो भक्तास्तव **शे**षगिरिवरी दाखवितो गुणरूप ॥ मिरवे० ॥ १ ॥
ज्याचें पद [5]क्षीरसागरदुहिता सेवितसे सुखरूप ।
ते कमलास्थिति विसरुनि जाली पाहे दिव्य स्वरूप ॥ मिरवे० ॥ २ ॥
**प्र**ऱ्हादास्तव प्रगटुनि स्तंभीं केला **दि**तिज कुरूप ।
तो [6]देशिक **गो**विंद दीनाचा दावी विश्वरूप ॥ मिरवे० ॥ ३ ॥

## पद २१० वें.

**रा**धाप्रियमानसहंसा गुणसमुद्रा ।
गोपीजनचित्तचकोरविकसितचंद्रा! ॥ ध्रुवपद. ॥
मी हीनदीन पदीं **लीन** शीण करीं परता ।
कनवाळुपणें दे क्षेम **ह**री! दे आर्ता ।

---

१. पाप. २. पवित्रा. ३. उदकांत. ४. वेदशास्त्रें. ५. लक्ष्मी. ६. गुरु.

मी दास तुझा तूं सांग सख्या सुखवार्ता ।
हे भवशमना विश्वोद्भवपालनकर्ता ।
जगदाकार जगदीशा प्रतापरुद्रा ॥ गोपी० ॥ १ ॥
पतितोद्धारा पद्माक्षीरमणा येईं ।
हे मनोवृत्ति अर्पण केली तव पायीं ।
किति अंत पाहशिल माझा कृष्णाबाई? ।
[1]भवसरित्पुरीं बुडतों काढीं त्वरें लवलाहीं ।
शिरीं अभयवरद कर ठेवीं, स्थापीं मुद्रा ॥ गोपी० ॥ २ ॥
श्रीमत्सद्गुरुमहाराज नरोत्तम राया ।
दुस्तर भ्रमरूपी सर्व निवारीं माया ।
क्षण लव पल न गमे तुजवांचुनि यदुराया! ।
गोविंदमनोरथ पूर्ण करावा सदया ।
मज बसवीं तूं साम्राज्यपटाच्या भद्रा ॥ गोपी० ॥ ३ ॥

## पद २११ वें.

दीनरक्षका! पाव तूं तरी ।
हे रमाधवा! नवाज काज हें असाध्य आज धांव लौकरी ॥ध्रुवपद.॥
लागलें मना विषयसुखपिसें ।
स्त्रीकलत्रपुत्रभ्रातृमित्र हे विचित्र आप्त प्रिय मला दिसे ।
दुष्कृते तईं फावले तसे ।
कर्म तें अकर्म थोर फार घोर रूप म्यां केलें भलतिसें ।
बुडतों अशा भवसरित्पुरीं ॥ हे रमाधवा० ॥ १ ॥
तव वियोग हा सोसेना मला ।
कां व्रजांत गोपीनिवास फाग खेळतोसि सांग कोमला ।
येईं बा! त्वरें कंठ शोकला ।
कां उपेक्षिसी दयाघना! मनास आणि हें त्यजुं नको मला ।
प्रगट होइं तूं हृदयमंदिरीं ॥ हे रमाधवा० ॥ २ ॥
सुंदरानना प्रभु [2]इंदिरावरा! ।
मंदारोद्धरा! त्वरा करा हरा अघासि स्वामिभक्तिप्रियकरा! ।

---

१. संसाररूप नदीच्या लोटांत. २. लक्ष्मीपते!

दीन मी तुम्हां विनविं श्रीधरा! ।
त्यागितां जलास मीन शीण पावतो तसा मि गूणगंभिरा ।
द्वय पदांबुजीं ठेविं रे हरी! ॥ हे रमाधवा० ॥ ३ ॥
क्षणक्षणां असे जीव घाबरा ।
रुक्मिणीनिवासका! निका विचार मांडिलासि भुवनसुंदरा! ।
गुरुनरोत्तमा! अभयसुखकरा! ।
आस पुरविं दास गोविंदास पदविलास देउनि पाश दूर करा ।
[1]श्रीनिकेतना पोटिसी धरीं ॥ हे रमाधवा० ॥ ४ ॥

## पद २१२ वें.

प्राणसख्या प्रियकरा! ।
पद्मोद्भवजनका पद्माक्षीरमणा पद्माकरा! ॥ ध्रुवपद. ॥

निजजनभयनाशना! ।
निशिदिनिं मनिं योगी तुज ध्याती दानवकुलशासना! ।
हे यादवकुलभूषणा! ।
विधि हर सुर किन्नर नर स्तविती दे पद विश्वेशना ॥
चाल ॥ गुणज्ञा प्रीतिवर्धना! ।
पौलस्त्यकुलमर्दना! ।
उचलुनि नगगोवर्द्धना ॥
उठाव ॥ व्रजवासी त्वां भक्त रक्षिले बापा मुरलीधरा! ॥ प्राण० ॥ १ ॥
[2]कंजायतलोचना! ।
कर्मसाक्षी मधुकैठभदमना हे कलिमलमोचना! ।
ऐकावी मम सूचना ।
काळमुखीं सांपडलों बापा! मज कांहीं सूचना ।
चाल ॥ धनुर्यागि धनुभंजना! ।
राधामानसरंजना! ।
निजसुख देसी नि[3]जजना ।
उठाव ॥ योगीजनविश्रामा आतां मम भवभ्रम दूर करा ॥ प्राण० ॥ २ ॥

---

१. लक्ष्मीनिवासा. २. कमलायतनयना. ३. स्वभक्तांला.

हे विश्वोद्धारका ! ।
विश्वेशा विश्वांतरसाक्षा विधिमनभयहारका ! ।
मज न गणीं तूं पारका ।
सर्वस्वी हा देह अर्पिला यावरी मज घोर कां ? ।
चाल ॥ हे गोपीजनवल्लभा ! ।
चिद्गगनीं करावी प्रभा ।
तूं वैकुंठपुरिच्या शुभा ।
उठाव ॥ इंद्रादिक सुर स्तविति तुजला हे त्रिभुवनसुंदरा ॥ प्राण० ॥ ३ ॥
धांवा श्रीगुरु नरहरी ! ।
ब्रह्मकटाहातें विदारुनि येई सख्या ! लौकरी ।
बा ! मी बुडतों लवकरी ।
घाबरलों, मज न सुचे कांहीं, सत्वर हातीं धरीं; ।
चाल ॥ गोकुलपति गोपीवरा ! ।
काऊर करावी त्वरा ।
हे मनोवृत्तिपदिवरा ।
उठाव ॥ गोविंद प्रभुनाथ नृसिंहा भवगज[1] तुम्हि आवरा ॥ प्राण० ॥ ४ ॥

## पद २१३ वें.

सांवळिया राधारमणा ! । कां नये दीनाची करुणा ? ॥ ध्रुवपद. ॥
पावन ब्रिद पायीं असतां । कां त्यजिलें अनाथनाथा ? ।
ये सत्वर धांव समर्था । सोयरिया रुक्मिणीकांता ! ।
पतितोद्धारा फणिशयना[2] ! ॥ कां नये० ॥ १ ॥
दुर्धर भवसरिताजीवनीं । बुडतों काढी करिं धरुनी ।
गुणदोषक्षमा हे करुनी । मज तारीं नामस्मरणीं ।
उन्मद भवगजमददमना ! ॥ कां नये० ॥ २ ॥
तळमळ बहु वाटे मजला । अभिमान कसा त्वां त्यजिला !
मम दुष्कृत[3] पाहुनि थिजला । यास्तव विट आला तुजला ।
योगिजनमानसहरणा ! ॥ कां नये० ॥ ३ ॥
नैराश्य होतां माझी । अपकीर्ति होईल तुझी ।

---

१. संसाररूप हत्ती. २. शेषशयना. ३. पाप.

यावरि कां तुझी मर्जी । ऐकें दासाची अर्जी ।
न करीं आळस अघशमना[1]! ॥ कां नये० ॥ ४ ॥
गुरुनाथ नरोत्तमराया । अनिवार तुझी हे माया ।
सांभाळीं हिला यदुराया! । आवडी दे तव गुण गाया ।
गोविंद विनीत धरि चरणा ॥ कां नये० ॥ ५ ॥

## पद २१४ वें.

हे व्रजपति नंदकुमारे सकुमारे कृष्णाबाई! ॥ ध्रुवपद. ॥
तुजविण विकळ जिव होतो क्षणलवपल स्थिर न राहे ।
तळमळ बहु वाटे मजला गति कोण करूं मी माये! ।
विश्रांति नसे तुजपरती आयुष्य वृथा सरताहे ॥
चाल ॥ हे यदुपति! ये लवलाहें ।
अति मृदु मज दाखवीं पाय ।
आलिंगन दे चहुं बाहे[2] ॥ हे व्रज० ॥ १ ॥
सर्वस्वीं शरण तुज आल्या परता कधिं केला नाहीं ।
पुरवोनि प्रीति तयाची कवटाळुनि धरिले हृदयीं ।
कनवाळुपणाची थोरी कां केली माझे आई! ॥
चाल ॥ गुणसरिते! सत्वर येईं ।
साष्टांगनमन तव पायीं ।
सप्रेमें चुंबन देईं ॥ हे व्रज० ॥ २ ॥
तान्हें टाकुनि दूर माता लपली त्या कांहीं कळेना ।
मग काय गति हो! झाली त्याची मज आकळेना ।
लडिवाळ करावा आधीं त्यागितां तोचि टळेना ॥
चाल ॥ प्रीति जडली हे वितळेना ।
पाहतां तुज तुही वळेना ।
हा देह कदापि जळेना ॥ हे व्रज० ॥ ३ ॥
न करिं मज पायापरता गुरुनाथ नरोत्तम राया! ।
दुस्तर भ्रमरूपी कृष्णा! अनिवार तुझी ही माया ।
अपराधी मी बहु दास्या दुःखार्णवीं[3] बुडली काया ॥

---

१. पापनाशना. २. भुजांनीं. ३. दुःखसागरांत.

चाल ॥ गोविंद प्रभु सुखसदया ! ।
कारिं सर्व सुखाची छाया ।
सांभाळीं मला यदुराया ! ॥ हे व्रज० ॥ ४ ॥

### पद २१५ वें.

सज्जन विश्रांता आतां येईं समर्था ! ।
प्राणसख्या रुक्मिणीकांता ! ॥ ध्रुवपद. ॥
त्रिभुवनीं तुजपरता थोर कदापि दिसेना ।
मज आश्रय [1]आन असेना ।
ध्यानासि आणितां प्रभुजी ! तूं गवसेना ।
हा दृढ निश्चयही वसेना ।
सायास कठिण योगाचा मनीं बसेना ।
हे वृत्ति तयांत धसेना ॥
चाल ॥ भेटीची फार अपेक्षा ।
तुज न कळे अंतरसाक्षा ।
विश्रांतरचित्तपरीक्षा ॥
टीप ॥ हे दीननाथ ब्रिद पायीं तुझ्या गुणवंता ! ॥ प्राण० ॥ १ ॥
थोरीवपणाची चाड तुम्हाला नाहीं ।
मज कळलें कृष्णाबाई ! ।
अद्यापि पहासी काय नवल ये समयीं ? ।
मी बुडतों कीं [2]भवडोहीं ।
पाहिला करुन संसार नसे सुख कांहीं ।
दुष्कृत बहु जडलें हृदयीं ॥
चाल ॥ तुटली हे [3]सुकृतदोरी ।
जन्मांतर पडलें भारी ।
पापाच्या झाल्या [4]हारी ॥
टीप ॥ खुंटला यत्न मी काय करूं भगवंता ! ॥ प्राण० ॥ २ ॥
नामाग्निनें जळताति दुष्कृत बा रे ! ।
आधार मला कळला रे ! ।
प्रल्हाद ध्रुव उपमन्युला वळला रे ! ।
नामें वाल्मिक तरला रे ! ।

---

१. अन्य. २. प्रपंचरूप डोहांत. ३. पुण्याची दोरी. ४. पंक्ति.

हा अजामिळ पुत्रमिषें उद्धरला रे! ।
तें प्रेम जिवीं धरला रे! ॥
चाल ॥ तुज गोड प्रीतिच्या गोष्टी ।
त्या म्यांही धरिल्या पोटीं ॥
आशा करि मज बहु कष्टी ॥
टीप ॥ नैराश्य करुनी मन माझें तारीं दीनार्ता ॥ प्राण० ॥ ३ ॥
पुंडलीकवरदा देवा मनोभिरामा ।
योगीजनमनविश्रामा! ।
गुरुनाथ नृसिंहा तारीं आत्मारामा! ।
चिद्वैभवसुखदा आम्हा ।
गोविंदा निजपदीं गति दे चित्तविरामा ।
देशिकराया सुखधामा ॥
चाल ॥ कनवाळू बहु दासाचा ।
हा निश्चय कळला साचा ।
आतां संशय काय कशाचा? ॥
टीप ॥ पूर्वापार हा आधार समजला आतां ॥ प्राण० ॥ ४ ॥

## पद २१६ वें.

सांवळ्या तुझि मर्जी रे! । कोण तुम्हाला वर्जी ॥ ध्रुवपद. ॥
तूं रुसल्या मजवर जी। तारक आन नसे विधिहर जी! ॥ सांवळ्या० ॥१॥
मी विषयास्तव गरजी । आवडे सुतदाराधन घर जी! ।
करि प्याद्याचा फरजी । तारीं गोविंदा नरहरजी! ॥ सांवळ्या० ॥ २ ॥

## पद २१७ वें.

गोपीश्रमहरणा हरी! । येईं लौकरी सौख्यसदना! ॥ ध्रुवपद. ॥
षड्रिपु[1] जाचिती नष्ट वाटती कष्ट सदां देहीं ।
दुर्धर माझें अदृष्ट झालें मति भ्रष्ट विठाबाई! ।
वदवे तें वदलों स्पष्ट तुम्हाविण श्रेष्ठ कोणी नाहीं ।
टीप ॥ खुंटली मति श्रीपती वदावें किती दोषहरणा ॥ गोपी० ॥ १ ॥
दुःशासन धरितां निरी विकळ सुंदरी दुःख अनळे ।

१. कामक्रोधादिक सहा शत्रु.

मनदूत द्वारकापुरीं धाडिला त्वरें तुम्हां पहिलें ।
होउनि प्रगट अंतरीं टाकी तिजवरी वस्त्र अनळें ।
टीप ॥ घे चक्र दमाया करीं धाकती वैरी कंसकदना! ॥ गोपी० ॥ २ ॥
दुर्वास छळितां वनीं करी विनवणी द्रुपददुहिता ।
उभी राहुनि वृंदावनीं मनीं स्मरतां रुक्मिणीकांता ।
पुढील भाने लवंडुनि येसि धांवुनियां श्रीमंता! ।
टीप ॥ अघमर्षण[1] करितां मुनि तृप्त करिसि तूं मधुसूदना ॥ गोपी० ॥ ३ ॥
प्रल्हाद गांजितां पिता तुम्हा अच्युता! आळविलें ।
लागतां न लव खांबांत प्रगटतां क्रूर रूप[2] धरिलें ।
त्यापरी मला नरहरी! तारीं सांभाळीं वचन पहिलें ।
टीप ॥ गोविंददास उद्धरी ब्रीद सांभाळीं कुंदरदना! ॥ गोपी० ॥ ४ ॥

## पद २१८ वें.

जय जय जगदीशा! । यदुकुलनलिन[3]दिनेशा[4]! ॥ ध्रुवपद. ॥
इच्छित प्रेमघनाशा । देईं सकळ भवपाशा ॥ जय० ॥ १ ॥
दुर्मद दनुजविनाशा! । यदुपति देवकीजठरनिवासा! ॥ जय० ॥ २ ॥
गोविंदहृदयनिवासा! । नरहरि योगीमानसहंसा! ॥ जय० ॥ ३ ॥

## पद २१९ वें.

सांवळ्या प्रभु नंदकिशोरा! । राजसा दधिनवनीतचोरा! ।
दीनजनसुखदायका कर्ममोचका विश्वविहारा! ॥ ध्रुवपद. ॥
भवाब्धिपरतीर उतराया । येईं सत्वर यादवराया रे! ।
घाबरला हा जीव धांव येथूनि मुक्त कराया ।
कधीं येशी देशिक[5]राया । नेणवे कृतदोष हराया हो! ।
कामक्रोधमदमत्सर जळचर जाचिती शरीरा या ॥
चाल ॥ खुंटला यत्न श्रीपती स्तब्धली मती शेषशयना! ।
लाधली असे दुर्मति वदावें किती दोषहरणा ।
चूकवी सख्या दुर्गति राहुं दे प्रीति कमलनयना! ॥
उठाव ॥ कोण गती करूं या परिहारा ।
क्षणक्षणा क्लेश होत हारा ।

---

१. पापशमन. २. नरसिंहरूप. ३. कमल. ४. सूर्या. ५. गुरुवर्या.

विगलित तनु सांवरी येइं लवकरी नंदकुमरा! ॥ सांवळ्या० ॥ १ ॥
तारिले बहु पातकी जाणा। असें मज कळलें अज्ञाना हो!।
मी अपराधी तुझा दुजें मज करी सज्ञाना।
अंगीं जडलें दुष्कृत नाना। ठाउकें तुजला खगगमना[1] रे!।
दीनोद्धार असें ब्रिद पाईं सोडूं नका ध्याना ॥
वाल ॥ होणार तेंचि हो सुखें निकें वाटलें तुझ्या चित्ता।
कर्मानुरूप हे मती गती घडली रुक्मिणिकांता।
गेलि रे लाज यदुपति! अतिशय झालें श्रीमंता ॥
उठाव ॥ नसे चित्त सुकृत दोरा। किति करणें बा येरझारा।
ज़ी! आद्यवैद्य तूं खरा हरीं भवरोग देइं मात्रा ॥ सांवळ्या० ॥ २ ॥
सुंदरानन पद्मदलाक्षा। सोय अरे अंतरसाक्षा हो!।
विद्वज्जनविश्रांता आतां ये सर्वाध्यक्षा।
नका त्रासूं चित्तपरीक्षा। गुणज्ञा दे मजला भिक्षा।
तूं सर्वांतरसाक्षी विलक्षण पद देईं अलक्षा ॥
वाल ॥ श्रीगुरुनाथ नरहरि धांव लौकरी सौख्यसदना।
होउनि प्रगट अंतरीं चित्त सांवरीं अरिकदना।
आरामवाटिका बरी हृदयमंदिरीं येइं सजना ॥
उठाव ॥ मना येईल तैसेंचि करा। नका येऊं स्वामी निकरा।
गोविंदप्रतिपाल बाल संरक्षीं विश्वसूत्रा ॥ सांवळ्या० ॥ ३ ॥

## पद २२० वें.

येईं रे! वृंदावनकुंजविलासिया रे! ॥ ध्रुवपद. ॥
यदुकूलभूषणविश्वोद्धारा!। राधिकाहृत्पंकजभ्रमरा!।
कारा चुकवीं यमाचिये हृदये निवासिया रे! ॥ येईं० ॥ १ ॥
कृष्णा! नंदयशोदाबाळा!। गाईगोपव्रजप्रतिपाळा!।
गोवर्धनधरणा नटनाटकवेषिया रे! ॥ येईं० ॥ २ ॥
नरकविदारक नरकमोचना। नरशार्दूल[2] मम दुष्कृतदहना।
नमन पदीं गोविंदाप्रति देईं तव गुण विशेष या रे! ॥ येईं० ॥ ३ ॥

## पद २२१ वें.

श्रीरंगा येईं रे! योगीजनमानसहंसा! ॥ ध्रुवपद. ॥

१. गरुडवाहना. २. नरश्रेष्ठा, नरपुंगवा.

[१]कंसासुहरणा भवतरणा । करुणाब्धे नतजनसुखकरणा! ।
दीनोद्धार असे ब्रिद पायीं धांव पाव श्रीरुक्मिणीरमणा! ॥ श्री०॥१॥
गोपाळा गोपबाळमित्रा । गोवर्धनधरणा मृदुगात्रा ।
गोपीप्रिय गंगाधरप्रियकर गुणसिंधु कालिंदीकलत्रा ॥ श्री० ॥ २ ॥
भक्ताची मनोवांच्छित सिद्धि । काळ उभा लक्षितसे संधी ।
[२]बंदी तुझा गोविंद प्रार्थित [३]बंध चुकवी हे किल्मिषदहना ! ॥ श्री०॥३॥

**पद २२२ वें.**

गोविंदा! रामा! ये रे! । गोपाळा! रामा! ये रे! ।
भक्तकामकल्पद्रुम नरहरे! मजला क्षेम दे रे! ॥ ध्रुवपद. ॥
क्रोध नक्र विदारुनि चक्रें दिग्गज गज उद्धरिला ।
आलिंगुनि कनवाळा हृदयीं मुक्तपुराप्रति नेला ॥ गोविंदा० ॥ १ ॥
घेउनि तव स्वरुपातें कौळिक नृपकन्ये रत झाला ।
अति संकटिं आळवितां तुजला आपणाऐसा केला ॥ गोविंदा० ॥ २ ॥
मी तव सर्व गुणें हिन देवा [४]सुकृत नाहीं पदरीं ।
दीन गोविंद अधमनरकेसरी, करुणार्णव! मज तारीं ॥ गोविंदा० ॥३॥

**पद २२३ वें.**

गोकुलवासा गोपविलासा गोपाला गरुडविहारा! ।
गोवर्धनधरणा अघशमना गोरसहरणा सकुमारा! ॥ ध्रुवपद. ॥
शरणागतवत्सल ब्रिदपायीं गाजतसे सकळा भुवनीं ।
ऐशी शास्त्रमुखांतील वाणी म्यां ऐकिली बापा श्रवणीं ।
हा निश्चय मनीं जडला म्हणउनि आलों शरण जोडुनियां [५]पाणी ।
आणिक कोणी नसे मज त्राता येईं त्वरें पंकजपाणी ॥
उठाव॥ भक्तकामकल्पद्रुम म्हणती तुजलागुनि नंदकुमारा ॥ गोव० ॥ १ ॥
गज नक्रें गंडिकापतंजळीं आक्रमि व्याकुळ झाला ।
होती गात्र शिथिल सर्वहि ते तेव्हां प्रार्थियलें तुजला ।
मुक्तपुरीं असतीं गरुडासन त्यागुनियां सत्वर आला ।
गज केला अपणासम प्रभुजी! उद्धरिलें त्या अधमाला ।
उठाव॥ एवढी लाज तुम्हा बि[६]रुदाची दावी वदन भवनदी तारा ॥ गोव० ॥२॥

१. कंसाचे प्राण हरणाऱ्या, कंसाला मारणाऱ्या! २. भाट, स्तुतिपाठक. ३. भवबंध, मायापाश. ४. पुण्य. ५. हात. ६. लौकिकाची.

प्रऱ्हादास्तव स्तंभ विदारुनि मर्दियला दुर्जन[1] समरीं।
मज पतिताला त्राता कोणी आन[2] नसे बा! कंसारी!।
पतितपावन नाम तुझें मज तारुनि, सखया! सत्य करीं।
याविरहित गोविंददिनाची आणिक न वदे वाणि हरि ॥
उठाव॥ भक्तांची मनोवांछित सिद्धि म्हणउनियां तिष्ठत द्वारा ॥ गोव० ॥ ३ ॥

## पद २२४ वें.

मजवरी कृपा करीं देवराया! ॥ ध्रुवपद. ॥
भक्ताची मनोवांछित सिद्धि। देईं त्वरें सुखसदया ॥ मजवरी० ॥ १ ॥
दीननाथ ब्रीद तव पायीं। सांभाळीं गुणवर्या ॥ मजवरी० ॥ २ ॥
गोविंद अधम सर्वोपरि असतां। तारीं भवार्णवीं[3] सखया॥ मजवरी० ॥ ३ ॥

## पद २२५ वें.

गोविंदा! रामा! ये रे!। गोपाळा! रामा येईं रे!।
गोपीमानसहंसा कृष्णा! मजला क्षेमें[4] दे रे! ॥ ध्रुवपद. ॥
यज्ञमुखीं अवदान न घेतां चित्तीं त्रिटसी कां? रे!।
सान मुलें गवळ्यांचीं त्यांचें उच्छिष्ट खासी बा! रे! ॥ गोविंदा० ॥ १ ॥
इंद्रादिक सुर नमिति तुजला होउनियां दीन सारे।
तो स्तव अप्रिय मानुनि शीव्या खासी मुलांच्या कशा रे! ॥ गोविंदा० ॥२॥
अति सुंदर [5]क्षीराब्धीतनया नावडे तूज कमला रे!।
भाग्योदय कुब्जेचा भारी दासीसी रमला रे! ॥ गोविंदा० ॥ ३ ॥
अधमोद्धारण हें मी जाणुनि भजतों तुज सदा रे!।
तरि करुणा ऐकुनि दीनाची क्षेम दे गोविंदा रे! ॥ गोविंदा० ॥ ४ ॥

## पद २२६ वें.

रामकृष्ण वासुदेव भज मानसहंसा।
सज्जनजनपालक सुखदायक हृद्धंसा ॥ ध्रुवपद. ॥
मंदस्मित कुंदरदन। [6]मुनिजनहृत्तापकदन।
[7]मदनदहनप्रियकर मधुरिपु अघनाशा ॥ रामकृष्ण० ॥ १ ॥

---

१. हिरण्यकशिपु. २. अन्य, दुसरा. ३. संसारसमुद्रांत. ४. भेट, आलिंगन. ५. क्षीरसागराची कन्या. (लक्ष्मी.) ६. मुनिजनांच्या हृदयांतील दुःख नाहींसें करणारा. ७. शंकराचा आवडता.

कल्पद्रुमवनविलास । कंसांतक श्रीनिवास ।
कमलाकर कंजनयन कौस्तुभमणिभूषा ॥ रामकृष्ण० ॥ २ ॥
गोविंद प्रभुदयाल । नरहरि गोकुळपाल ।
गोपीकुचमंडन भवखंडन जगदीशा ॥ रामकृष्ण० ॥ ३ ॥

**पद २२७ वें.**

सुंदर ध्यान हरीचें । पाहतां नयनीं ।
मन उन्मन हें झालें स्वसुखें करुनी ॥ ध्रुवपद. ॥

माथा किरीट विराजितसे कुंडल श्रवणीं ।
कमलदलापरि साजे शोभा नयनीं ।
बाहुचतुष्टय आयुधें धरले पाणी ।
आभरणें[1] तनु मंडित गळां मुक्तमणी ॥ सुंदर० ॥ १ ॥
हृदयीं श्रीवत्सनिकेतन दोहीं भागीं ।
चंदनलेप सुगंधित, श्यामल आंगीं ।
पीतांबर कटी शोभे केशररंगी[2] ।
वांकी पदीं, गर्जतसे असुरालागीं ॥ सुंदर० ॥ २ ॥
कमला धरी हृत्कमलावरी पदकमला ती ।
संवाणी सद्भावें बहु दिनराती ।
सनकादिक योगीजन हृदयीं ध्याती ।
दास गोविंदाची सुखविश्रांति ॥ सुंदर० ॥ ३ ॥

**पद २२८ वें.**

बाई ! कधीं पाहीन हा वनमाळी । घेईन नेंव्हाळी[3] ॥ ध्रुवपद. ॥

चिमण्या या गोपसमाजीं जेवी । दध्योदन सेवी ।
असल्या जन्मांतर सुकृत ठेवी । तरि प्रीति करावी ।
त्यातें ठेवावें त्या हृत्कमळीं ॥ घेईन० ॥ १ ॥
ज्यातें कवटाळुनि गोपी धरिती । प्रेमें रंजविती ।
वृंदावनीं रासक्रीडा करिती । हरिसुख अनुभविती ।
छंदें बिंबोष्ठीं वाजवी मुरली ॥ घेईन० ॥ २ ॥

---

१. भूषणांनीं, अलंकारांनीं. २. केशराप्रमाणें पिंवळा. ३. अपूर्वता, कौतुक, गोडी.

ज्याच्या पदकमळीं पैंजण साजे । भुवनत्रयीं गाजे ।
ज्यातें स्तविती धर्मादिक राजे । गंभीरगिरा जे ।
तो हा भिवरेतिरीं भक्ताजवळीं ॥ घेईन० ॥ ३ ॥
सांगूं क्लेशांची कवणा वार्ता । गुरु नरहरि[1] परता ।
न दिसे त्रिभुवनीं मज लागुनि पाहता । गोविंद दीनार्ता ।
सांगा हरिला शरणागत पाळीं ॥ घेईन० ॥ ४ ॥

### पद २२९ वें.

श्रवण[2] करा हरिकथा । कथा तुम्ही ॥ ध्रुवपद. ॥
पुराणपुरुष अच्युतगुण गाता । सेवा आराधानपथा पथा ॥ श्रवण० ॥ १ ॥
भक्तिपुरःसर भागवतातें । प्रेम करोनि मथा मथा ॥ श्रवण० ॥ २ ॥
गोविंद म्हणे याविण स्वार्था । जन्म गेला वृथा वृथा ॥ श्रवण० ॥ ३ ॥

### पद २३० वें.

कोठें क्रमिली रात्र एवढी प्राणवल्लभा! हरी! ।
खरं सांगा मज लवकरी ॥ ध्रुवपद. ॥
यदुकुलनलिनदिनेशा[3] जी आश्चर्य एक गमतसे ।
बिंबाधर सुकले दिसे ॥
घुर्मित झाली दिष्टि कष्ट झाले वाटे भलतसे ।
घर्में तनु भिजली असे ॥
चंदनलेप सुगंध अंगींचा मज कांहींना दिसे ।
लागलें कोणाचें पिसें ॥
वज्रचुड्यांचीं चिन्हें दिसती तुमच्या अंगावरी ॥ खरं० ॥ १ ॥
तुम्ही तालेवार लोक तुम्हाला योग्य नव्हे गिरिधरा! ।
प्राणसख्या रुक्मिणीवरा! ॥
आज दिवस कीं माझा कळला असतां गुणगंभिरा ।
राजसा सौख्यसागरा ॥
मी लक्षित बसल्यें मार्ग केव्हांचा तुझा प्रियकरा ।
हा आर्षभाव कां बरा ॥
सेज बहुत अरुवार[4] फुलांची रचिली जी मंदिरीं ॥ खरं० ॥ २ ॥

---

१. नरहरिगुरूवांचून. २. पद १७८ पहा. ३. यदुकुलरूप कमलास सूर्याप्रमाणें जो आहे तो. (कृष्ण.) ४. कोमल.

हीन माझं प्रारब्ध बोल कोणाला ठेवूं तरी ।
हे रीत नव्हे कीं बरी ॥
काय मृषा प्रीतीच्या गोष्टी सांगतसां क्षणभरी ।
लक्षांश कोणावरी ॥
अष्टाधिक शतसोळासहस्र वनिता तुमच्या घरीं ।
अशी कोण मिळाली दरी ॥
तिजवरतीं हें लक्ष्य ठेविलें काय म्हणावें तरी ॥ खरं० ॥ ३ ॥
अति कनवाळू बाप दिनाचा प्रत्युत्तर दे तिला ।
कां भ्रंश तुला लागला ॥
भक्तासाठीं केलें धांवणें जीव माझा श्रांतला ।
म्हणऊनि घर्म अंगाला ॥
तीव्र उष्ण किरणें त्या रविचीं तेणें अधर सूकला ।
जागर बहु झाला मला ॥
सर्वांतरीं मी आत्मा असतां आळ घेसि मजवरी ॥ खरं० ॥ ४ ॥
**ध्यान** बहु सुंदर देवाचें पाहुनी **भा**मा सती ।
आलंगिला **य**दुपति ॥
प्रेमाश्रु हे स्रवति लोचनीं कुच तेणें भीजती ।
करी निंबलोण मागुती ॥
सप्रेमें गुरु **न**रहरिराया पूजिलें बहुतां रिती ।
**गो**विंदाची सद्गती ॥
प्रकृतिपुरुषऐक्याची गोडी काय म्हणावें तरी[1] ॥ खरं० ॥ ५ ॥

## पद २३१ वें.

**रा**धा मन उल्हासे । मंदिरीं बैसलीसे ।
तव विषयलहर करि कहर तिला लागलें **कृ**ष्णपीसें[2] ॥ ध्रुवपद. ॥
दूतीप्रति हंसगमना । म्हणे जाईं कुंजवना ।
तूं प्राणसखी मज जिवींची म्हणुनी तुजप्रति करितें करुणा ॥
**य**शोमतीबाळ **का**न्हा । दावी राजिवनयना ।
कोठवरी दुःख करुं सहन, वेदना सोसवेना ॥

---

१. या पदांत 'सत्यभामाविनोद' आहे. या कथानकावर कविता अनेककविकृत लघुकाव्य-माला—भाग १ पृ० ७३-७५ व भाग २ पृ० ४९-५१ यांत छापलेली आहे. २. पिसें=वेड.

झाली विकळ चंद्रवदना । दूती गेली कुंजवना ।
करद्वय जोडुनि करी नमन सदनीं चाल जी कुंदरदना ॥
चाल ॥ हे प्रभु यदुकुलतिलका ।
स्वामी मन्मथजनका ।
तूं प्रियकर मुनि सनका ॥
उठाव ॥ तुजविण दीन राधिका नसे शब्दाचा आवांका[1] ।
म्हणुनी प्रार्थितें तुज ऐसें ॥ राधा० ॥ १ ॥
दूतिवचन श्रवणकमळीं । ऐकुनियां वनमाळी ।
सवें गोपवृंदसमुदाय थाट विनटला हरीजवळी ॥
शृंगार गाईगवळी । करिं वंशदंड मुरली ।
कांसेसि पितांबर पिंवळा हार गुंजाची जसि पिंवळी ॥
श्यामतनूवरी पिंवळी । केशरी उटी लावियली ।
मस्तकीं केश विस्तीर्ण भाळीं कस्तुरी लावुनी काळी ॥
चाल ॥ पावन तोडर चरणीं ।
नृत्य पावन धरणीं ।
डोलती कुंडल श्रवणीं ॥
उठाव ॥ इंद्रादिदेवसमुदाय हरीदर्शनासी इच्छितसे ॥ राधा० ॥ २ ॥
सर्वांतर समसाक्षी । ज्या सत्ते पशुपक्षी ।
स्थावरजंगम वर्तती चराचर भवसागरीं रक्षी ॥
त्याच्या पदकमलाक्षी । रमली हे निगमसाक्षी ।
हिमनगजापति करि ध्यान, विधि जन्मला असे कुक्षीं ॥
ध्रुव प्रऱ्हादा अक्षी । दे गति चित्तपरिक्षी ।
पाहुनि सुंदर हरि असा तिनें धरियेला हेतु मोक्षीं ॥
चाल ॥ दूति वदे नंदकुमारा ।
श्रीकृष्णा सुकुमारा ।
धरीं व्याकुल ते अधिरा ।
तुजविण सद्गुणपात्रा ॥
उठाव ॥ हे कमलदलायतनेत्रा विचित्र होईल मज भासे ॥ राधा० ॥ ३ ॥
लगबग करि हरि तेव्हां । दूतिसह राधागेहा ।
येतांचि निरक्षी सखी तसी लक्षिते वासुदेवा ॥

---

१. धैर्य.

देवा दुर्लभ ठेवा । निज जन करि हरि धांवा ।
राधाकंठीं हस्त घालुनि देत चुंबन तिस बरवा ॥
रत्नजडित पर्यंका । त्यावरि यदुकुलतिलका ।
बसवुनि करी उपचार हारगंधादि दावी भावा ॥
चाल ॥ ते समाधिसुखनिद्रा ।
हरिसवें पद्मनेत्रा ।
मिनेली[1] सखी सत्पात्रा ।
नसे भिन्न उभयगात्रा ॥
उठाव ॥ गुरु नरसिंहपदकमलारविंदिं गोविंदभृंग विलसे ॥ राधा० ॥ ४ ॥

## पद २३२ वें.

साजणी न गमे मज बाई ! ।
हरिवांचुनि जिवीं सुख नाहीं ॥ ध्रुवपद. ॥
नेग[2] जड झाले नगापरि[3] मातें । क्षणभरीं दावि पुरुषोत्तमातें ॥ साजणी० ॥१॥
हार गळां बहु भार असा हे । आभरणें सह साहीन साहे ॥ साजणी० ॥ २ ॥
जाई दूति, नरहरिरुप दावा । गोविंदाचा प्राणविसांवा ॥ साजणी० ॥ ३ ॥

## पद २३३ वें.

दम धर मजला सोड । हरि ! रे ! ॥ ध्रुवपद. ॥
किति करशिल रेंळी[4] धरुनी पदरीं । जवुन तुझी हे खोड हरि रे ॥ दम०॥ १ ॥
मथुरेला मज जाऊं न देसी । देई नवनीत गोड हरि रे ॥ दम० ॥ २ ॥
गोविंदप्रभु नरहरिराया । केली तव पदीं जोड हरि रे ॥ दम० ॥ ३ ॥

## पद २३४ वें.

निरंजनीं[5] अनुहात वेणु वाजे ।
जालें तटस्थ ऐकतां मन माझें हो ! ॥ ध्रुवपद. ॥
श्रवण माझे गुंतले वेणूनादीं ।
मनोवृत्ति गुंतली ब्रह्मानंदीं ।
अहंकार सासुरा मेला द्वंद्वीं ।
यानें घातलें संसारसुखाच्या बंदीं हो ! ॥ निरंजनीं० ॥ १ ॥

---

१. मिळाली, एकरूप झाली. २. दागिने, भूषणें. ३. पर्वताप्रमाणें. ४. थट्टा, मस्करी. ५. एकांतांत.

गृह नोहे कारा[१] मातें वाटे ।
काय करूं मी प्रारब्ध माझें खोटें ।
क्षणक्षणा आयुष्यकाळ लोटे ।
पूर्वार्जित आडवें पडलें मोठें ॥ निरंजनीं० ॥ २ ॥
दैवयोगें भेटली नरसाबाई ।
भावें माथा ठेविला तीचे पायीं ।
कान फुंकोनि दाविलें डोळां कांहीं ।
वृत्ति बुडाली स्वानंदसुखाच्या डोहीं ॥ निरंजनीं० ॥ ३ ॥
चित्रविचित्र दाविलें नरहरिरायें ।
त्याची गोडी सांगतां मुखीं नये ।
प्राण गेल्या न सोडीं त्याचे पाय ।
गोविंदाची विश्रांति सद्गुरुमाये ॥ निरंजनीं० ॥ ४ ॥

**पद २३५ वें.**

मंद समिर[२] गति मंजुळ मुरहर वाजवितो पावा ।
तो हरि मजला दावा ॥ ध्रुवपद. ॥
नम्र करुनि शिर संभ्रम करद्वय जोडुनि सखिचरणीं ।
मस्तक ठेवी धरणी ॥
शुभ्र वस्त्र जरितगट जडित घे अंचल[३] कुचावरुनी ।
डोलति कुंडल श्रवणीं ॥
गोमेदोत्पलपाचरत्नमणिहार हृदयभुवनीं ।
साजे मस्तकिं वेणी ॥
चाल ॥ अरुणापरि कुंकुम भाळीं ।
वरि मुक्तफळांची जाळी ।
तांबूल अधरपुटकमळीं ॥
उठाव ॥ मोरजडित मुदराखडि वरि केतक बदरी लावा ॥ तो हरि० ॥ १ ॥
हस्त धरुनि मन स्वस्थपणें करि कस्त पुढें जाया ।
ते अनयाची जाया[४] ॥
गस्त चुकुनि अलि मस्तपणें श्रीहरिचे पद पहाया ।
आलापित यदुराया ॥

१. कैद, कारागृह. २. वायु. ३. वस्त्र. ४. बायको (राधा).

दुस्तर हा भवसागर सत्वर परतिर उतराया ।
शुक म्हणे, 'परिसें राया ! ॥
चाल ॥ गंभीर गिरा करि स्तवन ।
हंसापरि जीचें गमन ।
क्षणक्षणा सखिसि करि नमन ॥
उठाव ॥ शारदेंदुवदना म्हणती दिठि[1] मुरलीधर पाहवा ॥ तो हरि० ॥ २ ॥
विरह विकळ गळगळ स्रवती द्वयनेत्र कुचावरती ।
अधरोष्ठ उभय स्फुरती ॥
वनचर पशु तर वैर त्यजुनि राधेभंवते भ्रमती ।
पक्षी गजबज करिती ॥
साधुसंगमीं निमग्न होउनि कृष्णस्मरण करिती ।
राधेचा श्रम हरती ॥
चाल ॥ हे [2]मधुमुरनरकविनाशा ! ।
स्वामी रे रमाविलासा ! ।
नीवारीं सकळ भवपाशा ॥
उठाव ॥ श्रीसद्गुरु नरहरिपदकमळीं गोविंदा लावा ॥ तो हरि० ॥ ३ ॥

पद २३६ वें.

उद्धवा ! हरीसि [3]मात हेचि जाणवा ।
होति विकळ प्राण गोपिचे रमाधवा ! ॥ ध्रुवपद. ॥
कुंदरदन मदनतात, सज्जन जन हृदयिं ध्यात ।
सुखवर नर किन्नर, गुणगंभिर, मुरलीधर, घनश्याम सुंदरा ।
निशिदिनिं मनिं ध्यास, दाखवा रमावरा ! ।
[4]कमलायतलोचन हरि आणि मंदिरा ॥ उद्धवा० ॥ १ ॥
धरुनि करी गोपिकांस, कुंजवनीं आसपास ।
रासभुवनि रतिविलास, हांसतसे वदन चुंबुनी ।
सोडिनाचि देह धरी दृढ अकर्षुनी ।
तो प्रभु आम्हांस दावि आजि भूवनीं ॥ उद्धवा० ॥ २ ॥

---

१. दृष्टीनें, डोळ्यांनीं. २. मधु, मुर आणि नरकासुर यांचा नाश करणाऱ्या (कृष्णा). ३. वार्ता, वर्तमान. ४. कमलाप्रमाणें विस्तृत नेत्र ज्याचे आहेत तो.

गोविंद प्रभु दयाळ नरहरि गोकूळपाळ ।
पाळुनि लडिवाळ विरह शांतवुनी [1]आळ पूरवा ।
उद्धवा हरीस सांग गोपि [2]ऊरवा ।
दर्शन देऊनि त्यासि प्रेम वाढवा ॥ उद्धवा० ॥ ३ ॥

**पद २३७ वें.**

उद्धवा ! तुम्ही मथुरेला जाउनि सांगा ।
प्राणसख्या अंतरंगा ॥ ध्रुवपद. ॥
उद्धवा ! स्वकीय आशा सोडुनि पायीं ।
रतलें मन करुं मी कायी ? ॥
उद्धवा ! [3]रैयनदिन चैन पडेना देहीं ।
विरहाग्नि पेटला देहीं ॥
उठाव ॥ उद्धवा ! हरिविरहानें जाइन भंगा ॥ प्राण० ॥ १ ॥
उद्धवा ! रुसुनि बसतां मी धांवुनि यावें ।
सप्रेमें चुंबन घ्यावें ॥
उद्धवा ! मधुर वचनें मानस निववावें ।
उचलुनि मज कडिये घ्यावें ॥
उठाव ॥ उद्धवा ! [4]विमलपंकजकर लावि ममांगा ॥ प्राण० ॥ २ ॥
उद्धवा ! क्षणक्षणा हात ठेवुनी [5]कुरळीं ।
सरसावि [6]अलक वनमाळी ॥
उद्धवा ! लक्षुमीहृदय करें ज्या कवळी ।
तो कर माझ्या हृत्कमळीं ॥
उठाव ॥ उद्धवा ! कुंजकाननिं करि रासप्रसंगा ॥ प्राण० ॥ ३ ॥
उद्धवा ! कृपा करुनी गुरु नरहरिराया ।
भेटविं मज यशोमतितनया ॥
उद्धवा ! नमन माझें कीं तुमचे पायां ।
दुस्तर भवसिंधु तराया ॥
उठाव ॥ गोविंद प्रार्थना करि मुखिं गात अभंगा ॥ प्राण० ॥ ४ ॥

---

१. इच्छा, हेतू. २. शिलक राहूं द्या, विरहानें प्राणत्याग करूं देऊं नका. ३. रात्रदिवस. ४. निर्मल कमलहस्त. ५. केशांवर. ६. केश.

### पद २३८ वें.

माझ्या दृष्टि दाविला हंस बाई! ।
ज्याला पाहतां त्रैलोकीं उपमा नाहीं ॥ ध्रुवपद. ॥
ज्याच्या तेजें ब्रह्मांड उजळलें ।
नाहीं त्याला हात पाय कान डोळे ।
न कळे[1] हिरवें ना काळें पिवळें ढवळें ।
तयामाजी चमकते हिरे गळे ॥ माझ्या० ॥ १ ॥
येउनि बैसला अउट हात वृक्षमाथां ।
काय सांगुं मि त्या पक्षींद्राची वार्ता ।
दृष्टी मुराली त्याजला पाहतां पाहतां ।
द्वैतभाव नाठवे माझ्या चित्ता ॥ माझ्या० ॥ २ ॥
तेंचि ध्यान लागलें माझे चित्तीं ।
हाल्दं विरलीं सांजणी! नेत्रपातीं ।
तव पातली सद्गुरु नरसिंहमूर्ति ।
त्यानें धरुनी दिधले माझे हातीं ॥ माझ्या० ॥ ३ ॥
सद्गुरुरायें उपकार थोर केला ।
माझा हंस दृष्टिनें दाखविला ।
आतां कैसें मी ग! विसरूं त्याला ।
गोविंदाचा मनोरथ पुरवीला ॥ माझ्या० ॥ ४ ॥

### पद २३९ वें.

मी आश्रित तुमचा । श्रीरामा! ॥ ध्रुवपद. ॥
राजा तूं साम्राज्यपदाचा । त्राता विश्वाचा ॥ श्री० ॥ १ ॥
इंद्रियेग्राम[2] स्वसत्ते आपुल्या । वर्तविसी साचा ॥ श्री० ॥ २ ॥
निर्मुनि जिव हे पालन करिसी । संहार जगाचा ॥ श्री० ॥ ३ ॥
सूर्य करी अनु तैसा हा जिव । या गोविंदाचा ॥ श्री० ॥ ४ ॥

### पद २४० वें.

शरयूतिरवासा रामा! । गुणग्रामा! सत्वर येईं ॥ ध्रुवपद. ॥
हे करधृतकार्मुकबाणा! कौसल्याजठरनिवासा[3]! ।

---

१. कळत (समजत) नाहीं. २. इंद्रियसमूह. ३. कौसल्येच्या पोटांत राहणाऱ्या.

काकुत्स्था! कैठभदमना! कौशिकमुनिमानसहंसा!।
हे कमलदलायतनेत्रा! मी बुडतों दे मज ढिवसा[1] ॥
चाल॥ कां अजुनि न येसी कैसा।
कुठवरि तरि पाहसि तमाशा।
कारा हरि सोडुनि पाशा॥ शरयू० ॥ १ ॥
खर दूषण त्रिशिरा रोषें, सहस्रावधि वधिले बाणीं।
खळ खळ पिशिताशन[2] त्यांच्या, प्राणांची केली बोहनी।
खटपट चुकवीली मुनिची, सुखी केले या जनस्थानीं॥
चाल॥ खरि केली निश्चयवाणी।
खगअरुणसुता[3] उद्धरुनी।
खाटीक विराधा दमुनि॥ शरयू० ॥ २ ॥
गौतमसती पदरजस्पर्शें शीळेची केली नारी।
गाती तुज निगम प्रितिनें स्वच्छंदें गर्जति चारी।
गंधर्व कलावत वाद्यें वाजविती नानाकुसरी[4] ॥
चाल॥ गो चेष्टविती मम शरिरीं।
गोवियली वृत्ति सारी।
गंगाधरहृदयविहारी[5] ॥ शरयू० ॥ ३ ॥
घनश्यामतनु सुकुमारा पहाया मन फार भुकेलें।
घडि पल युगसम मज जातो, श्रीरामा अंतर सुकलें।
घडि घडि आयुष्य कमी बा! झालें तुज कैसें नकळे॥
चाल॥ चित्स्वरूप दावी सगळें।
पाहतांचि निवती डोळे।
घेईन सुखाचे सोहळे॥ शरयू० ॥ ४ ॥
नभगामि[6] अमर सर्वहि ते, दशमुखकारागृहिं असतां।
नारद विधि पाचारुनियां मुळ[7] पाठविलें तुज ताता!।
न उपेक्षिसि प्रभु तूं त्यातें, पुरविली तयाची आस्था॥

---

१. भरंवसा, धिवसा. २. मांसभक्षक, राक्षस. ३. जटायु. ४. कुसरी=कौशल्य, कुशलता. ५. आपल्या अंगाचा दाह शमन होण्याकरितां शिव (गंगाधर) रामनामाचा जप करीत असे—ही कथा प्रसिद्धच आहे. ६. आकाशगामी, खेचर. ७. बोलावणें, आमंत्रण.

चाल ॥ नरहरि गुरुनाथ समर्था ।
न करीं गोविंदा परता ।
नामामृत चाखवि दात्या ॥ शरयू० ॥ ९ ॥

पद २४१ वें.

श्रीरामा । सज्जनमनोभिरामा । योगीमनविश्रामा । सगुणा मेघश्यामा ।
कामादिक रिपुदमना शमना भवभय हे सुखधामा ॥ ध्रुवपद. ॥
त्राता । तुजवांचुनि मज आतां । न दिसे रे रघुनाथा । तारीं दिनजनभ्राता ।
त्वत्पदरजस्पर्शें उद्धरिली गौतमऋषिची कांता ॥ श्रीरामा० ॥ १ ॥
तारीं । दुस्तर या संसारीं । दुर्मति माझि निवारीं । ऐकें दशवदनारी ।
शरणागत वत्सल ब्रिद पायीं, गर्जति सज्जन सारी ॥ श्रीरामा० ॥ २ ॥
दासी । स्तवि जे दिव्यपदासी । न करीं वृत्ति उदासी । दे सुख गोविंदासी ।
तूं गुरुनाथ नरोत्तम तारक अंतरसदनविलासी ॥ श्रीरामा० ॥ ३ ॥

पद २४२ वें.

झडकरि येईं रामा । मुनिविश्रामधामा ॥ ध्रुवपद. ॥
जानकीसौभाग्यवर्धन, जलजनेत्र[1] जगत्रपालन, जगन्निवास जनार्दन प्रभु जन्ममरण निवारीं ॥ झडकरि येईं० ॥ १ ॥
त्राणभूषित ध्यान करि, धनुबाण नेत[2] अभिमान धरुनि गुमान सहित दशास्य निवटुनि, रक्षुनी सुरमान ॥ झडकरि येईं० ॥ २ ॥
लक्ष्मणाग्रज दक्ष राक्षस शिक्षिता कोदंड दिक्षित, लक्षणार्थ अलक्ष तव पद अक्षयी अपेक्षी ॥ झडकरि येईं० ॥ ३ ॥
काच मनिं यमजाच दुस्तर आच चुकवि कृपाच करुनी, याचका वरदान देई तसाच तुज गोविंद प्रार्थित ॥ झडकरि येईं० ॥ ४ ॥

पद २४३ वें.

करुणानिधान रामा । निजसौख्य देईं आम्हां ॥ ध्रुवपद. ॥
या संकटा निवारी । भवदुःख[3] सर्व हरीं ॥ करुणा० ॥ १ ॥
निजरक्षका दयाळा । सीताविलासशीला ॥ करुणा० ॥ २ ॥
गोविंद बद्धपाणी । ठेवी पदाब्जीं मूर्ध्नि[4] ॥ करुणा० ॥ ३ ॥

पद २४४ वें.

रामा ! राजिवाक्षा ! प्रभु तूं क्षेम[5] दे मला हो ! ।
जीव माझा तुझ्या पदीं घेतलासे लाहो ! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. कमलनयन. २. नम्र. ३. संसारदुःख. ४. शिर, मस्तक. ५. आलिंगन.

रयनदिवस मला चैन किमपि पडेना ।
झुरतसे देह माझा गति सांपडेना[1] ।
अलक्षासि लक्ष कैसें लावुं हें घडेना ।
गुरुकृपेवीण तुझें रूप आतुडेना ॥ रामा० ॥ १ ॥
प्रवृत्तीचा योग हाचि मला गोड वाटे ।
काय करुं कर्म माझें ओढवलें खोटें ।
क्षणपल आयुष्य जातें येणें हृदय फाटे ।
न चले उपाय कांहीं हेंचि दुःख मोठें ॥ रामा० ॥ २ ॥
आतां कृपा करीं गुरु नरहरिराया ।
हेंचि अनिवार तुझी निरसावी[2] माया ।
भवपुरीं बुडतों काढीं धरूनियां बाह्या[3] ।
गोविंदालागोनी तुम्ही रामा उद्धराया ॥ रामा० ॥ ३ ॥

पद २४५ वें.

श्रीरामा मंगलधामा । योगीजनमनविश्रामा ॥ ध्रुवपद. ॥
वियोग तुझा मज जाचे[4] । लागलें ध्यान स्वरूपाचें ॥ श्रीरामा० ॥ १ ॥
ठेवुनि कर निढळावरता । पाहतों वाट रघुनाथा ॥ श्रीरामा० ॥ २ ॥
दीनवत्सल तव ब्रिद पायीं । गोविंदप्रभु तूं येई ॥ श्रीरामा० ॥ ३ ॥

पद २४६ वें.

श्रीरामा मंगलधामा । गुणग्रामा आत्मारामा ॥ ध्रुवपद. ॥
आम्हां टाकुनि परदेशी । झालासि निरंजनवासी ॥ श्रीरामा० ॥ १ ॥
वियोग तुझ्या स्वरुपाचा । साहेना[5] सत्य त्रिवाचा ॥ श्रीरामा० ॥ २ ॥
स्मृति होतां मन झुरताहे । ऊपाय नसे करुं काये ॥ श्रीरामा० ॥ ३ ॥
गोविंद दीनाची करुणा । ऐकावी सीतारमणा ॥ श्रीरामा० ॥ ४ ॥

पद २४७ वें.

माझ्या[6] सांवळिया श्रीरामा राजिवलोचना रे ! ॥ ध्रुवपद. ॥
सीतापति शरयूतिरवासी । योगीमानसकमलप्रकाशी ।

१. मिळेना, सांपडेना. २. नाहींशी करावी. ३. बाहेर. ४. जाच करी, दुःखदायक होई. ५. सहन होईना. ६. या पदाच्या अंतीं गोविंदाचें नांव नाहीं, तेव्हां हें पद गोविंदाचेंच कीं काय ही शंका आहे.

कांसीं धरि त्या भवनिधि पार उतारणा रे! ॥ माझ्या० ॥ १ ॥
रविकुलभूषण जंगदोद्धारा । नामें शंकरदाहविदारा ।
उलटे भजनीं करिसी वाल्मिक पावना रे! ॥ माझ्या० ॥ २ ॥
पाशीं गुंतलों या भवजाळीं । टाळी दुस्तर ते हे काळीं ।
भाळीं वंदुनि नरहरि करितो करुणा रे! ॥ माझ्या० ॥ ३ ॥

## पद २४८ वें.

राहें [1]सुखीं श्रीरामा हृदयीं ॥ ध्रुवपद. ॥
सर्व जिवांचा वास तवान्तरीं । मम मानसविश्रामा ॥ राहें० ॥ १ ॥
तुझ्या मंत्रउपासनेकरुनि । शुद्ध किरें गुणग्रामा ॥ राहें० ॥ २ ॥
सीतालक्ष्मणसहित रघूत्तमा । प्रगटें निजसुखधामा ॥ राहें० ॥ ३ ॥
गोविंदाची आशा पुरवीं । हृदयस्था गुणग्रामा ॥ राहें० ॥ ४ ॥

## पद २४९ वें.

सखया! रामा! गुणग्रामा! सत्वर येईं ।
सुकुमारा राजसा क्षेम देईं ॥ ध्रुवपद. ॥
रात्रंदिवस झुरतसे मन माझें ।
कधिं पाहिन मी दृष्टिनें रूप तुझें ॥ सखया० ॥ १ ॥
पाप माझें कैसें हें फळास आलें ।
पाहतां पाहतां निजरूपीं लावविलें ॥ सखया० ॥ २ ॥
कोटी भानू चंद्राग्नी लोपुनि जाती ।
स्वयंप्रकाश का वर्णू तुझी दीप्ती ॥ सखया० ॥ ३ ॥
नरहरिकृपें देखिलें तुझिया पायां ।
गोविंदाची चुकवीं [2]अविद्यामाया ॥ सखया० ॥ ४ ॥

## पद २५० वें.

कां रुसलासि दयाळा । मजवरि रामा! ॥ ध्रुवपद. ॥
भक्तकामकल्पद्रुम ब्रिद विलसे पायीं ।
दीनवत्सल कीर्ति हे भुवनीं ती ही ।
गर्जति शास्त्रपुराणें देति [3]ग्वाही ।
मजविषयीं काय दयाही उरली नाहीं ॥ कां रुस० ॥ १ ॥

---

१. सुखानें. २. अज्ञानरूपी माया. ३. साक्ष.

जें म्यां दुष्कृत[1] केलें इहपरजन्माचें ।
ठाउक तुजला आहे, वदुं काय वाचे ।
पुण्यावीण घडेना दर्शन प्रभुचें ।
हें फळ कळलें मजला दुर्दैवाचें ॥ कां रुस० ॥ २ ॥
ऐसा पतित असें मी, मजला त्राता ।
अन्य नसे मज कोणी जानकिकांता! ।
येइं समर्था सदया मनविश्रांता! ।
पाहें ब्रिदाकडे आपुल्या, तूं हृदयस्था ।
दिन गोविंदा न करीं पायांपरता ॥ कां रुस० ॥ ३ ॥

## पद २५१ वें.

श्रीरामा! नको विसरूं रे! नको विसरूं । तूं माय मी लेंकरूं ॥ ध्रुवपद. ॥
अज्ञानांधकुपीं मी पडलों । कोठवरी तरि धीर धरूं ॥ श्रीरामा० ॥ १ ॥
जननीविण बाळक परदेशी । नको मजला दूर करूं ॥ श्रीरामा० ॥ २ ॥
तुजवांचुनि मज त्राता[2] न दिसे । कवणाला मी स्मरूं ॥ श्रीरामा० ॥ ३ ॥
गोविंदप्रभु नरहरिराया! । तूं सुखकल्पतरू ॥ श्रीरामा० ॥ ४ ॥

## पद २५२ वें.

श्रीरामा राजिवनेत्रा कोमलगात्रा! ।
धांवें नगजापतिमित्रा[3]! ॥ ध्रुवपद. ॥
बुडतों भवगांगप्रवाहीं[4] विषय निर पाहीं । न दिसे मज तारू कांहीं ।
कामादिक दुस्तर जलचर दंशति देहीं । येथें उपाय दुसरा नाहीं ।
तूं कर्णधार[5] गुरुराया! सत्वर येईं । प्रभु तारीं मज ये समयीं ॥
चाल ॥ दिनवत्सल ब्रिद पदिं साजे ।
भुवनत्रयिं ऐसें गाजे ।
निरुपम तव स्वरुप विराजे ॥
उठाव ॥ लवकर येउनि मज तारीं सीताकलत्रा[6]! ॥ धांवें० ॥ १ ॥
हा काम सबळ विषधरफणि दंशित शरिरा । विषयाच्या येती लहरा ।
दाटला कंठ मोहाचा झेंडू सैरा । परमार्थ गोड कडु सारा ।

१. पाप. २. तारणारा. ३. नगजा+पति+मित्र=पार्वती+पति+मित्र=राम. ४. संसाररूप पाण्याच्या प्रवाहांत. ५. नावाडी. ६. सीता आहे कलत्र (स्त्री) ज्याची तो (राम).

संसार कटु प्रिय वाटे विषयपसारा । भवझेंडू देतो भंवरा ॥

चाल ॥ मांत्रिका गुरू रघुराया ! ।
निर्विषय करावी काया ।
ये सत्वर धांवुनि सदया ॥

उठाव ॥ विभ्रम कारिं तूं मज मुनिजनमानससूत्रा ! ॥ धांवें० ॥ २ ॥

अभिमानें पडलों [1]आशाकारामाजी । क्रोधादिक दुष्टसमाजीं ।
क्षणक्षणा जाचती मजला हे बहु पाजी । नव्हती परमार्थी राजी ।
श्रीमत्सद्गुरु नरसिंह तुम्ही ऐका जी । लावा मज भक्तिपथा जी ॥

चाल ॥ पाळीव [2]सारमय तूझा ।
नको त्यागूं गुरुमहाराजा ।
गोविंददीनाच्या काजा ॥

उठाव ॥ कनुवाळपणें तारावें मज अजपौत्रा ! ॥ धांवें० ॥ ३ ॥

## पद २५३ वें.

माझ्या जीविंच्या जीवना आत्मारामा ! ।
भेट देईं राजसा मेघश्यामा ! ॥ ध्रुवपद. ॥
मज सोसवेना वियोग तुझा कांहीं ।
दीननाथा भेटि दे [3]लवलाही ॥ माझ्या० ॥ १ ॥
क्षणक्षणा होतसे जीव कष्टी ।
केव्हां पाहिन घवघवीत रूप दृष्टी ? ॥ माझ्या० ॥ २ ॥
तुजवीण दुसरें नसे कांहीं ।
गोविंदासी एकदां दर्शन देईं ॥ माझ्या० ॥ ३ ॥

## पद २५४ वें.

शरयूतिरवासि दयाळे ! । कनुवाळे ! सत्वर येईं ॥ ध्रुवपद. ॥
अहंकार दशानन मेला खळ नेतो [4]अविद्याविपिनीं ।
श्रीरामा ! सत्वर यावें सोडविता नाहीं कोणी ।
सद्भाव सुमित्रात्मज तो दवडीला कठोर वचनीं ॥

चाल ॥ विपरित कर्मांची करणी ।

---

१. आशारूपी बंदीखान्यांत. २. कुत्रा, श्वान. ३. लौकर. ४. अज्ञानरूपी अरण्यांत.

दुर्मति मज आली घडोनी ।
दुर्गति होईल निदानीं ॥ शरयू० ॥ १ ॥
श्रीरामा पद्मजजनका पद्माक्षारमणा धांवें ।
पद्मजतनया श्रमहरणा मज पतितालागुनि पावें ।
पडलों दुष्टाच्या हातीं आतां म्यां काय करावें? ॥
चाल ॥ कवणाप्रति शरण रिघावें? ।
कवणाचे पाय धरावे? ।
विष खावोनियां मरावें ॥ शरयू० ॥ २ ॥
गुरुनाथ नरोत्तमराया[1], ब्रह्मांडनिवासा! रामा! ।
आनंदरूपा त्वां यावें योगीजनमनविश्रामा![2] ।
गोविंद दीनाप्रति त्राता न दिसे रे! आत्मारामा! ॥
चाल ॥ पुरवावें मदंतरकामा ।
यावें रे! चित्सुखधामा ।
निर्गुणरूप दाखवीं आत्मा ॥ शरयू० ॥ ३ ॥

## पद २५५ वें.

येई बा! रघुराया! सीताकांता! । पद दावीं समर्था! ॥ ध्रुवपद. ॥
रामा! तुजवांचुनि मी परदेशी । पडलों भवपाशीं[3] ।
माता सांभाळी बाळकासी । तद्वत् तूं मजसी ।
न करीं अव्हेर सख्या! गुणवंता! । पद० ॥ १ ॥
कैसें जन्मान्तर आडवें पडलें । विषयीं मन बुडलें ।
कामादिक शरिरीं येउनि भिडले । बहु दुष्कृत घडलें ।
आतां कोणी न दिसे मज त्राता । पद० ॥ २ ॥
येणें जाणें तुज लागुनि नाहीं । तूं सर्वाठायीं ।
आहे व्यापक, हें कळलें कांहीं । जरि का मम देहीं ।
अझुनि लपलासी? प्रगटें आतां । पद० ॥ ३ ॥
पहिलें दीनाला दावुनि आशा । मग कां जी! निराशा ।
करणें हें योग्य नव्हे जगदीशा । पद्माक्षिविलासा ।
दासा गोविंदा तारिं अनाथा । पद० ॥ ४ ॥

---

१. नरश्रेष्ठांच्या राया! २. योगीजनांच्या मनाला आनंद देणाऱ्या! ३. संसारबंधनांत.

### पद २५६ वें.

रामा! घनश्याम राजिवनेत्रा! । मदनारिमित्रा! ।
साकेताधिपते! कोमलगात्रा! । दशरथनृपपुत्रा! ॥ ध्रुवपद. ॥
नाहीं सुकृत[1] मज घडलें कांहीं । दुष्कृत या देहीं ।
जडलें, आतां कोण गति करुं कांहीं । बुडलों भवडोहीं ॥ रामा० ॥१॥
कैशी नवविधा[2] तूझी भक्ति । कसि आहे विरक्ति ।
अंगीं जडली अविद्यात्मक शक्ति । हे माया भ्रांति ॥ रामा० ॥ २ ॥
ऐशा अधमाला कोण त्राता । हे जानकिकांता! ।
आतां गोविंदा तारीं समर्था । प्रभु दीनानाथा. ॥ रामा० ॥ ३ ॥

### पद २५७ वें.

काय मी सांगूं देवा! माझे जिविंचें गुज ।
पतितपावना रे! आतां राखीं माझी लाज ॥ ध्रुवपद. ॥
जन्मतां गर्भवासीं क्लेश झाले जे भारी ।
नेणवे मजलागीं, तुज ठाउके हरि ॥ काय मी० ॥ १ ॥
दु:संगसंगतीनें चित्त व्याकुळ माझें ।
अपराध थोर केले सांभाळावे महाराजें. ॥ काय मी० ॥ २ ॥
संसारीं सुख नाहीं, सुख तुझेचि पायीं ।
सप्रेम भक्ति देईं, मायबहिणी रामाबाई! ॥ काय मी० ॥ ३ ॥
अपराध करीं क्षमा, गुरु नरहरिराया! ।
देईं बा! क्षेमं[3] मातें, गोविंदाच्या प्राणसखया! ॥ काय मी० ॥ ४ ॥

### पद २५८ वें.

येईं बा! रघुराया! राजिवनेत्रा । नगजापतिमित्रा[4]! ।
रामा सुकुमारा कोमलगात्रा । पद्माक्षिकलत्रा! ॥ ध्रुवपद. ॥
येईं म्हणतां मज लज्जा वाटे । बहु दुष्कृत खोटें ।
पतितोद्धारण ब्रिदें पायीं मोठें । त्रिभुवनिं बोभाटे ॥
तारीं तूं मजलागुनि अजपौत्रा । नगजा० ॥ १ ॥
नाहीं तुम्ची सेवा मज घडली । विषयीं मति जडली ।

१. पुण्य. २. पृ० ३८ टी० ३ पहा. ३. आलिंगन, भेट. ४. शंकराच्या मित्रा! ५. लौकिक.

कांता कांचन हे मनिं आवडली । मति त्यांतचि बुडली ।
झाली निर्फळ देहाचि कीं यात्रा । नगजा० ॥ २ ॥
ऐशा पतिताला कोण त्राता । प्रभु जानकिकांता ! ।
दाव्या नरसिंहा कृपा करीं आतां । दे क्षेम समर्था ।
तारीं गोविंददीना गुणपात्रा[१] । नगजा० ॥ ३ ॥

## पद २५९ वें.

कधीं येशील सीतारमणा ! । दीनावरि करुनि करुणा ॥ ध्रुवपद. ॥
ब्रह्मांडनिवासा रामा । योगीजनमनविश्रामा ! ॥ कधीं० ॥ १ ॥
तूं भक्तकाजकैवारी । मज अधमालागुनि तारीं ॥ कधीं० ॥ २ ॥
गजनक्र तुवां धरिलें । मजला कां अव्हेरिलें ॥ कधीं० ॥ ३ ॥
गोविंद अधमाला तारीं । हें संकट नाहीं भारी ॥ कधीं० ॥ ४ ॥

## पद २६० वें.

शरयूतिरवासी देवा ! । कोठें गुंतला प्राणविसांवा ॥ ध्रुवपद. ॥
क्षणलवपल युगसम जातें वियोग कदापि न साहे ।
चांडाळे विघड बहु केला गति कोण करूं मी माये ।
आयुष्य बहुत विधीनें दिधलें प्राण न जाये ॥
चाल ॥ दु:खार्णवि बुडली काय[२] ।
जिव माझा व्याकुळ होय ।
हिंसकगृहिं पडली गाय ॥ शरयू० ॥ १ ॥
आहा रे ! विधात्या नष्टा कां लिहिलें माझ्या भाळीं ।
जन्माभर काय कसें हें तें नकळे मज ये काळीं ।
दुर्बुद्धि कसी उद्भवली इच्छिली मृगकांचोळी[३] ॥
चाल ॥ चुकले शरणागत पाळी ।
दासीचें[४] मन सांभाळीं ।
शरीराची झाली होळी ॥ शरयू० ॥ २ ॥
साधू लक्ष्मण मजजवळी रक्षणार्थ देवर[५] होता ।

---

१. गुणांच्या पात्रा (भांड्या!) २. काया, देह. ३. सुवर्णमृगाचा कथाभाग सर्वांस माहीत आहेत. ४. सीतेचें. ५. दीर, नवऱ्याचा भाऊ.

विपरीत गति कर्माची म्यां छळिलें सद्गुणवंता ।
तोही मज त्यागुनि गेला कांतारीं जेथें भ्राता ॥
ाल ॥ तो दोष बैसला माथां ।
हा दुर्जन कोठें होता? ।
नकळे मज याची वार्ता ॥ शरयू० ॥ ३ ॥
मार्गी श्रम मज बहु होतां कुरवाळी अमृतहस्तें ।
कनुवाळू बहु दासाचा श्रमहारी निश्चळ चित्तें ।
गोविंदवरद नरसिंहा! तूं निजपद दाखविं मातें ॥
ाल ॥ करुणाब्धि मज अधमातें ।
बा! करीं भवाब्धीपरतें ।
सद्भावें नमिन पदातें ॥ शरयू० ॥ ४ ॥

**पद २६१ वें.**

दाशरथे! रामा! । करुणाब्धे! ॥ ध्रुवपद. ॥
मज पतिताला तारक न दिसे । तुजविण गुणग्रामा[1]! ॥ करुणाब्धे० ॥ १ ॥
शरणागताऽव्हेर न करिसी । दे चित्सुखधामा ॥ करुणाब्धे० ॥ २ ॥
अधमोद्धारण हें ब्रिद पायीं । सांभाळीं रामा! ॥ करुणाब्धे० ॥ ३ ॥
गोविंद प्रभु नरहरिराया! । योगीविश्रामा! ॥ करुणाब्धे० ॥ ४ ॥

**पद २६२ वें.**

भक्तवत्सला दयाब्धि! तारिं तूं मला ।
[2]भानुवंशभूषणा सुगात्रकोमला! ॥ ध्रुवपद ॥
साकेतानिवास आस माझि पूरवीं ।
नासुनि अज्ञान ज्ञानि वृत्ति फीरवीं ।
तूं त्रिभुवनधीश चिदाकाशिंचा रवी ।
निर्गुण निर्द्वंद्वरुपा भ्रांति नूरवीं ॥ भक्त० ॥ १ ॥
होउनी जळांत मीन शंख मारिला[3] ।
मंदराद्रि धरुनि पृष्ठिं सिंधु तारिला ।
क्रोडरूप धरुनि हिरण्याक्ष चीरिला ।
प्रबळ हिरण्यकश्यपूता नखें विदारिला ॥ भक्त० ॥ २ ॥

---

१. सद्गुणसमूहा (रामा). २. सूर्यवंशभूषणा. ३. विष्णूच्या अनेक अवतारांस उद्देशून रा-
ास प्रार्थना कवीनें केली आहे.

होउनि वामन बळि पाताळीं घातला ।
सहस्त्रार्जुन प्रबळ क्षात्र मदें मातला ।
परशायुध घेउनि यमलोक दाविला ।
तो तूं रघुवंशीं रघुनाथ जन्मला. ॥ भक्त० ॥ ३ ॥
चंडधनुर्दंडधारका रघूत्तमा! ।
दंडधर प्रचंड भय निवारिं उत्तमा ।
खंडुनि दशमुंड मुक्तिदा अनुत्तमा ।
स्थापुनियां धर्म रक्षिसी द्विजोत्तमा ॥ भक्त० ॥ ४ ॥
मान वचन दीन मी गुमान दुर करीं ।
सच्चिद्रुप दाखवी दीनानाथ लौकरीं ।
जालों मी अनन्यशरण तूज नरहरी ।
आस पुरवी दास गोविंदास करिं धरीं ॥ भक्त० ॥ ५ ॥

## पद २६३ वें.

रामचंद्र प्रभो! रामचंद्र प्रभो! रामचंद्र प्रभो! रामचंद्र प्रभो! ॥ध्रुवपद.॥
दशमुखदर्पविनाशा । सीतामानसहंसा ॥ राम० ॥ १ ॥
गोतमसतिउद्धरणा । भार्गवरणमदहरणा ॥ राम० ॥ २ ॥
शरयूतीरविहारा । स्वस्त्रीसुखदातारा ॥ राम० ॥ ३ ॥
ब्रह्मानंदसमुद्रा । रामा प्रतापरुद्रा ॥ राम० ॥ ४ ॥
सद्गुरु नरशार्दूला । गोविंदवरद दयाळा ॥ राम० ॥ ५ ॥

## पद २६४ वें.

मजवरि कृपा करीं देवराया! । भक्ती शुद्ध वराया. ॥ ध्रुवपद. ॥
काय वृथा भूभार जन्मलों । द्विजयोनिंत[1] रघुराया! ॥ मज० ॥ १ ॥
तुज अधमोद्धारण मुनि म्हणती । हें ब्रिद प्रभुच्या पाया ॥ मज० ॥ २ ॥
कलिमाजी नामामृत सार हें । हा भवसिंधु तराया ॥ मज० ॥ ३ ॥
दीन गोविंद शरण तुज आलों । शाश्वत[2] पद उमगाया ॥ मज० ॥ ४ ॥

## पद २६५ वें.

तार समर्था देईं अनुज्ञा रामा! राजिवनयना! ।
गुणसमुद्रा सखया पन्नगशयना! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. ब्राह्मणयोनींत. [हा कवि ब्राह्मण होता.] २. मुक्ति.

तूं सर्वज्ञ समर्थ स्थित्यंतरसाक्षी ।
नित्य निरंतर ध्यातो तुज विरुपाक्षी[1] ।
योगी निरंतर लाविति दृष्टि अलक्षी ।
तो तूं सगुणस्वरूपा नतजनपक्षी ॥ तार० ॥ १ ॥
तूं बुद्धीचा चाळक तूं सर्वहि कर्ता ।
अखिलोद्भव पाळुन तूं जगसंहर्ता ।
देह असे जड बापा तूं चालविता ।
नाहीं स्वतंत्र मी रामा तुझी सत्ता ॥ तार० ॥ २ ॥
मी सर्वस्वी पतित शरण तुज आलों ।
तार किंवा ने निरया[2] दिन बहु झालों ।
षड्रिपु जाचिती मातें म्हणउनि भ्यालों ।
म्हणे गोविंद तुझें रूप पाहुनि धालों[3] ॥ तार० ॥ ३ ॥

## पद २६६ वें.

ब्रह्मांडविलासा रामा! । सुखधामा योगिविलासा! ॥ ध्रुवपद. ॥
विश्वांतरसाक्षी तुजला साष्टांग नमन हें माझें ।
निःसंगा निर्विकारा, साकार स्वरूप तूझें ।
चैतन्या आत्मारामा, अवतरलासी सुरकाजे ।
चाल॥ तुजला न नराकृति साजे ।
चैतन्य स्वरूप विराजे ।
योगीजन ध्याती असे जे ॥ ब्रह्मांड० ॥ १ ॥
त्रिभुवनकंटक दशमुख हा विधी वरदे उन्मद झाला ।
सुरपद हरिलें दुष्टानें, दिन केला विष्टपमेळा[4] ।
रजनीचरमय क्षिति झाली पिडिलें नृप साधुजनाला ॥
चाल॥ ब्रह्मा तुज शरण रिघाला ।
घेउनि देवाच्या पाळाला ।
प्रार्थियेलें तुज कृपाळा ॥ ब्रह्मांड० ॥ २ ॥
ऐकुनियां करुणा त्याची दशरथगृहीं अवतरलासी ।
मारुनि घट क्षात्रप्रतापें सुख दिधलें त्रैलोक्यासी ।
गोविंद शरण तुज आला दासाचा अभिमानी होसी ॥

---

१. शंकर. २. निरय=नरक, रौरव. ३. संतुष्ट झालों. ४. भुवनसमूह.

चाल ॥ रामा तूं अखिलविलासी ।
देशिकराया! सुखविलासी ।
दावी चैतन्यरूपासी ॥ ब्रह्मांड० ॥ ३ ॥

### पद २६७ वें.

श्रीरामा कृपासमुद्रा दाशरथे! मां पाहे । ममांतरिं राहें ॥ ध्रुवपद. ॥
आधिभूतिआध्यात्मिकदैविक । दुःख शमवि करुं काये ॥ ममांतरिं० ॥ १ ॥
कामादिक षड्रिपु अतिदुस्तर । जाचती क्लेश न साहे ॥ ममांतरिं० ॥ २ ॥
तूंचि सर्व गण गोत आप्त सख। तूंचि जनक मज माये ॥ ममांतरिं० ॥ ३ ॥
गोविंदप्रभु नाथ नरोत्तम । निरयगती तुज, त्राहे ॥ ममांतरिं० ॥ ४ ॥

### पद २६८ वें.

रामा! कामारिहृदयनिवासा! । मुनिमानसहंसा! ॥ ध्रुवपद. ॥
नामामृत सेवुनि वाल्मिक तरला । भ्रम त्याचा हरिला ।
श्यामांगा प्रेम तुझाचि धरिला, । शुद्ध भाव वरिला ।
नक्रें छळितां तो दुर्जन करिला । त्यासह उद्धरिला. ॥ रामा० ॥ १ ॥
शुका पढवितां वेश्या तरली । गणिका उद्धरली ।
शबरी पदपद्मीं जाली भ्रमरी । शाश्वतपदिं शिरली. ॥ रामा० ॥ २ ॥
मातें पतितातें न करी परता । श्रीजानकिकांता! ।
मातें तुजवीण नसे बा! त्राता । चुकवीं भवव्यथा. ॥ रामा० ॥ ३ ॥
नाहीं पुण्याची किंचित् जोडी । बाहत्तर खोडी ।
परि मज लागलि तव नामीं गोडी । पुरवावी अवडी ॥ रामा० ॥ ४ ॥
पतितोद्धारण ब्रिद प्रभुच्या पायीं । निगमादिक गाही ।
तारीं मजला तु सख्या! लवलाहीं । गोविंदा पाहीं ॥ रामा० ॥ ५ ॥

### पद २६९ वें.

भज श्रीराम नरोत्तम माझा, कां चढला ऐश्वर्यमदा? ।
पूर्व पुण्य जव पदरीं बापा तव म्हणती दादा दादा. ॥ ध्रुवपद. ॥
पहिले कोण दिवस तुज होता तोचि समज आपुले चित्तीं ।
जगरूपीं जगदीशकृपेचें फळ चढलें तुझिया हातीं ॥ भज श्री० ॥ १ ॥

---

१. गुरुराया! २. रक्षण कर. ३. शंकरहृदयनिवासा. ४. गजेंद्राला. ५. पोपटाला. ६. साक्ष. ७. नरश्रेष्ठ.

हें ऐश्वर्य हरीचे देणें, प्राप्त सख्या! सुकृत जोडी।
राज्याश्रित जन मानुनि देती बैसाया गाडी घोडी॥ भज श्री० ॥ २ ॥
पाहतां पाहतां कैक दरिद्री झाले हे निवले डोळे।
हयशाळा घरिं वाजे चौघडा त्याला भाकरही न मिळे॥ भज श्री० ॥ ३ ॥
दरिद्र अथवा दौलत हें फळ दैवानें बापा मिळती।
न करावा अपमान दिनाचा ऐका दासाची विनती॥ भज श्री० ॥ ४ ॥
गोविंद प्रभुनाथ नरोत्तम कैवारी निजदासाचा।
पतीतपावन श्रीदें[१] रुळे पदीं, काय करिल न कळे साचा॥ भज श्री० ॥ ५ ॥

## पद २७० वें.

श्रीराम जय राम जय जय राम॥ ध्रुवपद.॥
श्रीमद्राम रविकुळभूषण। भक्तसखा कनवाळू राम॥ श्रीराम० ॥ १ ॥
रीतोत्पलदलवत[२] कोमल। कौसल्यागर्भोद्भव राम॥ श्रीराम० ॥ २ ॥
मखरक्षणार्थ नृपाला प्रार्थुनि। कौशिकमुनि मखरक्षक राम॥ श्रीराम० ॥ ३ ॥
जनस्थानाचा मार्ग वरोधुनि। ताटिका पद घे निष्काम॥ श्रीराम० ॥ ४ ॥
एक शरें विस कोटि निशाचर। मारुनि मुनिला[३] दे आराम॥ श्रीराम० ॥५॥
रामा गोतममुनिची शीला। निजपदरज केली विश्राम॥ श्रीराम० ॥ ६ ॥
महद्दुत्सह[४] मानूनि अहल्या। पूजुनि जपत प्रभुचें नाम॥ श्रीराम० ॥ ७ ॥
जनकसुता गृहिं घेउनि येतां। पथिं जितियेला भार्गवराम॥ श्रीराम० ॥ ८ ॥
एकपत्निव्रत श्रेष्ठ जयाचें। योगिजनाचा मनविश्राम॥ श्रीराम० ॥ ९ ॥
जनकाज्ञाप्रतिपालक राघव। दंडकवनवासी श्रीराम॥ श्रीराम० ॥ १० ॥
यमरूपी शोधूनि दशानन। वधुनि तया दे निजसुखधाम॥ श्रीराम० ॥११॥
राक्षसपति वैश्रवण बिभीषण। स्थापुनि दिधला कांचनग्राम[५]॥ श्रीराम० ॥१२॥
मनुजाकृति गोविंदा साचा। दैशिक नरहरि आत्माराम॥ श्रीराम० ॥ १३ ॥

## पद २७१ वें.

राम हो! माझ्या प्राणाचाहि प्राण। पाहतां वाटे मना समाधान॥ ध्रुवपद.॥
सगुणरूप गुणाचा सागर। वेष्टियला कासे दिव्य पीतांबर।
कुंडलें कर्णीं, कंठीं मुक्तहार। गाजतो पायीं ब्रीदाचा तोडर॥ राम० ॥ १ ॥

---

१. लौकिक. २. तांबड्या कमळाच्या पांकळीप्रमाणें. ३. विश्वामित्राला. ४. मोठा आनंद.
५. सोन्याची नगरी, लंकापुरी.

अंगुलीमध्यें मुद्रिकेचि शोभा । मुगुटीं दिव्य भास्कराची प्रभा ।
श्यामता ज्याची लाजवीत नभा । तो राम सिंदुरगडावरी ऊभा ॥ राम०॥२॥
देखतां ज्याचें प्रसन्नवदन । ते ठायीं माझें गुंतलेंसे मन ।
नासिक सरळ, आकर्ण नयन । पाहतां मूर्ति जाहलें समाधान ॥ राम० ॥ ३ ॥
वामांगीं उभी जनकाची बाळा । गौरांगी असे लावण्याची कळा ।
नरहरिरायें दाखविले डोळा । गोविंद रामा पाहुनी आनंदला ॥ राम० ॥ ४ ॥

## पद २७२ वें.

राम हो! माझ्या जिविंचे विश्राम । त्याविण होतो देहाला बहुत श्रम॥ध्रुवपद.॥
पाहिली बहु संसाराची सोये । सुख ना, दुःख त्यामाजी होताहे ।
वासना स्थिर कदापी न राहे । रामाविना सर्वेही अपाये ॥ राम० ॥ १ ॥
जाहला देह संतप्त त्रितापें[१] । जाचती जन्मजन्मांतरींचीं पापें ।
नासुचे कांहीं तेणें देह कांपे । दिसतें नाम श्रीरामाचें सोपें ॥ राम० ॥ २ ॥
पातकी जन नामानें तरले । वाल्मिकादिक दोषी उद्धरले ।
विश्वासें तें म्यां अंतरीं धरिले । गोविंदाचें मन त्यामाजी रंगलें ॥ राम०॥ ३ ॥

## पद २७३ वें.

धन्य दिवस आज सोनियाचा जाला ।
मुळावीण[२] श्रीराम घरा आला हो! ॥ ध्रुवपद. ॥
पूर्वपुण्य संपूर्ण फळा आलें ।
कूटस्थातें सगुण देखीयेले ॥ धन्य दिवस० ॥ १ ॥
बहू जन्माचें सार्थक मजला जालें ।
सर्वेहि पर्वें दर्शन आजी घडलें ॥ धन्य दिवस० ॥ २ ॥
गोविंदाची वासना पुरविली ।
नृसिंहानें मजवरी कृपा केली. ॥ धन्य दिवस० ॥ ३ ॥

## पद २७४ वें.

देखिला नयनीं अयोध्येचा राणा । वंदे निगमाशास्त्रपुराणा ॥ ध्रुवपद. ॥
नीलमणी जसा तशी अंगकांती । चर्चिली सर्वांगीं विभुती ।
मकरकुंडलें कुंडलें रत्नदीप्ती । कटी वल्कलवसनें असती ।

---

१. आधिभौतिक, आध्यात्मिक आणि दैविक असे तीन प्रकारचे ताप. २. बोलावण्य शिवाय, आमंत्रणावांचून.

सरळ भुजदंड गजशुंडापरि दिसती । मुद्रिकारत्न तयेंभवती ।
वदन साजिरें साजिरें वर्णवेना ॥ वंदे निगमाशास्त्रपुराणा ॥ १ ॥
मस्तकीं जटा जटाजूट साजे । पदीं ब्रिद भुवनत्रयीं गाजे ।
जया वंदिती वंदिती सर्व राजे । धर्म रक्षायाच्या व्याजें ।
फिरतसे वनीं वनिं त्यागुनि राज्य । दुष्ट निशिचर वधुं या काजें ।
मनुजरूप धरिलें धरिलें जगिं जाणा । वंदे निगमाशास्त्रपुराणा ॥ २ ॥
पदरजस्पर्शें तरली पद्मजबाळा । भार्गवाचा रणमद हरिला ।
जटायू पक्षी पक्षी उद्धरिला । पवनात्मज हृदयीं धरिला ।
सद्गुरु माझा त्या प्रभु नरकेसरिला । भावें गोविंद शरण जाला ।
हृदयिं दृढ धरिलें धरिलें तच्चरणा । वंदे निगमाशास्त्रपुराणा ॥ ३ ॥

## पद २७५ वें.

काय सांगूं वात्सल्य श्रीरामाचें । शंकर हृदयीं जपतो नाम ज्याचें ॥ध्रुवपद.॥
अयोध्येहोनी मी येतां हनूमंता । प्राणनाथ लक्ष्मण संगें भ्राता ।
मार्गीं चालतां मी राहें पंथ क्रमिता । उभा राहोनि आलंगी मातें भर्ता ॥का०॥१॥
घेवोनियां विश्राम वृक्षातळीं । अमृतहस्तें मम मुखातें कुरवाळी ।
'पंथ क्रमितां श्रमलीस जनकबाळी !' । संबोखीतां श्रम जातसे ते काळीं॥का०॥२॥
जेव्हां आली साकेतीं जनकतनया । नाहीं गेली पुनरपी जनकालया ।
क्षणही वियोग नव्हता त्याच्या पायां । या दुष्टानें बिघड केला वांया॥का०॥३॥
रामवियोगाच्या दुःखें दीन जाली । सरिता सागर पर्वत आड पडली ।
दैवें तुझी मारुती ! भेट जाली । श्रीरामातें दाखवीं नेत्रकमळीं ॥ का० ॥ ४ ॥
रामप्राप्तीस्तव सद्गुरु तूंची माझा । कृपा करूनी दाखवीं रामराजा ।
अनन्य भावें मी शरण महाराजा । ऐसी बोले गोविंदप्रभुची भाजा ॥का०॥५॥

## पद २७६ वें.

केला राम धनी । अघटित ज्याचीं करणी ॥ ध्रुवपद. ॥
सच्चित्सुख आनंद परात्पर । व्यापक जो त्रिभुवनीं ॥ केला० ॥ १ ॥
विश्वपटीं तंतूरुप नटला । ध्यानीं रमती सुरमुनी ॥ केला० ॥ २ ॥
प्रल्हादास्तव स्तंभीं प्रगटला । गोविंदवरदायनी ॥ केला० ॥ ३ ॥

---

१. शोभे. २. ब्रह्मदेवकन्या (अहिल्या). ३. नृसिंहाला. ४. म्हणतां, बोलतां. ५. हें पद कदाचित् गोविंदकवींच्या भार्येनें केलें असावें, असें वाटतें. ६. गोविंदाला वर देणारा.

## पद २७७ वें.

भक्तकामकल्पद्रुम जो श्रीराम अयोध्यापती ।
तोचि उभा घनश्याम छबेला सिंदुरगडपर्वतीं. ॥ ध्रुवपद. ॥
पीतवसन परिधान कोर तगटी त्यावर भर्जरी ।
खव्याचें कटिसूत्र जडित नवरत्न नितंबावरी ।
पांघरला दिव्यांबर सुंदर सुवर्णपट केशरी[1] ।
युग्म करीं पवच्या जडिताच्या, नवरत्नें त्यावरी ॥
चाल ॥ नवमेघ तनू साजिरी ।
मुकुट शोभिला शिरीं ।
श्रुतिकुंडलमकराकृति ॥
उठाव ॥ भृगुअंगिरातनय येउनि उभय कर्णीं लागती ।
सत्वर वध या दशाननाला घेई यश रघुपती ॥ भक्त० ॥ १ ॥
मुक्तहार कंदरांत पदकीं रत्न फार जडियले ।
मध्यहिरा दैदिप्य तेज राउळामाजि[2] पडियेलें ।
हास्यवदन अनुग्रहार्थ सुचवी परि मौन धरियलें ।
कमलदला सरळा शुभनासिक पाहुनी शुक लाजले ॥
चाल ॥ वामांगीं जानकी सती ।
जे तप्त सुवर्णाकृति ।
दशवदनाची सद्गती ॥
उठाव ॥ असे उभय दंपती[3] विलोकुनि मनीं लागली प्रीती ॥ तोचि० ॥ २ ॥
प्रल्हादास्तव स्तंभीं प्रगटला स्वामी गुरु नरहरी ।
त्यानें मज दीनास लक्षुनी कृपा अनुग्रह करी ।
मी बाळक अज्ञान वरदकर कृपें ठेविला शिरीं ।
दाखविला श्रीराम चराचर जीव जया अंतरीं ॥
चाल ॥ तें सुख वर्णितां नये ।
वैखरी[4] उगिच स्थिर राहे ।
गोविंदवृत्ति डुलताहे ॥
उठाव ॥ जो दर्शनमात्रें सकळांला देतो उत्तम गती ॥ तोचि० ॥ ३ ॥

---

१. केशरी रंगाचें वस्त्र. २. देवालयांत. ३. उभयतां जोडा. ४. वाणी.

### पद २७८ वें.

आठविला श्रीराम । हृदयीं. ॥ ध्रुवपद. ॥
भक्तकामकल्पद्रुम राघव । तारक ज्याचें नाम ॥ हृदयीं० ॥ १ ॥
गेरळानळें[1] जाचतसे देहीं । शिव झाला आराम ॥ हृदयीं० ॥ २ ॥
राजीवाक्ष सगुण सुखदायक । पूर्ण करी मनकाम ॥ हृदयीं० ॥ ३ ॥
गोविंदप्रभु तारक मोठा । स्मरतां ज्याचें नाम ॥ हृदयीं० ॥ ४ ॥

### पद २७९ वें.

राघव आणा रे! आणा रे! राघव आणा रे! ॥ ध्रुवपद. ॥
त्याविण पळ युगसम मज जाती । कर्मगनीनें पडली भ्रांती ।
ज्यातें योगी पाहती अनुदिनीं ध्याना रे! ॥ राघव० ॥ १ ॥
भक्तजनाचा प्राणविसावा । सीताहृत्पंजरींचा[2] रांवा ।
शरणागतास रक्षी देउनि माना रे! ॥ राघव० ॥ २ ॥
श्रीमत्सद्गुरुनाथ नरोत्तम । निजदासा निजपद दे उत्तम ।
गोविंदाला दावा त्याचे चरणां रे! ॥ राघव० ॥ ३ ॥

### पद २८० वें.

कधिं पाहिन मी श्रीराम, योगिविश्राम, भक्तसुखधाम, नेत्रकमळीं ।
शिर ठेविन तत्पदकमळीं । सद्भावें. ॥ ध्रुवपद. ॥
अरुणापरि पद आरक्त, ध्वजांकुशयुक्त, ध्यातसे भक्त, सदा हृदयीं ।
पाहतां अप्रतिम सुख देही । सद्भावें ॥
पतितोद्धारण ब्रिद त्यांत, सकळ भुवनांत, गर्जतो सत्य, निगम ग्वाही ।
ऐकिलें सर्वाठायीं । सद्भावें ॥
कैलासीं आदिनाथ, शिवेसमवेत, नित्य हृदिं ध्यात, शिव पाही ।
विश्रांति दुजि नाहीं । सद्भावें ॥
गंगायमुना विधिसुता, रमति निजहिता, जनकदुहिता, नमितां पायीं ।
आनंदयुक्त वैदेही । सद्भावें ॥
नख सोज्वळ चंद्राकार, बहुत अरुवार[3], पाहतां मनोवृत्ति रमली ।
शिर ठेविन तत्पदकमळीं । सद्भावें ॥ कधिं० ॥ १ ॥

---

१. विषानें. २. सीतेच्या हृदयरूपी पिंजऱ्यांतील पोपट. ३. कोमल.

सिंहासम कटि सान, गोजिरें ठाण, पीतांबर वेष्टित जरितगटी ।
शार्ङ्ग धरिलें मुष्टीं । सद्भावें ॥
नाभीपंकज लहान, सुखाचें स्थान, त्यांत उद्भवला परमेष्ठी[1] ।
ज्यानें निर्मिली सर्व सृष्टि । सद्भावें ॥
वक्षस्थळ अति विस्तीर्ण, वत्सलांछन, श्रीनिकेतन, पाहतां दृष्टीं ।
आनंद ने[2] माये पोटीं । सद्भावें ॥
गजशुंडापरि भुजदंड, असे प्रचंड, कुंडलें शोभति कर्णपुटीं ।
आरक्त विडा अधरोष्टीं । सद्भावें ॥
नासिकतिलपुष्पापरी, तिलककेशरी, विडा रसभरीत वदनकमळीं ।
शिर ठेविन तत्पदकमळीं । सद्भावें ॥ कधिं० ॥ २ ॥
मस्तकीं नवरत्नें जडित, शोभतो मुगुट, प्रभेचा थाट, अलयीं विलसे ।
उत्तरी[3] भर्जरिचि दिसे । सद्भावें ॥
वामांगी सीताशक्ति, तरुण आकृति, अलंकाराची दीप्ती असे ।
जगजननी बहु शोभतसे । सद्भावें ॥
गौरांगीं शार्दुलकटी, वरी पीतघटी, चुबुक हनुवटी, तयेवरता निळबिंदु असे ।
कुंकुम निढळीं विलसे । सद्भावें ॥
सुमंतादिक प्रधान, सभासद मान्य, पुढें हनुमान, उभा असे ।
लागलें स्वरूपाचें पिसें । सद्भावें ॥
नरहरि सद्गुरुमहाराज, पुरवीं मनकाज, दास गोविंद प्रतिपाळीं ।
शिर ठेविन तत्पदकमळीं । सद्भावें ॥ कधिं० ॥ ३ ॥

### पद २८१ वें.

जानकीसहित राम दृष्टि देखिला ।
भाग्योदय फार मनामाजि लेखिला ॥ ध्रुवपद. ॥
दिव्य वसन केशरी पितें[4] वेष्टिला कटीं ।
हास्यवदन सुंदर अति रम्य हनुवटी ।
कमलायत नेत्र धनुःप्राय भ्रूकुटी[5] ।
रत्नजडित मुगुट मस्तकीं विराजला ॥ जानकी० ॥ १ ॥
मुक्तकंदरांत पदकजडित शोभलें ।
तसेंच रत्नजडित स्फूर्ति कर्णि कुंडलें ।

१. ब्रह्मदेव. २. न मावे, न राहे. ३. आंगवस्त्र, उपरणें. ४. पीतांबर. ५. भोंवयी.

आणिक भुजबंद कटक तेज आगळें[1] ।
भरजरीचा जामेवार[2] अंगीं घातला ॥ जानकी० ॥ २ ॥
वामभागिं ती विदेहराजकूमरी ।
नेसली पटकूळ वसन पल्लवी जरी ।
आभरणें मंडित तनु सान गोजरी ।
एकावळि मुक्तचंद्रहार शोभला ॥ जानकी० ॥ ३ ॥
सिंदुर नग मस्तकिं रघुनाथ राउळीं ।
सन्मुख सौमित्र वीर तो अतुर्बळी[3] ।
शक्रारि प्रबळ शत्रु मिळविला धुळी ।
सुंदर निलरत्नकांति तो विलोकिला ॥ जानकी० ॥ ४ ॥
लक्ष्मणाग्रभागिं आंजनेय तो उभा ।
सिंदुरचर्चित बालसूर्यसमप्रभा ।
दशमुख बलदर्प हरुनि विटंबिली सभा ।
दास गोविंदास महल्लाभ लाभला ॥ जानकी० ॥ ५ ॥

## पद २८२ वें.

तुजवर आम्ही फिदा बोल एकदा पद्मलोचने ! ।
मुनिमानसप्रियकरे ! नंदकुमरे ! शुभलक्षणे ! ॥ ध्रुवपद. ॥
पीतवसन परिधान कोरतगटी त्यावर भरजरी ।
खंल्याचें कटिसूत्र जडित नवरत्न नितंबावरी ।
बहु नादर वय तरूण ठेंगणी असे गोजरी ।
कटिकर निट बाहुले उभी खुब नटून भिवरातिरीं ॥
चाल ॥ राजसे ! ग ! कैकांचें मन मोहिलें ।
राजसे ! ग ! हे प्राण पदीं वाहिले ।
राजसे ! ग ! पंढरिस तुला पाहिलें ॥
टीप ॥ तुझें ध्यान लागलें विकळ जिव होत असे साजणे । मुनि० ॥ १ ॥
नरम गाल रेशमी, चुबुक हनुवटी कपोल[4] चांगली ।
कुंदरदन सुख सधन दिठी नासाग्रीं असी पाहिली ।
दिव्य मकरकुंडलें हिऱ्यांची गंडी प्रभा फांकली ।
रसभर मुखीं तांबूल अधर सुरंग रंगली विडी ॥

---

१. मोठें, फार. २. आंगरखा. ३. पराक्रमी. ४. गाल.

चाल ॥ राजसे! ग! सुवास गुंतला असे ।
राजसे! ग! तनुतेज फांकलें दिसे ।
राजसे! ग! तुज पाहतां मन हें पिसें[1] ॥
टीप ॥ नसे भाग्य, मज असे प्रीति माझी, तुजला गवसनें । मुनि० ॥ २ ॥
ध्रुव नारद प्रऱ्हाद व्यास शुकसनकादिक ते भले ।
कर जोडुनि प्रार्थितां तुला पाहुनि स्तब्ध राहिले ।
निज सुकृत धन पदरीं घेउनि उगे उभे राहिले ।
तें टाकुनि तुज कसे प्रियकरे! गवळी इष्ट वाटले? ॥
चाल ॥ राजसे! ग! उच्छिष्ट मुखीं घालसी ।
राजसे! ग! तत्संगें ताक तूं पिसी ।
राजसे! ग! धांवून गुरें वोळेसी[2] ॥
टीप ॥ कडकडोनि झोंबसी गळां पडसी घेसी चुंबनें । मुनि० ॥ ३ ॥
अंगिकार करिसी न करीसी हेंचि दुःख वाटतें ।
वियोगाग्नि जाळितो तुझा, मम प्रेम हृदयिं दाटतें ।
आलिंगावें तुला वदन चुंबाया मन ऊठतें ।
प्रेमाश्रु हे स्त्रवती लोचनीं वदनिं येति वाटतें ॥
चाल ॥ राजसे! ग! मी दीन प्रार्थितों तुला ।
राजसे! ग! गोविंद म्हणावें आपुला ।
राजसे! ग! निजपदिं गति देईं मला ॥
टीप ॥ जसा छंद लागला रूपाचा तोचि सखे! पुरवणें । मुनि० ॥ ४ ॥

### पद २८३ वें.

दंडधर प्रचंड भय अखंडवारका ।
तांडवाधिशा नतास सौख्यकारका ॥ ध्रुवपद ॥
[3]पंचवदन मदनदहन, त्रिपुरमर्दना ।
नंदीवाहन मुनिजनमनवर्धना ।
[4]नागभूषण वसनरहित प्रभु जनार्दना ।
काशिपुरनिवास जगदंतकारका ॥ दंड० ॥ १ ॥

---

१. वेडें. २. वळविशी, संभाळशी. ३. पांच वदनें ज्याला आहेत तो (शंकर). पंचवदनांचीं नांवें:—सद्योजात, तत्पुरुष, अघोर, वामदेव व ईश. ४. गजचर्म हें ज्याचें भूषण आहे तो (शंकर).

दिव्य पतितपावन हें ब्रिद पदीं असे ।
पूर्वि पतित तारियले म्हणुनि मज पिसें ।
लागलें परंतु यत्न न चले करुं कसें ।
तूं कृपा करूनि मज दिनास तारका ॥ दंड० ॥ २ ॥
जोडुनि कर नमन तूज हे दयानिधी ! ।
पळ पळ आयुष्य गत, नसेचि आवधी ।
षड्रिपु अति कष्ट दुष्ट देति मंदधी ।
दीन गोविंददास यासि पाळका ॥ दंड० ॥ ३ ॥

## पद २८४ वें.

गौरीरमणा ! तूं सत्वर येंई । आलिंगन देंई ।
मजला भवत्राता, तुजविण कांहीं । भुवनत्रयिं नाहीं ।
मदनदहन, भवशयन नमन तुज, नंदिवहन, निजजनसुखदायी ॥ ध्रुवपद. ॥
नाहीं सुकृत बा ! माझ्या पदरीं । मज दीना तारीं ।
जन्मांतर आडवें पडलें भारी । हें कोण निवारी ।
त्रिपुरदमन सुखसदन वदन मज दाखवि, मी बुडतों भवडोहीं ॥गौरी०॥१॥
हीनयाती शंबर तवनामीं । नेला निजधामीं ।
ठेवीं विरूपाक्षा ! मज पदपद्मीं । या अंतर्यामीं ।
प्रगटुनि[१] भवतम दुर करीं हरि श्रम, चिद्रुप सुख गोविंदा दावीं ॥गौरी० ॥२॥

## पद २८५ वें.

'नरहरि' हा चतुराक्षरिमंत्रसुधारस घे रसने ! ।
भवक्षयरोग निवारी श्रीगुरु निश्चय पदिं वरणें ॥ ध्रुवपद. ॥
नवल गुरु तो देशिक माझा उपदेशिल ज्ञान ।
नयनकटाक्षें पाहतां सहज चुके हें अज्ञान ।
न करी अन्य विलक्षण वार्ता करि नामस्मरन ।
उठाव॥न भव तुला पुनरपि हे रसने ! होइल कल्यान ॥ नरहरि० ॥ १ ॥
रस संपूर्ण परीक्षा करिसी तिक्ताम्लक्षार ।
रसी क्षर लावुनियां वदसि जन हे लाघव फार ।

---

१. संसाररूप अंधकार.

रव रव बांधित या अपवादें हे का होय बर ।
उठाव ॥ रक्षिल हा परमात्मा अंतर बाह्य रमावर ॥ नरहरि० ॥ २ ॥
हर्ष मनीं भजनाचा तेणें तुष्टे रमानाह ।
हंस परात्पर योगी रमती अर्पुनियां देह ।
हरिनामामृत रस घे सत्वर जाई सहदेह ।
उठाव ॥ हरिहरकीर्तनिं गाई ध्याई तत्पदिं सुखलाह ॥ नरहरि० ॥ ३ ॥
रिता ठाव नसे ज्यावांचुनि व्याप्त चराचरीं ।
रिद्धि सिद्धि जयाचे द्वारीं असती कामारी ।
रीस वानर नाथ नरोत्तम प्रभु दशवदनारी ।
उठाव ॥ रिणानुबंध तुझा मज गोविंदाला पदरीं धरीं[१] ॥ नरहरि० ॥ ४ ॥

## पद २८६ वें.

हो! सुमंत! राम हा श्रीमंत दाखवा ।
अंतसमय प्राप्त सीताकांत भेटवा ॥ ध्रुवपद. ॥
मित्रकुळिं[२] सुमित्र राम चित्र सम विचित्र गात्र विश्वामित्र सदृश योगि भोगिती अरूपरूप हृदयमंदिरीं ।
जानकीसहित राम दावि मंदिरीं ।
ज्यास्तव तप करिती मुनि गिरिकंदरीं[३] ॥ हो सुमंत० ॥ १ ॥
चंड द्विरदशुंड[४] तसे मंडित भुजदंड सरळ कुंडल युत गंडप्रभा चंड धनुर्दंड तुणिर पृष्ठि बांधिला ।
चीर वसन त्यागुनि कटि वल्क नेसला ।
अजिनांबर टाकुनि वनिं राम बैसला ॥ हो सुमंत० ॥ २ ॥
श्रीमद्रणरंगधीर अयोध्यापुरीचा अमीर सौमित्रादिक वजीर वेष्टित मुनिवृंद राघवा ।
प्रेमभरित पाहीन मी केव्हां रमाधवा? ।
तत्पदिं सुख घ्या तुम्ही गोविंद मानवा ॥ हो सुमंत० ॥ ३ ॥

## पद २८७ वें.

माझ्या सुकुमारा रामा कोणी तरि दावा. ॥ ध्रुवपद. ॥
सुमंत निर्दय बाई! कसी दया नाहीं ।
बुद्धिमंत मोठा त्यातें म्हणूं आतां कांहीं? ।

---

१. पृष्ठ १६ टीप ३ पहा. २. सूर्यवंशीं. ३. गुहेंत. ४. हत्तीच्या सोंडेप्रमाणें.

माझ्या प्रारब्धाची गती विपरीत पाहीं ।
कसी हटीं पडली याच्या भरताचि आई ॥
टीप ॥ कसा सवतीनें माये! साधियला दावा ॥ माझ्या० ॥ १ ॥
मही[1]! तुझा तो जावाई तुज निरवीला ।
आपुलिये कन्येसाठीं स्नेह मिरवीला ।
एका सत्यासाठीं राजा इनें हारवीला ।
असा कोणी नाहीं राजाराम फिरवीला ॥
टीप ॥ दूर वनीं गेला माझा जिवींचा विसावा ॥ माझ्या० ॥ २ ॥
भागिरथी! सांग त्या वरुणासी कांहीं ।
तृषाकाळीं क्षणक्षणा पाणी ठायीं ठायीं ।
तुझा पिता राम त्यातें असोनियां देई ।
नदी वापि सरोवरें तेथें प्रगट होई ॥
टीप ॥ रामावरी प्रेम माये बहुत असावा ॥ माझ्या० ॥ ३ ॥
रामाचेनि वंश तुझा धन्य दिनकरा[2]! ।
तेव्हां उष्ण किरणा स्वामी तुम्ही शांत करा ।
माझीं बाळें वनीं भ्रमती सांभाळी लेंकुरा ।
मेघा आड होई, होई सुख रघुवीरा ॥
टीप ॥ सदैव राम माझा जवळी असावा ॥ माझ्या० ॥ ४ ॥
लोकप्राणसंरक्षका मंद मंद येई ।
श्रम वनीं चालण्याचे निवारुनि घेई ।
माझ्या पाडसाला[3] वनीं सर्व सुख देई ।
योगिदीक्षा ज्याची ऐसा श्रीराम विदेही ॥
टीप ॥ लवकरी येई असा निरोप वदावा ॥ माझ्या० ॥ ५ ॥
अलक्षा निःसंगा योगिमनविश्रामा! ।
आत्मारामा सत्ता तुझी चैतन्यनिष्कामा ।
हृदयस्था सद्गुरुराया! स्वामी नरोत्तमा! ।
चिदाकाश सूर्या आर्या दावि रूप आम्हा ॥
टीप ॥ गोविंदाचा जीव चिदानंदीं मिळवावा ॥ माझ्या० ॥ ६ ॥

---

१. हे पृथ्वि! २. सूर्या! ३. बाळाला.

## पद २८८ वें.

ऐक राया, भज रघुराजपायां ॥ ध्रुवपद. ॥

ऐक तूं दैशीकपद, सुखदैक स्मरि, येकैक नमुनी, तैं कृपा तुज, गै करुनि अढैक सुख देईल रघुविर ॥ ऐक० ॥ १ ॥

नाम गा निजधाम पाहुनि, कामनाविरहीत हो मग, श्यामतनु विश्राम देइल, कामना पुरवील रघुविर ॥ ऐक० ॥ २ ॥

रावणासह पुत्ररविसुत, भूवनाप्रति धाडुनी तुज, सज्जना रक्षूनि सुरमुनि, भ्रमणा चुकवील रघुविर ॥ ऐक० ॥ ३ ॥

साकेतपुरनाथ जानकिकांत तव अपघात चुकविल, नाथ नरहरि आस करि गोविंदपदयुग ध्यात रघुविर ॥ ऐक० ॥ ४ ॥

## पद २८९ वें.

राज्यमदें शाश्वत मानसि आपणा पृथ्वीपाळा! ।
नकळत नेइल काळ म्हणुनि हरिभजनीं धरि चाळा[1] ॥ ध्रुवपद. ॥
मिथ्या वैभव दोदिवसांचें स्वप्नापरि पाहे ।
मागें मेले आतां पुढती मार्ग असा आहे ।
धन संपति हें समजुनि पाहतां दुपारी छाया हे ।
करि श्रीहरिपदिं आस होउनी दास धरी पाये ।
दीननाथ तूं कृपा करुनियां तोडिं जन्ममरणा ॥ नकळत० ॥ १ ॥
छप्पन युगें लंकापतिचें राज्य भ्रष्ट जालें ।
चवदा कल्पें आयुष्य मार्कंडेयाचें सरलें ।
लोमेशादी भृशुंडि आनंत आयुर्ष्यी गेले ।
काळचक्र भ्रम नेत कोण बापा! तेथ उरले? ।
मोकळवृत्ति करि सर्वत्रा एके स्थळीं गोळा ॥ नकळत० ॥ २ ॥
अहंपणाचा गौरव तो रौरव[2] दाविल नयनीं ।
न चलतसे बळ तेथें नये सांगातें हो कोणी ।
सत्सुकृत हे क्रियापराची दया हृदयभुवनीं ।
सत्वमतीनें हरिपदप्राप्ति निज अंतःकरणीं ।
शरणागत नरहरि या लागुनि झाला गोविंदपदकमळा ॥ नकळत० ॥ ३ ॥

---

१. प्रीति. २. नरक.

## पद २९० वें.

सुमंत्रा ! कोठें आहे तो प्राणसखा श्रीराम । मनविश्राम ॥ ध्रुवपद. ॥
ज्याचें ध्यान करी गिरिजाधव । निशिदिनिं स्मरतो नाम ॥ सुमंत्रा० ॥ १ ॥
त्याविण पळ युगसम मज जातें । मम मानससुखधाम ॥ सुमंत्रा० ॥ २ ॥
गोविंदाचा देशिक[1] नरहरी । पुरवि मनांतिल काम[2] ॥ सुमंत्रा० ॥ ३ ॥

## पद २९१ वें.

तो हा देखिला किं काय । राजा दाशरथी बाई ! ॥ ध्रुवपद. ॥
माथा जटेंचा मुकुट । अंगीं विभूतिचें कुट ।
हातीं कटारीची[3] मूठ । दीठ लागलि ग आई ॥ तो हा० ॥ १ ॥
हातीं शोभे धनुष्य बाण । आंगीं मेघा ऐसा वान ।
तनु गोजिरिसी सान । ध्यान लावी शिवपायीं ॥ तो हा० ॥ २ ॥
मुख साजिरें सुहास्य । कटी अजिनाची कास ।
भोंवता ऋषीचा समास[4] । मोठा बाका शीपाई ॥ तो हा० ॥ ३ ॥
राम चित्ताचा उद्धार । केला अहिल्येचा उद्धार ।
गोविंदाचा जो सरदार । बिद्र गाजतसे पायीं ॥ तो हा० ॥ ४ ॥

## पद २९२ वें.

काय सांगूं सौंदर्य मानवीचें । लोक झाले तटस्थ त्रिभुवनींचे ॥ ध्रुवपद. ॥
नील अलकावरि[5] मोतियाचि जाळी । कटी वेष्टियली चंद्रकळा काळी ।
हेम तगटाचा घोळ तळी घोळी । मनी कपटी बाहेर दिसे भोळी ॥ १ ॥
रत्नजडिताचा चुडा उभय हातीं । दशांगूळी मुद्रिका वोप देती ।
पथीं चाले उन्मत्त ज्या साहातीं । शब्द वदतां चमकती रत्न दंती ॥ २ ॥
घोळपायींसिं ज्या नमनी वाजे । गुजरिया त्यावरी बहु विराजे ।
माज पाहूनी भृंग मनिं लाजे । कटीसूत्र खव्याचें कटी साजे ॥ ३ ॥
मुक्त पांच सरी पदकिं रत्नखाणी । आभरणाची तिज कांहीं नसे वाणी[6] ।
कोकिळेपरि मंजूळ जिची वाणी । गीत गातां तल्लीन यक्षश्रेणी[7] ॥ ४ ॥
असो आतां सौंदर्य भाग्यशाली । मंदहास्य लक्ष्मणा समीप आली ।
रामदासातें विषापरी झाली । गोविंद प्रभु अनुजास शरण आली ॥ ५ ॥

---

१. गुरु. २. इच्छा. ३. तरवारेची. ४. समुदाय. ५. केशांवर. ६. कमतरता. ७. यक्ष-समूह.

## पद २९३ वें.

केवढें भाग्य असे पार्थाचें । वर्णवेना वाचे ॥ ध्रुवपद. ॥

इंद्रादिक नमिती सुरपद ज्याचें । जें ध्यान शिंवाचें ।
सनकादिक स्तविती मंजुळवाचे । नृप मुक्तिपुरीचे ।
उठाव ॥ तो हरिहर करि धरुनि [1]रहंवरि योजित बारा दोर हयाचे ॥ केव० ॥ १ ॥

ज्याच्या नीलांगीं [2]पांसु उधळी । बहु शोभा आली ।
आंगीं चंदन उटि कस्तुरि भाळीं । तांबुल मुखकमळीं ।
उठाव ॥ कमलनयन अहिशयन जनार्दन स्यंदन हय चालवितो ज्याचे ॥ केव० ॥ २ ॥

मुकुटीं बहु रत्नें झळ झळ करिती । श्रुतिकुंडल स्फुरती ।
शोभे चतुरायुध ते चहुं हातीं । सुर वर नर स्तविती ।
गुरुनरशार्दुल वरप्रसादें गोविंद हरिगुण गाउनि नाचे ॥ केव० ॥ ३ ॥

## पद २९४ वें.

कोण वनाप्रति आला । पाहा शोध करा ॥ ध्रुवपद. ॥

सुंदर वय तरुणाकृति तो नर नीलतनू ।
चंड पराक्रमी दिसतो, जैसा भानू ।
वीर चक्रांत धुरंधर करि दिव्य धनू ।
श्रेष्ठ वात गमे मज, हरिहर नेणो ॥ कोण० ॥ १ ॥

ब्रह्मादिक सुर वंदिति ज्याच्या पदपद्मा ।
सेवि निरंतर ज्याचे स्वकरें पद्मा ।
दर्शनमात्रें झालें सुख हृत्पद्मा ।
कां प्रिय त्याचें घडतें आम्हां अधमा ॥ कोण० ॥ २ ॥

भस्मचर्चित दिव्यतनू शिरिं स्निग्धजटा ।
फेटा फार विराजे तनु मेघघटा ।
वीरकंकण पेट्याचें सज बाहुवटा ।
दिव्य करांगुली मुद्रा पाहा त्या [3]सुभटा ॥ कोण० ॥ ३ ॥

वाटे पाय धरावे जी नरहरिराया ! ।
कोण असे [4]वीरशार्दूल मज समजुनियां ।
त्याचें दास्य घडावें नमितों पायां ।
गोविंदासी तत्पदीं द्या लोटुनियां ॥ कोण० ॥ ४ ॥

---

१. रथावर. २. धूळ. ३. सुंदर. ४. नरश्रेष्ठ.

## पद २९५ वें.

कधीं मी पाहिन सखि पद्माक्षी । जानकी हरिणाक्षी ।
जे कां द्विजदैवत अग्निसाक्षी । वरली युगपक्षी ।
हरिविधि सुरकिन्नर नर वर्णिति सगुण चरित्र जिचें विरुपाक्षी ।। ध्रुवपद. ।।
जीच्या स्वरुपासीं न दिसे तुलना । त्रिभुवनिंच्या ललना ।
मदनाला लाजविते शशिवदना । ऐसी गजगमना ।
उठाव ।। विरहविकळ गळ गळ जळ स्त्रवतें श्रीरामाचिया उभयाक्षी ।। कधीं० ।। १ ।।
अरुणापरि अति मृदु पदतळ साजे । पदभूषण गाजे ।
जीचे स्निग्धांगसुवर्ण तनू जे । अलंकृत बहु साजे ।
उठाव ।।सैंवरीं महिवरनयन भ्रमरवत सीतावदन सरोजा लक्षी ।। कधीं० ।। २ ।।
सीताविरहें व्याकुळ रघुराणा । जो वंद्य पुराणा ।
नाना नाटक करि लीला जाणा । तारक त्रिभुवना ।
उठाव ।। चरण धरुनि करि नमन सदोदित गोविंदवरद जगत्रयसाक्षी ।।कधीं० ।। ३ ।।

## पद २९६ वें.

देईं राया रघुराजजाया ।। ध्रुवपद. ।।

मान वचन प्रमाण, त्यज अनुमान, न धरि गुमान हृदयीं, सान न मनिं निदान तुजप्रति प्राण घेइल जाण रघुविर ।। देईं० ।। १ ।।

काळ अजसुत[१] बाळ त्रिभुवनपाळ, परम दयाळ जगदिश भाळलोचन माळ जपत, तमाळनीळ महाराजा ।। देईं० ।। २ ।।

पाय नमुनी आय दुर करी, काय सह समुदाय वाचवि तोषुनी जगमाय अर्पुनि गाय गीतीं गोविंद प्रार्थित ।। देईं० ।। ३ ।।

## पद २९७ वें.

कपींद्रा ! सांग मला तूं कोठें वसे श्रीराम । मनविश्राम ।। ध्रुवपद. ।।
भक्ताची मनोवांछित सिद्धि । पावन ज्याचें नाम ।। कपींद्रा० ।। १ ।।
त्याविण क्षण पल युगसम जातें । दाखवि निज सुखधाम ।।कपींद्रा० ।।२।।
सत्तेनें जो त्रिभुवन चालवी । हृदयीं आत्माराम ।। कपींद्रा० । ३ ।।
गोविंद प्रभु स्वामी नरोत्तम । पुरवी सर्वही काम ।। कपींद्रा० ।। ४ ।।

---

१. दशरथपुत्र.

## पद २९८ वें.

कपींद्रा! सुखी आहे कीं जानकीमनविश्राम । सर्वसुखधाम ॥ ध्रुवपद. ॥
विश्वोद्भव पालन संहारण । हेंचि असे निज काम ॥ कपींद्रा० ॥ १ ॥
मी निर्गुण सगुणत्वा आणुनि । दाखविला गुणग्राम ॥ कपींद्रा० ॥ २ ॥
शिशु गोविंद संगें घेउनि । पाजी सुखामृतनाम ॥ कपींद्रा० ॥ ३ ॥

## पद २९९ वें.

[1]राया जनकाची वैदेही । श्रीरामा देई ॥ ध्रुवपद. ॥
त्यागी रजनीचर कानन दहिता । पद्माक्ष दुहिता ।
स्वहिता सांभाळी किल्बिष रहिता । ऐके नृपनाथा ।
समजा, त्रैलोक्यपतिची [2]वनिता । जगतीची माता ।
न धरी अभिलाष हिचा तूं हृदयीं ॥ श्रीरामा० ॥ १ ॥
इच्छामात्रें जगडंबर रचिलें । विधि हरिहर पुतळे ।
करुनी इच्छेनें इनें नाचविले । प्रेमें खेळविले ।
होते जे निर्गुण सगुणा आले । ईच्या गुणलीले ।
ते हे मुक्त करी लागुनि पायीं ॥ श्रीरामा० ॥ २ ॥
राया! तूं त्यागीं सर्व दुराशा । न धरावी आशा ।
केली वंशाची काय निराशा । पावति हे नाशा ।
चुकवीं तूं काळकरीच्या पाशा । आर्जवि जगदीशा ।
गोविंद प्रभु हृदयांतरीं ध्याई ॥ श्रीरामा० ॥ ३ ॥

## पद ३०० वें.

सोडिना जसे तसेचि हो सुखें पुढें ।
यश अपयश पूर्व संचितें घडे ॥ ध्रुवपद. ॥
[3]पूर्वी परमळे असुर तूं स्वबोधिला ।
होउनि तूं जळीं मीन दैत्य मारिला ।
मंदराद्रि पृष्ठि धरुनि सिंधु तारिला ।
क्रोड रूप धरुनि हिरण्याक्ष मर्दिला ॥ सोडिना० ॥ १ ॥
वधिला दिग्गजेंद्र धरुनि सिंह आकृति ।
त्याचा प्रपौत्र बळी प्रबळ ये क्षिती ।

---

१. रावणास मंदोदरीनें केलेला बोध. २. स्त्री. ३. येथें विष्णूनें घेतलेल्या अवतारांवर कटाक्ष आहे.

स्थापुनि पाताळीं त्यास लावुनि प्रिती ।
सहस्रार्जुन बघुनि त्यास दिधली सद्गती ॥ सोडिना० ॥ २ ॥
आतां मी जिंकीन तुज स्वबळें राघवा ।
घेइन स्वस्थान तुझें रे सीताधवा! ।
न करी अनुमान पाहु हस्तलाघवा ।
गोविंद प्रभु करी [1]संधान तेधवां ॥ सोडिना० ॥ ३ ॥

## पद ३०१ लें.

देईं अनुज्ञा रामा! । सौमित्रातें ॥ ध्रुवपद. ॥
पूर्वी विधिवरदान असे त्या दुष्टातें ।
द्वादश वर्षें निरशन करी कष्टातें ।
इंद्रियनिग्रह निद्रा नसे श्रेष्ठातें ।
तोचि वधिल स्वबळें मतिभ्रष्टातें ॥ देईं० ॥ १ ॥
इह लक्षणीं अलंकृत लक्ष्मण प्रबळ असे ।
यापरि वीर हो! रामा सृष्टींत नसे ।
त्यासि निरोपी आतां लागलें पिसें ।
तुम्हा साध्य नसे तो स्वामी परिसें ॥ देईं० ॥ २ ॥
होतां फार विलंब पुढें असाध्य तुम्हां ।
हें मद्वाक्य परिसें मनविश्रामा ।
या दुष्टातें शमवी आत्मारामा ।
गोविंद दास विनवी तुज मेघश्यामा ॥ देईं० ॥ ३ ॥

## पद ३०२ रें.

कपींद्रा! दावि मला तूं दाशरथी रघुनाथ । जानकीकांत ॥ ध्रुवपद. ॥
रविकुलभूषण [2]जितखरदूषण । निजजनमनविश्रांत ॥ जानकी० ॥ १ ॥
दशरथनंदन दशमुखकंदन । मुनिहृत्कमळीं ध्यात ॥ जानकी० ॥ २ ॥
दीन गोविंद तुम्हां विनवितो । जोडुनि दोन्ही हात ॥ जानकी० ॥ ३ ॥

## पद ३०३ रें.

धन्य दिवस आज साधुसंग लाधला ।
सर्वहि शुभयोग पर्वकाळ साधला ॥ ध्रुवपद. ॥

---

१. शरसंधान. २. खरदूषणादि राक्षसांस ज्याणें जिंकलें असा.

दुर्लभ सत्संग आम्हां विषयीं मानवा ।
स्त्रीकलत्रपुत्रमित्र आवडे जिवा ।
अर्थसंग्रहार्थ[1] नित्य सोस हा नवा ।
हाचि या मनास वेध प्रबळ लागला ॥ धन्य० ॥ १ ॥
मान्यता असावि या जनांत चांगली ।
विषयवासनेंत वृत्ति फार रंगली ।
आवडे मना तसीच बुद्धि वागली ।
पाहिला विचार म्यां कधीं न आपुला ॥ धन्य० ॥ २ ॥
तार या भवाब्धिपार करि नरोत्तमा ।
भूमिभार झालों वृथा पाव उत्तमा ।
मम दुष्कृत[2] फार रक्षिणार तूं आम्हां ।
दास गोविंदास पदविलास दाविला ॥ धन्य० ॥ ३ ॥

## पद ३०४ थें.

धन्य दिवस सत्संग लाभ जाला । होता संशय तो मनांतील गेला ॥ध्रुवपद.॥
दैवयोगें होतांचि संतभेटी । समाधान वाटलें माझे पोटीं ।
त्रिविधताप पळाले उठाउठी । कृपा करुनि दिधली दिव्य दृष्टि ॥ धन्य० ॥ १ ॥
कामधेनु कल्पवृक्ष चिंतामणी । उदारताही याची कोण मानी ।
संतकृपें दाविती चित्सुखखाणी । नेउनी बसविती साम्राज्यपदाच्या स्थानीं॥ध०॥२॥
देशिकरायें[3] अघटित ऐसें केलें । माझें मज स्वरूप दाखवीलें ।
आनंदाच्या सदनांत बैसवीलें । गोविंदाचें मनोरथ पुरवीलें ॥ धन्य० ॥ ३ ॥

## पद ३०५ वें.

धन्य दिवस आज साधुसंग लाधला ।
अर्धोदय पर्वकाळ सर्व साधला ॥ ध्रुवपद. ॥
फीरता वनांत कल्पवृक्ष देखिला ।
खाणतां महींत द्रव्यकुंभ लेखिला ।
लिहितां पिशाच लिप्त गुरु विलोकिला ।
तत्पदिं सप्रेमयुक्त भाळ ठेविला ॥ धन्य० ॥ १ ॥
बुडतां जळांत थोर नाव लाधली ।

---

१. द्रव्यसंग्रहार्थ. २. पापें. ३. गुरुरायानें.

तापतां उन्हांत आम्रवृक्षसाउली ।

...................................................... ।

तद्वत सत्संग गुरु माय पाहिली ॥ धन्य० ॥ २ ॥

ठेवितांचि वरद हस्त मस्तकावरी ।

पाहिलें नरोत्तमास हृदयमंदिरीं ।

ना दिसेचि द्वैत[1] एकला चराचरी ।

भरला आनंद गोविंदाचे अंतरीं ॥ धन्य० ॥ ३ ॥

## पद ३०६ वें.

देईं राया । सुत क्षितिजा वराया ॥ ध्रुवपद. ॥

राम मनविश्राम सुरमुनिकामद प्रभुश्याम, घन तनु नाम जपत् अ-राम, हर सुखधाम, पद निष्काम रघुविर ॥ देईं० ॥ १ ॥

मित्रकुलपति पुत्र द्वय तव चित्र सम सुविचित्र; कर्तबगात्र कमनिय[2] नेत्र अंबुजपत्र, नतचिन्मात्र, रघुविर ॥ देईं० ॥ २ ॥

कष्टला ऋषिश्रेष्ठ कौशिक तिष्ठला उत्तिष्ठ रघुपति, स्पष्ट देईं कनिष्ठ सुतसह नष्ट दुष्टवधार्थ रघुविर ॥ देईं० ॥ ३ ॥

त्रास न करुनि भास, त्यजि विश्वास, धरि धर कास, गुरुचि त्यासि निरखुनि आस पुरवी दास नमि गोविंद रघुविर ॥ देईं० ॥ ४ ॥

## पद ३०७ वें.

रघुपति ऐक रामा! । मुनिविश्रामधामा! ॥ ध्रुवपद. ॥

क्रूर निशिचर घूर, धर रणशूर, वनि मखचूर, करिती झूर, ती म-हिसूर, निज मनिं पूरवी संकल्प रघुपति ॥ रघुपति० ॥ १ ॥

वार भय अनिवार करि शरमार रिपुगणहार, मुनिजन तार, भवभय वार करिपद फार, मृदु अनिवार रघुपति ॥ रघुपति० ॥ २ ॥

बंद हर सुर वृंद, सुखि कर द्वंद रहित आनंद, भोगवि मंद, मति गोविंद, तव गुण छंद, गात प्रबंध रघुपति ॥ रघुपति० ॥ ३ ॥

## पद ३०८ वें.

किति तरि तुज शिकवुं जाणरे मना सुजाणा ॥ ध्रुवपद. ॥

श्रीगुरुपदकमल धरुनि । भक्तियोग सांग करुनि ।

वैराग्यस्थिति वरोनि । सावध गुरुचरणा ॥ किति० ॥ १ ॥

---

१. द्वैत=ईश्वर व आत्मा यांत भेद न मानणें. २. सुंदर.

सांडुनिया सर्व विषय । रघुविरपादिं करुनि आशय ।
निरसुनि माया संशय । शाश्वतपद[1] वरिना ॥ किति० ॥ २ ॥
जोडुनि कर नमन तूज । पाहुनि घे हीत गूज ।
गोविंदालागिं उमज । दे नरहरिचरणां ॥ किति० ॥ ३ ॥

### पद ३०९ वें.

रामचंद्रपदसरोज सेविं रे! मना ।
त्याविरहित अन्य नसो चित्तिं कामना ॥ ध्रुवपद. ॥

रघुविरपदकमल विमल । वज्रांकुश चिन्ह सबळ । हळ हळ दुर करुनि सकळ । ध्यायीं हृदयीं वज्रपंजरा ।
कपिध्वज ध्यानीं आणि त्या सीतावरा ।
दुस्तर भवसिंधु पार होईं पामरा ॥ राम० ॥ १ ॥
जो दशमुखदर्पहरण । निशिदिनिं करी हेंचि स्मरण । अर्चुनि[2] सुख लाहे पाहे गाय गीतीं श्रीनिकेतना ।
घोष करुनि गाइ त्या कपींद्रकेतना ।
दशरथप्रभुतनय दूर करिल यातना ॥ राम० ॥ २ ॥
श्रीमद्गुरु नृसिंह । अरिमदगजदमन सिंह । ........................ । स्मरहरप्रियकर[3] या भुवनसुंदरा ।
निजपदीं स्थापियलें शक्तिकंदरा ।
तत्पद सुख दे गोविंद या नरा ॥ राम० ॥ ३ ॥

### पद ३१० वें.

काय सांगूं सामर्थ्य हनुमंताचें ॥ ध्रुवपद. ॥
मातें अंजनीच्या कुशीं जन्म घेतां ।
क्षुधानळें व्यापिलें रामदूता ।
फळें आणाया लागुनि गेली माता ।
तेव्हां हृदयीं आठविलें श्रीरघुनाथा ॥ काय० ॥ १ ॥
उदयीं बिंब आरक्त दिसे रवी ।
कोमलनेत्रीं तेजाची आभा भावी ।
फळ म्हणोनि उडाला त्यातें सेवी ।

---

१. मोक्ष, मुक्ति. २. पूजून. ३. शंकराला प्रिय (राम).

काय सांगूं अद्भुत बळाची ठेवी ॥ काय० ॥ २ ॥
ग्रहणीं राहू ताडिला सव्य[1] हातें ।
बळ सामर्थ्य दिधलें सीताकांतें ।
.................................... ।
युद्ध केलें शचीच्या प्राणनाथें ॥ काय० ॥ ३ ॥
पक्षपात करुनी सुग्रीवाचा ।
मित्र केला मित्रात्मज राघवाचा ।
रणीं मर्दिला आत्मज मघवाचा[2] ।
राजा केला वाळीच्या वैभवाचा ॥ काय० ॥ ४ ॥
सीताविरहें व्याकुळ रामराणा ।
शुद्धिसाठीं[3] प्रयत्न केले नाना ।
पुढें देखिला तो अंजनीचा तान्हा ।
नेत्र लावुनि राघवा आणी ध्याना ॥ काय० ॥ ५ ॥
आज्ञा होतां मुद्रिका घाली बोटीं ।
गगनमार्गें उडाला ऊर्ध्व दृष्टी ।
सागर लंघोनि उतरला लंकाबेटीं ।
लंका देवी ताडितां झाली कष्टी ॥ काय० ॥ ६ ॥
दिव्यवनीं शिंशुपा वृक्षातळीं ।
आदिमाता देखिली भद्रकाळी ।
सद्भावेंसि वंदिली जनकबाळी ।
तृतीय भाग लंकेची केली होळी ॥ काय० ॥ ७ ॥
जंबुमाळी मारुनि अक्षयातें ।
रात्रिंचर[4] बहु पावले क्षयातें ।
ब्रह्मा पत्र दे कर्तृत्वा साक्षियातें ।
विजयी भेटों आला रामरायातें ॥ काय० ॥ ८ ॥
सह सेनेसि मारुनि दशकंधरा ।
राज्य दिलें तयाच्या सहोदरा[5] ।
अयोध्येसी आणिलें रघुवीरा ।
वांचविले भरतराजेश्वरा ॥ काय० ॥ ९ ॥

---

१. डाव्या हातानें. २. इंद्राचा. ३. शोधासाठीं. ४. राक्षस. ५. बिभीषणास.

राम म्हणे ऐका हनुमंता ।
चिरंजीव हो तव तनु आतां ।
अति संकटीं सांभाळी माझ्या भक्ता ।
गोविंदाचा नरहरी सौख्यदाता ॥ काय० ॥ १० ॥

## पद ३११ वें.

दशमुखदर्पभंजना रामरंजना मरुततनया ॥ ध्रुवपद. ॥
रघुनाथ प्रियकरा हरी, तारि भवपुरी मज कपिराया ।
मुखिं नासिकिं भरलें नीर काढीं सत्वर धरुनि बाह्या ।
आशा सुसरी जलचरी वोढी बळकटें धरुनी पाया ।
न दिसे मज तारु तरी धांव सत्वरी प्राणसखया ॥ दशमुख० ॥ १ ॥
हा काम [१]व्याळ अतिविशाळ डंखित काळ मला वाटे ।
येतसे लहर विषयाची मोहें कंठ असे दाटे ।
न सुचे मज कांहीं यत्न कर्म पूर्वीचें बहु खोटें ।
होतसे विकल बहु गात्र मांत्रिका ये धांवुनि सदया ॥ दशमुख० ॥ १ ॥
श्रीरामभक्त संकटीं घालती मिठी बा तव पायीं ।
पूर्वापरता रक्षिलें बहुत शिक्षिले दुर्जन पाही ।
माझा कां आला वीट देई मज भेट तूं [२]लेवलाही ।
गोविंदास उद्धरीं कृपा करि मज नरहरिराया ॥ दशमुख० ॥ ३ ॥

## पद ३१२ वें.

आलारे आलारे मारुती आलारे ॥ ध्रुवपद. ॥
थर थर थर कांपती धरा धर । गर गर गर नक्षत्रें महिवर ।
पडती, उडती दिग्गज प्रलयो झालारे ॥ मारुती० ॥ १ ॥
देव विमानें सांडुनि पळती । चवदा भुवनें तेजें जळती ।
[३]हत्ती टाकुनि [४]सुरपती पळुनि गेलारे ॥ मारुती० ॥ २ ॥
सागर सीमा सांडूं पाहे । अपर्णा धरी सांबाचे पाये ।
गोविंद भ्रमर कपिपदकमळीं दडला रे ॥ मारुती० ॥ ३ ॥

## पद ३१३ वें.

कैंचा वानर आला न कळे म्यां कैसा तरि गिळिला गे ! ।
ज्याच्या मुक्तिच मजला नाहीं कोण समजला गे ! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. सर्प. २. लौकर. ३. ऐरावत. ४. इंद्र.

तापत्रय संसारा पासुनि मुक्त करिल हें गमतें गे! ।
मी भोळी मज काय कळे हें आतां मानस भ्रमलें गे! ॥ कैंचा०॥१॥
गोविंद म्हणे क्षणभरि तूं धीर धरीं भोग देहाचा सरला गे! ।
श्रीसद्गुरु महाराज नरहरि बाह्यांतरिं तो भरला गे! ॥ कैंचा० ॥ २ ॥

### पद ३१४ वें.

मारुतात्मजा! कपिराया! हो! ॥ ध्रुवपद. ॥
संकटीं तुज आळवितां भावें[1] । येसी धांवुनि सखया ॥ मारु० ॥ १ ॥
तुजविण कोण असे मज त्राता । दाल्या अंजनीतनया! ॥ मारु० ॥ २ ॥
सीताशोक हरुनि निजविक्रमें[2] । भेटविली रघुराया ॥ मारु० ॥ ३ ॥
गोविंदावरी करुणा करुनि । दावी निजपद सखया ॥ मारु० ॥ ४ ॥

### पद ३१५ वें.

मारुतात्मजा कृपाब्धि तारीं मज दीना ।
दुर्धर संकटीं वारीं हारी यातना ॥ ध्रुवपद. ॥
जानकीसंताप हरुनि सौख्य दाविलें ।
दुर्धर रजनीचर त्या स्वकरें मर्दिले[3] ।
सद्भावें करुनि रामचरण सेविले ।
महाप्रसाद लाधला प्रतापवर्धना ॥ मारु० ॥ १ ॥
रामप्राप्ति व्हावयासि तूंचि कारण ।
भवाब्धिमाजि[4] बुडतों मी येईं धांवुन ।
तारु यांत मज नसे प्रभु तुम्हाविण ।
शरणागतवत्सल मां पाहि सज्जना ॥ मारु० ॥ २ ॥
इच्छा परिपूर्ण करीं माझी नरहरी ।
रामीं प्रीति दे विशिष्ट हेंचि अंतरीं ।
याविण मज इच्छा नसे तूं कृपा करी ।
दास गोविंदास या दीनास उद्धरीं ॥ मारु० ॥ ३ ॥

### पद ३१६ वें.

नमुं सज्जन श्रोते । भाविक ॥ ध्रुवपद. ॥
पंडित वैदिक शास्त्रिपुराणिक । मज अनुग्रह कर्ते ॥ भाविक० ॥ १ ॥

---

१. भक्तीनें. २. आपल्या पराक्रमानें. ३. मारिले. ४. संसारसागरांत.

मति स्फुर्ति तुमच्या वचनानें । अनुसुख दाते ॥ भाविक० ॥ २ ॥
गुरु नरहरीनें संतसभेप्रति । निरविलें हातें ॥ भाविक० ॥ ३ ॥
कर माथां ठेवुनियां पदरीं । ध्या गोविंदातें ॥ भाविक० ॥ ४ ॥

पद ३१७ वें.

अहा! दुर्दैवा त्वां हें काय केलें! । श्रीरामरूप मातें दुरावीलें. ॥ ध्रुवपद. ॥
पोगंडदशा भरली माझे अंगीं । नाकळे तेव्हां कांहीं मजलागीं ।
प्रवृत्तिमार्गे वर्तलों या जगीं । विषयानंद हाचि मन भोगी ॥ अहा!० ॥ १ ॥
धनधान्यपुत्रपौत्राची आवडी । लागली मना प्रपंचाची गोडी ।
केली बापा दुःसंगाची जोडी । पडली पायीं प्रपंचाची बेडी ॥ अहा!० ॥२॥
.......................... । ........................ ।
होतें पूर्वीचें[१] सुकृत पदरीं । अनायासें आले सद्गुरु नरहरि ॥अहा!० ॥ ३ ॥

पद ३१८ वें.

श्रीरामचंद्रपदसरोज ध्याइं मानसा ॥ ध्रुवपद. ॥
उदार समर[२]धीर राम । त्यजुनि स्मरविलास धाम ।
पाहुनि उपाधीभ्रम । भुलला कसा ॥ श्रीराम० ॥ १ ॥
असार संसार सार । मानुनि व्यवहार फार ।
करसि जाणुनी विकार । होतो पदरसा ॥ श्रीराम० ॥ २ ॥
तारणार हे पदारविंद । हा भवाब्धिऱ्हद ।
जाणुनि गोविंद लुब्ध । होतो पदरसा ॥ श्रीराम० ॥ ३ ॥

पद ३१९ वें.

सांवळी सुंदर कांती । विटेवें[३]री विठ्ठलमूर्ती ।
योगियांची मनविश्रांती । विठाई माझी ॥ ध्रुवपद. ॥
गोजिरें जयाचें ठाण । अरुणापरि पदतळ समचरण ।
जा[४]न्हवीचें जन्मस्थान । विठाई माझी ॥ १ ॥
कासे दिव्य पितांबर पिवळा । वैजयंती माळ गळां ।
आपाद लंबितसे वनमाळा ॥ विठाई माझी ॥ २ ॥

---

१. पुण्य. २. योद्धा. ३. पदसंग्रह—भाग १ पृ० २१ टीप १ पहा. ४. गंगेची उत्पत्ति विष्णूच्या पायांतून झाली अशी कथा आहे.

सिंहासम कटिभाग साजे । खंब्याचें कटिसूत्र विराजे ।
क्षुद्रघंटिका मंजुळ वाजे । विठाई माझी ॥ ३ ॥
कंठीं मुक्तफळाची[1] माळा । उत्तरी[2] वस्त्र पितांबर धवळा ।
पाहतां दिठीं न पुरे मुखकमळा । विठाई माझी ॥ ४ ॥
वक्षस्थळ अति रुंद जयाचें । नासिक तिळपुष्पापरि त्याचें ।
सुंदर मुखकल्हार[3] हरीचें । विठाई माझी ॥ ५ ॥
रत्नजडित मुगुटाची आभा । अंगीं गंध उटीची शोभा ।
कटिकर नीट विटेवरि ऊभा । विठाई माझी ॥ ६ ॥
आनंदाब्धि सुखाची लहरी । वामांगी भिमकाची कुमरी ।
अर्ध दृष्टि प्रभुची नासाग्रीं । विठाई माझी ॥ ७ ॥
गुरु महाराज नरोत्तम मूर्ती । अंतरगृहीं हृत्कमलावरतीं ।
गोविंदाची सुखविश्रांती । विठाई माझी ॥ ८ ॥

## पद ३२० वें.

विठाबाई माय, माय पंढरीची । बहुत कनुवाळु अंतरींची ॥ ध्रुवपद. ॥
तरुण सांवळी, सांवळी अंगकांती । दोहिं पदतळीं अरुणदीप्ती ।
दृष्टीं पाहतां, पाहतां दिव्यमूर्ती । वेधली विश्वचित्तवृत्ती ।
पितांबर कटीं, कटीं तया भवतीं । वेलि सूवर्ण रत्नदीप्ती ।
दिव्य मुद्रिका, मुद्रिका उभय करिची ॥ बहुत० ॥ १ ॥
जन्मला विधी, विधी नाभिकमळीं । दोंदिल उदर, वरी त्रिवळी ।
कटी कर उभी, उभि भक्ताजवळी । सिंधुतनया हृदयीं धरिली ।
मुक्तमाळिका, माळिका त्यांत पोंवळी । भुजबंदांत रत्नें जडलीं ।
माळ तुळसीच्या, तुळसीच्या मंजुरीची ॥ बहुत० ॥ २ ॥
चुंबुक[4] हनुवटी, हनुवटी दृष्टि नाकीं । दुरुनि रुक्मिणीला अवलोकी ।
वामभागीं हे, भागीं हे सखि भिमकी । हास्यवदनेंदु पाहे तंव कीं ।
हरीच्या रूपा, रूपा कोण लेखी । भक्तभयसागर सोकी[5] ।
मूळ यशोमती, यशोमतिच्या उदरींची ॥ बहुत० ॥ ३ ॥
मुगुट मस्तकीं, मस्तकीं दिव्य शोभा । मकरकुंडलें रत्न आभा ।

---

१. मोत्यांची. २. उत्तरीय वस्त्र, उपरणें. ३. कमल. ४. लहानशी, सुंदर. ५. भक्ताच्या भयरूपी सागराचें शोषण करी, भक्तजनांचीं संकटें दूर करी.

वदन साजिरें,[१] साजिरें कोमल गाभा । पाहतां तया पद्मनाभा ।
केशरी टिळा, टिळा गंध शोभा । विटेवरि गुरु नरहरि ऊभा ।
मूर्ति गोविंद हृत्पद्ममंदिरींची ॥ बहुत० ॥ ४ ॥

**पद ३२१ वें.**

गुणगहना रे! प्रियकरा! सख्या! सुखकरा! रुक्मिणीवरा!
कटसूत्रभूषणा! ।
मम भवश्रमहारका! दीनतारका! पद्मलोचना! ॥ ध्रुवपद. ॥
तव नामविषय हें सार, गोड मज फार, जळो संसार दुःखवेदना ।
किति सोसावा हा भार, काय करणें या दाराधना ॥
सुखकर हे तूझे पाय, हृदयिं मी ध्याय, तोडि भवबंधना ।
भिवरातीरनिवासा, येइं बा! त्वरें कंसमर्दना ॥
चाल ॥ आधींच लाविलें पिसें[२] पुढें भलतिसें करूं इच्छिसी ।
मी कदां सोडिना तुला भक्तवत्सला जि आव्हेरिसी ।
पहिलेंचि प्रीति लाविली आतां कां मजला तूं त्यागिसी? ॥
टीप ॥ सोडिली लाज श्रीपती, देइं मज मती । दुःसंगती न देई मना॥ मम०॥१॥
जनविरुद्ध दिसे मात, आणि ध्यानांत, निंदिती आप्तवर्ग सर्वही ।
परि मी न गणीं कोणास, आस धरलीसे तुझे पायीं ॥
लौकीक सोडिला हरी! धांव लौकरी करीं मज धरीं[३] बुडतों भँवडोहीं ।
दे सत्वर वरदान मान रक्षीं तूं विठाबाई ॥
चाल ॥ साम्राज्यसौख्यवर्धना! गोवर्धनोद्धारणा! हरी! ।
राधामानसरंजना! भवभंजना! येइं लवकरी ।
आरामवाटिका बरी, येइ सत्वरी हृदयमंदिरीं ॥
टीप ॥ तुझें म्हणविल्या आज कायसी लाज।सांग यदुराज हेचि सूचना॥मम०॥२॥
पातक म्यां केलें फार, बुद्धि अविचार पतित साचार जाण श्रीधरा! ।
नाहिं मला आधार, नेइं परपार, भक्तप्रियकरा ॥

१. उत्तम. २. वेड. ३. करीं धरणें=आश्रय देणें, साहाय्य करणें. ४. हा समास चिंतनीय आहे.

नामाचा देईं थार, चुकाव संसार, तार बा! तूंचि सोयरा खरा।
धीर नसे मम मनीं, बैस हृद्भुवनीं सीतावरा! ॥
ाल ॥ गुरुनाथ नृसिंहा हरी, स्वस्थ करिं चित्त भ्रांति बीघडी।
बा! मी बुडतों भवपुरीं, येइं सत्वरी घालिं तूं उडी।
नामाची सांगड घेई, नेइं गोविंदा पैलथडी ॥
ीप ॥ तूं निदानींचा एक पाहिला लेख दाविं श्रीमूख गुरु चिद्घना ॥ मम० ॥३॥

## पद ३२२ वें.

बोल एकदां, एकदां इंदुवदने। क्षेम दे मला दनुजकदने[1]! ॥ ध्रुवपद.॥
सजल घन तसा, तसा रंग तनुचा। नाभिं जन्मला जनक मनुचा।
न चले तुजपुढें, पुढें गर्व अनुचा। मारिला ज्येष्ठ पुत्र दनुचा ॥
चाल ॥ तेचि करकटीं। उभि राहुनि भिवरातटीं।
स्वजनासी लक्षी दिठी। दिठी कंसकदने! ॥ क्षेम० ॥ १ ॥
वेष्टिलें कटीं, कटीं पीतवसन। हृदयीं द्विजपायाचें[2] भुषण।
मकरकुंडलें, कुंडलें युक्त श्रवण। पाहतां तुझें वदननलिन ॥
चाल ॥ काम लाजला। शिवनेत्राग्नींत भाजला।
होवोनि तनय[3] राजला। राजला पद्मनयने! ॥ क्षेम० ॥ २ ॥
तुझ्या स्वरुपाचा, स्वरुपाचा हा चाळा। लागला वृद्धतरुणबाळा।
होउनी पिसें, पिसें आननाला। पाहसि परि न बोलसी त्याला ॥
चाल ॥ बहुत प्रार्थिती। सुर सकळ तुला विनविती।
बोलाया कुंठित मती। मती दर्पहरणे[4] ॥ क्षेम० ॥ ३ ॥
ऐकुनी तुझी, तुझी कीर्ति ऐसी। आम्हि दुर्बळ फणिपुरवासी।
फिरत पातलों, पातलों पंढरीसी। तुला देखिलें सगुणरासी ॥
चाल ॥ बोल एकदां। दे क्षेम, चुकविं आपदा।
निजसूख भोगवी सदा। गोविंद घेतें[5] धरणें ॥ क्षेम० ॥ ४ ॥

---

१. विठोबा! [पदसंग्रह—भाग १ पृष्ठ १७८ टीप १ पहा.] २. भृगुऋषीनें केलेल्या लत्ताप्रहाराचें भूषण. (श्रीवत्सचिन्ह.) ३. कृष्णाच्या पुत्राचें नांव मदन होतें हें प्रसिद्धच आहे. ४. दर्प=गर्व. ५. धरणें घेणें=तगादा करणें, मागणें.

### पद ३२३ वें.

कधिं येसिल पंढरिराया! । भवसिंधू पार कराया. ॥ ध्रुवपद. ॥
भेटीची फार अपेक्षा । कां त्यजिली अंतरसाक्षा ।
धांव रे! पद्मदलाक्षा । सर्वांतर चित्तपरिक्षा ।
गुणगहना सर्वाध्यक्षा । श्रमहरणा येइ अलक्षा ।
स्मरहरप्रियकर यदुराया! ॥ भव० ॥ १ ॥
निढळावरि ठेवुनि पाणी[१] । अष्टदिशा पाहतों नयनीं ।
न येसी कां माझे ध्यानीं । जालों उदास अंतःकरणीं ।
तूं दासाचा अभिमानी । सज्जनजन वदती वदनीं ।
दुर करीं अविद्यात्मक[२] माया ॥ भव० ॥ २ ॥
कधिं नाहीं सुकृत घडलें । दुष्कृत बहु अंगीं भिडलें ।
तवनामीं मानस जडलें । म्यां तेंचि सख्या जिवीं धरिलें ।
............................|............................ ।
गोविंदा तारीं सखया! ॥ भव० ॥ ३ ॥

### पद ३२४ वें.

आलास पंढरीराया! जग हें ताराया ॥ ध्रुवपद. ॥
पतितपावन हे ब्रिद पायीं । शास्त्रें गर्जति साही ।
गणिका[३] उद्धरली त्वां लवलाही । तूं दिनजनसुखदाई[४] ।
दे क्षेम मला तूं सुख सदया ॥ जग० ॥ १ ॥
मायासरितेच्या दीर्घ प्रवाहीं । बुडलों भवजळडोहीं ।
आशामगरीनें धरिलें पायीं । सोडीनाच उपायीं ।
त्राता न दिसे रे! तुजविण सखया ॥ जग० ॥ २ ॥
आतां ताराया मजला दीना । यावें रुक्मिणिरमणा! ।
येथूनी काढावें रे अघशमना । स्वामी दीनोद्धरणा! ।
गोविंदावरि करि छाया[५] ॥ जग० ॥ ३ ॥

### पद ३२५ वें.

किति अंत पाहसिल माझा रे! गुणवंता! ।
तुजविण पलयुग समजतों पंढरीनाथा! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. हात. २. अविद्यायुक्त. ३. पिंगला नामक वेश्या. ४. दीनजनांस सुख देणारा. ५. कृपारूपी छाया.

पूर्वील पुण्य तव नाहीं माझे पदरीं ।
हा जन्म वृथा गेला देवा! कंसारी! ।
मन रैयनदिवस इच्छित परधन परनारी ।
दुःखाचे डोंगर जाले या संसारीं ।
शुकव्यास मुखें कीर्ती ऐकिली भारी ।
नामें तरले दोषाचे नामधारी ॥
चाल॥ द्विज अजामीळ पुत्रमिषें दोषी तरला । अजि गुणवंता! ।
शतकोटी ब्रह्महत्त्या वाल्मिक उद्धरिला । अजि गुणवंता! ।
मारिता हाक नेले वैकुंठा कैरिला । अजि गुणवंता! ।
नक्रें छळितां कौटाळुनि हृदयीं धरिला । अजि गुणवंता! ॥
उठाव॥ असे अमित दोषि तारियले काय चिंता ।
मी कदा सोडिना तुम्हासि अजि भगवंता! ॥ किति० ॥ १ ॥
मी लक्ष प्रकारें चुकलों कर्म ओढवलें ।
म्हणऊनि प्रभूपायाचें अंतर पडलें ।
दिधलें भाष्य परी मज कुणि कांहीं न घडलें ।
हे कामक्रोधमदमत्सर शरिरीं भिडले ।
अभिमाना हातीं माझें मन सांपडलें ।
यास्तव नाना कर्मांचें अंतर पडलें ॥
चाल॥ आतां अपराध क्षमा करीं विठ्ठलराया! । अजि गुणवंता! ।
ही मनोवृत्ती अर्पण केली पादिं जाया । अजि गुणवंता! ।
तूं तार किंवा ने निरैया माझी काया । अजि गुणवंता! ।
मी बुडतों तूं देहांत उभारुनि बाह्या । अजि गुणवंता! ॥
उठाव॥ केधवां येसि मज न कळे अनाथनाथा! ।
तूं तातमात गणगोत दीनजनभ्राता ॥ किति० ॥ २ ॥
अज्ञानपणीं बहु केले चाळे पाहीं ।
तूं क्षमा करीं गे! माझे विठाबाई! ।
परदेशीं कां मोकलिलें मज लवलाहीं ।
तुजविण भासतसे वोस दिशा मज दाही ।

---

१. रात्रदिवस. २. गजेंद्राला. ३. निरय=नरक. ४. सोडलें, टाकलें.

पहातां शिणले हे नेत्र करूं गत कायी? ।
विपरीत कल्पना बुडवीते भवडोहीं ॥
चाल ॥ तूं सकळ विश्वव्यापक नरहरि गुरुनाथा । अजि गुणवंता! ।
गोविंद द्वैतमति कल्पित नुरेचि आतां । अजि गुणवंता! ।
मी दास तुझा तूं मुक्तपुरीचा दाता । अजि गुणवंता! ।
गुरु अभयवरद कर ठेवीं माझे माथां । अजि गुणवंता! ॥
उठाव ॥ आतां उचित जें येईल प्रभुच्या चित्ता ।
करि क्लेशनिवारण स्वामी रुक्मिणीकांता! ॥ किति० ॥ ३ ॥